प्रकाशक :
श्री. मनोहर य. जोशी
बी.ए.बी कॉम.
प्रसाद प्रकाशन,
१८९२, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ३०.



शके १९०६



मुद्रक :
प्रमोद वि. बापट
स्मिता प्रिंटर्स
१०१९, सदाशिव पेठ
नागनाथ पाराजवळ
पुणे, ४११ ०३०

## प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद : आपली पुराणे' या योजनेतील पांचवा व शेवटचा संच आज प्रकाशित होत आहे. या संचात मत्स्यपुराण, कूर्मपुराण, गरुडपुराण, ब्रह्मांडपुराण व समालोचन ग्रंथ हे पांच ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत. व याबरोबरच ही योजना पूर्ण होत आहे. सर्वसामान्य माणसाची जिज्ञासा पूर्ण करणारा चार वेद व अठरा पुराणांचा एकत्रित प्रकाशनाचा अशा प्रकारचा हा मराठीतील पहिलाच प्रयत्न आहे. व वाचकांच्या उत्स्फूर्त सहकार्यामुळेच तो एवढ्या सहजतेने पूर्ण होत आहे. आजपर्यंत बहुतेक सर्व प्रयत्न अपुरेच राहिले आहेत, प्रत्येक प्रयत्नात प्रकाशकाला, 'वाचकांच्या सहभागाच्या अभावामुळे व अर्थातच त्यामुळे आलेल्या आर्थिक अडचणींमुळे प्रयत्न सोडून द्यावे लागले' असे खेदाने नमूद करावे लागलें आहे. पण आम्ही असे भाग्यवान की आम्हांला प्रचंड प्रतिसाद मिळाला व सर्व ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीच पूर्वीचे ग्रंथ पुनःपुन्हा छापावे लागले.

सुरुवातीला योजना जाहीर केली होती त्यावेळी प्रत्येक ग्रंथाचे व संपूर्ण संचाचे स्वरूप जसे राहील असे जाहीर केले होते. त्याप्रमाणेच सर्व योजना पूर्ण झाली आहे. प्रकाशनाचा कार्यक्रमही ठरल्याप्रमाणेच पार पडला. आहे. सर्वच कामात अनेकांचे मनापासून सहकार्य लाभले. श्री. स. कृ. देवधर व डॉ. प्र. न जोशी यांच्याबरोबरच्या चर्चेतूनच या योजनेने आकार घेतला. श्री. बाबूरावजी पारखे, स्मिताप्रेसचे श्री. प्रमोद बापट, सौष्ठव पुस्तकबांधणीचे कातुरे बंधू, तीर्थक्षेत्रांचे फोटो ज्यांनी दिले ते श्री. ल. ग. देशपांडे; अशा कितीतरी व्यक्तींचा सहभाग मला लाभला. या सर्वांचा अर्थातच मी ऋणी आहे.

ऑगस्ट १९८० मध्ये मी ही योजना जाहीर केली त्यावेळी २४ ग्रंथांचीच योजना जाहीर केली होती. नंतर विचारांती २५ व्या 'समालोचन' ग्रंथाची आवश्यकता भासू लागली. ठेवीच्या व्याजात सर्व हिशोब बसवायचा असल्याने प्रत्येक ग्रंथाची पृष्ठसंख्या आधीच निश्चित केली होती. परंतु ऐनवेळी ग्रंथाचा विषय व्यवस्थित पूर्ण व्हावा यासाठी अनेक ग्रंथांची पृष्ठसंख्या वाढवावी लागली. अशा तऱ्हेने मूळ योजनेपेक्षा सुमारे १००० पृष्ठे वाढली. तसेच प्रत्येक ग्रंथात दोन याप्रमाणे एकूण पन्नास रंगीत चित्रे देण्याचा निर्णयही नंतरच घेतला. यामुळे खर्च अर्थातच वाढत गेला, तसेच प्रत्येक संचाचा प्रकाशनसमारंभही वेगवेगळ्या ठिकाणी— नाशिक, मुंबई, नागपूर, पणजी व आता पुणे— येथे करण्याचेही नंतरच योजले. हे सर्व समारंभ वाचकांच्या अमाप उत्साहामुळे हजारोंच्या उपस्थितीत पार पडले.

दरवर्षी प्रसिद्ध होणारे संच गावोगावच्या वाचकांना कसे पाठवावेत हाही एक प्रश्नच होता. प्रत्येकवेळी संच पोस्टाने पाठविणे खर्चाचे व गैरसोयीचेही होते. शिवाय ग्रंथ खराब होण्याचीही भिती होती. योजनेच्या वाचकांनी यातही सहकार्य केले. प्रत्येक गावी एका सभासदाकडे त्या गावातील सर्व संच पाठवावेत व तेथून सर्वांनी ते न्यावेत असे आम्ही ठरविले. हे संच-वितरणाचे काम करण्यासही वाचक आपणहून पुढे आले व त्यासाठी येणारा खर्चही घेण्याचे त्यांनी नाकारले.

ही योजना मूळातच शुद्ध व्यावसायिक प्रकाशन म्हणून मी हाती घेतली नव्हती. खरे म्हणजे माझा स्वभावही अगदी काटेकोर व्यावसायिकाचा नाही. व्यवहाराचा ताळेबंद सोडून चालणार नाही, याचे जरी मी भान ठेवून होतो तरी ऐनवेळी खर्च वाढत गेले तरी ग्रंथांच्या परिपूर्णतेत त्रुटी राहणार नाही अशी काळजी मी घेतली आहे. सुदैवाने माझा हेतू वाचकांनीही जाणला व त्यांच्या वाढत्या पाठबळाने माझा उत्साह वर्धिष्णु होत गेला.

योजनेच्या निमित्ताने अनेकांच्या भेटी-गाठी झाल्या. हजारो वाचक मला प्रत्यक्ष भेटून गेले. परगावचे हजारो वाचक आवर्जून प्रत्येक वेळी पत्र पाठवितात, तसेच पुण्यात आल्यावर मुद्दाम भेटूनही जातात. अशी प्रत्येक भेट हा माझा आनंदाचा ठेवा आहे. अनेकांच्या भेटी झाल्या, चर्चा झाल्या, अभिनंदनाचा वर्षाव झाला, काहींनी त्यांना वाटलेल्या त्रुटीही सांगितल्या, पण या सर्वांपेक्षा मला प्रकर्षाने जाणवत होते ते हे, की या सर्व वाङ्मयाबद्दल वाचकाला अपार कुतूहल आहे व ते नेमकेपणाने जाणून घेण्यास ही योजना त्यांना उपयोगी पडत आहे.

ठेवीच्या व्याजात ग्रंथ हा व्यवहारही सगळ्यांनाच सोयीचा वाटला अर्थात उभयपक्षी तो सोयीचा आहे. यापुढे अशीच आणखी प्रकाशने करण्याचे वाचकांनीच सुचवले. माझाही तसा विचार होताच. त्यामुळेच **'आपली उपनिषदे : आपली पुराणे'** ही पुढील योजना मी तयार केली. वेद-पुराणांच्या बहुसंख्य वाचकांनी त्यातही सहभागी होत असल्याचे कळविले आहेच. ज्यांनी अजून आपली संमती कळविलेली नसेल त्यांनी ती त्वरित कळवावी व हा आनंदसोहळा यापुढेही चालू ठेवण्याचा मला सक्रीय आशीर्वाद द्यावा अशी विनंती आहे.

गेल्या काही वर्षांत अनेकांनी अनेक तऱ्हांचे प्रश्न मला विचारले. त्यांत बहुतेकांनी एक प्रश्न मला नेहमीच विचारला की, "अशी प्रकाशन-योजना प्रथम तुम्हीच केली व तिला प्रचंड यश मिळाले, आपली योजना यशस्वी झाली याचा आनंद, अभिमान तुम्हांला वाटतो की नाही ?"

मी प्रत्येक वेळी जे उत्तर दिले ते मला इथे जरूर नमूद करून ठेवावेसे वाटते. योजना यशस्वी झाली यात अभिमानाचा भाग माझ्या दृष्टीनें फारसा नाही. आनंद जरूर झाला पण त्या आनंदाची जात जरा वेगळी आहे. वेद व पुराणे या स्वरूपात वाचकांसमोर येणे ही काळाची गरज होती. परमेश्वरी इच्छेनें हे काम आज ना उद्या होणारच होते, पण हे काम करण्यासाठी परमेश्वराने साधन म्हणून मला निवडले व माझ्यामार्फत हे काम पूर्ण करून घेतले याचा मला जरूर आनंद वाटतो.

घेतला आनंद वाटिला आनंद
यापरता आनंद आणखी कोणता ?

मनोहर य. जोशी

## लेखकाचे निवेदन

'आपले वेद, आपली पुराणे' या लोकप्रिय ग्रंथमालेतील पांचव्या संचातील 'मत्स्यपुराण' नावाचे एक महत्त्वाचे पुराण वाचकांच्या हाती देताना मला मोठा संतोष वाटत आहे. ठरलेल्या वेळेच्या आधीच आमची ही यशस्वी ग्रंथमाला पूर्ण होत आहे. याचे श्रेय आमचा ग्राहकवर्ग, मुद्रक, व्यावसायिक सहकारी यांना व श्रीव्यासमुनी यांच्या कृपेला देणे इष्ट ठरणार आहे.

आपल्या प्राचीन परंपरेत पुराणांचा धागा वेदकालापासून आहे. अठरा महापुराणे, अठरा उपपुराणे, यांचा प्रचंड विस्तार, त्यांत वेळोवेळी पडलेली भर, त्यांतील पाल्हाळ व पुनरुक्ती आणि मुख्यत: संस्कृत भाषा; यांमुळे पुराणांतील सांस्कृतिक धन आजपर्यंत सर्वसामान्य लोकांच्या कक्षेत आले नव्हते. मूळ संस्कृत पुराणेही सहजासहजी उपलब्ध होत नाहीत. त्यांच्या अवाढव्य विस्तारामुळें ती वाचणेही अशक्य बनते. म्हणून त्यांचे रूपांतर आजच्या भाषेत करण्याची ही योजना सर्वांनाच पसंत पडली. या ग्रंथमालेतील पुराणे ही मूळ संस्कृतातील पुराणांचे अक्षरशः भाषांतरे नाहीत. निवडक विषयांची पुन्हा रचना करून, पुनरुक्ती टाळून, मूळ कथानकास वा निरूपणास धक्का लागणार नाही, अशा हेतूने या ग्रंथांची मांडणी केलेली आहे. माझे स्वत:चे असे या पुराणग्रंथांत काहीही नाही हे कबूल करणे अगत्याचे आहे. संस्कृत विद्येचे संशोधक, प्राचीन संस्कृतीचे अभ्यासक यांच्यासाठी हा उपक्रम नाही हे स्पष्टच आहे.

संतबोध, संतचरित्रे, संतकार्य यांच्या चिंतनात व मननात निम्मे आयुष्य गेल्यावर मी संतवाङमयातील अनेक संदर्भ उपनिषदांत व पुराणांत शोधू लागलो. 'अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें' असे पुराणांविषयी ज्ञानेश्वर का म्हणतात, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला.

घरी बहुतेक सर्व पुराणे होतीच. त्यांच्या अभ्यासात आठ-दहा वर्षे गली. या अभ्यासातून ही पुराणग्रंथमाला आकारास आली. ' प्रसाद ' प्रकाशनचे श्री. मनोहर य. जोशी यांची कुशलतापूर्वक दृष्टी, भक्कम पाया म्हणून या योजनेस लाभली. पुराणांचे हे नवदर्शन वाचकांना पसंत पडले आहे, असे वाटते. पुराणांतील चमत्कार, विकृत संकल्पना, अघटित प्रसंग, पाल्हाळ आणि मुख्यतः आजच्या या नव्या काळात पुराणांच्या दर्शनाचा उपयोग; यासंबंधी एक समालोचनात्मक ग्रंथ याच संचाबरोबर वाचकांच्या हाती देत आहोत.

हा ' मत्स्यपुराणा 'चा ग्रंथ तयार करताना मला सन १८७४ साली रावजी श्रीधर गोंधळेकर यांनी छापलेल्या त्रिखंडात्मक पुराणाचा व सन १९८३ साली गीताप्रेसने प्रसिद्ध केलेल्या मत्स्यपुराणांकाचा उपयोग झाला आहे.

—प्र. न. जोशी

' रेणुका ' लक्ष्मीपार्क
नवी पेठ पुणे ३०.

# मत्स्यपुराणपरिचय

**भगवान मत्स्यांनी सांगितलेले पुराण**

श्रुतीनां यत्र कल्पादौ प्रवृत्त्यर्थं जनार्दनः ।
मत्स्यरूपेण मनवे नरसिंहोपवर्णनम् ।।
अधिकृत्याब्रवीत् सप्तकल्पवृत्तं मुनीश्वराः ।
तन्मात्स्यमिति जानीध्वं सहस्राणि चतुर्दश ।।

(मत्स्यपुराण ५३-४९–५०)

ज्या पुराणात कल्पाच्या प्रारंभी प्रवृत्तीसाठी मत्स्यरूपी जनार्दनांनी मनूला नरसिंहवर्णनप्रसंगी सप्त कल्पांचा विषय समजावून सांगितला, ते चौदा हजार श्लोकांचे मत्स्यपुराण असे श्रेष्ठ मुनींनो, तुम्ही जाणावे. हे खुद्द मत्स्यपुराणातच सांगितले आहे.

भगवान विष्णूंनी वैवस्वत मनूस मत्स्यरूपाने दर्शन देऊन हे पुराण कथन केल्याची कथा पहिल्याच अध्यायात आली आहे. मनू एकदा आपल्या आश्रमात पितरांसाठी तर्पण करीत होता. त्याच्या हातातील पाण्यात त्याला एक लहान मासा दिसला. मनूला त्याची दया वाटली व त्याने त्याला आपल्या कमंडलूत ठेवून दिले. तेथे तो सोळा अंगुळे वाढला आणि राजाला म्हणाला, 'माझं रक्षण कर.' तेव्हा मनूने त्याला मोठ्या रांजणात ठेवले, पण तेथेही त्याचा आकार वाढला. तेथून तो विहिरीत गेला, तेथून सरोवरात, तेथून तो समुद्रात गेला तरी त्याचा आकार वाढतच गेला. मग मात्र हा सामान्य मासा नाही, हे मनूच्या ध्यानात येऊन त्याने त्या मत्स्यास नमस्कार करून म्हटले, 'आपण कोण आहात ?' त्यावर मत्स्य म्हणाला, 'मी विष्णू असून तुला भविष्याची सूचना देण्यासाठी आलो आहे. थोड्याच दिवसांनी जलप्रलय होऊन ही सृष्टी नाहीशी होणार आहे. त्यावेळी तू सर्व जीवसृष्टीतील नरमाद्यांच्या

जोडच्या घेऊन एका नौकेंत बस. ती नौका माझ्या शिंगास बांध. म्हणजे मी त्या जलसागरातून तुझं रक्षण करीन.' याप्रमाणे मनूनें केल्यावर मत्स्यरूपीं विष्णूंनी त्याला हे पुराण सांगितलें. म्हणून यास मत्स्यपुराण असे नाव मिळाले.

## मत्स्यपुराणाची रूपरेखा

हे पुराण अठरा महापुराणांपैकी एक असून याचा क्रम सोळावा आहे. याची श्लोकसंख्या सुमारें चौदा-पंधरा हजारांची आहे. देवी-भागवतात मात्र या पुराणाची संख्या एकोणीस हजार सांगितली आहे. या पुराणाचे एकूण अध्याय दोनशेएक्याण्णव असून शेवटच्या अध्यायात प्रमुख विषयांच्या अनुक्रमणिकेसहित मत्स्यपुराणाचा महिमा निवेदन केला आहे.

या पुराणात सुरुवातीस मन्वन्तरांचे सर्वसामान्य वर्णन आले आहे. नंतर पितृवंश मात्र विस्तारानें वर्णन केला आहे. तेराव्या अध्यायात वैराज, चौदाव्या अध्यायात अग्निष्वात्त, पंधराव्यात बर्हिषद या पितरांचे वंश दिले आहेत. सोळा ते तेविसाव्या अध्यायांत श्राद्धकल्पाचे वर्णन आले आहे. ययातीच्या चरित्राबरोबर सोमवंशाच्या वाढीचे वर्णन विस्तारानें आले आहे. पंचावन्न ते एकशेदोन या अध्यायांत विविध व्रतविधींची माहिती आली आहे. यानंतरच्या दहा अध्यायांत प्रयाग-क्षेत्राचे माहात्म्य आले आहे. काशीचे महत्त्वही पुढील पांच अध्यायांत आले आहे. यानंतरच्या आठ अध्यायांत नर्मदानदीचे माहात्म्य आले आहे.

त्रेपन्नाव्या अध्यायात अठरा महापुराणे व उपपुराणे यांची माहिती विषयांच्या अनुक्रमणिकेसह आलेली आहे. पुराणांचा क्रमबद्ध विकास ध्यानात येण्याची सोय या माहितीमुळे झाली आहे. भृगू, अंगिरा, अत्री, विश्वामित्र, कश्यप, वसिष्ठ, पराशर, अगस्त्य या ऋषींच्या वंशांची वर्णनेही एकशेपंचाण्णव ते दोनशेदोन या अध्यायांतून आलेली आहेत. अध्यायक्रमांक दोनशेपंधरा ते दोनशेत्रेचाळीसपर्यंत राजधर्माचे विस्तृत वर्णन आले आहे. दैव, पुरुषप्रयत्न, साम, दाम, दंड, भेद, दुर्ग, यात्रा,

साहाय्यसंपत्ती इत्यादी विविध प्रकारच्या अंगांनी राजधर्माचे महत्त्व विशद केले आहे.

भिन्न भिन्न देवांच्या प्रतिमा कशा कराव्यात, त्यांची मापे कशी असावीत, त्यांची प्रतिष्ठापना कशी करावी, ताल-मान कसे व किती धरावे, प्रासाद, देवालये, मंडप इत्यादींची निर्मिती कशी करावी, वास्तु-शांतिविधी कसा असावा; अशा काही महत्त्वाच्या बाबींनी हे पुराण समृद्ध बनले आहे. काही अध्यायांतून हिमालयाचे, ऐरावतीनदीचे, कैलासाचे सुरेख वर्णन आले आहे. कालिदासाने 'कुमारसंभव' लिहिताना या वर्णनाचा उपयोग केला असावा, असा जाणत्यांचा तर्क आहे. भक्ती, कर्मयोग यांचेही महत्त्व या पुराणाने वर्णन केले आहे. आत्मज्ञानी पुरुषाला कर्म सोडता येणार नाही, असा एक महत्त्वाचा सिद्धांत यात आला आहे.

अनेक धर्मशास्त्रीय विषय या पुराणात विस्ताराने आले आहेत. मनू व याज्ञवल्क्य यांच्या स्मृतींमधील कित्येक श्लोक या पुराणात दिसतात. हरिहरांचे ऐक्य व त्यांच्या अवतारांचे रहस्य हे पुराण वर्णन करताना दिसते. नारदपुराण, विष्णुपुराण, भागवतपुराण, महाभारत इत्यादी ग्रंथांत या पुराणाचा उल्लेख आला आहे. मत्स्यपुराणातील पंचवीस ते बेचाळीस या अध्यायांतील पांचशेंसहा श्लोक जसेच्या तसे महाभारतातील आदिपर्वाच्या ययातीच्या उपाख्यानात आले आहेत. आपस्तंवसूत्रांत या पुराणातील एक उतारा आधार म्हणून घेतला आहे.

## मत्स्यपुराणातील कथासृष्टी

इतर अनेक पुराणांप्रमाणे मत्स्यपुराण अनेक प्रकारच्या आख्यानांनी, कथांनी समृद्ध बनले आहे. महाराज पृथूचे आख्यान, त्याने केलेले पृथ्वीचे दोहन, महर्षी कौशिकांचे पुत्र व पिपीलिकेची कथा, ब्रह्मदत्ताची कथा, चार चक्रवाक, चंद्राची उत्पत्ती, त्याचा विवाह, तारेवर त्याची आसक्ती, तारेपासून बुधाची उत्पत्ती, पुरूरवा व उर्वशी यांचे आख्यान, नहुषपुत्र ययातीचे आख्यान; इत्यादी कथाभाग या पुराणाने मनापासून वर्णन केला आहे.

कच, देवयानी, शर्मिष्ठा, शुक्राचार्य, वृषपर्वा इत्यादींची कथा या पुराणानें विस्ताराने निवेदन केली आहे. ययाती व अष्टक यांचा संवाद तत्त्वज्ञानपर आहे. वसुमान, शिबी, कार्तवीर्य अर्जुन, महर्षी आपव, स्यमंतकमणी, श्रीकृष्णांचे चरित्र, देवासुरांचा संग्राम, शुक्राचार्यांना शिवांकडून वरप्राप्ती, इंद्रपुत्री जयंती म्हणजेच देवयानी, भगवंतांचे विविध अवतार, अगस्त्य, वसिष्ठ, उर्वशी यांच्या कथा, राजा पुष्पवाहनाचे आख्यान, राजा पुरूरव्याचा वृत्तांत, दानवश्रेष्ठ मयाची तपस्या, त्याच्याकडून त्रिपुराची निर्मिती, दैत्यांचे अत्याचार, देवासुरांतील युद्ध, विद्युन्मालीचा वध, तारकासुराचा वध, असुरस्त्रियांची क्रीडा, त्रिपुराचा नाश, कार्तिकस्वामी, हिरण्यकशिपू यांच्या कथा, सावित्रीचे विस्तृत आख्यान; अशा महत्त्वाच्या कथांनी हे पुराण समृद्ध बनले आहे.

## स्थान-माहात्म्ये व सृष्टिक्रम

मत्स्यपुराणात अनेक तीर्थांचा विस्तृत परिचय आला आहे. अनेक अध्यायांतून प्रयागचे माहात्म्य विस्ताराने वर्णन करण्यात आले आहे. प्रयागला गेल्यानें कोणते फळ मिळते, प्रयागमधील विविध तीर्थे कोणती? गंगामाहात्म्य, यमुनामाहात्म्य, प्रयागातील सर्व तीर्थे, ब्रह्मदेव, विष्णू, शिव यांचा प्रयागातील निवास; इत्यादी अंगांनी मत्स्यपुराणात प्रयागचे महत्त्व विशद करण्यात आले आहे. याचप्रमाणे हिमालय, कैलास, ऐरावतीनदी, काशी, अमरकंटक, कपिलानदी, ज्वालेश्वरतीर्थ, कावेरीसंगम, नर्मदेच्या उत्तर-दक्षिण तटांवरील तीर्थे, इत्यादी तीर्थस्थानांची विशेष माहिती हे पुराण देताना दिसते.

सृष्टिक्रमानुसार विविध जीवांची, वंशांची निर्मिती, त्यांचा विकास हे पुराणांचे खास विषय आहेत. मत्स्यपुराणातही सृष्टीच्या विकासाची रूपरेखा आलेली आहे. ब्रह्मदेवांची पांच मुखे, सरस्वती, मनू यांची निर्मिती, आदिसृष्टीची निर्मिती, दक्षकन्यांची उत्पत्ती, देवादिकांची निर्मिती, कश्यपांचा वंश, मरुतांची उत्पत्ती, मन्वन्तरांचे चौदा देव व सप्तर्षी, सूर्यवंश, चंद्रवंश, इलाचा वृत्तांत, इक्ष्वाकुवंशवर्णन, पितृवंशवर्णन, यदुवंश, क्रोष्टूचा वंश, वृष्णीचा वंश, श्रीकृष्णांचा वंश, तुर्वसू

व द्रह्यू यांचे वंश, भरताचा वंश, भृगूंचा वंश, अंगिरांचा वंश, विश्वामित्रांचा वंश, कश्यपांचा वंश, वसिष्ठांचा वंश, अगस्त्यांचा वंश, धर्मऋषींचा वंश; इत्यादी वंशविस्तारही या पुराणात आला आहे.

## विविध व्रतविधींची समृद्धी

मत्स्यपुराणात अनेक व्रतविधींची विस्ताराने वर्णने आली आहेत. देवीच्या एकशेआठ नामांचा पाठ आला आहे. श्राद्धाचे स्वरूप, त्याचे प्रकार, श्राद्धासाठी उपयुक्त तीर्थस्थाने; अशा अनेक आचारधर्मांचे विवेचन यात आले आहे. सातव्या अध्यायात मदनद्वादशीव्रताचा सविस्तर परिचय आला आहे. महर्षी वसिष्ठादींनी दितीसाठी या व्रताचा परिचय करून दिला. व्रतधारीने चैत्रातील शुक्लद्वादशीस श्वेत तांदुळांनी परिपूर्ण असा एक छिद्ररहित घट स्थापन करावा. त्यावर श्वेतचंदनाचे अनुलेपन करावे. दोन श्वेतवस्त्रांनी तो आच्छादित करावा. नाना प्रकारची फळे, ऊस, विविध प्रकारची अन्नसामग्री, गीत-वाद्य, भगवान विष्णूंची अर्चना इत्यादी तपशील दिला आहे. विष्णूंची पूजा करताना म्हणावे; 'विष्णूंच्या पायांत कामदेव, जंघांत सौभाग्यदाता, मांड्यांत स्मर, कटिभागात मन्मथ, उदरात स्वच्छोदर, वक्षःस्थलात अनंग, मुखात पद्ममुख, बाहूंत पंचशर, मस्तकात सर्वात्मा, यांना नमस्कार असो.'

अशीच आणखीही व्रते मत्स्यपुराणाने वर्णिलेली आहेत. नक्षत्रपुरुषव्रत, आदित्यशयनव्रतविधी, श्रीकृष्णजन्माष्टमीव्रत, रोहिणीचंद्रशयनव्रत, सौभाग्यशयनव्रत, अनंततृतीयाव्रतविधी, रसकल्याणिनीव्रतविधी, आर्द्रानंदकरीतृतीयाव्रत, अक्षयतृतीयाव्रत, सारस्वतव्रत, सप्तमीस्नपनविधी, भीमद्वादशी व्रतविधी, पण्यस्त्रीव्रतविधी, अशून्यशयनव्रतविधी, अंगारकव्रतविधी, कल्याणसप्तमीव्रत, मंदारसप्तमीव्रत, शुभसप्तमीव्रत, विशोकद्वादशी, गुडधेनुदानविधी, माहेश्वरव्रतविधी, सर्वफल त्यागव्रतविधान, आदित्यवारकल्पविधान, संक्रांतिव्रत; अशा किती व्रतविधींची नावे सांगावीत ?

## मत्स्यपुराणाचा स्थलकालविचार

या पुराणाच्या उत्पत्तिस्थानासंबंधी बरेच मतभेद आहेत. कोणी याची निर्मिती दक्षिणेत झाली असे म्हणतात, तर कोणी हे पुराण आंध्रात तयार झाल्याचे सांगतात. कोणी नासिकच्या प्रदेशात या पुराणाची निर्मिती झाल्याचे मानतात, आणखी कोणी नर्मदेच्या तटावर हे पुराण तयार झाल्याचे सांगतात. या पुराणास नर्मदेचे माहात्म्य विशेष आवडीने गायिले आहे असे दिसते. प्रलयकाली सर्व वस्तूंचा नाश झाला तरी नर्मदा मात्र शिल्लक राहील असे यात म्हटले आहे.

एकः स्थास्यसि देवेषु दग्धेष्वपि परन्तप ।
सोमसूर्यावहं ब्रह्मा चतुर्लोकसमन्वितः ॥
नर्मदा च नदी पुण्या मार्कण्डेयो महानृषिः

(मत्स्यपुराण २.१२-१४)

मत्स्यभगवान मनूस सांगतात, 'राजा, आगामी प्रलयकालात सर्व देव दग्ध झाले तरी तू एकटाच राहशील. तसेच चंद्र,सूर्य, मी चतुर्लोक समन्वित ब्रह्मदेव, पुण्यप्रद नर्मदानदी, महर्षी मार्कंडेय तेवढे शिल्लक राहातील.' नर्मदानदीच्या तीरांवरील लहान लहान स्थानांचीही नोंद पुराणकर्त्याने केली आहे. नर्मदा व ओंकारेश्वराजवळील कावेरी यांच्या संगमाचेही वर्णन यात आले आहे. हा संगम लेखकाने गंगा-यमुना संगमाप्रमाणे पवित्र मानलेला आहे.

या पुराणाचा इतर प्राचीन ग्रंथांशी आलेला संबंध ध्यानात घेता हे सन २०० ते ३०० या काळात तयार झाले असावे, असा जाणत्यांचा अंदाज आहे. तरी या पुराणाचा काही मोठा भाग फार प्राचीन असावा, असाही तर्क केला गेला आहे. आपस्तंबसूत्रांत मत्स्यपुराणाचा एक उतारा असल्याने हे पुराण सनपूर्व ६०० ते ३०० पर्यंत तयार झाले असावे, असाही एक अंदाज आहे.

## अमृतमय सुभाषिते

या मत्स्यपुराणात उपदेशवजा भाग भरपूर आहे. प्रसंगी सुभाषित-

वजा वाक्यांची प्रेरणाही लक्षणीय आहे. कर्मयोगाचे माहात्म्य सांगताना म्हटले आहे;

यस्मिन्कर्मणि यस्य स्याद्विशेषेण च कौशलम् ।
तस्मिन्कर्मणि तं राजा परीक्ष्य विनिवेशयेत् ।।

ज्याचे ज्या कामात विशेष कौशल्य असेल, त्याची राजाने परीक्षा करावी व त्या त्या कर्मात राजाने त्याची योजना करावी. राजाची लक्ष्मी कशी वाढते, राजाने प्रजेशी कसे वागावे हे सांगताना हे पुराण म्हणते;

तथा च रागप्रभवा हि लक्ष्मीः राज्ञां मता भास्करवंशचंद्र ।
तस्मात्प्रयत्नेन नरेन्द्रमुख्य कार्योऽनुरागो भुवि मानवेषु ।।

सूर्यकलभूषण राजा, राजाची लक्ष्मी प्रजेच्या प्रेमाने वाढते. म्हणून राजाने प्रजेच्या सुखासाठी नेहमी प्रयत्न करावा. कर्मयोगाचे महत्त्व विशद करताना ह्या पुराणाने म्हटले आहे;

कर्मयोगोद्भवं ज्ञानं तस्मात्तत्परमं पदम् ।
कर्मज्ञानोद्भवं ब्रह्म न च ज्ञानकर्मणः ।।

कर्मयोगापासून ज्ञानाची प्राप्ती होते. कर्म व ज्ञान यांपासून ब्रह्माची प्राप्ती होते. कर्मावाचून ज्ञान मिळत नाही.

# अनुक्रमणिका

## १ प्रास्ताविक



## २ कथा-उपकथा

### ३ तीर्थस्थानमाहात्म्य

## ५. सदाचारदर्शन

## ६. तत्त्वज्ञानदर्शन



## ७. उपसंहार व महिमा



## ८. स्तोत्रमंजूषा

# मत्स्यपुराण

## १. प्रास्ताविक

**मंगलाचरण**

प्रचंडताण्डवाटोपे प्रक्षिप्ता येन दिग्गजाः ।
भवन्तु विघ्नभङ्गाय भवस्य चरणाम्बुजाः ।।

' प्रचंड वेगाने प्रवृत्त झालेल्या तांडवनृत्याच्या आवेशात ज्यांच्याद्वारे दिग्गजगण दूर फेकले गेले आहेत, त्या भगवान शंकरांच्या चरणकलमांनी आम्हां सर्वांच्या विघ्नांचा नाश करावा.'

पातालादुत्पतिष्णोर्मकरवसतायो यस्य पुच्छाभिधाता- ।
दूर्ध्वं ब्रह्माण्डखण्डव्यतिकरविहितव्यत्ययेतापतन्ति ।।
विष्णोर्मत्स्यावतारे सकलवसुमतीमण्डलं व्यश्नुवाना- ।
स्तस्यास्योदीरितानां ध्वनिरपहरतादश्रियं वः श्रुतीनाम् ।।

' मत्स्यावताराच्या वेळी पाताळातून वर उसळणाऱ्या ज्या भगवान विष्णूंच्या पुच्छाच्या आघाताने समुद्र उसळून गेला, ब्रह्मांडखंडाच्या संपर्काने उत्पन्न झालेल्या व अस्ताव्यस्त झालेल्या संपूर्ण पृथ्वीमंडलास व्यापून पुन्हा खाली पाडले जाते, त्या भगवानांच्या मुखातून उच्चारित अशा श्रुतींच्या ध्वनींनी आपणां सर्वांच्या अमंगलाचा नाश

व्हावा.'

**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत्**

'नारायण, नरश्रेष्ठ नर व सरस्वती यांना नमस्कार करून जयाचा म्हणजे महाभारत, पुराणादींचा पाठ करावयास हवा.' तो अजन्मा असूनही क्रियेशी संपर्क असल्याने 'नारायण' या नावाने ओळखला जातो. सत्त्व, रज, तम असे त्याचे त्रिगुणरूप आहे. ऋक्, यजु:, साम अशा त्रिवेदांनी तो ओळखला जातो, त्या स्वयंभू भगवानांना नमस्कार असो.

## ब्रह्मदेव व मनू

एकदा दीर्घकालीन यज्ञ संपल्यावर नैमिषारण्यवासी शौनकादी मुनींनी एकाग्रचित्त होऊन बसलेल्या सूताचे वारंवार अभिनंदन करून त्याला पुराणासंबंधी, धार्मिक सुंदर कथांसंबंधी जिज्ञासा प्रकट करून विचारिले; 'निष्पाप सूता, आतापर्यंत आपण आम्हांस अमृततुल्य अशा पुराणांचं कथन केलंत. त्याच पुराणांचं आणखी एकदा श्रवण घडावं, अशी आमची इच्छा आहे. मुने, ऐश्वर्यशाली जगदीश्वरानं या सृष्टीची रचना कशी केली? त्या भगवान विष्णूंना कोणत्या कारणासाठी मत्स्य-रूप धारण करावं लागलं? शंकरांना भैरवत्वाची, पुरारित्वाची पदवी कशी प्राप्त झाली? ते वृषभध्वज कपालमालाधारी कसे बनले? सूता, या सर्व प्रश्नांचं आपण क्रमवार, विस्तारानं वर्णन करावं. यासंबंधी, आपण जे अमृततुल्य शब्द बोलाल, ते ऐकून आमची तृप्ती होत नाही.'

यावर सूत म्हणाला, 'ब्राह्मणांनो, पूर्वी भगवान गदाधरांनी ज्या मत्स्यपुराणाचं वर्णन केलं होतं, त्याचं विवरण आज तुम्ही ऐकावं. हे पुण्यप्रद, परमपवित्र व आयुष्यवर्धक आहे. प्राचीनकाळी सूर्यपुत्र मनूनं पुत्रावर राज्यभार सोपवून मलयाचलाकडं तपासाठी प्रयाण केलं. तो क्षमाशील, आत्मगुणांनी संपन्न, सुखदु:खांना समान मानणारा, उत्कृष्ट वीर होता. मनूनं त्या पर्वतावर तप करून उत्तम योगाची प्राप्ती करून

घेतली. असं तप करण्यात कोटयवधी वर्षं गेली.' सूताने सर्व कथा निवेदन केली.

त्यानंतर त्याला ब्रह्मदेव प्रसन्न झाले. ते राजाला म्हणाले, 'वर माग.' तेव्हा महाराज मनूने पितामह ब्रह्मदेवांना प्रणाम करून म्हटले, 'भगवन्, मी आपणांस केवळ एकच वर मागतो. प्रलयाचा काळ उपस्थित झाला की मी सर्व स्थावरजंगम जीवसमूहांचं रक्षण करण्यास समर्थ व्हावं.' विश्वात्मा ब्रह्मदेवांनी त्याला 'तथास्तु' म्हणून आशीर्वाद दिला. देवांकडून पुष्पवृष्टी झाली. ब्रह्मदेव तेथेच अंतर्धान पावले.

## भगवान मत्स्य व मनू

एका समयाची गोष्ट आहे. आश्रमात पितृतर्पण करताना मनूच्या हातातील जलात एक मत्स्यी आली. त्या मत्स्यीचे रूप पाहून राजा मनू दयार्द्र झाला. त्याने तिला कमंडलूत घालून तो तिचे पालनपोषण करू लागला. काही दिवसांनी ती मत्सी मत्स्यरूपाने सोळा अंगुले मोठी झाली. 'रक्षण करा. रक्षण करा.' असे तो मत्स्य म्हणू लागला. तेव्हा राजाने त्या जलचारी जीवास मातीच्या एका घड्यात ठेविले. तेथे तो एका रात्रीत तीन हात वाढला. पुन्हा त्या मत्स्याने सूर्यपुत्र मनूस आर्तवाणीने म्हटले, 'राजन्, मी आपणांस शरण आलो आहे. माझं आपण रक्षण करावं.' तेव्हा त्या सूर्यनंदन मनूने त्या मत्स्यास विहिरीत स्थान दिले. पण एके दिवशी तो मत्स्य त्या विहिरीतही मावू शकला नाही. तेव्हा राजाने त्यास सरोवरात ठेवून दिले. तेथेही तो एक योजन मोठा होऊन दीनवाणीने राजास म्हणाला, 'नृपश्रेष्ठ, माझं रक्षण करावं,'

त्यानंतर राजाने त्यास गंगेत सोडून दिले. तेथेही त्याने आणखी विशाल रूप धारण केले. तेव्हा भूपालाने त्यास समुद्रात सोडून दिले. तेव्हा त्या मत्स्याने संपूर्ण समुद्र व्यापून टाकला. त्यावेळी मनूने भयभीत होऊन त्याला म्हटले, 'आपण कुणी असुरराज तर नाही? आपण वासुदेव भगवान आहात का? नाही तर असा चमत्कार होता ना. असा कोटयवधी योजनांचा विस्तार कधी होऊ शकतो? केशवा, मला माहीत

आहे की, आपण मत्स्यरूप धारण करून मला खिन्न करीत आहात. हृषीकेशा, आपण जगदीश्वर, या जगाचं निवासस्थान आहात. आपणांस माझा नमस्कार असो.'

त्यानंतर त्या मत्स्यरूपी भगवान जनार्दनांनी म्हटले, ' निष्पाप, ठीक आहे. तू मला चांगलं ओळखलंस. भूपाल, थोड्याच वेळात पर्वत, वनं, काननं यांसहित ही पृथ्वी जलमग्न होणार आहे. म्हणून पृथ्वीपते, सर्व जीवसमूहांचं रक्षण करण्यासाठी सर्व देवगणांनी ही नौका निर्माण केली आहे. सुव्रता, जितके स्वेदज, अंडज, उद्भिज जीव आहेत, जितके जरायुज जीव आहेत, त्या सर्व अनाथांना तू या नौकेत चढव. तू त्यांचं रक्षण कर. राजन्, जेव्हा युगान्ताच्या वायूनं ही नौका डगमगू लागेल, तेव्हा तू तिला माझ्या या शिंगाला बांधून टाक. त्यानंतर पृथ्वीपते, प्रलय समाप्त झाल्यावर तू सर्व जगातील स्थावरजंगम प्राण्यांचा प्रजापती होशील. कृतयुगाच्या प्रारंभी सर्वज्ञ व धैर्यशाली नरेशाच्या रूपात तू मन्वन्तराचा अधिपती होशील. त्यावेळी देवगण तुझी पूजा करतील.'

भगवान मत्स्यांकडून हे सर्व ऐकल्यावर मनूने भगवान मधुसूदनास प्रश्न केला, ' भगवन्, हा युगान्तप्रलय किती वर्षांनी येईल ? नाथ, मी सर्व जीवांचं रक्षण कसं करू ? मधुसूदना, आपली व माझी भेट पुनः कशी होणार ?' यावर भगवान मत्स्य म्हणाले, ' महामुने, आजपासून शंभर वर्षेपर्यंत या भूतलावर वृष्टी होणार नाही. त्यामुळं परम अमांगलिक व अत्यंत भयंकर दुष्काळ पडेल. त्यानंतर युगान्तप्रलय उपस्थित झाल्यावर तप्त अंगारांची वृष्टी करणारी सूर्याची सात भयंकर किरणं छोट्या-मोठ्या जीवांचा संहार करू लागतील. वडवानलही अत्यंत भयंकर रूप धारण करील. पाताळातून वर येऊन संकर्षणाच्या मुखातील विषाग्नी व भगवान रुद्रांच्या तिसऱ्या डोळ्यांतील नेत्राग्नी या तीनही लोकांना भस्म करतील. परंतपा, अशा प्रकारे जेव्हा सर्व सृष्टी जळून भस्म होईल, गगनमंडल उष्णतेनं संतप्त होईल, देवदेवता व नक्षत्रं यांच्यासहित सर्व जग नष्ट होऊन जाईल, त्यावेळी संवर्त, भीमनाद, द्रोण, चंड, बलाहक, विद्युत्पातक, शोण असे सात

प्रलयकारी मेघ जलाची वृष्टी करू लागतील. सर्व पृथ्वी आप्लावित होऊन जाईल. सारे समुद्र क्षुब्ध होऊन एकमेकांत मिसळतील. तीनही लोक पूर्णरूपानं एकार्णवाच्या रूपात परिणत होतील.

'सुव्रता, त्या वेळी तू ही वेदरूपी नौका ग्रहण करून सर्व जीवांना व बीजांना तीवर घेऊन, मी दिलेल्या दोरीनं ही नाव माझ्या शिंगास बांधून टाक. परंतपा, अशा भीषण काळात सर्व देवसमूह जळून भस्म झाला तरी, माझ्या प्रभावानं सुरक्षित राहून तू एकमात्र अवशेष राहशील. या आंतरप्रलयात सोम, सूर्य, मी, चार लोकांसह ब्रह्मदेव, पुण्यतोया नर्मदानदी, महर्षी मार्कंडेय, शंकर, चारही वेद, विद्यांसह सर्व पुराणं व तुझ्यासह ही नौका, हे सर्व वाचून राहील. महीपते, चाक्षुषमन्वन्तराच्या प्रलयकाळी जेव्हा या प्रकारे पृथ्वी एकार्णवात निमग्न होईल, तुझ्याकडून नंतर सृष्टीचा प्रारंभ होईल तेव्हा मी वेदांचं प्रवर्तन पुन: करीन.'

असे म्हणून भगवान मस्त्य तेथेच अंतर्धान पावले. मनूने तेथेच राहून भगवान वासुदेवांच्या कृपेनें प्राप्त झालेल्या योगाचा अभ्यास केला. त्यानंतर भगवान वासुदेवांनी सांगितल्याप्रमाणे भगवान जनार्दन एका शिंगाच्या मस्त्याच्या रूपात अवतीर्ण झाले. त्याच वेळी एक सर्पही रज्जुरूपाने वाहात वाहात मनूच्या पार्श्वभागी आला. धर्मज्ञ मनूने आपल्या योगबलाने समस्त जीवांना आकर्षित करून नौकेवर चढविले. त्या सर्परूपी रज्जूने मनूने त्या नौकेस मत्स्याच्या शिंगास बांधले. त्यानंतर भगवान जनार्दनांना नमस्कार करून तो स्वत:च त्या नौकेवर बसला.

अशा रीतीनें प्रलयाच्या वेळी योगाभ्यासी मनूने सर्वांचे रक्षण केले. ही सर्व कथा सांगून सूत म्हणाला, 'या मत्स्यरूपी भगवानांनी ज्या पुराणाचं वर्णन केलं होतं, त्याच पुराणाचं प्रवचन आज मी तुम्हांपुढं करीन. आपण सावधान होऊन श्रवण करावं. द्विजवर, आपण जो प्रश्न मला विचारला आहे, तोच एकार्णवाच्या समयी मनूनं भगवान केशवांनाही विचारला होता.'

मनूने विचारले, 'भगवन्, सृष्टीची उत्पत्ती, तिचा संहार, मानव-

वंश, मन्वन्तरं, मानववंशात उत्पन्न झालेल्या लोकांची चरित्रं, भुवनांचा विस्तार, दान व धर्म यांचा विधी, सनातन श्राद्धकल्प, वर्ण व आश्रम यांचा विभाग, इष्टापूर्त (वापी, कूप, तडाग इत्यादीं)ची निर्मिती, देवदेवतांची प्रतिष्ठा, धार्मिक विषय; या सर्वांचं आपण विस्तारानं वर्णन करावं.'

त्यावर भगवान मत्स्य म्हणाले, 'महाप्रलयाच्या समयास हे सर्व स्थावरजंगम जगत झोपल्याप्रमाणं अंधकारात बुडून गेलं होतं. त्याची कल्पनाच करणं अवघड होतं. कोणतीही वस्तू ज्ञातव्य म्हणून उरली नव्हती. त्यानंतर पुण्यकर्मांचं उत्पत्तिस्थान असलेले, निराकार, स्वयंभू भगवान या समस्त जगतास प्रकट करण्यासाठी अंधकाराचा भेद करण्यासाठी प्रादुर्भूत झाले.

'त्यावेळी जे इंद्रियांपलीकडील, परात्पर,सूक्ष्मापेक्षा सूक्ष्म,महानापेक्षा महान, अविनाशी व नारायण या नावानं विख्यात असलेले भगवान स्वतः एकटेच अवतीर्ण झाले. त्यांनी आपल्या शरीरापासून अनेक प्रकारच्या जगताची सृष्टी निर्माण करण्याची इच्छा केली. त्यांनी ध्यान करून प्रथम जलाची निर्मिती केली. त्यांत त्यांनी आपल्या वीर्यरूप बीजाचा निक्षेप केला. ते बीज एक हजार वर्षं व्यतीत झाल्यावर सुवर्ण व रजत यांचं एक अंडरूप तयार झालं. त्याची कांती दहा हजार सूर्याप्रमाणं होती. त्यानंतर महातेजस्वी स्वतः स्वयंभू त्या अंड्यात प्रवेश करू लागला. आपल्या प्रभावानं ते स्वयंभू तत्त्व अंड्यात सर्वव्यापक झालं व पुनः विष्णुभावास प्राप्त झालं.

'त्यानंतर त्या अंड्याच्या आत सर्वप्रथम भगवान सूर्य उत्पन्न झाला. तो आदीपासून उत्पन्न झाल्यामुळं त्यास 'आदित्य' व वेदांचा पाठ केल्यानं 'ब्रह्मदेव' या नावानं विख्यात झाला. त्यानंच त्या अंड्यास दोन भागांत विभक्त केलं. स्वर्गलोक व भूतल यांची रचना झाली. त्या दोहोंच्या मध्ये संपूर्ण दिशा व अविनाशी आकाश यांची निर्मिती झाली. त्याच वेळी त्या अंड्याच्या जरायुभागापासून मेरू आदी सात पर्वत प्रकट झाले. जो गर्भाशय होता, तो विद्युत्समूहासहित मेघमंडळाच्या रूपात परिणत झाला. त्याच अंड्यापासून नद्या, पितृगण,

मनुसमुदाय उत्पन्न झाले. नाना रत्नांनी उत्पन्न झालेले लवण, इक्षू, सुरा इत्यादी सात समुद्र तयार झाले. हे सर्व त्या अंड्याच्या अंतःस्थित जलापासून प्रकट झालं.

'शत्रुदमना, जेव्हा त्या प्रजापती देवास सृष्टीच्या रचनेची इच्छा झाली, तेव्हा त्याच्या तेजापासून मार्तंड (सूर्य) प्रादुर्भूत झाला. या महात्म्याचं जे रजोगुण रूप होतं, तेच लोकपितामह चतुर्मुख भगवान ब्रह्मदेवांच्या रूपात प्रकट झाले. त्यांनीच देव, असुर व मजव यांसहित सर्व जगताची रचना केली. त्याला तू रजोगुणरूप सुप्रसिद्ध महान सत्त्व समजावंस.'

*

# २. कथा-उपकथा

## महाराज पृथूचे चरित्र, पृथ्वीचे दोहन

सूताने ऋषींना मत्स्य भगवानांनी सांगितलेल्या सृष्टिरचनेचे सर्व विवरण विस्ताराने केलें. तेव्हा ऋषींनी त्याला विचारिले, 'सूत, असं ऐकलं आहे की, पूर्वी अनेक भूपालांनी या पृथ्वीचा उपभोग घेतला. पृथ्वीचा व त्यांचा संबंध असल्यामुळं त्यांना 'पार्थिव' वा 'पृथ्वीपती' असे नाव प्राप्त झाले. पण 'पृथ्वी' हे नाव नेमकं कोणत्या कारणानं उत्पन्न झालं ? ती 'गो'रूप कशी बनली ? यांत एखादं रहस्य असल्यास सांगावं.' ऋषींच्या या प्रश्नांची उत्तरे सूताने दिली.

प्राचीन काळी स्वायंभूव मनूच्या वंशात अंग नावाचा एक प्रजापती झाला. त्याने मृत्यूची कन्या सुनीथाशी विवाह केला होता. सुनीथाचे मुख मोठे कुरूप होते. तिच्या गर्भापासून वेन नावाचा एक महाबली पुत्र उत्पन्न झाला. तो पुढे सम्राट चक्रवर्ती झाला. पण तो सदा अधर्मात रमायचा. परक्यांच्या स्त्रियांचे अपहरण तो करीत राहिला.

तो लोकांतही या अधर्माचाच प्रचार करू लागला. तेव्हा महर्षींनी जगाच्या धर्माचरणाच्या वृद्धीसाठी त्याला विनंती केली. पण त्याचे अंत:करण अशुद्ध असल्यामुळे त्याने त्यांची विनंती मानली नाही. प्रजेला अभय दिले नाही. तेव्हा महर्षींनी त्याला शाप देऊन मारून टाकले.

त्यानंतर शासकहीन राज्यात अराजकता पसरली. भयभीत ब्राह्मणांनी बलपूर्वक वेनाच्या शरीराचे मंथन केले. मंथन झाल्यावर त्याच्या शरीरात शरीरस्थित मातेच्या अंशाने म्लेच्छ जाती निर्माण झाल्या. त्यांचा रंग काळचा अंजनासारखा होता. त्याच्या शरीरस्थ धर्मपरायण पित्याच्या अंशापासून, उजव्या हातातून एक धार्मिक पुत्र उत्पन्न झाला. त्याचे शरीर दिव्य तेजाने संपन्न होते. त्याने रत्नजडित कवच व बाजूबंद धारण केले होते. त्याच्या हातांत धनुष्यबाण व गदा शोभत होती. मोठा प्रयत्न करून तो वेनाच्या पृथू म्हणजे मोठ्या भुजेपासून प्रकट झाला. म्हणून तो पृथू या नावाने प्रसिद्धीस आला.

त्याला ब्राह्मणांनी पित्याच्या राज्यावर जरी अभिषिक्त केले, तरी त्याने परमदारुण तपस्या करून भगवान विष्णूंना प्रसन्न करून घेतले. त्यांच्या वरदानाच्या प्रभावाने तो सर्व भूमंडलाचा राजा झाला. त्यानंतर अमित पराक्रमी पृथूने भूतलास स्वाध्याय, वषट्कार, धर्म यांनी विहीन पाहून तो क्रुद्ध झाला. त्याने धनुष्यबाण हाती घेऊन पृथ्वीवर आक्रमण करण्याचा प्रयत्न केला. पृथ्वी भयभीत होऊन, गायीचे रूप धारण करून पळून गेली.

इकडे प्रचंड धनुष्य धारण करून पृथूही तिच्या मागे धावला. पृथू मागे येत आहे असे पाहून गोरूप भूमी हताश होऊन, एका जागी उभी राहून म्हणाली, 'नाथ, मी आपल्या प्रसन्नतेसाठी काय करू?' तेव्हा पृथू तिला म्हणाला, 'सुव्रते, तू त्वरित या संपूर्ण चराचर जगतासाठी मनोवांच्छित वस्तू प्रदान कर.' त्यावर पृथ्वी म्हणाली, 'ठीक आहे. मी तसंच करीन.' त्यानंतर नरेश्वर पृथूने स्वायंभूव मनूस वत्स करून आपल्या हाताने गोरूप पृथ्वीचे दोहन केले. त्यापासून शुद्ध अन्न निर्माण झाले. त्यामुळे प्रजेचा जीवननिर्वाह होत राहिला.

यानंतर दोहनाची प्रक्रिया चालूच राहिली. ऋषींनीही पृथ्वीचे दोहन केले. त्यावेळी चंद्र वत्स होता. दोहन करणारे महर्षी बृहस्पती होते. वेद पात्र होते. आणि दोहन करून तयार झालेला पदार्थ तप होता. देवांनीही या पृथ्वीचे दोहन केले. इंद्र वत्स झाला. क्षीर ऊर्जस्वी बल झाला. या दोहनाच्या वेळी देवांचे पात्र सुवर्णाचे होते. अंतकानेही पृथ्वीचे दोहन केले. यावेळी यमराज वत्स बनला. स्वधा रस झाली. पितरांचे पात्र रजतमय होते. नागांनी केलेल्या दोहनात नागराज धृतराष्ट्र दोहन करणारा, नागराज तक्षक वत्स. पात्र तुंबी आणि क्षीर व दोहन केल्यानंतर पदार्थ विष होते. असुरांनीही या पृथ्वीचे दोहन केले. त्यांनी लोहमय पात्रात इंद्रास पीडित करणाऱ्या मायेचे दोहन केले. त्या कार्यात प्रल्हादपुत्र विरोचन वत्स झाला. मायेचा प्रवर्तक द्विमूर्धा दोहन करणारा होता.

यक्षांनीही पृथ्वीचे दोहन केले. त्यांना अंतर्धानविद्येची अभिलाषा होती. म्हणून त्यांनी कुबेरास वत्स केले. कच्च्या पात्रात त्यांनी पृथ्वीचे दोहन केले. प्रेत व राक्षस यांनीही पृथ्वीपासून भयंकर रुधिरधाराचे दोहन केले. त्यावेळी रौप्यनाभ नावाचे प्रेत दोहन करणारे होते. सुमाली नावाचे प्रेत वत्स बनले होते. अप्सरांसहित गंधर्वांनीही पूर्वी चैत्ररथास वत्स बनवून कमलाच्या पानांत पृथ्वीपासून सुगंधाचे दोहन केले. या कार्यात नाट्यवेदाचा पारगामी विद्वान वररुची नावाचा गंधर्व दोहन करणारा होता.

पर्वतांनी पृथ्वीपासून अनेक प्रकारची रत्ने, दिव्य औषधी यांचे दोहन केले. यावेळी महाचल सुमेरू दोहन करणारा, हिमवान वत्स व पात्र शैलमय होते. वृक्षांनी पृथ्वीपासून पलाशपत्राच्या पात्रात दुधाचे दोहन केले, त्यावेळी पुष्पे व लता यांनी लगडलेला शालवृक्ष दोहन करणारा होता. समृद्धिशाली व सर्ववृक्षमय प्लक्षवृक्ष वत्स होता. अशा प्रकारे सर्व वर्गांतील प्राण्यांनी आपापल्या इच्छेस अनुसरून पृथ्वीचे दोहन केले.

महाराज पृथूच्या राज्यात प्रजा दीर्घायू व धनधान्य, सुखवृद्धी यांनी संपन्न होती. त्यावेळी कोणी दरिद्री नव्हता. रोगी नव्हता. कोणी

पापकर्मात रमलेला नव्हता. पृथूच्या शासनकालात कोणत्याच प्रकारचे भय नव्हते. लोक दुःख व शोकरहित होते. सदा सुखमय जीवन जगणारे होते. त्या महाबली पृथूने प्रजेच्या हितकामनेनें प्रेरित होऊन आपल्या धनुष्याच्या टोकाने मोठमोठे पर्वत उखडून धरातल समतल बनविले. पृथूच्या कालात पुरे, ग्राम, दुर्ग नव्हते. कोणताच मनुष्य शस्त्र धारण करीत नव्हता. रोगांचा सर्वथा अभाव होता. क्षय, विनाश, विषमता यांचे दुःख नव्हते. लोकांना अर्थशास्त्राची प्रीती नव्हती. लोभाचे चिन्हही नव्हते. त्यांना फक्त धर्माचीं इच्छा होती.

हे सर्व वर्णन करून सूत म्हणाला, 'ऋषींनो, अशा प्रकारे मी आपणांस पृथ्वीच्या दोहनाचं, नाना पदार्थांचं वर्णन करून सांगितलं. ज्या वर्णाच्या प्राण्यांना ज्या पदार्थाची रुची असेल ते ते मी तुम्हांस सांगितलं. पृथ्वी धर्मात्मा पृथूची कन्या झाली. विद्वानांनी म्हणून हिला पृथ्वी असं नाव दिलं.'

## महर्षी कौशिकांचे पुत्र व पिपीलिकेची कथा

यानंतर सूतास ऋषींनी विचारले, 'सूत, महर्षी कौशिकांच्या पुत्रांचा वृत्तांत आम्हांस सांगा.' तेव्हा सूतानें हा सर्व वृत्तांत निवेदन केला. कुरुक्षेत्रात कौशिक नावाचे एक धर्मात्मे महर्षी राहात होते.त्यांना सात पुत्र होते. स्वसृप, क्रोधन, हिंस्र, पिशुन, कवी, वाग्दुष्ट व पितृवर्ती; अशी त्यांची नावे होती. पित्याच्या मृत्यूनंतर ते सर्व गर्गमुनींचं शिष्य झाले. त्या वेळी सर्व लोकांना भयभीत करणारी फार मोठी अनावृष्टी झाली. त्यामुळे भयंकर दुष्काळ पडला.

त्या समयी सर्व तपस्वी आपल्या गुरूंच्या, गार्गाचार्यांच्या सेवेत रमू लागले. एकदा वनात ते सर्व भुकेने अत्यंत पीडित झाले. त्यांना क्षुधाशांतीचा कोणताच उपाय सुचला नाही. तेव्हा लहान बंधू पितृवर्तीने श्राद्धकर्म करण्यास संमती दिली. मोठ्या बंधूंची आज्ञा घेऊन पितृवर्तीनें समाहितचित्त बनून श्राद्धाचा उपक्रम केला. त्यावेळी त्याने लहानमोठ्या क्रमाने दोन बंधूंना देवकार्यात, तीन पितृकार्यात व एकास अतिथिरूपात नियुक्त केले. तो स्वतः श्राद्धकर्ता बनला.

अशा प्रकारे पितृपरायण पितृवर्तीने पितरांचे स्मरण करून मंत्रोच्चारपूर्वक श्राद्धकर्म केले. कालक्रमानुसार मृत्यूच्या नंतर श्राद्ध-वैगुण्यरूप कर्मदोषाने ते सर्व दाशपुर (मंदसौर) नावाच्या नगरात व्याधरूपात उत्पन्न झाले. पण पितृस्नेहामुळे त्यांना पूर्वजन्मीचे स्मरण होते. पूर्वजन्मीच्या कर्मांच्या परिणामाने ते क्रूरकर्मा पारधी बनले. पण पितरांच्या माहात्म्याने ते जातिस्मर (पूर्वजन्मीचा वृत्तांत जाणणारे) झाले. त्यांना वैराग्य उत्पन्न झाले. सर्वांनी अनशन राहून आपल्या शरीरांचा त्याग केला. त्यानंतर ते सातही पुत्र कालंजरपर्वतावर भगवान नीलकंठांच्या समोर मृगयोनीत उत्पन्न झाले. येथेही त्यांना पितरांच्या कृपेने पूर्वजन्मीचे स्मरण होते. याही योनीत त्यांना ज्ञान व वैराग्य यांची प्राप्ती झाली. त्यांनी तीर्थस्थानात राहून, अनशन राहून धर्मपूर्वक आपल्या प्राणांचा त्याग केला.

त्यानंतर त्या सातही योगाभ्यासी पुत्रांचा जन्म मानससरोवरात चक्रवाकाच्या योनीत झाला. या योनीत त्यांची नावे सुमना, कुमुद, शुद्ध, छिद्रदर्शी, सुनेत्रक, सुनेत्र, अंशुमान; अशी होती. हे सातही योगाचे पारदर्शक विद्वान झाले. यांतील अल्पबुद्धीचे तीन योगभ्रष्ट झाले व इकडेतिकडे भ्रमण करू लागले. याच वेळी एक पांचालवंशी नरेश एका क्रीडावनात आपल्या स्त्रियांसह हास्यविनोद करीत होता. तो महान बलशाली व पराक्रमी होता. त्याच्यापाशी मोठी सेना होती. अनेक वाहने होती.

त्या शोभाशाली राजास पाहून जलपक्ष्यांपैकी एकास, जो पितृभक्त पितृवर्ती नावाचा होता, त्यास राज्यप्राप्तीची इच्छा उत्पन्न झाली. याच प्रकारे आणखी दोघांनी राजाचे दोन मंत्री व प्रचुर सेना आणि वाहने पाहून मृत्युलोकात मंत्रिपद प्राप्त व्हावे, अशी इच्छा व्यक्त केली. त्यांतील जे चार निष्काम होते ते श्रेष्ठ ब्राह्मणकुळात निर्माण झाले. त्या तीनमधील पहिला विभ्राजकाच्या पुत्ररूपाने ब्रह्मदत्त या नावाने विख्यात झाला. आणि दोन कण्डरीक व सुवालक या नावांनी मंत्र्यांचे पुत्र झाले. राजाच्या मृत्यूनंतर पुरोहिताने ब्रह्मदत्तास राज्यपदावर अभिषिक्त केले. हा पांचालनरेश ब्रह्मदत्त मोठा प्रबळ, पराक्रमी, सर्व

शास्त्रांत प्रवीण, योगज्ञ, सर्व प्राण्यांची बोली जाणणारा होता. देवलाची सुंदर कन्या, जी संनती या नावाने विख्यात होती, ती ब्रह्मदत्ताची पत्नी झाली. ती ब्रह्मवादिनी होती. या पत्नीच्या बरोबर राहून राजकुमार ब्रह्मदत्तानें राज्यकारभार सांभाळला.

एकदा राजा ब्रह्मदत्त आपल्या पत्नीच्या, संनतीच्या सह भ्रमण करण्यासाठी उद्यानात आला. तेथें त्यानें कामकलहानें व्याकुळ झालेल्या एका कीटदंपतीस पाहिले. त्या कीटाचे शरीर कामदेवांच्या बाणांनी संतप्त झाले होते. चारही बाजूंनी तो प्रियाचा अनुनय करीत होता. तो म्हणत होता, ' प्रिये, या जगतात तुझ्यासारखी सुंदर स्त्री नाही. तुझा कटिप्रदेश पातळ असून जंघा मोठ्या आहेत. तू स्तनांच्या भारानं झुकलेली आहेस. तू सुवर्णासारखी गोरी आहेस. तू सुंदर कमरेची, मृदुभाषिणी, मनोहर हास्यानं युक्त, लक्ष्यांचा भेद करणाऱ्या नेत्रांची, गूळ व साखर यांची प्रेमी आहेस. तू माझ्या भोजनानंतर भोजन करतेस. माझं स्नान झाल्यावर स्नान करतेस. मी परदेशी गेल्यावर तू दीन होतेस. मी क्रुद्ध झाल्यावर तू भयभीत होतेस. कल्याणी, तू कशासाठी क्रोधाचं मुख करून बसली आहेस ?'

यावर क्रोधाने भरलेली ती मुंगी त्याला म्हणाली, ' शठा, तू का व्यर्थ बडबड करतोस ? धूर्ता, तू काल माझा परित्याग करून लाडूचा भुगा करून दुसऱ्या एका मुंगीस नाही दिलास ?' तेव्हा मुंगा म्हणाला, ' वरवर्णिनी, तुझ्यासारखीच रंगरूपाची दुसरी मुंगी असल्यामुळं मी चुकून तिला लाडू दिला. म्हणून भामिनी, तू या अपराधाबद्दल मला क्षमा कर. सुव्रते, मी पुनः अशा प्रकारचं कमी करणार नाही. मी सत्याची ग्वाही देऊन तुझे चरण पकडतो. तू मज विनीतावर प्रसन्न व्हावंस.' असे मुंग्याने म्हणताच मुंगी प्रसन्न झाली. चक्रपाणी भगवान विष्णूंच्या कृपेने सर्व प्राण्यांच्या बोलींचे ज्ञान असणारा ब्रह्मदत्त त्यांचा संवाद ऐकून विस्मयचकित झाला.

## ब्रह्मदत्ताचा वृत्तांत, चार चक्रवाक

ब्रह्मदत्त या भूमीवरील सर्व प्राण्यांच्या भाषा समजत होता.

त्याला हे ज्ञान कसे झाले ? असा प्रश्न ऋषींनी सूताला विचारला. सूताने सर्व कथा निवेदन केली. ते चारही चक्रवाक त्या ब्रह्मदत्ताच्या नगरात एका वृद्ध ब्राह्मणाच्या पुत्ररूपाने उत्पन्न झाले. त्या जन्मीही ते ब्राह्मण पूर्वीप्रमाणेच जातिस्मर होते. त्यावेळी त्यांची नावे धृतिमान, तत्त्वदर्शी, विद्याचंड व तपोत्सुक; अशी होती. ते कर्मानुसार एका अत्यंत दरिद्री अशा सुदरिद्र नावाच्या ब्राह्मणाचे पुत्र झाले. लहानपणापासूनच त्यांची बुद्धी तपस्येकडे होती. ते द्विजश्रेष्ठ आपल्या पित्यास प्रार्थना करीत म्हणाले, 'पिताजी, आम्ही तपस्या करून परमसिद्धी प्राप्त करण्याचा प्रयत्न करणार आहोत.' हे ऐकून महातपस्वी सुदरिद्र दीन वाणीने म्हणाला, 'पुत्रांनो, तुम्ही असं का बोलता ? मी दरिद्री पिता आहे. मला सोडून तुम्ही वनवासी होता ? माझा त्याग करून तुम्हांस कोणता धर्म प्राप्त होईल ? तुमची गती तरी काय होईल ?'

असे म्हणून त्यांच्या पित्याने त्यांना अनुमती दिली नाही. पुत्रांनी पित्यास म्हटले, 'तात, आम्ही आपल्या जीविकोपार्जनाची व्यवस्था केली आहे. याशिवाय आपणांस अधिक काय हवंय ? ते तरी सांगा. जर आपण प्रातःकाळी राजा ब्रह्मदत्तापुढं श्लोकाचा पाठ कराल, तर तो आपणांस प्रचुर धनसंपत्ती व सहस्र ग्रामं प्रदान करील. तो श्लोक असा आहे.

**ये विप्रमुख्याः कुरुजाङ्गलेषु दाशास्तथा दाशपुरे मृगाश्च ।**
**कालंजरे सप्त च चक्रवाका ये मानसे तेऽत्र वसन्ति सिद्धाः ।।**

'जे कुरुक्षेत्रात श्रेष्ठ ब्राह्मण, दाशपुरात व्याध, कालंजपर्वतावर मृग व मानससरोवरात सात चक्रवाक होते, तेच सिद्ध बनून इथं निवास करीत आहेत.' पित्याला असे सांगून ते सर्व तपस्या करण्यासाठी वनात निघून गेले. इकडे हा सुदरिद्र ब्राह्मण आपल्या स्वार्थसिद्धीसाठी राज-भवनाकडे निघाला.

आता ब्रह्मदत्ताची उत्पत्तिकथा ऐकावी. पूर्वी पांचालदेशात एक अणुह नावाचा नरेश होऊन गेला. तो विभ्राटाचा पुत्र होता. पुत्र-प्राप्तीसाठी त्याने कठोर व्रत स्वीकारून सामर्थ्यशाली व सर्वव्यापक

देवदेवेश्वर नारायण श्रीहरींची आराधना सुरू केली. काही काळ गेल्या-वर जनार्दन त्याच्या आराधनेने प्रसन्न झाले. त्याच्यासमोर प्रकट होऊन ते म्हणाले, ' राजन्, तुझं कल्याण होईल, आता तू मनास येईल तो वर माग.' भगवान विष्णूंनी असे म्हटल्यावर राजाने उत्तम वर मागताना म्हटले, ' देवेश, मला एक बलवान, पराक्रमी पुत्र हवाय. तो सर्व शास्त्रांचा ज्ञाता असावा. तो धार्मिक, योगी, सर्व प्राण्यांची बोलभाषा जाणणारा असावा.' भगवानांनी त्याला तसा वर दिला व ते अंतर्धान पावले.

त्यानंतर समयानुसार तो प्रतापी ब्रह्मदत्त त्या राजा अणुहाचा पुत्र झाला. तो सर्व जीवांवर दया करी. सर्व प्राण्यांत तो बलसंपन्न होता. सर्व प्राण्यांची भाषा तो जाणी. तो सर्व प्राण्यांचा राजाधिराज, सम्राट बनला होता. याच ब्रह्मदत्ताने कामासक्त कीटदंपतीचे बोलणे ऐकले. ब्रह्मदत्ताला याचे हसू आले. महाराणी संनतीस याचे आश्चर्य वाटले. तिच्या मनात एखाद्या अनर्थाची शंका आली. तिनें नरेश्वर ब्रह्मदत्तास प्रश्न केला,

' राजन्, आपणांस अकस्मात हसू का आलं ? हास्याचं कारण मला समजलं नाही.'

त्यावर ब्रह्मदत्तानें कीटदंपतीमधील संवाद राणीस सांगितला. तो म्हणाला, ' वराननें, त्यांचा प्रेमालाप ऐकून मला हसू आलं. शुचिस्मिते, माझ्या हास्याचं दुसरं कोणतंच कारण नाही.' पण राजाच्या या बोलण्या-वर राणी संनतीनें विश्वास ठेवला नाही. ती म्हणाली, ' राजन्, आपलं हे कथन मला असत्य वाटतं. आपण मलाच पाहून हसलात. आता मी जगू तरी कशासाठी ? देवांखेरीज किडामुंग्याची भाषा कुणाला समज-णार ? आपण तर मलाच हसला होता. याखेरीज दुसरं काय असणार ?'

राणीचे बोलणे ऐकून राजा ब्रह्मदत्ताने उत्तर दिले नाही. हे रहस्य जाणण्याच्या इच्छेने राजाने श्रीहरींच्या समक्ष नियमपूर्वक अशी सात रात्र आराधना केली. भगवान हृषीकेशांनी स्वप्नात येऊन राजास म्हटले, ' राजन्, प्रातःकाली तुझ्या नगरात भटकणारा एक वृद्ध ब्राह्मण

जें काही म्हणेल, त्याच्या वचनांनी तुला हे रहस्य समजेल.' एवढे बोलून भगवान विष्णू अंतर्धान पावले. त्यानंतर राजा ब्रह्मदत्त आपली पत्नी व दोन मंत्री यांच्यासह नगरात फिरू लागला. त्याचवेळी एक वृद्ध ब्राह्मण त्यांना दिसला. तो मुखाने म्हणत होता;

**ये विप्रमुख्याः कुरुजाङ्गलेषु दाशास्तथा दाशपुरे मृगाश्च ।**
**कालंजरे सप्त च चक्रवाका ये मानसे तेऽत्र वसन्ति सिद्धाः ।।**

'जे प्रथम कुरुक्षेत्रात श्रेष्ठ ब्राह्मणांच्या रूपात, दाशपुरात व्याधांच्या रूपात, कालंजर पर्वतावर मृगयोनींत आणि मानससरोवरात सात चक्रवाकरूपांत होते, तेच आता सिद्ध बनून इथं निवास करीत आहेत.'

ब्राह्मणाच्या मुखातून असे ऐकल्यावर राजा शोकाकुल होऊन दोनही मंत्र्यांसह भूतलावर मूर्च्छित होऊन पडला. त्याच वेळी त्याला पूर्वजन्माची स्मृती झाली. त्या दोन श्रेष्ठ मंत्र्यांतील एक बाभ्रव्य सुबालक कामशास्त्राचा प्रणेता व सर्व शास्त्रांचा ज्ञाता होता. तो जगतात पांचाल या नावानें विख्यात होता. दुसरा कंडरीकही धर्मात्मा व वेदशास्त्राचा प्रवर्तक होता. ते दोघेही यावेळी राजाच्या पुढेच शोकमग्न होऊन धाराशायी झाले होते. त्यांनाहीं आपल्या पूर्वजन्माची स्मृती होऊन ते विलाप करीत म्हणू लागले;

'हाय, आम्ही लोलुप होऊन कर्मबंधनात फसलो व योगापासून पूर्ण भ्रष्ट झालो.' असा अनेक प्रकारचा विलाप करून ते तीनही योगाचे पारदर्शी विद्वान विस्मयाविष्ट होऊन वारंवार श्राद्धाचे माहात्म्य सांगू लागले. त्यानंतर राजाने त्या ब्राह्मणास अनेक गावांसहित प्रचुर धन-संपत्ती प्रदान केली. अशा रीतीनें धनाच्या प्राप्तीने हर्षित झालेला ब्राह्मण निघून गेला. राजा ब्रह्मदत्ताने आपल्या राजलक्षणांनी युक्त अशा विष्वक्सेन नावाच्या पुत्रास राज्यावर अभिषिक्त केले व तो वनात निघून गेला.

त्यानंतर ब्रह्मदत्त आदी ते सर्व श्रेष्ठ योगी मत्सररहित व पितृ-भक्त बनून त्या मानससरोवरात येऊन भेटले. संनतीचा राग संपला.

राजाला म्हणाली, 'राजन्, आपण जी इच्छा करीत आहात, ती राज्य त्यागाचा परिणाम आहे. आणि हे सर्व माझ्यामुळं घडलं.' राजाने तिचे म्हणणे मान्य केले. तिचे अभिनंदन करून तो म्हणाला, 'जर तुझी कृपा झाली तर मला हे सर्व फल प्राप्त झालंच आहे.'

त्यानंतर ते सर्व वनवासी योगाचा आश्रय घेऊन आपल्या तपोबलाने ब्रह्मरंध्राच्या द्वारे प्राण त्याग करून परमपदास गेले. अशा प्रकारे पितरलोक मनुष्यांना आयुष्य, धन, विद्या, स्वर्ग, मोक्ष, सुख, पुत्र व राज्य प्रदान करतात. जे ब्रह्मदत्ताचे हे पितृमाहात्म्य ब्राह्मणांना ऐकवितो, स्वतः ऐकतो, वाचतो तो शंभर कोटी कल्पांपर्यंत ब्रह्मलोकात प्रशंसित होतो.

## चंद्राची उत्पत्ती, त्याचा विवाह, तारेवर त्याची आसक्ती वगैरे

यानंतर सूताने ऋषींना श्राद्धाचा योग्य समय, त्याचे स्थान, काही नियम इत्यादींची माहिती दिली. सूतास ऋषींनी चंद्रासंबंधी माहिती विचारली. सूताने ती विस्ताराने सांगितली. पूर्वी ब्रह्मदेवांनी आपल्या मानसपुत्रास, अत्रींना सृष्टीची रचना करण्यासाठी आज्ञा दिली. त्या सामर्थ्यशाली ऋषींनी सृष्टिरचनेच्या निमित्ताने अनुत्तर नावाचे भीषण तप केले. या तपामुळे प्रशांत ब्रह्म त्यांच्या नेत्रांत स्थिर झाले. उमासहित भगवान शिवांनीही अत्रींच्या मनात व नेत्रांत निवास केला. त्यांना पाहून शिवांचा अष्टमांश शिशू चंद्राच्या रूपात प्रकट झाला.

त्यावेळी महर्षी अत्रींच्या नेत्रांतून जलसंभूत तेज खाली ओघळले. त्याने आपल्या प्रकाशाने अखिल चराचर विश्वास उद्दीप्त केले. दिशांनी त्या तेजास स्त्रीरूपाने धारण करून पुत्रप्राप्तीच्या कामनेने धारण केले. ते त्यांच्या उदरात गर्भरूपाने तीनशे वर्षांपर्यंत स्थित होते. दिशाना जेव्हा तो गर्भ धारण करणे शक्य झाले नाही, तेव्हा त्यांनी त्याचा परित्याग केला. चतुर्मुख ब्रह्मदेवांनी त्या गर्भास उचलले, त्याला सर्वायुधधारी तरुणाच्या रूपात तयार केले. त्यांनी त्याला वेदशक्तिमय रथावर बसवून आपल्या लोकास नेले. त्या पुरुषास पाहून ब्रह्मऋषींनी म्हटले, 'हे आमच्या लोकांचे स्वामी होतील.' त्यावेळी पितर, ब्रह्मादी-

देव, गंधर्व, औषधी यांनी 'सोमदैवत्य' नावाच्या वैदिक मंत्रसमूहांनी त्याची स्तुती केली. ही स्तुती झाल्यावर चंद्राचे तेज आणखी वाढले. या तेजामुळे भूतलावर दिव्य औषधींचा प्रादुर्भाव झाला. चंद्रमा औषधीश म्हणून प्रसिद्धीस आला. चंद्रमा शुक्लपक्षात वाढू लागला व कृष्णपक्षात क्षीण होत गेला.

त्यानंतर प्रचेतानंदन दक्षाने आपल्या रूपलावण्याने संपन्न व तेजस्विनी सत्तावीस कन्या त्याला पत्नीरूपाने प्रदान केल्या. तेव्हा शीत किरणांच्या चंद्राने एकमात्र भगवान विष्णूंच्या ध्यानात तत्पर राहून दहा लाख वर्षे तपस्या केली. तिने प्रभावित होऊन ऐश्वर्यशाली जनार्दन, परमात्मा, नारायण, श्रीहरि चंद्रावर प्रसन्न झाले. वर मागण्यासाठी त्यांनी सुचविल्यावर चंद्राने म्हटले,

'भगवन्, मी इंद्रलोकास जिंकण्याची इच्छा करीत आहे. तेथील देवांनी प्रत्यक्ष माझ्या भवनात येऊन आपापला भाग ग्रहण करावा. माझ्या राजसूययज्ञात ब्रह्मदेवादी देवगणांनी ब्राह्मण होऊन, त्रिशूलधारी भगवान शंकरांनी रक्षपाल होऊन उपस्थित व्हावं.' यावर भगवान विष्णूंनी 'तथाऽस्तु' म्हटले.

चंद्राने राजसूययज्ञाचे आयोजन केले. या यज्ञात महर्षी अत्री होता झाले. भृगू अध्वर्यू झाले. चतुर्मुख ब्रह्मदेव उद्‌गाता झाले. स्वतः श्रीहरी उपद्रष्टे बनून ब्रह्मापद त्यांनी स्वीकारलें. सनकादी सदस्य व दहा विश्वेदेव चमसाध्वर्यू बनले. यावेळी चंद्राने तीनही लोक दक्षिणारूपाने दिले. त्यानंतर अवभृथस्नान झाल्यावर चंद्राच्या रूपसौंदर्याचे अवलोकन करण्याच्या इच्छेने सिनीवाली आदी नऊ देवी त्याच्या सेवेत उपस्थित झाल्या. लक्ष्मीनारायणांना, सिनीवाली कर्दमांना, द्युती विभावसूस, तुष्टी अविनाशी ब्रह्मदेवांना, प्रभा प्रभाकरास, कुहू हविष्मानास, कीर्ती जयंतास, वसू मरीचिनंदनास, घृती नंदीस घेऊन चंद्राची सेवा करू लागल्या. चंद्र दहाही दिशांना प्रकाशित करीत होता. त्याला सर्व प्रकारचे दुर्लभ ऐश्वर्य प्राप्त झाले. सातही लोकांवर त्याचे एकछत्र अधिपत्य सुरू झाले.

यानंतर काही दिवसांनी चंद्र एकदा तारेस बरोबर घेऊन आपल्या घरी निघून गेला. बृहस्पतींनी सांगितले तरी त्याने तारा त्यांना परत दिली नाही. त्यानंतर महेश्वर, ब्रह्मदेव, साध्यगण, लोकपाल, मरुद्गण यांनी समजावून सांगितल्यावरही चंद्राने तारेस परत केले नाही. तेव्हा शिव क्रुद्ध झाले. त्यांनी बृहस्पतींशी स्नेह राखून आजगव नावाचे धनुष्य हाती घेऊन चंद्राबरोबर युद्ध करण्यासाठी प्रयाण केले. यावेळी त्यांचे मुख तृतीय नेत्रातील अग्नीमुळें भयंकर दिसत होते. त्यांच्याबरोबर भूतेश्वर व सिद्ध यांचे समुदायही होते. शस्त्रांनी सुसज्जित असे गणेशादी चौऱ्यांशी गणही तयार झाले. यक्षराज कुबेरही रथारूढ होऊन एक पद्म वेताळ, एक अर्बुद (शंभर कोटी) यक्ष, तीन लाख नाग, बारा लक्ष किन्नर यांनीही शिवांचे अनुकरण केले.

तिकडे चंद्रमाही क्रोधित होऊन नक्षत्रे, दैत्य व असुर यांच्या सेनेसहित शनैश्चर व मंगळ यांचे साह्य घेऊन रणभूमीवर उपस्थित झाला. ही तयारी पाहून साती लोक भयभीत झाले. समुद्रांसह पृथ्वी कापू लागली. शिवांनी प्रकाशमान व विशाल अशा अग्नेयास्त्राने चंद्रावर आक्रमण केले. दोनही सैन्यांत भीषण संग्राम झाला. युद्धाने उग्र रूप धारण केले. सर्व जीवांचा संहार होऊ लागला. अग्नीप्रमाणे चमकदार हत्यारे चमकू लागली. प्रहारांनी सैनिक नष्ट होऊ लागले. जाज्वल्यमान शस्त्रांच्या आघातांनी स्वर्ग, भूतल व पाताल यांचा थरकाप झाला.

हे पाहून रुद्राने क्रुद्ध होऊन ब्रह्मशीर्ष नावाचे अस्त्र चालविले. तेव्हा चंद्राने अचूक लक्ष्यवेध करणारे सोमास्त्र उपयोगात आणले. या दोनही अस्त्रांच्या टकरांनी सर्व समुद्र, भूमी, अंतरिक्ष यांचा थरकाप झाला. सर्व जगताचा विनाश होणार असे पाहून ब्रह्मदेवांनी त्यांचे निवारण करीत म्हटले, ' सोम, तू असं अकारण कार्य का करीत आहेस? यानं लोकांचा नाश होतो ना. सोम, तू दुसऱ्याच्या स्त्रीचं हरण करून वर पुन्हा युद्ध करितोस ? म्हणून तू शांतस्वरूप असूनही शुक्लपक्षाच्या अंती म्हणजे कृष्णपक्षात पापग्रह म्हणून प्रसिद्ध होशील. तू बृहस्पतींची भार्या त्यांना समर्पण कर. दुसऱ्याचं धन घेऊन ते परत करण्यात अपमान होत नाही.' ब्रह्मदेवांची ही आज्ञा चंद्राने मानली. बृहस्पती तारे-

सह आपल्या घरी निघून गेले.

## तारेपासून बुधाची उत्पत्ती, पुरूरवा व उर्वशी, नहुषपुत्र ययातीचा वृत्तांत

त्यानंतर एक वर्षाने तारेच्या उदरापासून एक कुमार प्रकट झाला. तो बारा सूर्यांप्रमाणे तेजस्वी, दिव्य पीतांबरधारी, दिव्य आभूषणांनी विभूषित व चंद्राप्रमाणे कांतिमान होता. तो संपूर्ण अर्थशास्त्राचा ज्ञाता, उत्कृष्ट बुद्धीचा व हस्तिशास्त्राचा प्रवर्तक होता. हेच शास्त्र 'राजपुत्रीय' नावाने विख्यात झाले. यात गजचिकित्सा आली आहे. हा सोमराजाचा पुत्र असल्यामुळे राजकुमार, राजपुत्र व बुध या नावांनी प्रसिद्ध झाला. त्याचे जातकर्मादी संस्कार करून ब्रह्मदेवांनी त्याला बृहस्पतींच्या घरी आणले. चंद्राने त्या पुत्राचा स्वीकार करून त्याचे नाव बुध ठेवले. ब्रह्मदेवांनी त्याला भूतलावर अभिषिक्त करून ग्रहांची समता दिली.

यानंतर बुधास एक पुत्र झाला. इलाच्या गर्भापासून उत्पन्न झालेल्या या पुत्राचे नाव पुरूरवा होते. तो सर्व लोकांकडून वंदित झाला. त्याने आपल्या प्रभावाखाली शंभराहून अधिक अश्वमेधयज्ञ केले. या राजा पुरूरव्याने हिमालयपर्वताच्या रमणीय शिखरावर भगवान विष्णूंची आराधना करून सर्व प्रकारचे ऐश्वर्य मिळविले. तो सात द्वीपांचा अधिपती झाला. त्याने केशी आदी कोटचवधी दैत्यांना नष्ट केले. त्याच्या रूपावर मुग्ध होणारी उर्वशी त्याची पत्नी झाली. पुरूरव्याने पर्वत, वनें, कानने यांसहित सात द्वीपांच्या पृथ्वीचे धर्मपूर्वक पालन केले. कीर्ती तर त्याच्यावर सदा चवरी ढाळत होती. भगवान विष्णूंच्या कृपेने त्याने इंद्राचे अर्धासन प्राप्त केले.

पुरूरवा धर्म, अर्थ व काम यांना समानरूपाने पाळीत असे. पूर्वी धर्म, अर्थ, काम कुतूहलाने आपणांस समान रूपाने राजा कसे पाहातो, हे देखण्यासाठी त्याच्यापाशी आले. अर्घ्य, पाद्य देऊन राजाने त्यांचे स्वागत केले. त्यांना सुवर्णजडित आसनांवर त्याने नेऊन बसविले. त्यांची त्याने पूजा केली. राजाने धर्माची पूजा थोडी अधिक केली. याचा राग

अर्थ व काम यांना आला. क्रुद्ध होऊन अर्थानें राजास शाप दिला, 'तू लोभामुळं नष्ट होशील.' कामानेही म्हटले, 'राजन्, गंधमादनपर्वतावरील कुमारवनात तुला उर्वशीच्या वियोगानं उन्माद होईल.' धर्मानें म्हटले, 'राजेन्द्रा, तू दीर्घायुषी व धार्मिक बनशील. तुझ्या संततीची वृद्धी होईल. जोपर्यंत सूर्य, चंद्र, तारांगण आहेत, तोपर्यंत या भूतलावरून त्यांचा विनाश होणार नाही.' असे म्हणून ते सर्व अंतर्धान पावले.

राजेश्वर पुरूरवा प्रतिदिन देवराज इंद्रास पाहाण्यासाठी अमरावतीस जात असे. एकदा तो सूर्याच्या रथावर आरूढ होऊन गगनतलाच्या दक्षिणभागी हिंडत होता. त्याच वेळी त्याने दानवराज केशिबरोबर चित्रलेखा व उर्वशी नावांच्या अप्सरांना आकाशात पाहिले. तेव्हा पुरूरव्याने वायव्यास्त्राचा प्रयोग करून दानवराज केशीस पराजित केलें. या संग्रामात इंद्रही पराभूत झाला. त्यानंतर राजानें उर्वशीला इंद्राला समर्पित केले. त्यामुळे त्याची देवांशी मैत्री वाढली. तो इंद्राचाही मित्र झाला. इंद्रानें प्रसन्न होऊन राजास सर्व लोकांत श्रेष्ठता, बल, पराक्रम, यश व संपत्ती दिली. भरतमुनीकडून त्याचे यशोगनही केले. उर्वशी पुरूरव्याच्या प्रेमाने त्याचे महान यश गाऊ लागली. एकदा भरतमुनीने 'लक्ष्मीस्वयंवर' नावाचे नाटक केले. त्यात इंद्राने मेनका, उर्वशी व रंभा या तिघींना नृत्य करण्याचा आदेश दिला. त्यात उर्वशी लक्ष्मीचे रूप धारण करून लयपूर्वक नृत्य करीत होती. नृत्यकालात पुरूरव्यास पाहून ती शुद्धबुद्ध विसरली. तेव्हा भरतमुनीने तिला अभिनयाचा नियम सांगितला. तो ती सर्व विसरून गेली. तेव्हा भरतमुनीने क्रोधित होऊन तिला शाप देताना म्हटले, 'तू याच्या वियोगानं भूतलावर पंचावन्न वर्षांपर्यंत सूक्ष्मलतेच्या रूपात उत्पन्न होऊन राहाशील व पुरूरवा तिथंच पिशाचयोनीचा अनुभव घेईल.'

त्यानंतर उर्वशीने पुरूरव्यास पतिरूपानें स्वीकारले. भरतमुनीच्या शापातून निवृत्त झाल्यावर उर्वशीनें बुधपुत्र पुरूरव्यापासून आठ पुत्रांना जन्म दिला. आयू, दृढायू, अश्वायू, धनायू, धृतिमान, वसू, शुचिविद्य व शतायू; अशी त्यांची नावे होती. हे सर्व पुत्र पराक्रमी निघाले. यांतील आयूस नहुष, वृद्धशर्मा, रजी, दंभ व विपाप्मा नावांचे पांच वीर पुत्र

झाले. रजीस शंभर पुत्र झाले. हे राजेय या नावाने विख्यात झाले. रजीनें भगवान नारायणांची आराधना केली. नारायणांनी त्याला असुर व मनुष्य यांपासून तो विजयी होईल, असा वर दिला.

त्यानंतर प्रल्हाद व इंद्र यांचा संग्राम तीनशे वर्षे चालला. कोणासच विजय मिळाला नाही तेव्हा देवांनी व असुरांनी ब्रह्मदेवांना विचारले, 'ब्रह्मन्, आमच्यापैकी कुणाचा विजय होईल?' हे ऐकून ब्रह्मदेव म्हणाले, 'ज्याच्या बाजूस रजी होईल, त्याचा विजय होईल.' तेव्हा दैत्यांनी त्याची विजयासाठी प्रार्थना केली. देवांनीही त्याची प्रार्थना केली. रजिराजाने इंद्राकडून अवध्य असलेल्या असुरांचा नाश केला. यानें प्रसन्न होऊन देवराज इंद्र राजाचा पुत्र झाला. रजीने इंद्राला राज्य सर्मपित केले व तो वनात तपस्या करण्यासाठी निघून गेला.

त्यानंतर तपस्या, बल व गुण यांनी संपन्न असलेल्या रजिपुत्रांनी इंद्राचे वैभव, त्याचे राज्य बलपूर्वक हिरावून घेतले. राज्यापासून भ्रष्ट झालेला इंद्र दीनदुःखी होऊन बृहस्पतींपाशी गेला व म्हणाला, 'गुरुदेव, मी रजिपुत्रांकडून पराभूत झालो आहे. आता मला यज्ञभाग मिळत नाही. माझं राज्य नाहीसं झालं आहे. आता राज्यप्राप्तीसाठी एखादा उपाय आपण मला सांगावा.' तेव्हा बृहस्पतींनी ग्रहशांती करून इंद्रास बलवान केले. त्यांनी रजिपुत्रांना मोहात टाकले. इंद्राने रजिपुत्रांचा संहार केला.

नहुषालाही सात पुत्र झाले. यती, ययाती, संयाती, उद्भव, पाची, शर्याती व मेघजाती; अशी त्यांची नावे होती. हे सातही वंशउद्धारक निघाले. ज्येष्ठ पुत्र यती कुमारावस्थेतच योगी बनला. दुसरा पुत्र ययाती धर्माचा आश्रय घेऊन राज्य सांभाळू लागला. त्याचवेळी दानवराज वृषपर्व्याची पुत्री शर्मिष्ठा व शुक्राचार्यांची व्रतपरायण कन्या देवयानी; या दोघी ययातीच्या पत्नी झाल्या. यांच्या गर्भांतून राजा ययातीस पांच पुत्र झाले. देवयानीस यदू व तुर्वसू नावांचे दोन पुत्र झाले. शर्मिष्ठास द्रह्यू, अनू व पुरू असे तीन पुत्र झाले. यांतील यदू व पुरू यांनी वंशाचा विस्तार केला.

नहुषनंदन राजा ययाती सत्यपराक्रमी व अजेय होता. त्याने

पृथ्वीचे पालन धर्मपूर्वक केले. विधिपूर्वक यज्ञांची अनुष्ठाने त्यानें केली. तो भक्तिपूर्वक देवांची व पितरांची अर्चना करीत असे. अशा प्रकारे नहुषपुत्र ययातीने अनेक वर्षेपर्यंत धर्मपूर्वक प्रजेचे पालन केले. यानंतर तो रूपास विकृत करणाऱ्या भयंकर वृद्धावस्थेने ग्रस्त झाला. वृद्ध झाल्यावर राजा ययातीनें आपल्या यदू, पुरू, तुर्वसू, द्रुह्यू, अनू यांना आपणांस त्यांची युवावस्था देण्यास सांगितले. पण यदू आदी पुत्रांनी पित्याची वृद्धावस्था स्वीकारण्यास संमती दिली नाही.

तेव्हा सर्वांत कनिष्ठ पुत्र सत्यपराक्रमी पुरू त्याला म्हणाला, 'बाबा, आपण आपलं वृद्धत्व मला द्यावं. माझं हे युवाप्राप्त शरीर आपण घ्यावं. आपण सुखानं उपभोग घ्यावा. मी आपली वृद्धावस्था घेऊन सुखानं राज्य करीन.' पुरूनें असे म्हटल्यावर राजर्षी ययातीने आपल्या तपोबलाच्या आश्रयाने आपले वृद्धत्व पुरूच्या शरीरात व त्याचे यौवन आपल्या शरीरात स्थापन केले. ययाती तरुण झाला. पुरू राजाची वृद्धावस्था धारण करून राज्यकारभार पाहू लागला.

अशी एक हजार वर्षे झाली. ययाती कामभोगानें तृप्त झाला. तो आपल्या पुत्रास, पुरूस म्हणाला, 'मुला, केवळ तुझ्याचमुळं मी पुत्रवान आहे. तूच माझा वंशविस्तार करणारा पुत्र आहेस. आजपासून हा वंश पुरुवंश या नावानं ओळखला जाईल.' यानंतर ययातीनें पुरूस राज्याभिषेक केला व काही काळानंतर तो मरण पावला.

## कच, शुक्राचार्य, देवयानी

राजर्षी ययाती देवराज इंद्रासारखा तेजस्वी होता. पूर्वी शुक्राचार्य व वृषपर्वा यांच्या कन्यांनी ययातीस पतिरूपाने स्वीकारले होते. बृहस्पती देवांचे व शुक्राचार्य दैत्यांचे आचार्य बनले हे दोनही ब्राह्मण आपापसांत स्पर्धाशील होते. देव युद्धात दानवांना मारीत असत. आणि शुक्राचार्य संजीवनीविद्येपासून त्यांना जिवंत करीत. ते पुन्हा उठून देवांशी युद्ध करीत. असुरांनी मारलेले देव मात्र परत जिवंत होत नसत. शक्तिशाली शुक्राचार्यांनाच संजीवनीविद्या माहीत होती. बृहस्पतींना ती माहीत नव्हती. यामुळे देवांना मोठा विषाद वाटला.

देवांना शुक्राचार्यांची मोठीच भीती वाटे. ते बृहस्पतींच्या ज्येष्ठ पुत्रास, कचास म्हणाले, ' पुत्र, आम्ही तुला शरण आलो आहोत. तू आता आम्हांस साह्य करावंस. अमित तेजाची ब्राह्मण शुक्राचार्यांपाशी संजीवनीविद्या आहे. तू ती त्वरित शीक. यामुळं तुलाही आमच्या-बरोबर यज्ञभाग प्राप्त होईल. राजा वृषपर्व्याकडे जाऊन तू शुक्राचार्यांचं दर्शन घे. त्यांची आराधना करण्यास तुझ्याएवढा समर्थ कुणी नाही. त्या महात्म्यांच्या प्रिय पुत्रीचं नाव देवयानी आहे. तू त्यांना सेवेनं प्रसन्न कर. शील-स्वभाव, मधुर व्यवहार, सदाचार व इंद्रियसंयम यांनी तू देवयानीस संतुष्ट कर.' 'ठीक आहे' असे म्हणून बृहस्पतिपुत्र कच वृष-पर्व्यापाशी आला. त्याने शुक्राचार्यांची भेट घेतली. त्यांना प्रणाम करून तो म्हणाला, ' भगवन्, मी अंगिराऋषींचा पौत्र व साक्षात बृहस्पतींचा पुत्र आहे. माझं नाव कच आहे. आपण मला शिष्य करून घ्यावं. ब्रह्मन्, आपण माझे गुरू आहात. मी आपल्याजवळ राहून एक हजार वर्षंपर्यंत उत्तम ब्रह्मचर्याचं पालन करीन. आपण मला अनुमती द्यावी.'

तेव्हा शुक्राचार्य म्हणाले, ' कचा, तुझं मी स्वागत करतो. मी तुझी विनंती मान्य केली आहे. मी तुझा सन्मान व सत्कार करीन. तुझा सत्कार केल्यानं बृहस्पतींचा सत्कार होईल.' तेव्हा कचाने शुक्राचार्यांचा आदेश मानून ब्रह्मचर्यव्रत धारण केले. शुक्राचार्यांनी शिष्य म्हणून त्याचा स्वीकार केला. आचार्य शुक्र व त्यांची कन्या देवयानी यांची तो नित्य आराधना करू लागला. तो नवयुवक होता. नृत्य व गायन करून तो देवयानीस संतुष्ट करी. आचार्यकन्या देवयानी युवती होती. तिच्यासाठी कच फुले व फळे घेऊन तिला प्रसन्न ठेवायचा. ती नेहमी कचाजवळच राहायची. आमोदप्रमोदात भाग घ्यायची. त्याची एकान्तात सेवा करायची.

अशा प्रकारे तेथे राहून कचाने पांचशे वर्षेपर्यंत ब्रह्मचर्यव्रताचे पालन केले. दानवांना ही वार्ता समजली. त्यानंतर कचास एकान्त-प्रदेशात एकटा, गायी चारण्यासाठी तो आला असताना बृहस्पतींच्या द्वेषाने व संजीवनीविद्येचे रक्षण करण्यासाठी गाठून दानवांनी त्याला मारून टाकले. नंतर त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून त्यांनी ते

कोल्ह्यांना व कुत्र्यांना खायला दिले. त्या दिवशी गायी रक्षकाखेरीजच आपल्या घरी परत आल्या. देवयानीनें पाहिले, गायी परत आल्या, पण त्यांच्याबरोबर कच नाही. तेव्हा तिने आपल्या पित्यास हा प्रकार सांगितला. ती म्हणाली. 'प्रभो, आपण अग्निहोत्र केलं आहे. सूर्य अस्ताला गेला. गायी आज रक्षकाविना परत आल्या आहेत, तरी कच काही दिसत नाही. पिताजी, मला असं वाटतं की, कच मारला गेला आहे. त्याला पकडलं तरी असावं. मी त्याच्याशिवाय जिवंत राहू शकणार नाही, हे खरंच सांगते.'

तेव्हा तिला शुक्राचार्य म्हणाले, 'पुत्री, तू भिऊ नकोस. मी मरण पावलेल्या कचास 'ये ये' असं म्हणून जिवंत करीन.' असे म्हणून त्यांनी संजीवनीविद्येचा प्रयोग करून कचास पुकारले. गुरूंनी पुकारा करताच सरस्वतीनंदन कच दुरून दौडतच आला. शुक्राचार्यांना प्रणाम करून तो म्हणाला, 'गुरुजी, राक्षसांनी मला मारलं होतं.' त्यानंतर देवयानीनें स्वतःसाठी वनातून फुले आणण्यासाठी त्याला वनात पाठविले. कचाने वेदाचा पाठ करीत वनात जाऊन पुष्पे वेचायला सुरुवात केली. याच अवस्थेत दानवांनी त्याला पाहिले. त्याला आसुरांनी दुसऱ्यांदा मारून अग्नीत जाळून टाकले व त्याच्या दग्ध शरीराचे चूर्ण करून ते त्यांनी मदिरेत मिसळून शुक्राचार्यांना पाजले. देवयानी आपल्या पित्यास म्हणाली, 'तात, आज मी त्याला फुलं आणण्यासाठी वनात पाठविलं होतं. पण तो अजूनपर्यंत आलेला नाही. मला असं वाटतं की, त्याला मारलं असावं. पिताजी, मी त्याच्याविना जिवंत राहू शकणार नाही.'

त्यावर शुक्राचार्य म्हणाले, 'मुली, बृहस्पतीचा पुत्र कच मरण पावला आहे. मी माझ्या विद्येनं त्याला अनेकदा वाचविलं. पण आताही तो मारला गेला आहे. आता मी काय करू ? देवयानी, तू शोक करू नकोस. रडू नकोस. तुझ्यासारखी शक्तिशाली स्त्री मेलेल्यासाठी शोक करणार नाही. तुला तर वेद, ब्राह्मण, इंद्रासहित सर्व देव, वसुगण, अश्विनीकुमार, दैत्य, जगातील सर्व प्राणी माझ्या प्रभावानं तिनही काळी आपलं मस्तक वाकवून प्रणाम करतात. आता या ब्राह्मणास जिवंत करणं अशक्य आहे. जर तो जिवंत होईल, तर पुन्हा दैत्यांकडून

मारला जाईल.'

तेव्हा देवयानी म्हणाली, 'तात, अत्यंत वृद्ध अंगिरा ज्याचे पितामह आहेत, तपस्येचं भांडार बृहस्पती ज्याचे पिता आहेत, जो ऋषींचा पौत्र व ऋषींचा पुत्र आहे, त्या ब्रह्मचारी कचासाठी मी शोक कसा करू नको ? मी का रडू नको ? तो ब्रह्मचर्यपालनात तत्पर होता. तपस्या हेच त्याचं धन होतं. तो कार्यकुशल होता. म्हणून तो मला फार प्रिय होता. सदा माझ्या मनाप्रमाणं तो वागायचा. आता मी त्याच्यासाठी भोजनाचा त्याग करीन. कच ज्या मार्गानं गेला आहे. त्याच मार्गानं मी जाईन.'

देवयानीचा असा दुःखपूर्ण शोक पाहून महर्षी शुक्राचार्यांनी कचास हाक मारली. ते दैत्यांना रागावून म्हणाले, 'असुर माझा द्वेष करतात, यात थोडाही संशय नाही. म्हणून तर ते इथं आलेल्या माझ्या शिष्यांचा द्वेष करतात. त्यांना मारतात. हे भयंकर स्वभावाचे लोक माझं ब्राह्मणत्व नाहीसं करण्याचा प्रयत्न करतात. म्हणून प्रतिदिन माझ्या विरुद्धच आचरण करतात. या पापाचा परिणाम इथं अवश्य प्रकट होईल. ब्रह्महत्या कुणास नाही जाळणार ? वाटल्यास तो इंद्रही असे ना का.' गुरूंनी विद्येचा प्रयोग करून कचास हाक मारली. तेव्हा पोटात असलेला कच भीत होता. त्याला शुक्राचार्य म्हणाले, 'वत्सा, कोणत्या मार्गानं तू माझ्या पोटात येऊन स्थिर झालास ? नीट सांग सर्व.'

तेव्हा कचाने म्हटले, 'गुरुदेवा, आपल्या कृपेनं माझ्या स्मरणशक्तीनं मला दगा दिला नाही. जे काही घडलं त्याचं मला नीट स्मरण आहे. आपलं पोट फाडून बाहेर यावं तर माझ्या तपस्येचा नाश होणार. असं काही होऊ नये, म्हणून मी घोर क्लेश सहन करीत आहे. आचार्य, असुरांनी मला जाळून माझं चूर्ण केलं. त्यांनी ते चूर्ण मदिरेत घातलं आणि आपणांस पिण्यासाठी दिलं. आपण ब्राह्मी, आसुरी व दैवी; अशा तीन प्रकारच्या मायांना जाणता. यांचं उल्लंघन मी कसं करू ?'

यावर शुक्राचार्य कन्येस म्हणाले, 'मुली, आता तुझ्यासाठी दुसरा कोणताच उपाय नाही. मी आता कोणतं प्रिय कार्य करू ? माझा वध करून कच शरीराच्या बाहेर येईल.' तेव्हा देवयानी म्हणाली, 'तात, कचाचा नाश व आपला वध; हे दोनही मला अग्नीप्रमाणं जाळतील.

कच नष्ट झाल्यानं मला शांती मिळणार नाही. आणि आपण मरण पावलात तर मी जिवंत राहू शकणार नाही.'

यानंतर शुक्राचार्य म्हणाले, 'बृहस्पतीच्या पुत्रा, कचा, आता तू तयार हो. कारण तू देवयानीचा भक्त आहेस. ती तुला चाहते. तू आता मृतसंजीवनीविद्या ग्रहण कर. केवळ एक ब्राह्मणच माझ्या पोटातून जिवंत बाहेर येईल. मुला, माझ्यासाठी तू जिवंत होऊन बाहेर ये. आणि पुत्राच्या नात्यानं तू मला पुन: जिवंत कर.'

अशा रीतीनें गुरूकडून कचाने संजीवनीविद्या प्राप्त केली. विप्रवर कच तत्काळ शुक्राचार्यांचे पोट फाडून बाहेर आला. मूर्तिमान वेदराशी-प्रमाणे असलेले शुक्राचार्य जमिनीवर पडलेले होते. आपल्या मरण पावलेल्या गुरूंना कचाने संजीवनीविद्येच्या प्रभावानें जिवंत केले. गुरूस प्रणाम करून तो म्हणाला, 'गुरुदेवांचा आदर न केल्यास शिष्य नरकात जातो.'

हा सर्व वृत्तांत सांगून शौनक शतानीकास म्हणाले, 'विद्वान शुक्राचार्य मदिरापानामुळंच ठकविले गेले. अत्यंत भयानक अशी त्यांची परिस्थिती झाली. त्यांनी कचासह मदिरापान केले होते. हे सर्व पाहून कविपुत्र शुक्र क्रोधित झाले. मदिरापानाबद्दल त्यांच्या मनात घृणा उत्पन्न झाली. त्यांनी ब्राह्मणांचे हित करण्यासाठी घोषणा केली. 'आज-पासून जो कुणी मंदबुद्धी ब्राह्मण अज्ञानानं मदिरापान् करील, तो धर्मापासून भ्रष्ट होऊन ब्रह्महत्त्येचा पापी होईल. तो इहलोकी व पर-लोकी निंदित होईल. धर्मशास्त्रात माझी ही मर्यादा सर्वांना मान्य होईल. साधुपुरुष, बाह्मण, गुरूजवळ अध्ययन करणारे शिष्य, देव व सर्व माणसं यांनी माझी ही मर्यादा नीट ध्यानात ठेवावी.'

असे म्हणून शुक्राचार्यांनी दानवांना बोलावून म्हटले, 'दानवांनो, तुम्ही सर्वजण मूर्ख आहात. मी तुम्हांस सांगतो की, कचानं संजीवनी-विद्या प्राप्त केली आहे. हा ब्राह्मण ब्रह्मस्वरूप आहे.' कचाने एक हजार वर्षे गुरूपाशी राहून आपले व्रत पूर्ण केले. गुरूंची अनुमती घरी जाण्या-साठी घेऊन तो त्या तयारीत राहिला.

## देवयानीची विवाहासाठी विनवणी, कचाची अस्वीकृती

कचाचे व्रत समाप्त झाले तेव्हा तो आपल्या देवलोकात जाण्यासाठी तयार झाला. त्यावेळी त्याला गुरू शुक्राचार्यांनी आज्ञा दिली. पण देवयानी त्याला म्हणाली, 'महर्षी, अंगिरसांच्या पौत्रा, तू सदाचार, उत्तम कुल, विद्या, तपस्या, इंद्रियसंयम इत्यादींनी शोभत आहेस. महायशस्वी महर्षी अंगिरा जसे माझ्या पित्यांना माननीय वाटतात, त्याचप्रमाणं तुझे पिता मला आदरणीय आहेत. तपोधना, आता मी जे सांगणार आहे, त्यावर विचार कर. तू जेव्हा व्रत व नियम यांचं पालन करीत होतास, त्यावेळी मी तुझ्याशी जे वर्तन केलं होतं, ते तू विसरू नकोस. आता तुझं व्रत समाप्त झालं आहे. तू अभीष्ट विद्या प्राप्त केली आहेस. मी तुझ्यावर प्रेम करते. तू माझा स्वीकार करावास. वैदिक मंत्रांनी तू विधिवत माझं पाणिग्रहण करावंस.'

यावर कच म्हणाला, 'देवयानी, ज्याप्रमाणं तुझे पिता शुक्राचार्य मला वंदनीय आहेत. तशीच तूही, त्यांच्यापेक्षाही मला माननीय वाटतेस. भद्रे, तू गुरुपुत्री असल्यानं सदा पूजनीय आहेस. देवयानी, तू माझ्याशी अशा प्रकारे बोलता कामा नये.' तेव्हा देवयानी त्याला म्हणाली, 'द्विजोत्तम, तू माझ्या गुरूंचा पुत्र आहेस. माझ्या पित्याचा नाहीस. कचा, जेव्हा असुर तुला वारंवार मारत होते, तेव्हा मीच प्रेमानं तुझं रक्षण केलं. याचं तू स्मरण कर. तू धर्माचा ज्ञाता आहेस. माझी तुझ्यावर भक्ती आहे. माझा त्याग करणं उचित नाही.'

त्यावर कच म्हणाला, 'उत्तम व्रताचं आचरण करणाऱ्या सुंदरी, तू मला अनुचित कार्यात प्रवृत्त करीत आहेस. शुभे, तू माझ्यावर प्रसन्न हो. तू मला गुरूंपेक्षाही श्रेष्ठ आहेस. भामिनी, शुक्राचार्यांच्या ज्या उदरापासून तू आलीस, त्याच उदरात मी होतो. भद्रे, धर्माच्या दृष्टीनं तू माझी बहीण झालीस. शुभानने, तू असं काही बोलू नकोस. कल्याणी, मी तुमच्या घरी मोठ्या सुखानं राहिलो. तुमच्या विषयी माझ्या मनात थोडाही रोष नाही. मी आता घरी जात आहे. तू मला आशीर्वाद दे. सदा सावधान राहून माझ्या गुरूंची, शुक्राचार्यांची सेवा तू करीत जा.'

यावर देवयानी म्हणाली, 'कचा, दैत्यांकडून तू वारंवार मारला जात होतास, तेव्हा मी तुला पतिबुद्धीनं वाचविलं. मी धर्मानुकूल अशा कामासाठी तुला प्रार्थना केली आहे. तू जर मला नाकारून जाशील तर तुझी संजीवनीविद्या निष्फळ होईल.' तेव्हा कच म्हणाला, 'देवयानी, तू गुरुपुत्री आहेस. तू मला दोष देऊ नकोस. तू मला शाप दिलास. भगिनी, मी तुला आर्यधर्म सांगतो. अशा वेळी तू शाप देणं योग्य नाही. तू धर्माला अनुसरून नव्हे, तर कामास वशीभूत होऊन मला शाप दिला आहेस. यासाठी तुझ्या मनातील कामना पूर्ण होणार नाही. कोणताही ऋषिपुत्र, ब्राह्मणपुत्र तुझा स्वीकार करणार नाही. माझी विद्या सफल न होण्याचा तू मला शाप दिलास. ठीक आहे. मी ज्याला विद्या देईन, त्याला तर ती प्राप्त होईल.'

असे म्हणून द्विजश्रेष्ठ कच मोठ्या त्वरेने इंद्रलोकास गेला.त्याला पाहून देव म्हणाले, 'कचा, तू आमच्यासाठी हे महान अद्भुत कार्य केलंस. तुझ्या यशाचा लोप आता कधी होणार नाही. यज्ञात भाग मिळण्याचा अधिकार तुला प्राप्त होईल.'

## देवयानी-शर्मिष्ठा यांच्यांत कलह, देवयानी व ययाती

कचानें मृतसंजीवनीविद्या जेव्हा आणली, तेव्हा देवांना अतिशय आनंद झाला. कचापासून ती विद्या शिकून ते कृतार्थ झाले. मग सर्वांनी इंद्रास म्हटले, 'पुरंदर, आता पराक्रम करण्याचा समय आला आहे. आपल्या शत्रूचा संहार करावा.' इंद्रानें त्याला संमती दिली. तो भूलोकावर चैत्ररथ नावाच्या वनात आला. तेथे त्याने सुंदर कन्या जलक्रीडा करीत असलेल्या पाहिल्या. इंद्रानें वायूचे रूप घेवून त्यांचे कपडे परस्परांत मिसळून दिले. सर्व कन्या बरोबरच जलातून बाहेर पडल्या. या गडबडीत शर्मिष्ठानें देवयानीचे वस्त्र घेतले. शर्मिष्ठा वृषपर्व्याची कन्या होती. यामुळे शर्मिष्ठा व देवयानी भांडू लागल्या.

देवयानी म्हणाली, 'दानवपुत्री, तू माझी शिष्या असून माझं वस्त्रं कसं घेतलंस ? तुला सज्जनांचा आचार समजत नाही ? तुझं भलं होणार नाही.' त्यावर शर्मिष्ठा म्हणाली, 'अग, तुझा पिता माझ्या

पित्याची एखाद्या सेवकाप्रमाणं स्तुती करतो. तू तर भीक मागणाऱ्याची कन्या आहेस. तुझा बाप स्तुती करून दान घेतो. ज्याची स्तुती केली जाते त्याची कन्या मी आहे. भिक्षुकी, तुझ्या हातांत तर काही नाही. बघ, माझ्या हातात हे हत्यार आहे. तू माझ्यावर व्यर्थ रागावू नकोस.'

हे सर्व ऐकून देवयानी आश्चर्यचकित झाली. शर्मिष्ठापासून ती वस्त्र हिसकावून घेऊ लागली. हे पाहून शर्मिष्ठेने तिला एका विहिरीत ढकलून दिले. ती पाण्यात बुडून मेली असे समजून शर्मिष्ठा घरी आली. त्यानंतर नहुषपुत्र ययाती त्या ठिकाणी आला. त्याच्या रथाचे घोडे थकले होते. त्यालाही विश्रांती हवी होती. हिंसक पशूंच्या मागे धावता धावता त्याला तहान लागली होती. ययातीने त्या जलशून्य विहिरीकडे पाहिले. तेथे त्याने अग्निशिखेसारखी एक तेजस्वी कन्या पाहिली. ती देवांगनाप्रमाणे सुंदर होती. तिला पाहाताच ययाती म्हणाला,

'सुमध्यमे, तू कोण आहेस ? तुझं मुख मोठं मनोहर आहे. तुझं वयही तसं अधिक दिसत नाही. तुझ्या कानांत मणिक्यकुंडलं असून ती सुंदर व चमकदार आहेत. तू अशा घोर चिंतेत का आहेस ? तू असा दीर्घ श्वास का घेतेस ? तृण व काष्ठ यांनी झाकलेल्या या विहिरीत तू कशी पडलीस ? तू कुणाची पुत्री आहेस ? सर्व काही मला नीट सांग.'

'देवांनी मारल्यावर दैत्यांना जे आपल्या विद्येनं जिवंत करतात, त्या शुक्राचार्यांची मी कन्या आहे. आपण मला ओळखलं नाही. महाराज, लाल नखांचा हा माझा उजवा हात आहे. यास धरून आपण माझा उद्धार करावा. मी जाणते, आपण उत्तम कुलातील नरेश आहात. आपण परम शांत व पराक्रमी आहात. आपण या विहिरीत पडलेल्या अबलेचा उद्धार करावा.'

यानंतर नहुषपुत्र ययातीने देवयानीस ब्राह्मणकन्या समजून, तिचा उजवा हात धरून तिला विहिरीतून बाहेर काढले. सुंदर देवयानीची अनुमती घेऊन ययाती आपल्या नगरास गेला. तो निघून गेल्यावर देवयानी शोकाने व्याकुळ झाली. तिने आपल्या सखीबरोबर सर्व वृत्तांत कळविण्यास सांगितले. या वृषपर्व्याच्या नगरीत परत जाणार नाही, असेही तिने कळविले. घूर्णिकाने सर्व वृत्तांत शुक्राचार्यांना सांगितला.

शुक्राचार्य त्वरित वनात आले. आपल्या पुत्रीस, देवयानीस पाहून त्यांना आनंद झाला. तिने पित्यास सांगितले, ' तात, वृषपर्व्याच्या मुलीनं आज माझा व तुमचाही अपराध केला आहे. मी तर आता शर्मिष्ठास आपल्या परीनं समजावलं.'

त्यावर शुक्राचार्य म्हणाले, ' देवयानी, तू स्तुती करणाऱ्या, भीक मागणाऱ्या अथवा दान घेणाऱ्याची कन्या नाहीस. तू कुणाचीही स्तुती न करणाऱ्या ब्राह्मणाची पुत्री आहेस. त्याचीच स्तुती सर्वजण करतात. हे सर्व वृषपर्वा, देवराज इंद्र व ययाती राजा जाणतात. निर्द्वंद्व, अचित्य ब्रह्मच माझं खरं ऐश्वर्ययुक्त बल आहे.'

शुक्राचार्य पुढे देवयानीस म्हणाले,

' देवयानी, जो मनुष्य दुसऱ्यांची कठोर वचनं सहन करतो, त्याचा सर्व जगावर विजय होतो. देवयानी, उत्पन्न होणाऱ्या क्रोधास अक्रोधानं जिंकावं. क्रोध न करणाराच श्रेष्ठ आहे. अजाण मनुष्यानं अज्ञानवश होऊन केलेल्या वैर-विरोधास सहन करावं.' तेव्हा देवयानी त्यांना म्हणाली, ' पिताजी, जरी मी अजाण असले तरी धर्म-अधर्मातील भेद जाणणारी आहे. क्षमा मी जाणते. पण तात, वृषपर्व्याच्या पुत्रीनं अत्यंत कटू शब्द बोलून मला हिणवलं आहे.'

## शुक्राचार्य व वृषपर्वा, शर्मिष्ठा देवयानीची दासी

देवयानीचे बोलणे ऐकून शुक्राचार्य रागाने वृषपर्व्याकडे आले. वृषपर्वा राजसिंहासनावर बसला होता. शुक्राचार्य एकदम त्याला म्हणाले, ' राजन्, अधर्माचं फळ त्वरित मिळतं असं नाही. पण केलेल्या पापाचं फळ कधी तरी मिळतंच. राजन्, अंगिरसांचा पौत्र कच विशुद्ध ब्राह्मण होता. माझ्या घरी राहून तो माझी सेवा करायचा. तू त्याचा वध वारंवार केलास. तुझ्या पुत्रीनं माझ्या कन्येचा वध करण्यासाठी तिला विहिरीत ढकललं. या दोन अपराधांसाठी मी तुझा त्याग करणार आहे. राजन्, मी तुझ्या राज्यात एक क्षणही राहाणार नाही. दैत्यराज, आपल्या उद्धट स्वभावाच्या पुत्रीची उपेक्षा का करतोस ?'

त्यावर वृषपर्वा म्हणाला, ' भृगुनंदन, आपण कधीच मिथ्या भाषण

केलं नाही. आपणांत नेहमी धर्म व सत्य यांचाच निवास असतो. आपण आमच्यावर कृपा करावी. भार्गव, आपण जर आम्हांस सोडून जाल, तर आम्ही समुद्रात प्रवेश करू. दुसरी गतीच आम्हांस उरणार नाही.' नंतर शुक्राचार्य म्हणाले. 'असुरा, तुम्ही समुद्रात जा अथवा चारी दिशांना पळून जा. मी माझ्या पुत्रीचा अपमान सहन करू शकत नाही. कारण ती मला अत्यंत प्रिय आहे. तू माझ्या देवयानीस प्रसन्न कर. ती प्रसन्न झाली तरच मी इथं राहीन.' त्यावर वृषपर्वा म्हणाला, 'भृगुनंदन, या असुरांपाशी जेवढी संपत्ती आहे, तिचे आपणच स्वामी आहात.'

हे ऐकल्यावर शुक्राचार्य वृषपर्व्यासह देवयानीकडे गेले व तिला म्हणाले, 'सुभगे, तुझं आता समाधान होईल.' तेव्हा देवयानी म्हणाली, 'तात, आपण या संपत्तीचे स्वामी आहात, याचा स्वतः राजांनी विश्वास द्यावा.' तेव्हा वृषपर्वा म्हणाला, 'पवित्र हास्य करणाऱ्या देवयानी, तुला जी वस्तू हवी, ती तू माग. मग ती अत्यंत दुर्लभ असली तरी मी तुला देईन.' त्यावर देवयानी म्हणाली, 'मला शर्मिष्ठा हवीय. तिनं एक हजार दासींसह माझी दासी बनावं. पिताजी माझा जिथं विवाह करतील तिथं ती माझ्याबरोबर येईल.'

हे ऐकून वृषपर्व्यानं शर्मिष्ठास बोलावून घेतले. शर्मिष्ठाने सर्व काही जाणले. आपल्या अपराधामुळे शुक्राचार्यांनी निघून जावे हे तिला योग्य वाटले नाही. शर्मिष्ठा एक हजार दासींसह शिबिकेत बसून वृषपर्व्यापाशी आली व देवयानीस म्हणाली. 'देवयानी, मी एक सहस्र दासींसह तुझी दासी बनून सेवा करीन. तुझा पिता ज्याच्याशी तुझा विवाह करतील, त्याच्या घरीही मी येईन.'

यावर देवयानी म्हणाली, 'अग, मी तर स्तुती करणाऱ्याची, दान घेणाऱ्या भिक्षुकाची मुलगी ना ? तू मोठ्या बापाची कन्या, त्याची स्तुती माझे वडील करतात. मग तू माझी दासी कशी होणार ग ?' यानंतर शर्मिष्ठा म्हणाली, 'आपद्ग्रस्त संबंधितांचं रक्षण कोणत्याही उपायानं करायला हवंय. तुझा पिता जिथं तुला देईल. तिथं मी तुझ्याबरोबर येईन.' वृषपर्व्याची पुत्री शर्मिष्ठा दासी होण्यास तयार झाली, हे पाहून देवयानी म्हणाली, 'पिताजी, आता मी नगरात प्रवेश करीन.

आपल्या विद्येचं बल अमोघ आहे. हे आता मला समजलं आहे.' आपल्या पुत्रीनं असे म्हटल्यावर शुक्राचार्य दानवांकडून पूजित झाल्यावर त्यांनी नगरात प्रवेश केला.

## देवयानी व शर्मिष्ठा, देवयानीचा ययातीशी विवाह

यानंतर दीर्घकाळ गेल्यावर देवयानी पुन्हा त्या वनात विहार करण्यासाठी आली. त्यावेळी तिच्याबरोबर एक हजार दासी घेऊन शर्मिष्ठाही सेवेसाठी उपस्थित होती. सर्व मैत्रिणींसह देवयानी त्या वनात विहार करू लागली. नाना तऱ्हेचे खेळ खेळून ती आनंदित झाली. वासंतिक पुष्पे, नाना प्रकारचे भोज्य पदार्थ यांचा आस्वाद तिने घेतला. याच वेळी स्वेच्छेने नहुषपुत्र राजा ययाती त्या वनात शिकार खेळण्यासाठी आला. परिश्रमाने तो थकला होता. त्याला पाणी हवे होते. त्याने देवयानी, शर्मिष्ठा इत्यादी युवतींनाही पाहिले. राजाने पवित्र हास्यमुखी देवयानी सुंदर आसनावर बसलेली पाहिली. तिच्या रूपास तुलना नव्हती. सुंदर स्त्रियांच्या मध्ये ती असून शर्मिष्ठा तिची चरणसेवा करीत होती. त्यांना पाहून ययातीने म्हटले,

'कन्यांनो, आपली नावं काय आहेत ? आपलं गोत्र काय आहे ? शुभे, आपण दोघींचाही परिचय मला करून द्यावा.'

'महाराज, मी असुरांचे गुरू शुक्राचार्यांची कन्या आहे. आणि ही दानवराज वृषपर्व्याची पुत्री, माझी सखी व दासी शर्मिष्ठा आहे. माझा विवाह झाल्यावर ही माझ्याबरोबर येईल.'

'सुंदरी, ही असुरकन्या रूपवती असून तिच्या भुवया सुंदर आहेत. ही तुझी दासी कशी झाली ?'

'आपण या विचित्र घटनांची चौकशी करू नये. सर्व काही दैवाप्रमाणंच घडतं. आपलं रूप राजाप्रमाणं दिसतं. आपण शुद्ध संस्कृत भाषेत बोलता. आपलं नाव काय आहे ? आपण आलात कुठून ? आपण कुणाचे पुत्र आहात ?'

'मी राजा नहुषाचा पुत्र आहे. ब्रह्मचर्यपूर्वक मी वेदांचं अध्ययन केलं आहे. माझं नाव ययाती आहे.'

'महाराज, आपण या वनात कशासाठी आला आहात ? आपणांस जल हवंय की कमलं ? की शिकारीसाठी इथं आलात ?'

'भद्रे, मी एका हिंसक पशूला मारण्यासाठी त्याचा पाठलाग करीत होतो, फार थकलो आहे मी. मी पाण्यासाठी इथं आलो आहे. आता मी परत जातो.'

'आपलं कल्याण असो. मी दोन हजार कन्या, ही शर्मिष्ठा यांच्या-सह आपल्या अधीन आहे. आपण माझे पती व्हावं.'

'शुक्रनंदिनी देवयानी, तुझं भलं असावं. भामिनी, मी तुमच्या योग्य नाही. क्षत्रियांना आपलं घराणं उचित नाही.'

'नहुषनंदन, ब्राह्मण व क्षत्रिय एकमेकांत मिसळून गेले आहेत. आपण राजर्षीचे पुत्र आहात. आता आपण माझ्याशी विवाह करावा.'

'वराननें, एकाच परमेश्वराच्या शरीरातून चारही वर्णांची निर्मिती झाली आहे. पण सर्वांचे धर्म व शौचाचार अलग अलग आहेत. ब्राह्मण त्या वर्णांत सर्वश्रेष्ठ आहे.'

'नहुषकुमार, नारीसाठी पाणिग्रहण हा एक धर्म आहे. यापूर्वी कुणीही पुरुषानं माझा हात पकडला नव्हता. सर्वांत आधी आपणच माझा हात पकडला. म्हणून आपणच माझे पती आहात, आता मी माझ्या हाताचा स्पर्श इतरांना कसा करू देणार ?'

'देवी, विज्ञ पुरुषानं जाणलं पाहिजे की, ब्राह्मणाचा क्रोध सर्व अग्नीपेक्षाही दुर्धर्ष व भयंकर असतो,'

'पुरुषप्रवर, ब्राह्मणाचा क्रोध असा असतो, हे आपणांस कुणी सांगितलं ?'

'भद्रे, सर्प एकासच चावतो. क्रोधानं भरलेला ब्राह्मण सारं राष्ट्र, सारं नगर नष्ट करील. भीरू, म्हणून मी ब्राह्मणास अधिक दुर्धर्ष मानतो. म्हणून जोपर्यंत तुझे वडील तुला माझ्या स्वाधीन करीत नाहीत, तोपर्यंत मी तुझ्याशी विवाह करू शकणार नाही.'

'राजन्, मी आपणांस वरलं आहे. आता माझ्या पित्याची अनुमती घेऊन आपण माझ्याशी विवाह करावा. आपण स्वतः त्यांच्यापुढं याचना

करू नये. त्यांनी अनुमती दिल्यावर आपण विवाह करावा. मग त्यांच्या कोपाचं भय आपणांस राहाणार नाही.'

इतके म्हणून देवयानीने आपल्या एका दासीला पित्यास बोलावून आणण्यास सांगितले. आपण स्वयंवराच्या विधीने नहुषनंदनास पतिरूपानें स्वीकारले असल्याचेही तिने आपल्या पित्यास कळविले. निरोप मिळताच शुक्राचार्यांनी तेथे येऊन राजास दर्शन दिले. राजा ययातीनें त्यांना प्रणाम केला. तो हात जोडून विनम्रभावाने उभा राहिला. देवयानी शुक्राचार्यांना म्हणाली, 'तात, हे नहुषपुत्र ययाती आहेत. यांनी संकटाच्या वेळी माझा हात पकडला होता. आपण मला यांना समर्पित करावं. मी यांच्याशिवाय कुणासच पती म्हणून स्वीकारणार नाही.'

तेव्हा शुक्राचार्य म्हणाले, 'वीर नहुषनंदन, माझ्या या लाडक्या पुत्रीनं तुम्हांस पतिरूपानं वरलं आहे. आपण माझ्या या कन्येचा पट्टराणी म्हणून स्वीकार करावा.' तेव्हा ययाती म्हणाला, 'भार्गव ब्रह्मन्, आपण मला वर द्यावा की, या विवाहामुळं मला वर्णसंकराचा दोष लागू नये.' तेव्हा शुक्राचार्य त्याला म्हणाले, 'राजन्, मी तुला या अधर्मापासून मुक्त करतो. मी तुझं पाप दूर केलं आहे. तू या सुंदर हास्याच्या देवयानीस धर्मपूर्वक पत्नी म्हणून स्वीकार. हिच्याबरोबर अतुल सुखाचा अनुभव घे. महाराज वृषपर्व्याची ही कन्या शर्मिष्ठाही तुला समर्पण करीत आहे. तू हिचा आदर नीट करीत जा. पण हिला कधी शेजेवर घेऊ नकोस. या शर्मिष्ठेस एकांतात कधी बोलावू नकोस. हिच्या शरीरासही स्पर्श करू नकोस. आता तू या देवयानीशी विवाह कर.'

## ययाति-देवयानीस पुत्र, ययाति-शर्मिष्ठास पुत्र

ययातीची राजधानी महेंद्रपुरीप्रमाणे होती. तेथे त्याने देवयानीची स्थापना अंतःपुरात केली. तिच्या अनुमतीने त्याने अशोकवाटिकेजवळ एक भवन निर्माण करून त्यात शर्मिष्ठाची एक हजार दासींसह व्यवस्था केली. नहुषकुमार ययातीने देवयानीबरोबर अनेक वर्षे विहार केला. तो तिच्या सहवासात प्रसन्न व सुखी होता. ऋतुकाल झाल्यावर देवयानीनें

गर्भ धारण करून एका पुत्रास जन्म दिला.

इकडे एक हजार वर्षे व्यतीत झाल्यावर वृषपर्वापुत्री शर्मिष्ठाने स्वत:स रजस्वलावस्थेत पाहून चिंतामग्न होऊन विचार केला. आपणांस ऋतुकाल तर प्राप्त झाला आहे. पण आपणांस पतीनं स्वीकारलेलं नाही. ही कशी परिस्थिती आहे ? आता कोणता उपाय करावा ? देवयानी तर पुत्रवती झाली आहे. आपलं यौवन आता व्यर्थ जाऊ नये. आपणही ययातीस का समर्पित होऊ नये ? आपण याचना केली तर ययाती आपणांस पुत्र देईल. पण तो धर्मात्मा नरेश काय मला एकांतात दर्शन देईल ?

शर्मिष्ठा असा विचार करीत असतानाच राजा ययाती तेथे अशोकवाटिकेजवळ आला. शर्मिष्ठास पाहून तो आश्चर्यचकित झाला. मनोहर हास्य करणाऱ्या शर्मिष्ठाने त्याला एकांतात एकट्यासच पाहिले. तिने पुढे होऊन त्याची आराधना केली. हात जोडून ती त्याला म्हणाली,

'नहुषनंदन, चंद्र, वायू, यम व वरुण जरी असले तरी आपल्या भवनातील स्त्रीस कोण पाहू शकणार ? महाराज, माझं रूप, कुल, शील इत्यादी आपण जाणताच. मी आज आपणांस प्रार्थना करते की, आपण मला आज ऋतुदान द्यावं. माझ्या ऋतुकालास सफल करावं.'

'शर्मिष्ठा, तू दैत्यराजाची सुशील व निर्दोष कन्या आहेस. मी हे सर्व जाणतो. तुझ्या शरीराची निंदा करावी, असं एकही स्थान नाही. पण मी काय करू ? जेव्हा देवयानीशी मी विवाह केला, तेव्हा शुक्राचार्यांनी मला स्पष्ट सांगितलं होतं की, शर्मिष्ठास शेजेवर बोलावून घेऊ नकोस.'

'राजन्, परिहासयुक्त वचन असत्य झालं तरी हानिकारक होत नाही. स्त्रियांशी विवाहाच्या वेळी, प्राणसंकटाच्या वेळी, सर्वस्व अपहरण झालं तर, विवश असताना असत्य भाषण केल्यास दोष घडत नाही. ही पांच प्रकारची असत्यं पापशून्य असतात.'

'देवी, सर्व प्राण्यांना राजा प्रमाण असतो. अर्थसंकट पडलं तरी विपरीत कर्म करू नये.'

'राजन्, आपला पती व सखीचा पती; दोनही बरोबर मानले आहेत. माझ्या सखीनं आपणांस पती मानलं आहे. म्हणून मीही आपणांस पतीच मानलं आहे.'

'याचकांना अभीष्टाचं दान करावं, असं माझं व्रत आहे. तूही माझ्याजवळ याचना केली आहेस. मग सांग मी तुझ्यासाठी कोणतं प्रिय कार्य करू ?'

'राजन्, मला अधर्मापासून वाचवून धर्माचं पालन करावं. मी आपणांपासून संतानवती बनून धर्माचं आचरण करीन, मी देवयानीची दासी आहे. देवयानी आपल्या अधीन आहे. म्हणून राजन्, आपण माझा अंगिकार करावा.'

शर्मिष्ठा असे म्हणाल्यावर राजानें तिचे म्हणणे मानले. त्यानें शर्मिष्ठाचा सत्कार करून तिला आपली भार्या बनविली, तिच्याशी सहवास करून तो आपल्या स्थानी निघून गेला. सुंदर भुवयांच्या शर्मिष्ठानें ययातीपासून गर्भ धारण केला. समय येताच तिने सूर्यासारख्या तेजस्वी पुत्रास जन्म दिला.

## देवयानी व शर्मीष्ठा यांचा संवाद, देवयानी रागावून पित्याच्या घरी जाते, शुक्राचार्यांचा ययातीस शाप

शर्मिष्ठास पुत्र झाला, हे पवित्र हास्याच्या देवयानीस जेव्हा समजले, तेव्हा ती दुःखीकष्टी झाली, ती शर्मिष्ठापाशी गेली व तिला म्हणाली,

'सुंदर भुवयांच्या शर्मिष्ठे, तू कामलोलुप होऊन हे पाप कशी करून बसलीस ?'

'सखी, कुणी एक धर्मात्मा ऋषी आले होते. ते वेदांचे विद्वान होते. मी त्यांना धर्मानुसार कामाची याचना केली. शुचिस्मिते, मी न्यायविरुद्ध कामाचं आचरण केलं नाही. त्या ऋषींपासूनच मला संतानाची प्राप्ती झाली. मी तुला हे सत्यच सांगते.'

'शर्मिष्ठे, तू जर श्रेष्ठ व ज्येष्ठ द्विजापासून संतान प्राप्त केलं असशील तर मग तुझ्यावर माझा राग नाही. भीरू, जर असंच घडलं

असेल तर चांगलंच आहे. त्या द्विजाचं नाम, गोत्र माहीत आहे ? मला जाणण्याची इच्छा आहे.

'शुचिस्मिते, तो आपल्या तपानं व तेजानं सूर्यासारखा प्रकाशत होता. त्याला पाहून मला काही विचारण्याचं साहस झालं नाही.'

त्या दोघींत अशी चर्चा चालली असताना दोघीही हसल्या. शर्मिष्ठा खरे तेच सांगत आहे, असे समजून देवयानी आपल्या मंदिरात गेली. राजा ययातीने देवयानीच्या गर्भापासून यदू व तुर्वसू अशा दोन पुत्रांना निर्माण केले. ते इंद्र व विष्णू यांच्याप्रमाणे वाटत. याच राजर्षीपासून शर्मिष्ठास द्रह्यू, अनू व पुरू; असे तीन पुत्र झाले. त्यानंतर एकदा देवयानी एकांतात ययातीला भेटली. तेथे तिने सुंदर रूपाची मुले खेळत असताना पाहिली. त्यांना पाहून ती आश्चर्यचकित झाली व म्हणाली;

'राजन्, हे देवासारखे कुमार कुणाचे आहेत ? तेज व रूप यांच्या बाबतींत ते मला आपणांसारखे दिसतात.' यानंतर तिने त्या कुमारांनाच विचारले, 'मुलांनो, तुम्ही कोण आहात ? तुमच्या ब्राह्मण पित्याचं नाव काय ?' त्यावर त्या बालकांनी आपल्या पित्याकडें, ययातीकडे बोट दाखविले. ते राजापाशी गेले. पण देवयानीसमोर त्या मुलांना राजाने जवळ घेतले नाही. तेव्हा ती बालके रडत रडत शर्मिष्ठापाशी गेली. त्या बालकांवरील राजाचे प्रेम पाहून देवयानी सर्व प्रकार समजली व शर्मिष्ठास म्हणाली,

'शर्मिष्ठे, तू माझ्या अधीन असून असं अप्रिय वाटणारं वर्तन कसं केलंस ?' तू तुझ्या असुरमार्गावर गेलीस. तुला माझी भीती नाही वाटली ?'

'मनोहर हास्याची सखी, मी ज्यांना ऋषी म्हटलं होतं, ते सत्यच आहे. मी न्याय व धर्म यांना अनुसरूनच वर्तन केलं आहे, मग मला तुझी भीती कसली ? जेव्हा तू राजास पतिभावानं वरलंस, तेव्हाच मीही त्याला पती मानलं होतं. शोभने, तू ज्येष्ठ व श्रेष्ठ ब्राह्मणपुत्री आहेस. म्हणून तू मला माननीय व पूजनीय आहेस. पण हा राजर्षी

मला तुझ्याहून अधिक प्रिय आहे. हे काय तू जाणत नाहीस ?' हे सर्व ऐकून देवयानी राजास म्हणाली,

'मी आता इथं राहाणार नाही. आपण मला अप्रिय अशी गोष्ट केलीत.' असे म्हणून डोळे भरून आलेली देवयानी उठली आणि त्वरित परत शुक्राचार्यांपाशी जाण्यासाठी निघाली. तिला जाताना पाहून राजा व्यथित झाला. त्याने देवयानीस समजावण्याचा प्रयत्न केला. पण ती परत आली नाही. तिचे डोळे क्रोधाने लाल झाले होते. थोड्याच वेळात रडत रडतच ती शुक्राचार्यांपाशी आली. पित्यास प्रणाम करून ती उभी राहिली. त्यानंतर राजा ययातीनेही त्यांना वंदन केले. देवयानी म्हणाली,

'तात, अधर्मानं धर्मास जिकलं आहे. नीचांची उन्नती झाली आहे. उच्चांची अवनती झाली. वृषपर्व्याची पुत्री शर्मिष्ठा मला डावलून पुढं गेली आहे. या महाराज ययातीपासून तिला तीन पुत्र झाले आहेत. मला भाग्यहीनेला दोनच पुत्र आहेत. भृगुश्रेष्ठ, हे महाराज धर्मयज्ञा-साठी प्रसिद्ध आहेत. पण यांनी मर्यादेचं उल्लंघन केलं आहे. कविनंदन, मी हे आपणांस यथार्थरूपानं सांगितलं आहे.'

यानंतर शुक्राचार्य ययातीस म्हणाले, 'महाराज, तुम्ही धर्मज्ञ असूनही अशा अधर्माला प्रिय कसं मानलंत ? राजा, म्हणून जिला जिंकणं कठीण आहे, अशी वृद्धावस्था तुला लौकरच येईल.' तेव्हा ययाती म्हणाला, 'भगवन्, दानवराजाची पुत्री मला ऋतुदान मागू लागली. मी ते धर्मसंमत मानून व्यवहार केला. जो मनुष्य न्यायपूर्वक ऋतुदान देणार नाही, तो भ्रूणहत्या करणारा होतो. मी अधर्माच्या भयानंच शर्मिष्ठास जवळ केलं.' तेव्हा शुक्राचार्य म्हणाले,

'राजन्, तू या विषयी माझ्या आदेशास ध्यानात ठेवलं नाहीस. तू माझ्या अधीन आहेस ना ? धर्मात मिथ्या आचार करणारा पुरुष चोर ठरतो.'

क्रोधाने भरलेल्या शुक्राचार्यांनी शाप दिल्यावर नहुषपुत्र ययातीनें त्याच वेळी आपल्या यौवनाचा त्याग केला. तो त्वरित वृद्ध झाला आणि भृगुश्रेष्ठांना म्हणाला,

'भगवन्, मी देवयानीच्या सहवासात युवावस्थेत असतानाही तृप्त नव्हतो. म्हणून ब्रह्मन्, या शरीरास वृद्धत्व येणार नाहीं अशी कृपा करावी.' तेव्हा शुक्राचार्य म्हणाले, 'भूमिपाल, मी खोटं बोलणार नाही. तू वृद्ध बनला आहेसच. पण तुला सवलत अशी देतो की, दुसऱ्याचं यौवन घेऊन तू वृद्धत्वाचा त्याग करू शकशील.'

या सवलतीस अनुसरून ययाती राजानें आपल्या यदू आदी पुत्रांना यौवनाची मागणी केली. स्वतःची वृद्धावस्था त्यांनी घ्यावी म्हणून राजाने त्यांना सूचना दिली. पण त्यांनी ती मानली नाही. राजानें त्यांना शाप दिला. तो म्हणाला, 'तुम्हांस सर्व दोषांनी युक्त अशी वृद्धावस्था प्राप्त होईल. तुमची संतानं जवान होताच मरण पावतील. तुम्ही अग्निहोत्राचा त्याग कराल.'

यानंतर ययातीचे वृद्धत्व त्याच्या पुरू नावाच्या मुलाने स्वीकारले. आपली युवावस्था त्याने पित्यास दिली. राजा ययाती पुन्हा तरुण झाला.

## राजा ययातीचे विषयसेवन व वैराग्य

नहुषपुत्र नरश्रेष्ठ ययातीने प्रसन्न होऊन अभीष्ट अशा विषयांचे भरपूर सेवन केले. त्याने धर्मानुकूल भोग भोगले. त्याने यज्ञांनी देवांना, श्राद्धांनी पितरांना, इच्छेस येईल ते देऊन दीनदुःखितांना, ब्राह्मणांना तृप्त केले. त्याने अतिथींना अन्न व जल देऊन, वैश्यांचे धन रक्षण करून, शूद्रांवर दया करून, प्रजेचे धर्मपूर्वक पालन केले. साक्षात इंद्राप्रमाणेच ययातीने आपल्या प्रजेचे रक्षण व पालन केले.

हा राजा सिंहासारखा पराक्रमी व नवयुवक होता. सर्व विषय त्याच्या अधीन होते. धर्मास विरोध न करता त्याने उत्तम सुखांचा भोग घेतला. तो तृप्त व आनंदी होता. पण त्याने अशी हजार वर्षे सुखभोगात काढल्यानंतर त्याला उपरती झाली. त्याने आपल्या पुत्रास, पुरूस बोलावून म्हटले,

'शत्रुदमन पुत्रा, मी तुझं यौवन घेऊन आपल्या रुचीस, उत्साहास अनुसरून विषयांचं सेवन केलं. पुरू,

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ।।
यत् पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः ।
नालमेकस्य तत् सर्वमिति मत्वा शमं व्रजेत् ।।
(३४.१०-११)

'विषयांची कामना त्या विषयांच्या भोगानें कधीच शांत होत नाही. पण अग्नीत तूप घातल्यावर जसा अग्नी भडकतो, तशी भोगाने विषय वाढतातच. या पृथ्वीवर जितके धान्य, जव, सुवर्ण, पशू व स्त्रिया आहेत. ते सर्व एका मनुष्यास पर्याप्त नाहीत. असे मानून शांती धारण करावी. पुरू, तुझं भलं व्हावं. मी प्रसन्न आहे. ही तुझी युवावस्था तू परत घे. हे राज्य तू घे. कारण तूच माझं प्रिय करणारा पुत्र आहेस.'

यावेळी नहुषनंदन ययातीने आपली वृद्धावस्था परत घेतली. पुरू पुन्हा युवक झाला. ययाती आपल्या लहान पुत्रास राज्य देत आहे हे पाहून ब्राह्मणादी अस्वस्थ झाले. त्यांनी ययातीस म्हटले, 'राजन्, आपण ज्येष्ठ पुत्रांना डावलून लहान पुत्रास राज्य का देता ? आपण धर्माचं पालन का करीत नाही ?' तेव्हा त्यांना ययाती म्हणाला, 'मी ज्येष्ठ पुत्रास राज्य देणार नाही. ज्येष्ठ पुत्र यदूनं माझ्या आदेशाचं पालन केलं नाही. जो पित्यास प्रतिकूल असतो, तो सत्पुरुषांच्या दृष्टीनं पुत्र होत नाही. जो मातापित्यांची आज्ञा मानतो, तोच वास्तवात पुत्र असतो. यदूनं माझी अवहेलना केली. तुर्वसू, द्रह्यू, अनू यांनीही माझा तिरस्कारच केला. पुरूनं मात्र माझी आज्ञा मानली. म्हणून तोच पुत्र या राज्याचा अधिकारी आहे. आपण या पुरूसच राज्याभिषेक करावा.'

प्रजेने राजाचा निर्णय मान्य केला. जो गुणवान पुत्र मातापित्यांची आज्ञा मानतो तो लहान असला तरी श्रेष्ठतम असतो. नहुषनंदन ययातीनें पुरूस राज्यावर अभिषिक्त केले. राजा तपस्वी ब्राह्मणांना घेऊन नगराच्या बाहेर पडला. यदूपासून यादव निर्माण झाले, तुर्वसूची संताने यवन झाले. द्रह्यूचे पुत्र भोज या नावाने प्रसिद्ध झाले. अनूपासून म्लेच्छ-जातीची निर्मिती झाली. याच पुरूच्या वंशातून पौरववंश सुरू झाला.

यातच राजा शतानीक झाला. नंतर हे राज्य कुरुकुलात समाविष्ट झाले व तो वंश कुरुवंश या नावाने प्रसिद्ध झाला. वनात राजा ययातीनें तपस्या करून स्वर्गलोकाची प्राप्ती करून घेतली.

## ययाती व अष्टक

यानंतर ययातीचे पुण्य क्षीण झाल्यावर तो परत स्वर्गातून पतन पावू लागला. याच वेळी राजर्षींत श्रेष्ठ व उत्तम धर्मवेत्ता अष्टकानें पतन पावणाऱ्या ययातीस म्हटले, 'इंद्रासारखं रूप असणारे आपण कोण आहात ? आपलं तेज अग्नीसारखं देदीप्यमान आहे. पण आपलं हे पतन पाहून आम्ही चकित झालो आहोत. आपण तर इंद्र, सूर्य, विष्णू यांच्यासमान प्रभावी आहात. आपल्या या पतनाचं कारण काय ? आपण कोण आहात ?' तेव्हा ययाती म्हणाला,

'महात्मन्, मी नहुषाचा पुत्र व पुरूचा पिता ययाती आहे. सर्व प्राण्यांचा अपमान केल्यानं माझं पुण्य क्षीण झालं आहे. म्हणून मी अशा पतनास प्राप्त झालो. मी आपणांपेक्षा वयानं खूप मोठा आहे. म्हणून मी आपणांस प्रणाम करीत नाही.'

'राजन्, आपण वयानं मोठे आहात, म्हणून श्रेष्ठ आहात. पण हे आपलं बोलणं फार झालं. विद्या, तपस्या यांत वरचढ असणारा द्विजच पूज्य मानला गेला आहे.'

'पापास पुण्यकर्मांचा नाशक मानलं आहे. ते नरकाची प्राप्ती करून देणारं आहे. श्रेष्ठ पुरुष दुराचारी पुरुषांचं अनुसरण करीत नाही. माझ्यापाशी पुण्यरूप धन खूप होतं. पण ते दुसऱ्यांची निंदा केल्यामुळं नष्ट झालं. मला आता ते प्रयत्न करूनही परत मिळणार नाही. म्हणून धीट पुरुषानं सुखदुःख समान मानून हर्ष वा शोक करू नये. त्यानं आपल्या भाग्यासच प्रबल मानावं. अष्टका, मी भयभीत नाही. मला मानसिक त्रास नाही. कारण या जगतात विधाता मला जसं ठेवील तसंच मी राहीन. प्रारब्धभोगाचा क्षय व्हायला हवा. मी सुख व दुःख यांना अनित्य जाणूनही मला संताप का येतो ? असा संताप होऊ नये म्हणून मी प्रयत्न करतो.'

'महाराज', अष्टकानें विचारले, 'आपण कोणकोणत्या लोकांत सुखभोग घेतले ?'

'अष्टका, मी प्रथम समस्त भूमंडलात प्रसिद्ध चक्रवती राजा होतो. तिथं सत्कर्मं करीत मी एक हजार वर्षं सुखानं निवास केला. त्यानंतर मी उच्च लोकात आलो. या इंद्रपुरीत मी एकहजार वर्षं राहून त्याहून उंच लोकात गेलो. जिथं जरावस्थेचा प्रवेशही होत नाही, अशा प्रजापतींच्या दिव्य लोकात मी गेलो. तिथं हजार वर्षं राहून मी ब्रह्म-देवांच्या धामात गेलो. त्यावेळी माझा प्रभाव देवेश्वरांवर होता. त्या-वेळी मी नंदनवनात इच्छेस येईल ते रूप धारण करून अप्सरांच्यासह दहालाख वर्षं विहार केला. त्यानंतर एक भयंकर रूप धारण करणारा देवदूत आला व मला उच्च स्वरांत म्हणाला, 'जा. तुझं पतन होईल. पतन होईल.' त्यानंतर माझं पुण्य क्षीण होऊ लागलं. मी नंदनवनातून खाली येत राहिलो. पडताना मला आकाशातून देवांची दयामयी वाणी ऐकू आली. 'अहो, मोठ्या कष्टाची बात. पुण्यकर्मा ययाती राजा पुण्य क्षीण झाल्यानं खाली परत येत आहे.' मी खाली पडत असताना देवांना विचारलं, 'देवांनो, मी साधुपुरुषांत पडावं, असा एखादा उपास सांगा. तेव्हा नरेन्द्रा, मला देवांनी तुझ्या यज्ञभूमीचा परिचय करून दिला. हविष्याचा सुगंध व धूमप्रांत पाहून मला संतोष झाला.'

'सत्ययुगातील निष्पाप राजा, आपण आपल्या इच्छेस अनुसरून दहालाख वर्षं नंदनवनात राहिलात. मग आपण आता भूतलावर का निघालात ?'

'स्वर्गलोकात ज्याचं पुण्य क्षीण होतं, त्यास परत यावं लागतं.'

'देवलोकात मनुष्याचं पुण्य क्षीण कसं होतं ? प्रजापतींच्या धामात कोणते पुरुष जातात ? आपण मला ज्ञानी पुरुष वाटता.'

'नरदेव, जो आपल्या मुखानं स्वतःची पुण्यकर्मं सांगतो, तो नर-कात जातो. म्हणून नरेन्द्रा, दुष्ट व निंद्य कर्मांचा त्याग करावा.'

यानंतर अष्टकास ययातीने नरकांची माहिती दिली. पूर्वीच्या कर्मांनुसार प्राणास कोणता जन्म येतो हेही समजावून सांगितले. मनु-ष्याचा विकास गर्भात कसा होतो, त्यास कोणत्या कर्माने यश मिळते,

स्वर्गलोक कसा असतो. आश्रमधर्म कसा असतो, दानधर्माचे महत्त्व; इत्यादी विषयही ययातीने सांगितले. प्रतर्दन, वसुमान इत्यादींनीही राजास काही प्रश्न विचारले.

## ययाती, वसुमान, शिबी

वसुमान ययातीला म्हणाला, 'नरेन्द्रा, मी उषदश्वाचा पुत्र आहे. मला आपणांस काही विचारायचं आहे. स्वर्गात वा अंतरिक्षात माझ्यासाठी काही विख्यात लोक आहेत ? महात्मन् मी आपणांस पारलौकिक धर्माचा ज्ञाता मानतो.' तेव्हा ययाती म्हणाला, 'राजन्, पृथ्वी, आकाश, दिशा यांना सूर्य प्रकाशित करतो. हे सर्व लोक स्वर्गात तुझी प्रतीक्षा करीत आहेत.' यावर वसुमान म्हणाला,

'राजन्, हे सर्व लोक आपणांस प्राप्त व्हावेत. धीमान, असा प्रतिग्रह घेण्यात तुम्हांस दोष वाटत असल्यास त्यांचं मूल्य म्हणून एक मूठभर तृण मला द्यावं.'

'राजन्, मी अशी खरेदी-विक्री लहानपणीही केलेली मला माहीत नाही. यापूर्वी कोणत्याच महात्म्यांनी केलेली नाही. हे कार्य मी करणार नाही. कारण मी तर सत्कर्म करू पाहतो.'

त्यानंतर शिबी म्हणाला, 'तात, मी उशीनराचा पुत्र शिबी आपणांस विचारीत आहे. अंतरिक्षात व स्वर्गात माझेही काही पुण्यलोक आहेत का ? सांगावं.' तेव्हा ययाती म्हणाला, 'नरेन्द्रा, जे जे साधुपुरुष तुला काही मागण्यासाठी आले, त्यांचा अपमान तू कधी केला नाहीस. यासाठी स्वर्गात तुझ्यासाठी अनंत लोक आहेत. ते विजेसारखे तेजस्वी आहेत.' तेव्हा शिबी म्हणाला, 'महाराज, हे लोक आपण खरेदी करणार नसाल तर मी ते आपणांस अर्पण करीन. आपण त्यांचा स्वीकार करावा. तात, मी त्या लोकात जाणार नाही. तिथं आपणच जावं.' तेव्हा त्याला ययाती म्हणाला, 'शिबी, दुसऱ्यांनी दिलेल्या लोकांत मी विहार करू शकणार नाही.'

यानंतर अष्टक ययातीस म्हणाला, 'राजन्, आपणांस आम्ही दिलेले लोक नकोत. तरी आम्ही आमचे पुण्यलोक आपणांस समर्पित

करून नरकात जाण्यासाठी तयार आहोत.' तेव्हा ययाती म्हणाला, 'मी पूर्वकाळी जे पुण्य केलं नाही, त्याचा परिणाम मी स्वीकारणार नाही.'

'नरेन्द्रा, ते अनंत फल तुम्हांसच प्राप्त होईल.'

यानंतर अष्टक म्हणाला, 'आकाशात पांच सुवर्णमय रथ दिसत आहेत. ते अग्निशिखेप्रमाणं प्रकाशत आहेत.' यावर ययाती म्हणाला, 'जे सुवर्णरथ चमकत आहेत, ते माझ्यासाठी व तुमच्यासाठी आले आहेत. यांवर आरूढ होऊन आपण माझ्याबरोबर इंद्रलोकास यावं.' नंतर अष्टक म्हणाला, 'राजन्, आपण रथात बसून आकाशात जावं. समय येताच आम्ही आपलं अनुसरण करू.' तेव्हा ययाती म्हणाला, 'आपण स्वर्गावर एकदमच विजय मिळविला आहे. सर्वांनी एकदमच जावं. देवलोकाचा हा रजोहीन सात्त्विक मार्ग आपणांस स्पष्टपणानं दिसत आहे.'

यानंतर ते सर्वजण दिव्य रथावर आरूढ होऊन धर्माच्या बळावर स्वर्गात पोचले. त्यावेळी पृथ्वी व आकाश यांत त्यांची प्रभा पसरली. अष्टक मध्येच म्हणाला, 'राजन्, महात्मा इंद्र माझा मित्र आहे. मी समजत होतो की, मीच एकटा सर्वांच्या आधी तिथं पोचीन. पण हा उशीनरपुत्र शिबी एकटाच सर्वांना मागं टाकून पुढं कसा गेला?' तेव्हा ययातीने सांगितले, 'राजन्, शिबीनं ब्रह्मलोकाच्या प्राप्तीसाठी आपल्या सर्वस्वाचं दान केलं होतं. म्हणून तो तुमच्यांत सर्वश्रेष्ठ आहे. राजा, दान, पवित्रता, सत्य, अहिंसा, ऱ्ही, श्री, क्षमा, समता, दयाळूपणा; हे अनुपम गुण शिबीत आहेत. बुद्धीत त्याच्याएवढा कुणीच नाही. म्हणून शिबी रथारूढ होऊन सर्वांपुढं गेला आहे.'

यानंतर अष्टकाने कुतुहलाने इंद्रतुल्य आपल्या आजोबांना, ययातीस पुन्हा प्रश्न केला. तो म्हणाला, 'महाराज, मी आपणांस एक प्रश्न विचारतो. आपण कुठून आलात? आपण कोण आहात? कुणाचे पुत्र आहात?' तेव्हा ययाती म्हणाला, 'मी नहुषाचा पुत्र व पुरूचा पिता ययाती आहे. मी या लोकी चक्रवर्ती नरेश होतो. तुम्ही सर्वजण माझेच आहात. तुम्हांस मी सर्व गुप्त गोष्ट समजावून सांगतो. मी तुमचा आजोबा आहे. मी या पृथ्वीस जिंकलं व तिला ब्राह्मणांना देऊन टाकलं.

मनुष्य जेव्हा शंभर पवित्र अश्वांचं दान करतो, तेव्हा तो पुण्यात्मा देव बनतो. मी सर्व प्रकारची दानं केली. मी कधी तोंडातून व्यर्थ शब्द काढले नाहीत. साधू सत्याचाच आश्रय घेतात. अष्टका, मी तुला, प्रतर्दनास, वसुमानास, शिवीस जे हे सांगत आहे, ते सर्व सत्य आहे. माझ्या मनातील विश्वास आहे की, सर्वजण सत्यामुळंच पूजित होतात.'

हा सर्व वृत्तांत सांगून शौनक शतानीकास म्हणाले, 'राजन्, राजा ययाती मोठा महात्मा होता. तो मोठा उदार होता. त्याच्या श्रेष्ठ मित्ररूपी दौहित्रांनी त्याचा उद्धार केला. त्यांनी सत्कर्म करून स्वर्गलोकाची प्राप्ती करून घेतली. असं हे नहुषपुत्र ययातीचं चरित्र आहे. हाच वंश पुढं पुरुवंशाच्या नावानं विख्यात झाला. त्यातच तुमच्या-सारखे इंद्रासमान पुरुष उत्पन्न झाले.'

## कार्तवीर्य अर्जुनाची कथा

यानंतर सूताने ययातीच्या, यदूच्या वंशांची वर्णनें ऋषींसाठी केली. याच वंशात कृतवीर्य झाला. या कृतवीर्याचा मुलगा कार्तवीर्य अर्जुन होता. तो सहस्र भुजांधारी असल्याने सहस्रार्जुन या नावानेही प्रसिद्ध झाला. तो सातही द्वीपांचा अधिपती होता. कृतवीर्यनंदन सहस्रार्जुनाने दहा हजार वर्षेपर्यंत घोर तपस्या करून महर्षी अत्रींच्या पुत्राची, दत्तात्रेयांची आराधना केली. प्रसन्न होऊन त्याला दत्तात्रेयांनी चार वर दिले. प्रथम वरामुळे त्याला एक हजार हात प्राप्त झाले. दुसऱ्या वराने सत्पुरुषांबरोबर अधर्म करणाऱ्यांच्या निवारणाचा अधिकार त्याला मिळाला. तिसऱ्या वराने सारी पृथ्वी जिंकून तिचे धर्मानुसार पालन करण्याचा अधिकार त्याला प्राप्त झाला. चौथ्या वराने सारी पृथ्वी जिंकून तिचे धर्मानुसार पालन करण्याचा अधिकार प्राप्त झाला. चौथ्या वराने रणभूमीवर त्याच्यापेक्षा अधिक बलवानाकडून त्याचा वध होणार होता.

या वरांच्या प्राप्तीमुळे कार्तवीर्य अर्जुन सप्तद्वीपांच्या पृथ्वीस जिंकून दशसहस्र यज्ञांचे अनुष्ठान त्याने केले. त्याने प्रचुर दक्षिणा वाटली. त्याच्या यज्ञांतील स्तूप सुवर्णाचे होते. गंधर्व व अप्सरा त्याच्या यज्ञांची

शोभा वाढवीत होत्या. राजा कार्तवीर्याचे महत्त्व पाहून नारद नावाच्या गंधर्वाने म्हटले, 'भावी क्षत्रिय नरेश, यज्ञ, दान, तप, पराक्रम व शास्त्रज्ञान या बाबतीत कार्तवीर्याबरोबर होणार नाहीत.' योगी अर्जुन रथावर आरूढ होऊन, हातांत खड्ग, चक्र व धनुष्य धारण करून सातही द्वीपांत भ्रमण करीत होता. राजा अर्जुन पन्नास हजार वर्षांपर्यंत चक्रवर्ती सम्राट बनला होता. तोच आपल्या योगबलाने पशूंचा पालक होता, तोच शेतांचा रक्षक होता. तोच समयी मेघ बनून वृष्टी करायचा. सहस्र किरणांनी जसा सूर्य शोभायचा, तसाच तो आपल्या हजार हातांनी शोभायचा.

या सहस्रार्जुनाने कर्कोटकनागाच्या पुत्रास जिंकून आपल्या माहिष्मती नगरीत बांधून ठेवले होते. भूपाल अर्जुन वर्षाऋतूच्या प्रवाहात सुखपूर्वक क्रीडा करायचा. तो समुद्राचा वेग रोखायचा. ललनांसह क्रीडा करताना त्याच्या गळ्यातील तुटलेली माळा धारण करणाऱ्या नर्मदानदीस चकित होऊन त्याच्या समीप जावे लागे. तो आपल्या हजार भुजांनी अनेक मोठ मोठे पराक्रम करीत असे. त्याने अनेकदा लंकेत जाऊन आपल्या पांच बाणांनी रावणास मोहित केले होते. रावणास माहिष्मतीस बंदिस्त केले होते. पुलस्त्यांनी विनंती केल्यावर त्याने रावणास बंधमुक्तही केले.

पण या सहस्रार्जुनाचे हजार बाहू भृगुकुलोत्पन्न परशुरामानें कापून छिन्न भिन्न केले. याचे कारण असे की, एकदा सामर्थ्यशाली महर्षी आपवांनी, वसिष्ठांनी क्रुद्ध होऊन त्याला शाप दिला होता की, 'हैहया, तू माझ्या लोकप्रिय वनास जाळून भस्म केलं आहेस. याचा परिणाम तुला भोगावा लागेल. भृगुकुलात उत्पन्न झालेला एक तपस्वी व बलवान ब्राह्मण तुझ्या हजार भुजा कापून तुझा वध करील.'

राजा सहस्रार्जुनास शंभर पुत्र असले तरी त्यांतील पांचच महारथी होते. त्यांच्या शिवाय शूरसेन, शूर, धृष्ट, क्रोष्टू, जयध्वज, वैकर्ता व अवन्ती हे सात अस्त्रविद्येत निपुण, बलवान, शूरवीर, धर्मात्मे व महान पराक्रमी होते. जयध्वजाचा पुत्र महाबली तालजंघ झाला. त्याला शंभर पुत्र तालजंघ या नावाचे झालें. या हैहयवंशाचे कुल पांच भागांत

विभक्त झाले. वीतिहोत्र, शार्यात, भोज, आवन्ती, कुंडिकेर; ही ती कुले होत. तीही तालजंघ या नावांनी प्रसिद्ध झाली. वीतिहोत्राचा पुत्र आनर्त झाला. त्याचा पुत्र दुर्जेय.

राजा सहस्रार्जुन सद्भावनापूर्वक धर्माने प्रजेचे पालन करीत होता. त्याने आपल्या धनुष्याच्या बलाने सागरापर्यंत पृथ्वीवर विजय मिळविला.

## कार्तवीर्याचा पराक्रम, महर्षी आपवांचा शाप

ऋषींनी सूतास विचारले, 'सूत, कार्तवीर्यानं बलपूर्वक महात्मा आपवांचं वन कशासाठी जाळून टाकलं? आताच आपण म्हटलं की, कार्तवीर्य प्रजेचा रक्षक होता. तर मग त्यानं महर्षींचं तपोवन का दग्ध केलं?' या प्रश्नाचे उत्तर सूताने दिले.

एकदा सूर्य ब्राह्मणाचे रूप घेऊन कार्तवीर्यापाशी आला. तो म्हणाला, 'नरेश्वरा, मी सूर्य आहे. आपण मला एकदाच तृप्ती द्यावी.' तेव्हा राजाने विचारले, 'भगवन्, कोणत्या पदार्थानं आपली तृप्ती होईल? दिवाकर, मी आपणांस कोणतं भोजन देवू?' तेव्हा सूर्य त्याला म्हणाला, 'दानशिरोमणी, मला सर्व स्थावरांचा, अर्थात वृक्षादींचा आहार प्रदान कर. त्यानं मी तृप्त होईन.' त्यावर कार्तवीर्य म्हणाला, 'तेजस्वीसूर्य, हे सर्व वृक्ष माझ्या तेजानं, बलानं जळू शकत नाहीत. मी आपणांस प्रणाम करतो.'

त्यानंतर सूर्य त्याला म्हणाला, 'नरेश्वरा, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. मी तुला एक अक्षय व सर्वतोमुखी बाण देतो. त्याच्या योगानं हे वृक्ष जळून जातील. त्यामुळं माझीही तृप्ती होईल.' त्यानंतर सूर्याने कार्तवीर्यास आपले बाण दिले. तेव्हा त्यांच्या साह्याने कार्तवीर्याने समस्त वृक्ष, ग्रामे, आश्रम, घोष, नगरे, तपोवने, रमणीय वने, उपवने यांना जाळून राखेचे ढीग बनविले. अशा रीतीने पूर्व व दक्षिणदिशा त्याने जाळून भस्म केल्या. या भयंकर तेजाने पृथ्वी, वृक्ष व तृण यांनी रहित होऊन नष्टभ्रष्ट झाली.

त्यावेळी महर्षी आपव त्या वनात दहाहजार वर्षे जलात राहून

तप करीत होते. व्रत पूर्ण करून ते बाहेर आले तेव्हा त्यांना अर्जुनाकडून जळालेला आश्रम दिसला. त्यांनी क्रुद्ध होऊन राजर्षी अर्जुनाला शाप दिला. यानंतर सूतानें ऋषींना क्रोष्टूचा वंश समजावून दिला.

## स्यमंतकमण्याची कथा

त्यानंतर सूतानें वृष्णिवंशाचे वर्णन करून स्यमंतकमण्याची कथा सांगितली. गांधारी व माद्री या दोन वृष्णीच्या पत्नी होत, याच वंशात प्रसेन नावाच्या राजापाशी स्यमंतक नावाचा श्रेष्ठ मणी होता. हे मणिरत्न भूतलावरील सर्व रत्नांचा राजा होते. भगवान श्रीकृष्णांनीही अनेकदा त्या रत्नाची इच्छा मनात धरून प्रसेनापाशी याचना केली. पण त्यांना ते प्राप्त झाले नाही. ते समर्थ असले तरी त्यांनी त्याचे अपहरण केले नाही.

एकदा प्रसेन तो मणी अंगावर घालून शिकार खेळण्यासाठी वनात गेला. तेव्हा त्याने एका बिळात वा गुहेत मोठा कोलाहल ऐकला. कुतूहलवश बनून प्रसेनाने त्या गुहेत प्रवेश केला. तेथे त्यानें एक अस्वल पाहिले. अस्वलाची दृष्टी प्रसेनावर व प्रसेनाची दृष्टी अस्वलावर पडली. त्यांच्यात मोठे युद्ध झाले. अस्वलानें प्रसेनास मारून तो मणी घेतला. गुहेत मरण पावलेला प्रसेन नंतर कोणासच दिसला नाही.

प्रसेन मरण पावला तरी श्रीकृष्णांनी मण्यासाठी प्रसेनास मारले, असे लोक म्हणतील असे श्रीकृष्णांना वाटले. त्यांनी लोकांना उत्तरही दिले. 'ते मणिरत्न धारण करून प्रसेन वनात गेला होता. त्याला तिथं कुणी तरी मारलं. मी त्या वृष्णिवंशाच्या शत्रूचा वध करीन.' त्यानंतर दीर्घ काळ लोटल्यावर श्रीकृष्ण शिकार खेळण्यासाठी वनातील त्या गुंफेपाशी आले. त्यांना पाहून महाबली अस्वलाने दीर्घ गर्जना केली. ती ऐकून हातात तलवार घेऊन श्रीकृष्ण त्या गुहेत शिरले. तेव्हा त्यांनी तेथे महाबली अस्वलास, जांबवानास पाहिले. श्रीकृष्णांनी वेगाने त्याला आपल्या अधीन केले. त्यावेळी त्याने स्तोत्र म्हणून श्रीकृष्णांची स्तुती केली. ती ऐकून भगवान कृष्ण संतुष्ट झाले व त्यांनी जांबवानास वर देऊन प्रसन्न केले. जांबवान त्यांना म्हणाला,

'प्रभो, आपल्या चक्रप्रभावानं मला मृत्यूच हवा. ही माझी सौंदर्यशालीनी कन्या आपणांस पतिरूपानं मानते. प्रभो, हा मणी मी प्रसेनास मारून घेतला होता, हा आता आपणांपाशीच असावा.' त्यानंतर श्रीकृष्णांनी आपल्या चक्राने जांबवानाचा वध केला. कन्येसह तो मणी श्रीकृष्णांना मिळाला. घरी आल्यावर कृष्णांनी सर्व सारवतांसमोर तो मणी सत्राजितास समर्पण केला. तेव्हा सर्व यदुवंशियांनी श्रीकृष्णांना म्हटले, 'श्रीकृष्णा, आम्ही तर असा निश्चय केला होता की, प्रसेन तुमच्या हातून मारला गेला.'

केकयराजाच्या दहा सौंदर्यशालिनी कन्या सत्राजिताच्या पत्नी होत्या. त्यांच्या गर्भांपासून सत्राजितास पराक्रमी, विश्वविख्यात असे शंभर पुत्र झाले. याही वंशाचा विस्तार मोठा झाला.

## श्रीकृष्णांचे चरित्र, दैत्यांचा इतिहास, देवासुरसंग्राम

पूर्वी जे प्रजेचे स्वामी होते, तेच देवाधिदेव महादेव श्रीकृष्ण लीलाविहार करण्यासाठी मृत्युलोकात मानवयोनीत जन्मास आले. वसुदेवाच्या तपस्येमुळे ते देवकीच्या गर्भातून जन्मास आले. त्यांचे नेत्र कमळांसारखे होते. त्यांना चार हात होते. त्यांचे रूप दिव्य कांतीने प्रकाशत होते. त्यांच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह होते. अशा दिव्य लक्षणांनी संपन्न असलेल्या श्रीकृष्णांना पाहून वसुदेव म्हणाला;

'प्रभो, आपण आपलं हे दिव्य रूप आवरून धरावं. देवा, मी कंसाच्या भीतीनं घाबरतो आहे. म्हणून मी आपणांस असं म्हणतो आहे. त्यानं माझ्या सहा पुत्रांना आधीच मारलं आहे.' हे ऐकून श्रीकृष्णांनी आपले रूप आवरून घेतले. वसुदेवाने त्यांना नंदगोपाच्या घरी नेले. तो त्याला म्हणाला, 'मित्रा, या बालकाचं नीट रक्षण करावं. देवकीच्या गर्भातून उत्पन्न झालेलं हे बालक कंसाचा वध करील.'

हे ऐकून ऋषींनी सूतास विचारले, 'सूत, हा वसुदेव कोण होता ? देवकी कोण होती ? भगवान श्रीकृष्ण त्यांना 'तात, माता' असं का म्हणत होते ? देवकीनं त्यांना आपल्या गर्भात का स्थान दिलं ?

हा नंदगोप कोण होता ? महाव्रतपरायण यशोदा कोण होती ? हिनं बालकृष्णाचं पालन का केलं ?' सूताने या प्रश्नांची उत्तरे दिली.

पुरुष (वसुदेव) कश्यप आहे व त्याची प्रिय पत्नी देवकी अदिती (प्रकृती) आहे. कश्यप ब्रह्मदेवांचे अंश होते. अदिती पृथ्वीचा अंश होती. देवकीने परमेश्वरापाशी कामना करून श्रीकृष्णांपासून वर प्राप्त केला. तेच योगात्मे श्रीकृष्ण योगमायेचा आश्रय धारण करून समस्त प्राण्यांना मोहित करून, मानवशरीर धारण करून या पृथ्वीवर अवतरले. त्या-वेळी धर्माचा ऱ्हास झाला होता. तेव्हा असुरांचा नाश करून धर्माची स्थापना करण्यासाठी सामर्थ्यशाली भगवान विष्णूंनी वृष्णिकुलात जन्म धारण केला. रुक्मिणी, सत्यभामा, नग्नजिताची कन्या सत्या, सुभामा, शैब्या, गांधारराजकुमारी लक्ष्मणा, मित्रविंदा, देवी कालिंदी, जांबवती, सुशीला, मद्रराजकुमारी कौसल्या आणि विजया; इत्यादी सोळा सहस्र देवी श्रीकृष्णांच्या पत्नी होत्या. रुक्मिणीने अकरा पुत्रांना जन्म दिला. ते सर्व युद्धकर्मात निष्णात होते. महाबली प्रद्युम्न, रणशूर चारुदेष्ण, सुचारू, भद्रचारू, सुदेष्ण, भद्र, परशू, चारुगुप्त, चारुभद्र, सुचारुक व सर्वांत लहान चारुहास; अशी त्यांची नावे होती.

या बुद्धिमान वसुदेवनंदन श्रीकृष्णांच्या पुत्रांची संख्या एक लाख व ऐंशी हजार असल्याचे सांगतात. प्रबल व शूरवीर यादवांची संख्या तीन कोटी झाली. त्यांतील साठ लाख तर महाबली व पराक्रमी होते. देवासुरांच्या संग्रामात महाबली असुर मारले गेले होते. तेच भूतलावर मानवयोनीत उत्पन्न होऊन सर्वांना कष्ट देत होते. यांचाच संहार करण्या-साठी भगवान यदुकुलात अवतीर्ण झाले. महाभाग यादवांची एकशेएक कुले होती. त्यांचा नेता श्रीकृष्ण असून सर्व यादव त्यांच्याच अधीन राहात.

यानंतर ऋषींनी विचारले, 'सूता, सप्तर्षी, कुबेर, यक्ष, मणिभद्र, शालंकी, नारद, सिद्ध, धन्वन्तरी, देवसमाज यांशी संघबद्ध होऊन भगवान विष्णू कशासाठी अवतीर्ण झाले ? या महापुरुषांचे किती अवतार झाले ? आणखी किती होणार आहेत ? वृष्णी व अंधक यांच्या वंशांत सर्वश्रेष्ठ विष्णू मानवयोनीत कशासाठी प्रकट झाले ?'

या प्रश्नांचे सविस्तर उत्तर सूताने दिले. जेव्हा धर्मापासून लोक विमुख होतात, जेव्हा शुभकर्मांत शिथिलता उत्पन्न होते, तेव्हा भगवान विष्णू दिव्य शरीराचा त्याग करून मानवयोनीत अवतार घेतात. पूर्वी दैत्यराज हिरण्यकशिपूस शासन करण्यासाठी त्यांनी अवतार धारण केला. बलीच्या पराभवासाठीही त्यांनी अवतार घेतला. प्रथम नरसिंह, नंतर वामन, वराह, मोहिनी, असे अवतार झाले. तारक, त्रिपुर, अंधक, वृत्त छात्र, हालाहल, कोलाहल इत्यादींच्या संदर्भांत अवतार झाले. देवासुरसंग्रामांत अशा अनेक प्रकारांचे अवतार भगवान विष्णूंना घ्यावे लागले.

## शुक्राचार्यांना शिवांकडून वरप्राप्ती

पूर्वी हिरण्यकशिपूने एक अर्बुद सात कोटी वीस लाख वर्षे त्रिलोकाचे राज्य केले. त्यानंतर बली राजा झाला. त्याचा अधिकार दोन कोटी सत्तर हजार वर्षांपर्यंत होता. त्यासमयी प्रल्हादादी असुर निवृत्तिमार्गी होते. अशा प्रकारे दहा युगे सर्व विश्व दैत्यांच्या अधीन होते. प्रल्हादानंतर हे राज्य इंद्राच्या हातांत आले. यापुढे दहा युगे जग शत्रुहीन होते. इंद्र सुखाने विश्वाचे पालन करीत होता. याच वेळी शुक्राचार्य असुरांचा पक्ष सोडून देवांकडे आले. ते पाहून दैत्य त्यांना म्हणाले,

‘ गुरुदेव, आपण आम्हांला सोडून देवपक्षात कसे आलात ? आता आमचं कसं होणार ? आम्ही आता रसातळाला जाणार,’

हे ऐकून शुक्राचार्य दुःखी दैत्यांना मधुर वाणीने म्हणाले, ‘ असुरांनो, तुम्ही भीती सोडून द्या. मी आपल्या तेजोबलानं पुन्हा तुमच्या पक्षात येईन. कारण या त्रैलोक्यातील सारे मंत्र, सर्व औषधी, रस, धनसंपत्ती ; या सर्व माझ्या स्वाधीन आहेत. यांतील चतुर्थांशही देवांपाशी नाही. मी हे सर्व वैभव तुम्हांस देईन. मी तुमच्यासाठीच हे धारण केलं आहे.’

यानंतर शुक्राचार्य असुरांच्या पक्षात गेले. हे पाहून सर्व देव एकत्र होऊन विचार करू लागले, ‘ बंधूंनो, हे शुक्राचार्य आपली सर्व कार्यं उलटसुलट करून टाकतील. जोपर्यंत ते असुरांना बलवान करीत आहेत,

त्याच्या आधीच आपण त्यांना मारून टाकावं. उरलेले पाताळात पळून जातील.' असा विचार करून देवांनी दानवांवर हल्ला केला. आपला संहार होत आहे, हे पाहून असुर शुक्राचार्यांना शरण गेले. तेव्हा त्यांनी असुरांच्या रक्षणाचा प्रयत्न केला. देवांना असुरांकडून पीडा होऊ लागली. देवांना पराभूत व्हावे लागले.

तरी ब्राह्मण शुक्राचार्य असुरांच्या हितासाठी म्हणाले, 'असुरांनो, वामनांनी तीन पादांत बलीचं राज्य संपविलं. जंभासुराचा वध झाला. विरोचनाचं निधन झालं. तुमच्याकडील प्रधान असुर अशा रीतीनं नष्ट झाले. तुम्ही आता थोडेच उरले आहात. तेव्हा हे युद्ध तुम्ही बंद करावं. नंतर काय करायचं ते मी सांगीन. आजच मी विजयप्राप्तीच्या मंत्रासाठी महादेवांपाशी जात आहे. मी त्यांच्यापासून अमोघ मंत्रांना प्राप्त करून घेईन. नंतर तुम्ही माझ्या साह्यानं पुन्हा देवांशी लढून विजयी व्हाल.'

यानंतर असुरांनी देवांपाशी जाऊन म्हटले, 'देवगण, यावेळी आम्ही सर्वांनी शस्त्रं खाली ठेवली आहेत. कवचं उतरवली आहेत. रथांना सोडून दिलं आहे. आम्ही वल्कलं धारण करून, वनात लपून तपस्या करणार आहोत.' हे ऐकून देवांना प्रसन्नता वाटली. त्यांची चिंता नष्ट झाल्यावर तेही युद्धापासून विरक्त झाले. युद्ध बंद झाल्यावर शुक्राचार्य असुरांना म्हणाले, 'असुरांनो, तुम्ही अभिमान सोडून तपस्या करावी. तुम्ही मी परत येण्याची वाट पाहावी.'

असे सांगून शुक्राचार्य महादेवांकडे निघाले. ते महादेवांना म्हणाले,

'देवा, मी देवांचा पराभव व असुरांचा जय व्हावा म्हणून अशा मंत्राच्या प्राप्तीसाठी आलो आहे की ते मंत्र बृहस्पतींपाशी नसावेत.'

'भार्गव, तुझं कल्याण असो. यासाठी तुला कठोर व्रताचं पालन करावं लागेल. तू एक सहस्र वर्षंपर्यंत शिर खाली करून धूमसेवन करशील तर त्या मंत्रांची प्राप्ती होईल.'

'देवा, ठीक आहे. आपण म्हणता तशी तपस्या आजपासून करीन.'

असे म्हणून शुक्राचार्य धूम्र उत्पन्न करणाऱ्या कुंडधार यक्षाकडे

गेले. असुरांच्या हितासाठी, मंत्रप्राप्तीसाठी त्यांनी ब्रह्मचर्य धारण करून महेश्वरांच्या आश्रमात तप सुरू केले. हा सर्व वृत्तांत देवांना समजल्यावर ते एकत्र होऊन बृहस्पतींकडे आलें व त्यांच्यासहित त्यांनी असुरांवर आक्रमण केले. असुरगण भयभीत होऊन देवांना म्हणाले, 'देवांनो, आम्ही शस्त्र ठेवून दिलं आहे. आपणही आम्हांस अभयदान दिलं होतं. मग आपण आमचा वध करण्यासाठी का प्रवृत्त झालात ? आता या वेळी आमचे गुरुवर्य इथं नाहीत. आम्हांजवळ शस्त्रंही नाहीत. आम्ही तपस्व्यांप्रमाणं चीर व वल्कलं धारण करून परिग्रहरहित आहोत. आम्ही कवचं व शस्त्रं धारण केल्यानंतर आपणांशी युद्ध करू.'

असे म्हणून भयभीत झालेले असुर शुक्राचार्यांच्या मातेपाशी गेले. मातेने त्यांना सांगितले, 'दानवांनो भिऊ नका. भीती सोडून द्या. माझ्याजवळ आल्यावर भीती कसली धारण करता ?' तरी देवांनी बलपूर्वक असुरांवर आक्रमण केले. हे पाहून शुक्रमाता ख्याती क्रुद्ध होऊन देवांना म्हणाली, 'मी आताच तुम्हांस इंद्ररहित करीन.' यानंतर त्या देवीने अभिचारमंत्राचा प्रयोग करून बळाने इंद्राला स्तंभित केले. आपला स्वामी असा स्तंभित झाला, हे पाहून देवगण मुक्यासारखे झाले. तेथून पळून जाऊ लागले. देवगण पळून गेल्यावर भगवान विष्णूंनी इंद्रास म्हटले, 'सुरश्रेष्ठा, तुझं कल्याण असो. तू माझ्या शरीरात प्रवेश कर. मी तुला इथून अन्यत्र नेईन.'

हे ऐकून इंद्र भगवान विष्णूंत सुरक्षित झाला. हे पाहून ख्यातिदेवी आणखीनच कुपित झाली. ती म्हणाली, 'मघवन्, मी सर्व प्राण्यांसह, विष्णूंसह सर्वांना जाळून टाकीन. तुम्ही दोघांनी माझं तपोबल पाहावंच.' हे ऐकून इंद्र व विष्णू भयभीत झाले. आपण आता या संकटातून कसे मुक्त व्हावे ? असा प्रश्न विष्णूंनी इंद्रास केला. तेव्हा इंद्र म्हणाला,

'प्रभो, जोपर्यंत ही आपणांस जाळीत नाही, तोपर्यंतच आपण हिला मारावं.' हे ऐकून भगवान चिंतेत पडले. तरी आपत्तीदूर करण्यासाठी त्यांनी आपले सुदर्शनचक्र सिद्ध करून तिचे शिर कापून टाकले. आपल्या भार्येचा वध झाला हे पाहून भृगू कुपित झाले व भगवान विष्णूंना शाप देत म्हणाले, 'विष्णू, स्त्री अवध्य आहे. हा धर्म न जाणता

आपण माझ्या भार्येचा वध केलात. म्हणून तुम्हांस मृत्युलोकात सात वेळा जन्म घ्यावा लागेल.'

भगवान विष्णूंना असा शाप दिल्यावर भृगूंनी ते शिर उचलून ख्यातीच्या शरीरास लावून म्हटले, 'देवी, तू विष्णूकडून मारली गेली आहेस. तुला मी पुन्हा जिवंत करतो. जर मी संपूर्ण धर्माचा ज्ञाता असेन, मी जर सत्यवादी असेन, तर तू जिवंत व्हावंस.' यानंतर देवी जिवंत झाली. सर्वांना अतिशय आनंद झाला.

शुक्राचार्यांच्या भीतीने इंद्राला शांती मिळाली नाही. रात्रभर जागून तो आपल्या कन्येला, जयंतीला म्हणाला, 'मुली, शुक्राचार्य माझ्या शत्रूंच्या हितार्थं भीषण व्रताचं अनुष्ठान करीत आहे. त्यांनी मला अतिशय व्याकुळ केलं आहे. तू त्यांच्यापाशी जाऊन माझं कार्यं सिद्ध कर. ते प्रसन्न होतील, अशी त्यांची तू आराधना कर.' आपल्या पित्याची आज्ञा ऐकून इंद्रपुत्री जयंती शुक्राचार्यांच्या तपस्थानी गेली. तेथे तिने शुक्राचार्यांना खाली मुख करून कुंडधार नावाच्या यक्षाकडून धूमकणांचे सेवन करताना पाहिले. त्यांच्या शरीरावर धूळ पसरली होती. ते अत्यंत दुर्बल झाले होते. मधुर भाषण करणाऱ्या जयंतीने शुक्राचार्यांची स्तुती केली. त्यांचे हातपाय दाबून तिने त्यांची सेवा केली. तिने त्यांच्याजवळ अनेक वर्षे निवास केला.

एक सहस्र वर्षांनंतर शुक्राचार्यांचे धूम्रव्रत पूर्ण झाले. भगवान शंकर त्यांच्यावर प्रसन्न होऊन म्हणाले, 'भृगुनंदना, आजपर्यंत तू एकट्यानंच हे खडतर व्रत केलं आहेस. म्हणून तू तप, बुद्धी, शास्त्रज्ञान, बल, तेज यांनी युक्त होऊन सर्व देवांना पराजित करशील. ब्रह्मन्, तुझी इच्छा काय आहे ? तू सर्व शत्रूंचं दमन करशील.' यानंतर भगवान महादेवांनी त्यांना प्रजेशत्व (प्रजापती), धनेशत्व (धनाध्यक्ष), अवध्यत्व; इत्यादी वर दिले. हे वरदान प्राप्त झाल्याने शुक्राचार्यांचे शरीर पुलकित झाले. याच हर्षाबरोबर त्यांच्या हृदयात भगवान शंकरांचे एक स्तोत्र प्रादूर्भूत झाले. त्यांनी भगवान शंकरांची स्तुती करताना म्हटले;

## शुक्राचार्यांकडून शिवस्तुती

'आपण शितिकंठ आहात. जगाच्या रक्षणांसाठी आपण हालाहल विषाचं प्राशन केलंत. आपण कनिष्ठ, सुवर्चा, सुंदर तेजाचे लेलिहान (वारंवार जीभ चाळवणारे), काव्य, वत्सर, अंधस्पती (सर्व अन्नांचे स्वामी), कपर्दी (जटाजूटधारी), कराल (भीषण), हर्यक्ष (पिवळ्या नेत्रांचे) वरद, संस्तुत (प्रशंसित), सुतीर्थ, देवदेव, रंहस् (वेगवान), उष्णीषी (शिरावर पगडी धारण करणारे), सुवक्त्र, बहुरूप, वेधा (विधानकर्ता), वसुरेता (अग्निरूप), रुद्र, तप, चित्रवासा (चित्र विचित्र वस्त्रधारी), ऱ्हस्व, मुक्तकेश, सेनानी, रोहित (मृगरूपधारी), कवी (अतीन्द्रिय विषयांचा ज्ञाता), राजवृक्ष (रुद्राक्षवृक्षरूप), तक्षकक्रीडन (नागराज तक्षकाबरोबर क्रीडा करणारे), सहस्रशिरा, सहस्राक्ष, मीढुष (स्तुतीची वृद्धी करणारा), वर, भव्यरूप, श्वेत, पुरुष, गिरीश, अर्क, बली, आजप्य (घृतपायी), सुतृप्त, सुवस्त्र, धन्वी (धनुर्धर) भार्गव, निषंगी (भाता धारण करणारे), तार (विश्वाचे रक्षक), स्वक्ष (शोभून दिसणाऱ्या नेत्रांचे), क्षपण (भिक्षुरूप), ताम्र, भीम, उग्र, शिव आहात.

'आपण महादेव, शर्व (प्रलयकाळात सर्वांचा संहार करणारे), विश्वरूप शिव, हिरण्य, वरिष्ठ, ज्येष्ठ, मध्यम, वास्तोष्पती (गृहक्षेत्राचे पालक), पिनाक, मुक्ती, केवल, मृगव्याध (मृगरूपधारी यज्ञासाठी व्याधरूप), दक्ष, स्थाणू (आधारस्तंभ) भीषण, बहुनेत्र, धुर्य (अग्रगण्य), त्रिनेत्र, ईश्वर, कपाली (चौथ्या हातात कपालधारी), वीर, मृत्यू, त्र्यम्बक, बभ्रू (विष्णुस्वरूप), पिशंग (भुऱ्या रंगाचे), पिंगल (निळसर, पिवळ्या रंगाचे), अरुण, पिनाकी, ईषुमान् (बाणधारी), चित्र, रोहित (लाल रंगाचे), दुन्दुम्य (दुंदुभीचे शब्द ऐकताच प्रसन्न होणारे), एकपाद, अज, बुद्धिद, आरण्य (अरण्यवासी) गृहस्थ, यती, ब्रह्मचारी, सांख्य (आत्मानात्मविवेकशील), योग, व्यापी, दीक्षित, अनाहत, शर्व (दारुकावनातील मुनींना मोहित करणारे), भव्येश (पार्वतीचे प्राणपती), यम, रोधा (धर्मऱ्हासाचे निरोधक), चेकितान (अतिशय ज्ञानसंपन्न) ब्रह्मिष्ट, महर्षी, चतुष्पाद, मेध्य (पवित्रस्वरूप)

रक्षी (रक्षक) शीघ्रग, शिखंडी, कराल, दंष्ट्री, विश्ववेधा (विश्वाचे सृष्टिकर्ते), भास्वर (दीप्तिमान), प्रतीत, सुदीप्त, समेधा, क्रूर, अविकृत, भीषण आहात.

'आपण शिव, सौम्य, मुख्य, धार्मिक, शुभ, अवध्य, अमृत, नित्य, शाश्वत, व्यापृत (कर्मसचिव), विशिष्ट, भरत, साक्षी, क्षेम, सहमान (सहनशील), सत्य, अमृत, कर्ते, परशू, शूली, दिव्यचक्षू, सोमप, आज्यप, धूमप, ऊष्मप, शुची परिधान, सद्योजात (पांच मूर्तीपैकी एकीतून प्रकट होणारे), मृत्यू, पिशिताश (फळाचा गाभा खाणारे), सर्व, मेघ, विद्युत्, व्यावृत्त (गज चर्माने आवृत), वरिष्ठ, भरित (परिपूर्ण), तरक्षू (व्याघ्रविशेष), त्रिपुरघ्न, तीर्थ, अवक्र, रोमश, तिग्मायुध (तीक्ष्ण हत्यार धारण करणारे), व्याख्य, सुसिद्ध, पुलस्ती (पुलस्त्यऋषिरूप), रोचमान, चंड, (अत्यंत क्रोधी), स्फीत (वृद्धिगत), ऋषभ, व्रती, युञ्जमान (सर्वदा कार्यरत), शुची, ऊर्ध्वरेता (अखंडित ब्रह्मचारी), असुरघ्न, स्वाघ्न (निजजनांचे रक्षक), मृत्युघ्न (मृत्यु टाळणारे), यज्ञिय (यज्ञासाठी हितकारी), कृशानू (आपल्या तेजाने तृणादींना सूक्ष्म करणारे), प्रचेता (चेतना देणारे), वन्ही, निर्मल आहात.

'आपण रक्षोघ्न (राक्षसांचा संहार करणारे), पशुघ्न, अविघ्न, श्वसित, विभ्रांत (भ्रांतिमान), महान्त, अत्यंत दुर्गम, कृष्ण, जयन्त, लोकानामीश्वर, अनाश्रित, वेध्य (भक्तांना लक्ष्यरूप), समत्वाधिष्ठित, हिरण्यबाहू (सोनेरी कांतीच्या भुजांचे), व्याप्त, मह (दीप्तिशाली), सुकर्मा, प्रसह्य, ईशान (नियंते), सचक्षू, क्षिप्रेषू (शीघ्रतेने बाण चालविणारे), सदश्व (उच्चैःश्रवादी उत्तम अश्वरूप), शिव, मोक्षद, कपिल, पिशंग (कनकाप्रमाणे कांतिमान), महादेव, धीमान्, महाकल्प, दीप्त, रोदन (रडविणारे), हस (हसविणारे), दृढधन्वा (सुदृढ धनुष्य धारण करणारे), कवची (कवच-धारी), रथी, वरूथी (भूत व पिशाच यांची सेना असलेले), भृगुनाथ, शुक्र, गव्हरेष्ठ (निकुंजप्रिय), वेधा (ब्रह्मस्वरूप), अमोघ, प्रशान्त, सुमेध, वृष (धर्मस्वरूप), कृत्तिवासा (गजासुराचे चर्म धारण करणारे), पशुपती, भूतपती आहात. आपणांस वारंवार प्रणाम असो.

आपण प्रणव, स्वाहा, ऋग्यजुःसाम, स्वधा, वषट्कार, मंत्रात्मा, त्वष्टा, धाता, कर्ता, चक्षुःश्रोत्रमय, भूतभव्यभवेश (भूत, भविष्य व वर्तमान यांचे ज्ञाते), कर्मात्मा, वसू, साध्य, रुद्र,आदित्य, सुर,विश्व, मारुत, देवात्मा, अग्नीषोमविधिज्ञ, पशुमन्त्रौषध, स्वयंभू, अज, अपूर्वप्रथम, प्रजापती,ब्रह्मात्मा,आत्मेश,आत्मवश्य,सर्वेशातिशय (सर्व ईश्वरांत मोठा), सर्वभूतांगभूत, भूतात्मा, निर्गुण, गुणज्ञ, व्याकृत (रूपांतरित), अमृत, निरुपाख्य (अदृश्य), मित्र, योगात्मा, पृथिवी, अंतरिक्ष, मह (महर्लोक), त्रिदिव्य (स्वर्ग), जन (जनलोक), तप (तपोलोक), सत्य (सत्यलोक), लोकात्मा, अव्यक्त, महान्, भूतादी, इंद्रिय, आत्मज्ञ, विशेष, सर्वात्मा, नित्य, आत्मलिंग, सूक्ष्म, शुद्ध, विभू, मोक्षात्मा आहात. आपणांस नमस्कार असो.'

## इंद्रपुत्री जयंतीची देवयानी

शुक्राचार्यांनी वरीलप्रमाणे भगवान शंकरांची प्रार्थना करून, हात जोडून ते नम्रपणाने उभे राहिले. तेव्हा भगवान शिवांनी आपल्या हाताने त्यांना स्पर्श करून दर्शन दिले व तेथेच ते अंतर्धान पावले. त्यानंतर शुक्राचार्यांनी मागे उभ्या असलेल्या जयंतीस पाहून म्हटले, 'सुभगे, तू कोण आहेस ? मी तपस्वी. माझी सेवा करून कष्ट का करतेस ? मी तुझी ही भक्ती, नम्रता, इंद्रियनिग्रह पाहून प्रसन्न झालो आहे. वरवर्णिनी, तू माझ्याकडून काय इच्छितेस ? वरारोहे, तुझी अभिलाषा काय आहे ? तू अवश्य सांग. मी ती पूर्ण करीन. मग ती कितीही दुष्कर असो.'

हे ऐकून जयंतीने त्यांना म्हटले, 'ब्रह्मन्, आपण आपल्या तेजोबलानं माझा मनोरथ जाणला असेल. आपणांस सर्व ज्ञात आहे.' हे ऐकून शुक्राचार्यांनी आपल्या दिव्य दृष्टीने तिचा मनोरथ जाणून म्हटले, 'सुंदर भावांच्या सुश्रोणी, इंदीवर कमलासारखा तुझा वर्ण श्याम आहे. देवी, तुझे नेत्र अत्यंत रमणीय आहेत. तुझं बोलणं अतिशय मधुर आहे. दहा वर्षं तू इथं माझ्याबरोबर राहिलीस. जो हवा असेल तो वर तू मला माग.'

असे म्हणून शुक्राचार्य परत आपल्या घरी जयंतीसह आले. त्यांनी तिचे पाणिग्रहण केले. नंतर तपोबलसंपन्न शुक्राचार्यांनी मायेचे आवरण निर्माण करून सर्व प्राण्यांपासून अदृश्य होऊन, ते दहा वर्षे जयंतीबरोबर राहिले. याच वेळी दितीच्या पुत्रांना समजले की, शुक्राचार्य सफल मनोरथ होऊन घरी आले आहेत. तेव्हा ते सर्व हर्षानें त्यांना पाहाण्यासाठी त्यांच्या घरी आले.

इकडे बृहस्पतींना समजले की, शुक्राचार्य जयंतीची मनोकामना पाहून संतुष्ट झाले व दहा वर्षांपर्यंत जयंतीच्या बंधनात सापडले आहेत. दैत्यांचे हे महान छिद्र पाहून इंद्राच्या प्रेरणेने त्यांनी शुक्राचार्यांचे रूप धारण केले आणि असुरांना बोलाविले. ते आले तेव्हा शुक्ररूपधारी बृहस्पती त्यांना म्हणाले, 'आपलं स्वागत असो. तुमच्या कल्याणासाठी मी तपोवनातून परत आलो आहे. तिथं प्राप्त झालेल्या विद्या मी तुम्हांला देईन.'

हे ऐकून सर्व दानव विद्याप्राप्तीसाठी तेथे एकत्र आले. एवढ्यात शुक्राचार्यांचा ठरलेला दहा वर्षांचा समय पूर्ण झाला. आपल्या यजमानाची वार्ता पाहाण्यासाठी ते उत्सुक झाले. एवढ्यात त्यांना जयंतीपासून देवयानी नावाची कन्या प्राप्त झाली, ते जयंतीला म्हणाले, 'पवित्र हास्याची देवी, साध्वी, आता मी यजमानांची देखभाल करण्यासाठी जातो.' हे ऐकून जयंती शुक्राचार्यांना म्हणाली, 'महाव्रत, आपण आपल्या भक्तांचं कल्याण अवश्य पाहावं. कारण सत्पुरुषांचा तोच धर्म आहे. ब्रह्मन्, मी आपल्या धर्माचा लोप व्हावा, असं कसं म्हणू?'

## देवासुरांचा संग्राम

त्यानंतर असुरांच्या जवळ शुक्राचार्य गेले. तेव्हा त्यांना त्यांचे रूप धारण केलेले बृहस्पती तेथे दिसले. तेव्हा ते असुरांना म्हणाले, 'दानवांनो, तुम्ही नीट ऐका. आपल्या तपस्येनं शंकरांना प्रसन्न करणारा शुक्राचार्य मी आहे. या बृहस्पतीनं तुम्हांस फसविलं आहे.' हे ऐकताच सर्व दानव आश्चर्यचकित झाले. किंकर्तव्यमूढ ते बनले. तेव्हा शुक्राचार्य त्यांना म्हणाले, 'असुरांनो, तुमचा आचार्य मी शुक्राचार्य आहे. आणि

हा देवांचा आचार्य बृहस्पती आहे. याचा त्याग करून तुम्ही मला अनुसरावं.' हे ऐकून तपस्वी बृहस्पती दानवांना म्हणाले, 'दैत्यांनो, तुमचा गुरू शुक्राचार्य मीच आहे. आणि माझं रूप धारण करून हा बृहस्पती इथं आला आहे. असुरांनो, माझं रूप धारण करून हा तुम्हांस मोहात टाकतो आहे.'

हे ऐकून सर्व दैत्य एकत्र आले व म्हणाले, 'हाच ऋषी आम्हांस दहा वर्षं शिक्षण देत आहे. म्हणून हेच आमचे गुरू होत.' सर्व दानवांनी बृहस्पतींना प्रणाम केला. त्यांचा त्यांनी अंगीकार करून त्यांचे अभिनंदन केले. क्रोधाने ते दैत्य शुक्राचार्यांना म्हणाले, 'हेच आमचे हितैषी गुरुदेव आहेत. आपण आमचे गुरुदेव नाहीत. आपण इथून निघून जावं. आपण शुक्राचार्य असा वा बृहस्पती असा. आमचे ऐश्वर्यशाली गुरुदेव हेच होत. आम्ही यांचीच आज्ञा मानू.'

असे म्हणून सर्व असुर बृहस्पतींच्या जवळ आले. दानवांच्या या वर्तनामुळे शुक्राचार्य कुपित झाले. ते म्हणाले, 'मी समोर असताना तुम्ही माझी आज्ञा मानली नाही. म्हणून तुमची चेतना नष्ट होईल. तुमचा पराभव होईल.' असुरांना असा शाप देऊन शुक्राचार्य तेथून निघून गेले. शुक्राचार्यांनी असुरांना शाप दिला हे पाहून बृहस्पतींना आनंद झाला. त्यांचा हेतू साध्य झाला होता. नंतर ते आपल्या स्वरूपात प्रकट झाले. आपण असुरांना जिंकले, समजून ते तेथून निघून गेले. बृहस्पती निघून गेल्यावर सर्व असुर भ्रमात म्हणू लागले, 'आपण तर फसलो आहोत. बृहस्पतीनं आपणांस व्यथित केलं आहे.'

असंतुष्ट दानव प्रल्हादास पुढे करून शुक्राचार्यांकडे गेले. त्यांना पाहून शुक्राचार्य म्हणाले, 'दानवांनो, मी समजावून सांगत असताना तुम्ही ऐकलं नाही. म्हणून तुम्ही पराभूत झालात.' हे ऐकून प्रल्हादाच्या डोळ्यांत अश्रू जमा झाले. तो गद्‌गद्‌वाणीने म्हणाला, 'भृगुनंदन,आपण आमचा त्याग करू नये. भार्गव, आम्ही आपलेच अश्रित, सेवक व भक्त आहोत. आपण आमचा स्वीकार करावा. बृहस्पतींनी आम्हांस मोहात टाकलं. आपण आपल्या दिव्यदृष्टीनं आम्हांस जाणावं. भृगुनंदन, आपण आमच्यावर कृपा करणार नसाल तर आम्ही आजच रसातळास जाऊ.'

अशा प्रकारचा अनुनय झाल्यावर शुक्राचार्यांनी दिव्यदृष्टीने सर्व काही जाणले. त्यांचे हृदय करुणेने भरून आले. क्रोधाचा त्याग करून ते असुरांना म्हणाले, 'प्रल्हाद, तुम्ही भिऊ नका. रसातळास कुणीच जाऊ नका. माझ्या शापानं तुमची चेतना नष्ट झाली होती. ती तुम्हांस आजच परत प्राप्त होईल. या विपरीत काळातही तुम्ही देवांवर विजय मिळवाल. पण तुम्हांस एकदा पातालात जावं लागेल. कारण ब्रह्मदेवांनीच असं सांगितलं होतं. माझ्या कृपेनं तुम्ही देवांचा पराभव करून त्रैलोक्याचं राज्य दहा युगांपर्यंत भोगाल. सावर्णी मन्वन्तरात तुम्हांस परत राज्य प्राप्त होईल. त्यावेळी तुमचा पौत्र बली त्र्यैलोक्यावर राज्य करील. देवांच्या राज्यावर बली अधिष्ठित होईल. असं मला भगवान शंकरांनीही सांगितलं आहे. हे माझे शंड व अमर्क दोन शिष्य बृहस्पतीप्रमाणं प्रभावशाली आहेत. ते तुमचं रक्षण करतील.'

असे शुक्राचार्यांनी सांगितल्यावर सर्व असुर प्रल्हादासह आपापल्या घरी गेले. विजयाच्या आशेने असुरांनी आपापली शस्त्रे व कवचे धारण करून देवांच्या निकट जाऊन त्यांना पाचारिले. असुरसेना घेऊन आल्याचे देवांनी पाहिले. देवही शस्त्रांनी सिद्ध होऊन युद्धास तयार झाले. देवासुरांचा हा संग्राम शंभर वर्षे चालला होता. यात असुरांनी देवांना पराभूत केले. तेव्हा देवांनी विचार केला की, आपण यज्ञाच्या निमित्तानं शंड व अमर्क यांना बोलावून असुरांवर विजय मिळवावा. ते त्या दोघांना म्हणाले, 'द्विजवर, आपण असुरांचा पक्ष सोडावा. आपण सर्वजण दानवांचा पराभव करू.' यानंतर मात्र देवांना विजय मिळून दानवांचा पराभव झाला. दानव बलहीन झाले. शुक्राचार्यांच्या पूर्वीच्या शापाने अशा प्रकारे दानव पराभूत झाले. धर्माची पुनः स्थापना झाली. या असुरांचा विनाश करण्यासाठी भगवान विष्णूंना पुनःपुन्हा अवतार धारण करावा लागला.

## भगवंताचे विविध अवतार

पूर्वी एकदा सामर्थ्यशाली ब्रह्मदेवांनी म्हटले होते की, जे असुर प्रल्हादाच्या आज्ञेत राहाणार नाहीत, ते मनुष्यांच्या हातून मारले

जातील. चाक्षुष मन्वन्तरात धर्माच्या अंशापासून साक्षात भगवान नारायणांचा अवतार झाला. त्यानंतर वैवस्वत मन्वन्तरात त्यांनी एक यज्ञानुष्ठान प्रवर्तित केले. त्या यज्ञाचे पुरोहित ब्रह्मदेव होते. चौथ्या तामस मन्वन्तरात देवांना विपत्तिग्रस्त पाहून हिरण्यकशिपूचा वध करण्यासाठी समुद्राच्या तटावर नृसिंहांचा अवतार प्रकट झाला. या द्वितीय नृसिंहावतारात रुद्र पुरोहित होता. सातव्या वैवस्वत मन्वन्तराच्या त्रेतायुगात, जेव्हा त्रिलोकावर बलीचा अधिकार होता, त्यावेळी तिसरा वामनावतार झाला. भगवान विष्णूंचे हे तीन दिव्य अवतार होत.

यांशिवाय आणखी सात अवतार भृगूंच्या शापामुळे मानवयोनीत झाले. प्रथम त्रेतायुगात, जेव्हा धर्माचा चतुर्थांश नष्ट झाला होता, तेव्हा भगवान मार्कंडेयांना पुरोहित करून दत्तात्रेयांच्या रूपात अवतीर्ण झाले. पंधराव्या त्रेतायुगात चक्रवर्ती मांधाताच्या रूपात पांचवा अवतार झाला. त्यावेळी पुरोहितपद महर्षी तथ्य (उत्तण्य) यांना मिळाले. सहावा अवतार परशुरामांच्या रूपात झाला. त्याने संपूर्ण क्षत्रियांचा संहार केला. त्यावेळी विश्वामित्रादी सहायक बनले होते. चोविसाव्या त्रेतायुगात सातव्या अवताराच्या रूपात रावणाचा वध करण्यासाठी भगवान श्रीराम महाराज दशरथाचे पुत्र म्हणून अवतीर्ण झालें. त्यावेळी वसिष्ठ पुरोहित होते. अठ्ठाविसाव्या द्वापरयुगात आठवा अवतार म्हणून भगवान विष्णू पराशर वेदव्यासांच्या रूपात अवतीर्ण झाले. त्यावेळी जातूकर्ण्याने पुरोहितपद भूषविले.

धर्माची स्थापना व असुरांचा विनाश करण्यासाठी नववा अवतार बुद्धांचा झाला. सुंदर त्यांचा सहचर रूपवान होता. त्यांचे नेत्र कमलासारखे होते. त्यावेळी पुरोहित महर्षी द्वैपायन होते. या युगाच्या समाप्तीच्या वेळी जेव्हा संध्यामात्र शिल्लक राहील, तेव्हा विष्णुयशाच्या पुत्ररूपाने कल्कींचा अवतार होईल. या दहाव्या अवतारात पराशरपुत्र व्यास व याज्ञवल्क्य पुरोहित होतील. त्यावेळी भगवान कल्की आयुधधारी शेकडो, सहस्रो विप्रांना बरोबर घेऊन चारही दिशांना असलेले धर्मविमुख जीव, पाखंडी, शूद्र राजे यांचा नाश करतील. ब्रह्मद्वेषी शत्रूंचा संहार करण्यासाठीच कल्कींचा अवतार होईल. या अठ्ठाविसाव्या

युगात भगवान कल्की सेनेसह विराजमान व यशस्वी होतील. त्यावेळी ते धर्महीन शूद्रांचा नाश करतील. पापी लोकांचा संहार करतील. त्या-नंतर आपले कार्य पूर्ण करून भगवान कल्की सेनेसह विश्रांती घेतील. त्यावेळी सर्व प्रजा समृद्धिशालिनी होऊन त्यांची सेवा करील. त्यानंतर मात्र प्रजा मोहित होऊन एक दुसऱ्यावर कुपित होईल. परस्पर लढून एकमेकांना मारतील. त्यावेळी कार्यकाल समाप्त झाल्यावर भगवान कल्की अंतर्धान पावतील.

याप्रमाणे राजा नष्ट झाल्यावर कोणीच रक्षक उरणार नाही. तेव्हा प्रजा युद्धभूमीवर एकमेकांस मारील. सर्व अत्यंत दुःखी होतील. ते लोक परिवारहीन होऊन ग्रामे व नगरे सोडून वनात राहातील. त्यांचे वर्ण, धर्म व आश्रम नष्ट होतील. कलियुगाची समाप्ती आली की, देशवासी अन्न विकू लागतील. चौकांत शिवमूर्ती विकल्या जातील. स्त्रिया आपले शील विकतील. त्या वेश्याकर्मात प्रवृत्त होतील. त्यांचे शरीर लहान होईल. लोक अल्पायुषी होतील. ते वनांत, नदीतटांवर व पर्वतांवर राहातील. कंदमुळे, पानें, फले, यांचे ते भोजन घेतील. वल्कल, मृगचर्म, पशुचर्म हीच त्यांची वस्त्रे असतील. ते सर्व वर्णसंकरांचे आश्रित होतील. नाना उपद्रवांनी पीडित होतील. त्यांची धनसंपत्ती कमी होईल. असा कष्टदायक अनुभव घेत घेत प्रजा कलियुगाबरोबर नष्ट होईल. यानंतर कृतयुगाचा प्रारंभ होईल.

## अगस्त्य, वसिष्ठ, उर्वशी

यानंतर सूताने ऋषींना तुर्वसू, द्रह्यू, अनू, पुरू, नीप, अग्नी; इत्यादींची वंशावळी समजावून दिली. नंतर नक्षत्रपुरुषव्रत, आदित्यशयन-व्रत, श्रीकृष्णाष्टमीव्रत, रोहिणीचंद्रशयनव्रतविधी तलाव, उद्याने, विहिरी, पुष्करणी, देवमंदिर यांची प्रतिष्ठा, वृक्षमहोत्सव, सौभाग्य-शयनव्रत; इत्यादी विषयांचे वर्णन आले आहे. यानंतर एकसष्टाव्या अध्यायात नारद व भगवान महेश्वर यांच्या संवादातून अगस्त्य, वसिष्ठ, उर्वशी अप्सरा यांच्या प्रकटीकरणाच्या कथा आल्या आहेत.

नारदांनी विचारले, ' त्रिपुरविनायक महेश्वरा, भूर्लोक, भुवर्लोक,

स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक, या सर्वांवर कुणाचं आधिपत्य होतं ? या लोकांत सुंदर रूप, दीर्घायू, सौभाग्य, विपुल लक्ष्मी यांची प्राप्ती कशी झाली ?' या प्रश्नांचे उत्तर देताना भगवान महेश्वरांनी सर्व वृत्तांत सांगितला. पूर्वी एकदा इंद्राने भूलोकीच्या असुरांचा नाश करण्यासाठी वायुदेवाबरोबर अग्नीस आज्ञा दिली. अग्नीने हजारो दानवांना जाळून भस्म केले. तारक, कमलाक्ष, कालदंष्ट्र, परावसू, विरोचन इत्यादी प्रधान दानव रणभूमीवरून पळून जाऊन समुद्रात प्रविष्ट झाले. तेथे ते लपून बसले. अग्नी व वायू यांनी त्यांना अशक्त, निर्बल, निर्जीव समजून त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. तरी ते दानव देव, नाग, मनुष्य यांना पीडित करून पुन्हा जलात प्रविष्ट होत. अशा प्रकारे पांच-सात दानव जलदुर्गात राहून त्रिलोकास पीडा देत असत. म्हणून इंद्राने वायू व अग्नी यांना समुद्रातील जल सुकवून टाकण्याची आज्ञा दिली. तेव्हा अग्नी व वायू शंबरासुराचा नाश करणाऱ्या इंद्राला म्हणाले,

'देवेन्द्रा, समुद्राचा विनाश करणं, हा तर महान अधर्म होईल. पुरंदरा, असं केल्यास बहुतेक जीवांचा नाश होईल. आम्ही हे पाप करणार नाही. सुरश्रेष्ठा, या समुद्राच्या जलात शेकडो, कोटयवधी जीव निवास करतात. त्यांचाही नाश करावा ?'

हे ऐकून सुरेन्द्राचे डोळे क्रोधाने लाल झाले. त्याने आपल्या क्रोधाग्नीनें अग्नीस जाळताना म्हटले, 'विभावसो, देवांवर धर्माचा, अधर्माचा प्रभाव कसला ? आपण वायूसह माझ्या आज्ञेचं उल्लंघन केलं आहे. अहिंसा आदी मुनिव्रत धारण करून आपण धर्म, अर्थ इत्यादींची उपेक्षा केली आहे. म्हणून आपण मानवलोकात वायूबरोबर मुनिरूपात जन्म घ्याल. अग्नी, मानवयोनीत उत्पन्न झाल्यावर जेव्हा आपण अगस्त्य-रूपानं समुद्राचं शोषण कराल, तेव्हा आपणांस देवत्वाची प्राप्ती होईल.'

अशा रीतीनं इंद्राच्या शापाने ते दोघे त्याचक्षणी पृथ्वीवर आले. त्या दोघांनी एकत्र अशा एक कुंभाचे शरीर धारण केले. ते मित्रावरुणाच्या वीर्यापासून उत्पन्न होऊन वसिष्ठांचे अनुज बनले. यानंतर ते उग्रतपस्वी अगस्त्यमुनींच्या नावाने विख्यात झाले. हे सर्व ऐकून नारदांनी विचारले, 'त्रिपुरसूदन, हे मुनी वसिष्ठांचे भाऊ कसे झाले ?

मित्रावरुण त्यांचा पिता कसा झाला? अगस्त्यांचा जन्म कुंभापासून, घड्यापासून कसा झाला?' याही प्रश्नांचे उत्तर नारदांनी दिले.

पूर्वी पुराणपुरुष भगवान विष्णू धर्माचे पुत्र होऊन गंधमादन-पर्वतावर तपस्या करीत होते. त्यांच्या तपस्येने भयभीत होऊन इंद्राने त्या तपात विघ्न निर्माण करण्यासाठी अप्सरा, वसंतऋतू, कामदेव यांना त्यांच्याकडे पाठविले. श्रीहरी त्यांचे गाणे, नृत्य पाहून कामप्रवृत्त झाले नाहीत. त्यांचे मन क्षुब्ध झाले. त्यांनी त्यांनाच क्षुब्ध करण्यासाठी आपल्या उरुप्रदेशापासून सर्वांना मोहित करणारी एक नारी निर्माण केली. तिने सर्व देवांना व त्या दोन देवश्रेष्ठांना क्षुब्ध केले. त्यावेळी श्रीहरींनी त्या अप्सरांसमोरच देवांना म्हटले, 'देवगण, ही एक अप्सरा आहे. ही लोकांत उर्वशी या नावानं प्रसिद्ध होईल.'

यानंतर एका घड्यापासून मित्र व वरुण यांच्या अंशापासून दोन मुनिश्रेष्ठ उत्पन्न झाले. प्राचीन काळातील गोष्ट आहे. एकदा महाराज निमी स्त्रियांबरोबर जुगार खेळत होता. त्याचवेळी महर्षी वसिष्ठ त्याच्यापाशी आले. पण राजाने त्यांचे स्वागत केले नाही. तेव्हा वसिष्ठ-मुनींनी राजास शाप दिला, 'तू देहरहित होशील.' त्यानंतर राजानेही मुनींना तोच शाप दिला. अशा शापांनी त्या दोघांची चेतना हरपली. ते दोघे शापापासून मुक्त होण्यासाठी जगत्पती ब्रह्मदेवांपाशी गेले. तेथे ब्रह्मदेवांच्या आदेशाने राजा निमीचा निवास प्राण्यांच्या नेत्रांत झाला. त्यांना विश्राम देण्यासाठी डोळ्यांच्या पापण्या लवून निमेष होतो. वसिष्ठही जलकुंभापासून प्रकट झाले. ते अत्यंत शांत स्वभावाचे होते. त्यांचा वर्ण गोरा होता. त्यांना चार भुजा होत्या. अक्षसूत्र (यज्ञोपवीत) व कमंडलू त्यांनी धारण केले होते. विप्रांनी घेरलेले अगस्त्यमुनी आपल्या पत्नीसह राहून मलयपर्वतावरील एका प्रदेशात वैखानविधीस अनुसरून अत्यंत कठोर तप करण्यास उद्युक्त झाले. त्यानंतर तारका-सुराने जगास अत्यंत पीडा दिली. हे पाहून ते अत्यंत कुपित झाले व त्यांनी समुद्र पिऊन टाकला. हे पाहून शंकरादी देव त्यांना वर देण्या-साठी उत्सुक बनले. त्याचवेळी ब्रह्मदेव व विष्णू वर देण्यासाठी प्रकट झाले व म्हणाले, 'मुने, आपलं कल्याण असो. आपलं अभीष्ट होईल.

आपण एखादा वर मागावा.'

तेव्हा अगस्त्यमुनी म्हणाले, ' देवा, मी सहस्र ब्रह्मदेवांच्या पंचवीस कोटी वर्षांपर्यंत दक्षिणाचलाच्या मार्गावर विमानात स्थित होऊन निवास करीन. त्यावेळी माझ्या विमानाचा उदय होताच जो मनुष्य माझं पूजन करील तो क्रमशः सात लोकांचा अधिपती होईल.' तेव्हा देवगणांनी ' एवमस्तु ' म्हणून प्रस्थान केले. म्हणून विद्वान अगस्त्यांसाठी सदा अर्घ्य प्रदान करतात. यानंतर नारदांनी विचारल्यावरून महादेवांनी अगस्त्यपूजनाचा विधी समजावून सांगितला.

## राजा पुष्पवाहनाची कथा

यानंतर अनेक व्रतविधींची विधाने आली आहेत. अनंततृतीया व्रत, रसकल्याणिनीव्रत, आर्द्रानन्दकरी तृतीयाव्रत, अक्षयतृतीयाव्रत, सारस्वतव्रत, सूर्यचंद्रग्रहणांत स्नानविधी, सप्तमीस्नपनव्रत, भीमद्वादशीव्रत, अशून्यशयन(द्वितीया)व्रत, अंगारकव्रत, शुक्र व गुरू यांचा पूजाविधी, कल्याणसप्तमीव्रत, विशोकसप्तमीव्रत, फलसप्तमीव्रत, शर्करासप्तमीव्रत, कमलसप्तमीव्रत, मंदारसप्तमीव्रत, शुभसप्तमीव्रत, विशोकद्वादशीव्रत, गुडधेनुदानविधी, पर्वतदान, धान्यशैलदान, लवणाचलदान, गुडपर्वतदान, सुवर्णाचलदान, शर्कराशैलदान, नवग्रहशांतिविधी, नवग्रहांचे स्वरूप, महेश्वरव्रत, सर्वफलत्यागव्रत, आदित्यवारकल्प, संक्रांतिव्रत, विभूतिद्वादशीव्रत; इत्यादी व्रतविधींचे त्यांच्या माहात्म्यांसह वर्णन आले आहे.

शंभराव्या अध्यायात विभूतिद्वादशीच्या प्रसंगाच्या निमित्ताने राजा पुष्पवाहनाचा वृत्तांत आला आहे. फार पूर्वी रथन्तरकल्पात पुष्पवाहन नावाचा एक राजा होऊन गेला. तो सूर्याप्रमाणे तेजस्वी होता. त्याच्या तपस्येने संतुष्ट होऊन ब्रह्मदेवांनी त्याला एक सोन्याचे कमल (रूपविमान) प्रदान केले. ते इच्छेनुसार कोठेही जाऊ शकत होते. ते प्राप्त झाल्यावर राजा पुष्पवाहन आपल्या जनांसह त्यावर आरूढ होऊन सर्वत्र विहार करीत असे.

कल्पाचा आदीत पुष्करनिवासी त्या पुष्पवाहनाच्या सातव्या द्वीपावर अधिकारी होता. पुढे ते द्वीप पुष्करद्वीप या नावाने ओळखले जाऊ लागले. ब्रह्मदेवांनी हे विमान राजाला दिलेले असल्यामुळे देव व दानव त्याला पुष्पवाहन म्हणू लागले. राजाला त्रिलोकात कोणतेच स्थान अगम्य नव्हते. त्याच्या पत्नीचे नाव लावण्यवती होते. ती अनुपम सुंदर होती. तिच्या भोवती हजारो नारी असत. पार्वती जशी शंकरांना प्रिय, तशीच ती राजाची अत्यंत आवडती होती. तिला दहा पुत्र झाले. ते सर्व धनुर्धारियात अग्रगण्य होते.

एकदा प्रचेताचे पुत्र मुनिवर वाल्मीकी राजाच्या घरी आले. त्यांना आलेले पाहताच राजाने विचारले, ‘मुनींद्र, कोणत्या कारणानं मला हे मानवांनी पूजित असं स्थान प्राप्त झालं आहे ? कोणत्या कारणानं मला ही देवांगनांना पराजित करणारी भार्या प्राप्त झाली आहे ? माझ्या थोडयाशा तपानं प्रसन्न होऊन मला ब्रह्मदेवांनी हे कमलगृह कशासाठी दिलं आहे ? यात अमात्य, हत्ती, रथसमूह, जनपदवासी, शेकडो राजे बसू शकतील. हे विमान चमकणाऱ्या ताऱ्यांनी वेढलेल्या चंद्राप्रमाणं शोभतं. प्रचेता, या प्राप्तीसाठी पूर्वजन्मी मी व माझ्या पुत्रांनी असं कोणतं पुण्य केलं होतं ?’

हे ऐकून महर्षी वाल्मीकी त्याला म्हणाले, ‘राजन्, तुझा पूर्वजन्म अत्यंत भीषण अशा व्याधकुलात होता. रात्रंदिवस तू पापकर्मांत रमत होतास. तुझं शरीरही बेडौल होतं. त्यातून दुर्गंध वाहायचा. ते मोठं कुरूप होतं. त्या जन्मी तुझा कुणीही हितैषी मित्र नव्हता. तुला पुत्र नव्हता की भाई-बंधू नव्हते. तुला माता नव्हती. पिता नव्हता. तुझी ही अनुकुल पत्नी तेवढी होती.एकदा अनावृष्टीनं भयानक दुष्काळ पडला. भुकेनं पीडित होऊन तू त्यावेळी आहाराच्या शोधात होतास. पण तुला जंगली फळं, खाद्यवस्तू मिळाली नाही. एवढयात तुझी दृष्टी एका सरोवराकडं गेली. ते कमलसमूहानं मंडित होतं. त्यात मोठमोठी कमलं फुललेली होती. तू त्यांतील अनेक कमलं तोडून वैदिश नावाच्या नगरीस निघून गेलास.

‘तिथं तू ती कमलपुष्पं विकून मूल्य प्राप्त करावं म्हणून खूप

हिंडलास. पण ती कमलं काही विकली गेली नाहीत. त्यावेळी तू भुकेनं अत्यंत व्याकुळ झाला होतास. तू तुझ्या पत्नीसह एका भवनाच्या प्रांगणात बसून राहिलास. तिथं रात्री तू एक मंगल ध्वनी ऐकलास. तो ऐकून तू तुझ्या पत्नीसह त्या स्थानी गेलास. तिथं एका मंडपात भगवान विष्णूंची पूजा होत होती. तिथं अनंगवती नावाची एक वेश्या माघमासातील विभूतिद्वादशीव्रताची समाप्ती करून आपल्या गुरूस, भगवान हृषी-केशांना विधिवत शृंगार करून सुवर्णमय कल्पवृक्ष, श्रेष्ठ लवणाचल, सर्व उपकरणांसह शय्या यांचं दान करीत होती. अनंगवतीची पूजा पाहून तू ती फुलं भगवान विष्णूंच्या शृंगारासाठी दिलीस. तुम्ही पतिपत्नींना भक्तिभाव उत्पन्न झाला. तुमच्या या क्रियेमुळं अनंगवती प्रसन्न झाली. तिनं तुम्हांस थोडी धनराशी दिली. पण तुम्ही ती नाकारली. तेव्हा अनंग-वतीनं तुम्हांस भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य अशा चार प्रकारांचं अन्न दिलं. तुम्ही त्या अन्नाचाही त्याग केलात, तुम्ही तिला म्हणालात, 'वरानने, आम्ही उद्या भोजन करू. दृढवते, आम्ही दोघंही जन्मभर पापकर्म केलं. पण आज आम्हांस विशेष आनंद झाला आहे.'

'याच वेळी तुम्हां दोघांना धर्माचा लेशांश प्राप्त झाला. तुम्ही रात्रभर जागरण केलंत. प्रात:काली अनंगवतीनं भक्तिपूर्वक आपल्या गुरूंना लवणाचलासहित शय्या व अनेक गावं, यांचं दान केलं तिनं बारा ब्राह्मणांना सुवर्ण, वस्त्र, अलंकार त्यांसहित बारा गायी प्रदान केल्या. यानंतर तिनं सुहृद, मित्र, दीन, अंध, दरिद्री आणि तुमचं दांपत्य यांना भोजन घातलं. तुमचा तिनं विशेष आदरसत्कार केला. राजेंद्रा, यामुळं तुला हे राजराजेश्वराचं रूप प्राप्त झालं. त्या कमलांनी भगवान केशवांची पूजा झाल्यामुळं तुझं पाप नष्ट झालं. तुला या कमलमंदिराची प्राप्ती झाली. तुझ्या सात्त्विक भावाच्या माहात्म्यानं ब्रह्मरूप भगवान जनार्दन, लोकेश्वर ब्रह्मदेवही संतुष्ट झाले. म्हणूनच तुझं हे पुष्करमंदिर कुठंही जाण्यासाठी समर्थ आहे. ती अनंगवती वेश्याही यावेळी काम-देवाची पत्नी रतीच्या सवतीच्या रूपात उत्पन्न झाली आहे. त्यावेळी तिचं नाव प्रीती असून ती सर्वांना आनंद देणारी आहे. म्हणून राजेश्वरा,

तू हे पुष्करगृह भूतलावर सोडून गंगातटावर विभूतिद्वादशीचं व्रत कर.'

इतके म्हणून प्रचेतामुनी तेथून अंतर्धान पावले. राजा पुष्पवाहनाने मुनींनी सांगितल्याप्रमाणे सर्व केले. त्याच्यावर भगवान केशव प्रसन्न झाले.

## राजा पुरूरव्याचा वृत्तांत

यानंतर नंदिकेश्वरांनी नारदांना साठ व्रतांचे विधान व माहात्म्य समजावून दिले. यानंतर स्नान, तर्पणविधी, मार्कंडेयांकडून युधिष्ठिरास प्रयागमाहात्म्यकथन, प्रयागक्षेत्री अनशनव्रत, तेथील कल्पवास, भूगोलाचे विस्तृत वर्णन, भारतवर्ष, किंपुरुषवर्ष, हरिवर्ष यांची वर्णने, यांचा परिचय आला आहे.

एकदा भगवान मत्स्यांना मनूने विचारले, 'जनार्दना, आपण मला बुधपुत्र पुरूरव्याचं जीवनचरित्र सांगितलंत. पण मला असं सांगा की, कोणत्या कर्मामुळं राजा पुरूरव्यास असं सुंदर रूप प्राप्त झालं? त्याला सौभाग्य प्राप्त कसं झालं? त्रिलोकातील श्रेष्ठ अप्सरा उर्वशी सौंदर्यशाली गंधर्वांचा त्याग करून सर्व प्रकारांनी राजा पुरूरव्याची संगिनी कशी बनली?'

मत्स्यभगवानांनी या प्रश्नांची उत्तरे दिली. राजा पुरूरवा पूर्वजन्मीही पुरूरवा याच नावाने विख्यात होता. तो चाक्षुष मन्वन्तरात मनूच्या वंशात उत्पन्न होऊन मद्रदेशाचा अधिपती झाला. यावेळी तो राजाच्या सर्व गुणांनी संपन्न असला तरी कुरूप होता. पूर्वजन्मी हा राजा पुरूरवा एका नदीच्या तटवर्ती एका गावात श्रेष्ठ ब्राह्मण होता. त्या वेळीही त्याचे नाव पुरूरवा होते. त्याने राज्यप्राप्तीची इच्छा मनात धरून, द्वादशीस उपवास करून भगवान विष्णूंचे पूजन केले. एकदा त्याने व्रतोपवास करून अंगास तेल लावले व नंतर स्नान केले. त्यामुळे त्याला मद्रदेशाचे निष्कंटक राज्य प्राप्त झाले. पण उपवासी शरीराला तेल लावल्यामुळे तो कुरूप झाला. तो जरी राज्यगुणांनी संपन्न होता, तरी रूपहीन असल्यामुळे प्रजेला त्याच्याबद्दल अनुराग वाटत नव्हता.

म्हणून मद्रनरेशाने रूपप्राप्तीसाठी तपस्या करावी, या इच्छेने

आपला राज्यभार मंत्र्यांवर सोपवून तो हिमालयपर्वतावर निघून गेला. तीर्थस्थानांचे दर्शन घेऊन तो पायीच निघाला. राज्याच्या सीमेवर येताच त्याला ऐरावती (रावी) नावाची अत्यंत मनोहारिणी नदी दिसली. ही नदी हिमालयातून निघून प्रवाहित झाली होती. तिचे जल चंद्रासारखे शीतल व वर्फराशीप्रमाणे उज्ज्वल होते.

पुढील एकशेसोळाव्या अध्यायात सूताने या ऐरावतीनदीचे सविस्तर वर्णन केले आहे. या नदीत दुपारी आपल्या सौंदर्याने मत्त होऊन अप्सरांचे समूह गंधर्वांसह क्रीडा करीत होते. त्या अप्सरांच्या शरीरांवरून गळणाऱ्या कुंकुमाने रंगीबेरंगी झाली होती. त्यात तटावरील वृक्षांच्या रंगीत फुलांची वृष्टी नदीत होत होती. या नदीचे पाणी ऐरावताच्या गंडस्थलापासून वाहाणाऱ्या मदजलासारखे होते. देवांगनांच्या स्तनांवरील चंदनाने युक्त होते. त्यावर भ्रमर भ्रमत होते. या नदीच्या तटावर कामाने वशीभूत झालेले मृग हरिणींच्यासह विहार करीत होते. कमलांनी ती नदी सुंदर दिसत होती. तिला पाहून राजा पुरूरवा पुढे निघाला.

त्या नदीच्या जलाच्या पानाने पुरूरव्याची थकावट दूर झाली. त्यानंतर त्याने महान हिमवान पर्वत पाहिला. या हिमालयाच्या अद्‌भुत छटांचे वर्णनही विस्ताराने एकशेसतराव्या अध्यायात आले आहे. या पर्वतावर राजा पुरूरवा मोठ्या हर्षाने हिंडू लागला. दैवयोगाने राजा त्या पर्वताच्या अशा सुरम्य भागात येऊन पोचला, की जेथे मनुष्य सहसा प्रवेश करीत नाही. येथूनच श्रेष्ठ नदी ऐरावती उगम पावली होती. येथील अनेक वृक्षांचे सविस्तर वर्णन सूताने केले.

पूर्वी या स्थानावर महर्षी अत्रींचा पुण्यमय आश्रम होता. त्या ऋषींच्या पुण्यमय निवासाने हा प्रदेश अहिंसक बनला होता. तेथील मांसभक्षक जीव केवळ दूध व फळे यांचाच आहार घेत असत मद्रेश्वराने त्या पर्वताच्या आश्रयाने आपले निवासस्थान बनविले. तेथे सर्व बाजूंनी कधी म्हशींचे, कधी बकरींचे दूध अमृताप्रमाणे स्रवत असे. हे पाहून भूपाल पुरूरव्यास अत्यंत हर्ष झाला. तेथे दिव्य सरोवरे होती. निर्मल जळाच्या नद्या वाहात होत्या. नाल्यांतून कधी गरम, तर कधी शीतल

जल वाहात होते. त्या पर्वतावर पावलोपावली सुंदर गुहा होत्या. त्या आश्रमाच्या भोवती हिमपात होत नव्हता.

तेथेच त्या पर्वतराजाचे एक पिवळ्या रंगाचे शिखर आहे. त्यावर मेघ एकत्र येऊन हिमवर्षाव करीत. पृथ्वीवरील सर्व कामना पूर्ण करणारा तो आश्रम होता. तेथे सदा भृंगांचा गुंजारव होई. तेथे सर्व पापे नष्ट होत असत. पूर्वजन्मीच्या आराधनेच्या प्रभावाने राजा पुरूरवा या स्थानी पोचला. त्याचे श्रम दूर झाले. त्या सुंदर, मंगलमय, शुभकारक आश्रमास पाहून पुरूरव्यास हर्ष झाला.

त्या पर्वताच्या एका शिखरावर एक सुंदर विवर होते. ते मालतीलतांनी आच्छादित होते. त्याला पाहाताच पुरूरवा आश्चर्यचकित झाला. त्याने त्या विवरात प्रवेश केला. शंभर हातांच्या अंतराएवढा त्याचा मार्ग होता. तो अंधारयुक्त असल्याने अत्यंत संकटमय होता. चारशे हातांच्या अंतरावर असलेल्या एका कांतिमान स्थानाकडे पुरूरवा येऊन पोचला. ते स्थान उंच, अत्यंत गंभीर व गोलाकार होते त्याचा विस्तार एक कोस होता. तेथे सूर्य तापत नव्हता, की चंद्र दिसत नव्हता. तरी ते स्थान रात्रंदिवस प्रकाशयुक्त होते. तेथे एक सरोवर होते. ते सोन्याचांदीसमान रंगीबेरंगी वृक्षांनी सुशोभित होते. तेथे नाना वृक्षांची फुलें माणकांच्या रंगांनी फुललेली होती. त्या सरोवराच्या चारही दिशांना शिलांची एक वेदी बनलेंली होती. त्या सरोवरात नाना प्रकारची कमलें उमलली होती.

त्या सरोवरातील जी भूमी होती, ती हिऱ्यांनी आच्छादित झाली होती. ती नाना प्रकारच्या रत्नांनी मंडित होती. तेथे जलात उत्पन्न होणाऱ्या कवड्या, शिंपा व शंख होते. तेथे मत्स्य, कासवे, मकर यांचे निवासस्थान होते. तेथे मरकतमणी व हिरे यांचे हजारो तुकडे पडले होते. पद्मराग, इंद्रनील, महानील, पुष्पराग, कर्केतन, तुत्थक व शेष इत्यादी मण्यांचेही तुकडे चमकत होते. काही ठिकाणी लाजावर्त, मुख्य, रुधिराक्ष, सूर्यकांत, चंद्रकांत, नीलवर्णीतिक, ज्योतीरस, रम्य व स्यमंतक मण्यांचे तुकडेही विखुरलेले होते. सुरमणी, सर्पमणी, वलक्षमणी, स्फटिकमणी, गोमेद, पित्तक, धूलीमणी, मरकत, वैडूर्य, सौगंधिक, राजमणी,

हिरे, मुख्य व ब्रह्मणी यांचेही तुकडे तेथे पडलेले होते. कोठे कोठे विखुरलेले मोती ताऱ्यांप्रमाणे चमकत होते.

त्या सरोवराचे पाणी थोडे गरम होते. त्यात स्नान केल्याने थंडी दूर होत होती. त्या सरोवराच्या मध्यभागी एक वैडूर्यमण्याची सुंदर शिला होती. ही रमणीय शिला महर्षी अत्रींनी आपल्या तपस्येच्या प्रभावाने निर्माण केली होती. ती आठशे हात विस्तृत व चौकोनी होती. या शिलेवर एक रमणीय पुष्करणी होती. ती चौकोनी, मनमोहिनी व आकाशासारखी निर्मळ होती. ती शीतल व निर्मल जलाने व कमलांनी सुशोभित होती. तिचे पाणी सुस्वादू, पचायला हलके, शीतल व सुगंध-युक्त होते. त्याने वायुविकार होत नसे. शरीरास ते तृप्ती द्यायचे.

त्या पुष्करणीच्या मध्यभागी महर्षी अत्रींनी तपस्येसाठी एक भवन निर्माण केले होते. तो सुंदर प्रासाद चांदीचा बनविला होता. तो चंद्रकिरणांप्रमाणे प्रकाशित होत असे. त्याला सर्व प्रकारची रत्ने जडविलेली होती. आत प्रवेश करण्यासाठी त्याला सोन्याची शिडी होती. तिला वैडूर्यमणी लावलेले होते. त्या भवनास इंद्रनीलमण्यांचे खांब होते. त्याच्या वेदीवर व जमिनीवर मरकतमण्यांची फरशी होती. त्या भवनात देवाधिदेव भगवान जनार्दनांची मूर्ती सर्व आभूषणांनी विभूषित होऊन शेषनागाच्या फण्यांवर शयन करणारी होती. लक्ष्मी आपल्या कमलदलसमान कोमल हातांनी भगवानांचे चरण दावीत होती. भगवानांच्या मस्तकावर कल्पवृक्षाच्या फुलांच्या मालांचा मुकुट शोभत होता.

या भगवानांची स्थापना महर्षी अत्रींनी केली होती. सिद्धगण त्यांची पूजा करीत असत. कल्पवृक्षाच्या फुलांनी त्यांची अर्चना होई. त्यांच्या अंगास दिव्य चंदनाचे अनुलेपन होते. ते दिव्य धूपाने पूजित झाले होते. सिद्धगण त्यांना सरस फळांचा उपहार देत असत. अशा या भगवानांच्या मूर्तीसमोर राजा पुरूरव्याने गुढगे टेकवून, मस्तक भूमीवर ठेवून त्यांना प्रणाम केला. त्याने सहस्र नामांनी त्या मधुसूदनांचे स्तवन केले. त्यांना प्रदक्षिणा घातली. त्याच देवमंदिराच्या आश्रमात निवास करण्याचा त्याने निश्चय केला.

नंतर तो विवरातून बाहेर आला. एक अतिशय मनोहारिणी गुंफेचा आश्रय घेऊन, तो नाना प्रकारच्या फुलांनी मधुसूदनांची पूजा करीत तपस्येत लीन झाला. तो नित्य त्रिकाल स्नान व अग्निहोत्र करीत असे. राजा बिछाना न घालताच गुहेत शयन करीत असे. त्याने रात्रीचे भोजन सोडले होते. तो केवळ जलावरच निर्वाह करी. तरी त्याला कसल्याच प्रकारची ग्लानी येत नसे. त्याचे शरीर तेजोमय बनले. राजा पुरूरव्याने त्या आश्रमात भगवान विष्णूंची पूजा करून, सुख-दु:खांची पर्वा न करता काही काळपर्यंत निवास केला.

राजकीय सामग्री व आहार यांचा त्याग करून राजा पुरूरवा त्या आश्रमात निवास करू लागला. तेथे त्याला गंधर्व व अप्सरा यांचा क्रीडाविहार पाहायला मिळे. राजा तेथील फुलांचा हार गुंफून, भगवान विष्णूंना समर्पित करून नंतर गंधर्वांना तो देई. तेथील अप्सरांची मन-सोक्त क्रीडा तो न पाहिल्यासारखा करी. काही अप्सरांच्या शरीरांतून कमलाचा गंध येई. त्याला आकृष्ट होऊन भृंगे त्यांच्या शरीरांभोवती गुंजारव करीत. काही अप्सरांचे डोळे पुष्परजांनी आक्रांत झाले होते. त्यांच्या पतींनी त्यांत फुंकर घालून त्यांना धूलिरहित केले. काही सुंदरींनी पुष्पे जमवून ती आपल्या पतींना दिली. पतींनी त्यांची गुंफलेली माळ त्यांनी आपल्या मस्तकावर बांधली.

काहीजणी पतीने वाकविलेल्या लतेची फुले तोडीत होत्या. त्या स्वत:स इतरांपेक्षा वरचढ मानीत होत्या. काही सुंदर देवांगना गंधर्वांसह क्रीडा करीत होत्या. त्यावेळी त्या राजाकडे पाहात होत्या. काही सुंदरी आपल्या पतींच्या अंगांवर जल उडवीत होत्या, तर काहीजणींच्या अंगांवर त्यांचे पती पाणी उडवीत होते. राजाने अशा स्नानमग्न अप्सरांना पाहिले. सर्व देवदेवी, गंधर्व-अप्सरा भगवान जनार्दनांची पूजा करतात, हेही त्याने पाहिले.

त्या अप्सरा प्रदोषकालात सदा देवाधिदेव भगवान जनार्दनांच्या समोर वाद्यांच्या तालावर नृत्य करीत असत. अशा प्रकारे गंधर्वांची, अप्सरांची क्रीडा पाहून राजा पुरूरवा भगवान केशवांची मनोभावे पूजा एकाग्रमनाने करीत होता. एकदा त्या गंधर्वांचे, अप्सरांचे समूह

राजाच्या जवळ आले आणि म्हणाले, 'राजन्, आपण या स्वर्गतुल्य देशात आले आहात. म्हणून आम्ही आपणांस मनोऽभिलषित वर प्रदान करू. त्यांना ग्रहण करून आपण घरी जावं अथवा इथंच राहावं.'

तेव्हा राजा त्यांना म्हणाला, 'गंधर्वांनो, अप्सरांनो, आपण अमित तेजस्वी आहात. आपलं दर्शन कधी निष्फळ होणार नाही. आपण आजच मला असं वरदान द्यावं की त्यामुळं भगवान जनार्दनांची कृपा माझ्यावर होईल.' त्याला 'ठीक आहे. असंच होईल' असे म्हणून ते गंधर्व अप्सरांसह तेथून निघून गेले.

त्यानंतर राजाने भगवान जनार्दनांची एक मासपर्यंत पूजा करीत तेथे निवास केला. तेथील गंधर्व व अप्सरा राजाच्या निर्लोभ कर्माने संतुष्ट झाल्या. याच वेळी राजा पुरूरव्याने हजारो रत्नांनी चित्रित अशा त्या आश्रमात प्रवेश केला. तेथे तो एक मासपर्यंत केवळ जल पिऊन निवास करून राहिला. फाल्गुनमासाच्या पौर्णिमेच्या रात्री स्वप्नात त्याने देवाधिदेव भगवान विष्णूंचे मंगलदायक शब्द ऐकले. 'राजन्, ही रात्र संपल्यावर तुझी महर्षी अत्रींशी भेट होईल. त्यांची भेट झाल्यावर तू कृतकृत्य होशील.'

हे स्वप्न पाहिल्यावर राजाने प्रातःकाली उठून, इंद्रियांना संयत करून विधिपूर्वक स्नान केले. भगवान जनार्दनांची पूजा केली. त्यानंतर त्याला महर्षी अत्रींचे प्रत्यक्ष दर्शन झाले. त्यामुळे तो कृतकृत्य झाला. धर्मात्मा राजाने अत्रींना भगवानांकडून झालेल्या स्वप्नदर्शनाचा वृत्तांत सांगितला. राजाने देवाधिदेव भगवान जनार्दनांची कृपा संपादन करून देवार्चन केले व अग्नीत आहुत्या टाकल्या. अशा रीतीने भगवान केशवांच्या वरदानाने त्याच्या सर्व मनकामना पूर्ण झाल्या.

## दानवश्रेष्ठ मयाची तपस्या

यानंतर सूताने कैलासपर्वताचे वर्णन करून गंगेच्या सात धारांचा वृत्तांत ऋषींना सांगितला. जंबूद्वीपाचे त्याने वर्णन केले. शाकद्वीप, कुश-द्वीप, क्रौंचद्वीप, शाल्मलद्वीप यांचेही वर्णन केले. यानंतर सूर्य व चंद्र यांच्या गती समजावून सांगितल्या. सूर्याच्या रथाचे वर्णन सूताने केले.

त्याच्या रथावर प्रत्येक मासास भिन्न भिन्न देवतांचे आरोहण कसे होते, हेही समजावून सांगितले. चंद्राची गती, ग्रहांच्या रथांचे वर्णन, ध्रुवाची प्रशंसा, देवगृहांचे वर्णन, त्रिपुरनिर्माणाचे वर्णन; इत्यादी विषय समजावून दिल्यावर सूताने त्रिपुराची सर्व माहिती ऋषींना दिली.

ऋषींनी एकदा सूतास विचारले, 'सूत, भगवान महेश्वरांना त्रिपुरी का म्हणतात? या देवाधिदेवांनी त्रिपुरास का दग्ध केलं? आपण आम्हांस हा सर्व वृत्तांत कृपा करून सांगावा.' सूताने या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली.

मय नावाचा एक मायावी असुर होता. तो नाना प्रकारच्या माया निर्माण करीत असे. तो एकदा संग्रामात देवांकडून पराजित झाला. म्हणून त्याने घोर तपस्या केली. त्याची तपस्या पाहून इतर दैत्यही त्याच्या तपस्येत भाग घेऊ लागले. त्यांत एक महाबली विद्युन्माली व दुसरा महापराक्रमी तारक होता. हे दोघेही मयाच्या तेजाने आकृष्ट होऊन त्याच्या पार्श्वभागी बसून तपस्या करू लागले. तपस्येच्या प्रभावानें ते तिघे जणू मूर्तिमान तीन अग्नींप्रमाणे दिसू लागले. या तीन दैत्यांच्या तपस्येमुळे त्रिलोक संतप्त झाला. ते हेमंतऋतूत जलात शयन करीत. ग्रीष्मऋतूत पंचाग्निसाधन करीत. वर्षाऋतूत आकाशाच्या खाली खुल्या मैदानात उभें राहात. सर्वांना प्रिय असणाऱ्या आपल्या शरीरांना ते अशा रीतीनें सुकवीत होते. फल, मूल, फूल, जल हाच त्यांचा आहार होता. कधी कधी ते निराहारही राहात असत. त्यांच्या वल्कलांवर चिखल साचला होता. त्यांचे मांस गळत होते. ते दुर्बल बनले होते. त्यांच्या तपस्येच्या प्रभावानें सारे जग निष्प्रभ झाले होते. सर्वत्र उदासीनता पसरली होती. सर्वांचे स्वर मंद झाले होते.

अशा रीतीने या तीन दानवरूपी अग्नींनी त्रिलोक दग्ध होत आहे असे पाहून भगवान पितामह ब्रह्मदेव त्यांच्यासमोर साक्षात प्रकट झाले. दैत्यांनी पितामहांना पाहून त्यांची स्तुती केली. त्यावेळी ब्रह्मदेवांचे नेत्र व मुख खुलून गेले. ते त्या प्रभावशाली दानवांना म्हणाले, 'दैत्यांनो, तुमच्या तपस्येनं मी संतुष्ट झालो आहे. तुम्हांला वर देण्यासाठी मी इथं प्रकट झालो आहे. तुमच्या मनासारखा वर तुम्ही मागावा.'

वर देण्यासाठी ब्रह्मदेव प्रकट झालेले पाहून असुरांचा शिल्पी मयाचे नेत्र हर्षाने उत्फुल्ल झाले. तो म्हणाला, 'देव, प्राचीनकाळी तारकामय संग्रामात देवांनी दैत्यांना पराजित करून त्यांना जखमी केलं. काहींना मृत्यू आला. त्यावेळी आमच्यांतील असुर भयानं चारही दिशांना पळून गेले. आमचा शरणदाता कोण आहे, आमचं कल्याण कसं होईल; हे आमच्या ध्यानात आलं नाही. मी आपल्या तपस्येच्या प्रभावानं आता अशा एका दुर्गाची इच्छा करीत आहे की, त्याचा पाडाव करणं देवांनाही अशक्य व्हावं. पितामह, त्या त्रिपुरात पृथ्वी, जल, अग्नी यांचा शिरकाव नष्टतेसाठी न व्हावा. मुनींचे शाप, देवांची अस्त्रं यांचा प्रवेश त्यात होऊ नये. हे त्रिपुर सर्वांनाच अलंघनीय व्हावं.'

असुरांचा विश्वकर्मा, महाशिल्पी मय असे म्हणताच विश्वस्रष्टे ब्रह्मदेव दैत्यांच्या अधीश्वरास, मयास म्हणाले, 'दानवा, तुझ्यासारख्या असदाचारीस सर्वांमरत्वाचं विधान इष्ट नाही. तू तृणानंच आपल्या दुर्गास निर्माण कर.' हे ऐकून हात जोडीत मय त्या पद्मयोनी ब्रह्मदेवांना म्हणाला, 'जो एकदाच सोडलेल्या एकाच बाणानं तो दुर्ग जाळू शकेल, तोच युद्धात आम्हांस मारू शकेल. उरलेल्या प्राण्यांपासून आम्ही अवध्य राहू.' ब्रह्मदेवांनी त्याला 'तथाऽस्तु' म्हटले व ते अंतर्धान पावले.

पितामह निघून गेल्यावर सूर्याप्रमाणे प्रभावशाली मयादी दानव आपापल्या स्थानी निघून गेले. ते महाबलशाली दानव तपस्या व वरदान यांनी अतिशय शोभू लागले. काही काळानंतर दानवश्रेष्ठ महाबुद्धिवान मयाने दुर्गाची रचना करण्याचा विचार केला. हा दुर्ग कसा असावा ? हे त्रिपुर कसे असावे ? त्यात आपणांशिवाय कोणाचाच निवास नसावा. ते एकाच बाणाने नष्ट होऊ नये. या पुरांची रचना कशी करावी ? या पुरांची निर्मिती पुष्यनक्षत्राच्या योगात होईल. याच नक्षत्रावर आकाशात ही तीन पुरे परस्परांत मिळून जातील. ती एकाच बाणाने नष्ट होणार नाहीत. त्यांतील एक पुर भूतलावर लोहमय, दुसरे गगनतलात रजतमय व तिसरे सुवर्णमय असेल. अशा प्रकारे तीन पुरांनी युक्त असे हे स्थल त्रिपुर या नावाने विख्यात होईल. त्याच्या अंतर्भागात शंभर योजनांच्या

विस्ताराचे विष्कंभ (बाधक स्तंभ) असतील. या त्रिपुरात गच्च्या, मनुष्यांचे वध करण्यासाठी यंत्रे, चक्रे, त्रिशूल, उपल, ध्वज, मंदराचल, व सुमेरूसारखे द्वारांनी व शिखरांनी शोभणारे परकोट इत्यादींचा समावेश होईल. तारक लोहमय पुराचे, मय सुवर्णमय पुराचे, विद्युन्माली रजतमय पुराचे रक्षण करील. एकमात्र भगवान शंकरांशिवाय या त्रिपुराचा नाश कोणीच करू शकणार नाही.

## मयाकडून त्रिपुराची निर्मिती

वरीलप्रमाणे विचार करून महाशिल्पी मयदानव दिव्य उपायांच्या प्रभावाने, मनाच्या संकल्पानुसार त्रिपुर नावाच्या दुर्गाची रचना करण्यास तत्पर झाला. परकोट, गोपुर, गच्च्या, दरवाजे, भवनाचे मुख्य द्वार; यांची रचना त्याने नक्की केली. विशाल राजमार्ग, पायवाटांनी युक्त असे रस्ते, गल्ल्या, अंतःपुर, शिवमंदिर, वटवृक्षांसहित तलाव, विहिरी, सरोवरे यांच्या निर्मितीचाही त्याने विचार केला. उद्याने, सभाभवनें, वाटिका, दानवांना बाहेर पडण्याचे मार्ग; यांचाही विचार मयाने केला.

अशा रीतीने नगररचनेत निपुण अशा मयाने केवळ मनाच्या संकल्पानुसार एका दिव्य त्रिपुराची रचना केली. त्याने निर्माण केलेल्या काळचा लोहाच्या पुराचा स्वामी तारकासुर झाला. जे रजतमय पुर होते, त्याचा मालक विद्युन्माली झाला. मयाने निर्माण केलेल्या तिसऱ्या सुवर्णमय पुराचा मालक स्वतः सामर्थ्यशाली मय झाला. मय दानवाचे विशाल पुर मेरुपर्वतासारखे दिसू लागले.

पूर्वी ज्याप्रमाणे त्रिलोचन भगवान शंकरांनी पुष्पक विमानाची रचना केली होती, त्याचप्रकारे मय दानवानें केवळ पुष्यनक्षत्राच्या संयोगानें काळाची व्यवस्था करून त्रिपुराची निर्मिती केली. त्यानें शेकडो, हजारो सोनें, चांदी, लोह यांची भवनें स्वतः निर्माण केली. त्या देवशत्रूची ही पुरे रत्नखचित असल्याने विशेष शोभा पावत होती. ती शेकडो महालांनी युक्त होती. त्यांत सर्व लोक स्वच्छंदाने विहार करीत असत. त्यांत उद्याने, विहिरी, कमलयुक्त सरोवरे यांची शोभा वाढत होती. त्यांत अशोकवृक्षांची सुंदर वनें होती. त्यात कोकिळपक्षी गात

असत. त्यांत मोठमोठ्या चित्रशाळा होत्या. सात, आठ, दहा मजल्यांची भवने मयाने मोठी सुंदर निर्माण केली होती. त्यांवर अनेक ध्वज व पताका शोभत होत्या. त्यांवर माळा शोभत होत्या. त्यांच्या घंटा शब्द करीत होत्या. उत्कृष्ट गंधयुक्त पदार्थांनी ही पुरे सुवासित झाली होती. पुष्पे, नैवेद्य आदी पूजासामग्रीने ती सजलेली होती. तेथे जलपूर्ण कलश स्थापन केले होते. ते यज्ञजन्य धुराने अंधकारित झाले होते. त्या त्रिपुरात अनेक उज्ज्वल भवने ओळीने उभी होती. त्यांवर मोत्यांच्या लटकणाऱ्या झालरी होत्या.

ती मल्लिका, चमेली आदी पुष्पांनी व गंध, धूप आदींनी पंच इंद्रियांना सुख देणारी होती. या त्रिपुरात सोने, चांदी, लोखंड यांचे प्राचीर बनले होते. त्यांवर मणी, रत्ने, काळे फत्तर जडवलेले होते. त्या एकेक पुरात शेकडो गोपुरे होती. त्यांच्यावर ध्वजा व पताका फडकत होत्या.ती पर्वतशिखराप्रमाणे दिसत होती.या त्रिपुरांत नूपुराचा झणत्कार होत असल्याने ती नगरी अत्यंत रमणीय झाली होती. त्या पुरीचे सौंदर्य स्वर्गाहूनही अतिशय मोठे होते. तीत कन्यापुरही होते. उद्याने, विहार-स्थले, तलाव, वटवृक्षांखाली चबुतरे, सरोवरे, नद्या, वने व उपवने यांनी ती संपन्न होती. तेथे अनेक दिव्य भोग व नाना प्रकारची रत्ने होती. त्या पुरीच्या बाहेरच्या रस्त्यांवर फुले विखुरलेली होती. मायेच्या उप-करणांनी या नगरीत शेकडो खोल खंदक निर्माण केले होते. अद्‌भुत पराक्रम करणाऱ्या मयाने निर्माण केलेल्या या उत्तम दुर्गाचा वृत्तांत ऐकून देवराज इंद्राचा शत्रू अनेक हजार दैत्यांसह तेथे आला. सर्व प्रकारचे दैत्य या नगरीत भरून राहिले. आकाश जणू अधिक जलपूर्ण ढगांनी व्यापून गेले होते.

## त्रिपुरात दैत्यांचा निवास, मयाचे स्वप्नदर्शन, दैत्यांचा अत्याचार

असुरशिल्पी मयाने अशा प्रकारे त्रिपुर नावाच्या नव्या दुर्ग-नगरीची निर्मिती केली. ती देवांनाही दुर्गम झाली. तीमधील दैत्य यम-राजापेक्षाही भयानक होते. ते सर्व आपल्या स्त्री-पुत्रांसह येऊन त्या

नगरीत स्थिरावले. देवशत्रूंनी ते पुर पूर्णपणानें व्यापून गेले. असंख्य कोटी दैत्यांनी ते भरून गेले. सुतल व पाताल यांतील अनेक दानव तेथे आले. पर्वतांवर राहून जीवननिर्वाह करणारे दैत्यही तेथे आले. त्यांची कांती काळचा मेघांसारखी होती. या नगरीतील असुर ज्या वस्तूंची कामना करीत त्या वस्तू मय त्यांना देत असे. त्या दानवांच्या सुडौल शरीरांवर चंदनाचा अनुलेप होता. निर्मल आभूषणे त्यांनी लेइली होती. वस्त्रे, माळा, अंगराग यांनी ते अलंकृत झाले होते. ते मत्त गजेंद्रासारखे दिसत असत. असे दैत्य चांदण्या रात्री व सायंकाळी कमलांनी सुशोभित अशा उद्यानांत व तपोवनांत आपल्या पत्नींसह निरंतर हर्षपूर्वक विहार करीत.

अशा या मयनिर्मित स्थानात राहून महासुर आनंदाचा उपभोग घेत असत. त्यांनी धर्म, अर्थ, काम यांच्या संपादनात आपली बुद्धी खर्च केली. त्रिपुरात राहाणाऱ्या त्या देवशत्रूंना स्वर्गवासियांप्रमाणे सुख लाभत होते. तेथे पुत्र पितृगणांची, पत्नी पतींची सेवा करीत. ते परस्परांशी कलह करीत नसत. त्यांच्यांत परस्पर प्रेम होते.

कोणत्याही प्रकारचा अधर्म प्रबळ होऊन त्रिपुरवासियांना बाधा करीत नसे. ते दैत्य शिवमंदिरात जाऊन शंकरांची अर्चना करीत. वेदोक्त वचनांचा उच्चार करीत. देवांची अर्चना, ब्राह्मणांना नमस्कार करून ते दान व धर्म, अर्थ व काम यांचे साधक बनले होते. तेथे अलक्ष्मी (दारिद्र्य), असूया, तृष्णा, भूक, कली व कलह; हे सर्व एकदा एकत्र येऊन त्या त्रिपुरात आले. या भयानक दुर्गुणांनी सायंकाळी त्रिपुरात प्रवेश केला. त्यांनी राक्षसांवर अधिकार प्राप्त केला. या दुर्गुणांना मयानें स्वप्नात दानवांच्या शरीरांत प्रवेश करताना पाहिले. तेव्हा सहस्र किरणधारी व उज्ज्वल प्रकाश देणाऱ्या सूर्याप्रमाणे मयानें तारक व विद्युन्माली यांच्यासह सभाभवनात प्रवेश केला. तेथे ते सुवर्णमय आसनांवर बसले. मयदानवाच्या एका बाजूस तारकासुर व दुसऱ्या बाजूस दानवश्रेष्ठ विद्युन्माली बसला.

यानंतर युद्धभूमीवर घायाळ झालेले, मनात क्रोध धारण करणारे सर्व देवशत्रू दानव तेथे येऊन बसले. सर्व दानव सुखपूर्वक आसनांवर

बसल्यावर मायेचा उत्पादक मय त्यांना म्हणाला, 'दाक्षायणीच्या पुत्रांनो, तुम्ही आता आकाशात भ्रमण करणारे व्हा. विशेषरूपानं गर्जना करा, मी एक भयानक स्वप्न पाहिलं आहे. त्याचं रूप भयानक असून जणू ते या त्रिपुराचा नाश करणारं वाटलं. ते अतुल पराक्रमी प्राणी क्रोधानं भरलेले होते. या पुरात प्रवेश करून ते दानवांच्या शरीरांत घुसत होते. हे त्रिपुरनगर अंधारानं व्यापलेलं होतं. हे नगर, घरं व तुम्ही लोक यांच्यासह समुद्राच्या जलात बुडत होतं. एक स्त्री नग्न होऊन उलूकावर बसून चालली होती. तिच्याबरोबर एक पुरुष होता. त्याच्या ललाटावर एक लाल टिळा लावला होता. त्याला चार पाय व तीन नेत्र होते. तो गाढवावर बसला होता. त्यानं त्या स्त्रीला प्रेरित केलं. तेव्हा त्यानं मला निद्रेतून सावध केलं. अशा या अत्यंत भयंकर नारीस मी स्वतः पाहिलं. दितिपुत्रांनो, मी हे असं एक स्वप्न पाहिलं. हे स्वप्न असुरांना अतिशय कष्टदायक वाटलं.

'म्हणून तुम्ही मला राजा समजत असाल, तर मी सांगतो ते नीटपणानं ऐका. तुम्ही कुणाचीही असूया करू नका. काम, क्रोध, ईर्ष्या, असूया इत्यादी दुर्गुणांना सोडून सत्य, दम, धर्म व मुनिमार्ग यांचा तुम्ही आश्रय घ्या. शांतिदायक अनुष्ठानांचा प्रयोग करून महेश्वरांची पूजा करा. तुम्ही असं केलंत तर या स्वप्नाची शांती होईल. असुरांनो, असं वाटत आहे की, त्रिनेत्रधारी देवाधिदेव भगवान रुद्र निश्चयानं आपणांवर कुपित झाले आहेत. कारण आपल्या या त्रिपुरात भविष्यात होणाऱ्या घटना आता दृष्टीस पडत आहेत. म्हणून तुम्ही कलहाचा त्याग करून सरलतेचा आश्रय घ्यावा. या दुःस्वप्नाच्या परिणामरूप कालाची प्रतीक्षा करा.'

मय दानवाचे हे असे भाषण ऐकून सर्व दानव क्रोध व ईर्ष्या यांना वशीभूत झाले. ते जणू विनाशाकडे गेले होते. ते आपल्या भावी विनाशा-कडे निघाले होते. ते परस्परांकडे पाहून ते क्रोधी बनले. त्यांचे डोळे लाल झाले. त्यांनी सत्य व धर्म यांचा त्याग केला व ते निंद्य कर्मांत प्रवृत्त झाले. ते पवित्र ब्राह्मणांचा द्वेष करू लागले. त्यांनी देवांची अर्चना करण्याचे सोडून दिले. ते गुरुजनांचा मान राखीत नव्हते. ते परस्पर

क्रोधपूर्ण व्यवहार करू लागले. ते कलहास प्रवृत्त झाल्यामुळे धर्माचा उपहास करू लागले. ' मीच सर्व काही ', असे म्हणून ते दुसऱ्याची निंदा करू लागले. ते गुरुजनांशी कडवट शब्दांनी बोलू लागले. रात्री दही, सातू, दूध, कपित्थाचे मूळ खाऊ लागले. त्यांचा शुद्धाचार नष्ट झाला. मूत्रत्याग करून ते जलास स्पर्श करीत, पण पाय न धूताच अंथरुणावर जाऊ लागले. ते अकस्मात भयभीत झाले. त्यांनी स्त्रीसहवासानंतर शरीराची शुद्धी करण्याचे सोडून दिले. गोपनीय कार्यांतही ते निर्लज्ज बनले. ते प्रथम सुशील असले तरी आता मोठे क्रूर बनले. ते देव व तपस्वी यांना कष्ट देऊ लागले. मयाने त्यांना मना केले असतानाही ते विनाशाकडे चालले होते.

त्यांच्या मनांत कलहाची इच्छा निर्माण झाली. ते ब्राह्मणांचा अपमान करू लागले. दानव त्रिपुराचा आश्रय घेऊन संक्रुद्ध होऊन वैभ्राताची नंदन, चैत्ररथ, अशोक, वराशोक, सर्वर्तुक आदी वनांचा, देवांच्या निवासस्थानांचा, स्वर्गाचा, तपस्वींच्या वनांचा विध्वंस करू लागले. देवमंदिर व आश्रम नष्ट करू लागले. देव व ब्राह्मण यांच्या उपासकांना मारू लागले. अशा रीतीने दानवांचे त्रिपुर नष्ट होण्याच्या पंथाला लागले.

## त्रिपुरवासी दैत्यांचा अत्याचार, ब्रह्मदेवांसहित देव शिवांकडे

त्रिपुरवासी दानवांचे शील भ्रष्ट झाले होतेच. त्यांच्यांत दुष्टताही पुरेपूर भरली होती. त्या दुरात्म्यांनी लोकांचा व तपोवनांचा नाश करायला सुरुवात केली. ते आकाशात जाऊन सिंहनाद करायचे. त्यामुळे सर्व जीवजंतू भयभीत होत असत. यामुळे सर्वत्र अंधकार पसरला. भयाने ग्रस्त होऊन आदित्य, वसू, साध्य, पितृगण, मरुद्‌गण हे सर्व एकत्र झाले आणि पितामह ब्रह्मदेवांना शरण गेले. तेथे पंचमुख ब्रह्मदेव सुवर्णमय कमलासनावर बसले होते. देवगण त्यांच्याजवळ आले आणि त्यांना नमस्कार म्हणून म्हणू लागले;

' निष्पाप पितामह, त्रिपुरनिवासी दानव आपल्या वरदानानं सुरक्षित होऊन आम्हांस सेवकांसारखे कष्ट देत आहेत. आपण त्यांना मना करावं.

पितामह, मेघांच्या गर्जनेमुळं हंस, सिंहाच्या गर्जनेनं मृग भयभीत होऊन पळू लागलात, त्याप्रमाणं या दानवांच्या भयानं आम्ही इकडं तिकडं लपून बसलो आहोत. पापरहित ब्रह्मन्, दानवांच्या या उपद्रवानं आम्ही आमची मुलं, आमच्या पत्नी यांची नावंही विसरून गेलो आहोत. लोभ व मोह यांनी अंध झालेले दानवगण देवांची निवासस्थानं फोडून तोडून टाकीत आहेत. ऋषींचे आश्रम उद्ध्वस्त करीत आहे. जर आपण त्वरित या दानवांचा नाश करून लोकांचं रक्षण केलं नाही तर देव,मनुष्ये आश्रम यांच्या विरहित जग होईल.'

त्यानंतर देवांनी पद्मयोनी ब्रह्मदेवांना निवेदन केले तेव्हा चंद्रासारख्या गौरवर्ण मुखाच्या सामर्थ्यशाली ब्रह्मदेवांनी इंद्रादी देवांना म्हटले, ' बुद्धिमानांत श्रेष्ठ देवगण, मी या मयास जो वर दिला होता, त्याच्या अंताचा आता समय आला आहे. त्यांना मी पूर्वीच याची सूचना दिली होती. श्रेष्ठ देवांनो, त्यांचं निवासस्थान असलेलं हे त्रिपुर तर एका बाणानंच नष्ट होणारं आहे. त्यावर बाणांची वृष्टी करण्याची जरूरी नाही. परंतु देवांनो, मला तर तुमच्यांत असा कुणीही दिसत नाही की, जो एका बाणानंच दानवांसहित या त्रिपुराचा नाश करील. देवाधिदेव प्रजापती शंकरांशिवाय दुसरा असा कोणताच पराक्रमी वीर दिसत नाही की, जो एकाच बाणानं या त्रिपुराचा नाश करील. म्हणून तुम्ही सर्व एकत्र जमून दक्षयज्ञविध्वंसक भगवान शंकरांपाशी जाऊन त्यांना त्रिपुराच्या विनाशासाठी प्रार्थना करावी. ते एकाच बाणानं या पुराचा नाश करतील.'

हे ऐकून सर्व देव ' ठीक आहे, आम्ही चलतो.' असे म्हणून ब्रह्म-देवांबरोवर शंकरांच्या सभेत आले. तेथे त्यांनी त्रिशूलपाणी शंकर–पार्वती व नंदी यांच्यासह भगवान शंकर विराजमान झालेले पाहिले. अजन्मा महादेवांच्या शरीराचा वर्ण अग्निसारखा उद्दीप्त होता. त्यांचे नेत्र अग्निकुंडासारखे लाल होते. त्यांच्या शरीरातून सहस्रो अग्नीं-सारखी व सूर्यांसारखी प्रभा प्रकटत होती. ते अग्नीच्या रंगाच्या विभू-तीने विभूषित झाले होते. त्यांच्या ललाटावर बालचंद्र शोभत होता.

मुख पूर्णिमेसारखे सुंदर होते. देवगण त्या अजन्मा नीललोहित महादेवांपाशी गेले. त्यांनी पशुपती, पार्वतीवल्लभ, वरदायक शत्रूंची स्तुती करताना म्हटले;

‘ भगवान्, आपण भव म्हणजे सृष्टीचे उत्पादक व पालक आहात. आपण शर्व (प्रलयकाली सर्वांचे संहारक) आहात. आपण रुद्र, वरद, पशुपती, उग्र, कपर्दी आहात. आपणांस नमस्कार असो. आपण महादेव, भीम, त्र्यंबक, शांत, ईशान, भयघ्न (भयाचा नाश करणारे), अंधकघाती (अंधकासुराचा वध करणारे) आहात. आपण नीलग्रीव, भीम, वेधा:, वेधसा सुत: (ब्रह्मदेवांकडून स्तुत), कुमारशत्रुनिघ्न (कुमार कार्तिकेयाच्या शत्रूंना मारणारे), कुमारजनक, विलोहित (लाल रंगाचे), धूम्र, वर, क्रथन (प्रलयकारी), नीलशिखंड (निळी जटावाले), शूली, दिव्यशायी (दिव्य समाधीत राहाणारे), उदग (सर्पधारी), त्रिनेत्र, हिरण्यवसुरेता (सुवर्णादी धनांचे उत्पत्तिस्थान), अचिंत्य, अंबिकाभर्ता, सर्वदेवस्तुत, वृषध्वज (बैलाच्या चिन्हाने युक्त ध्वजधारी), मुंड (मुंडधारी), जटी, ब्रह्मचारी, सलिले तस्यमान (जलात तपस्या करणारे), ब्रह्मण्य (ब्राह्मणभक्त), अजित (अजेय), विश्वात्मा, विश्वसृक् (विश्वाचे स्रष्टा), विश्वमावृत्य तिष्ठते (जगास व्यापून राहिलेले), दिव्यरूप, प्रभू, दिव्यशंभू (अत्यंत मंगलम), अभिगम्य (शरण जाण्यास योग्य), काम्य (अत्यंत सुंदर), स्तुत्य, सर्वदा अर्च्य (सदा पूजनीय), भक्तानुकंपी (भक्तांवर दया करणारे), यन्मनोगतं नित्यं दिशते (मनाची अभिलाषा पूर्ण करणारे) आहात. आपणांस नमस्कार असो.’

## शिवांचा दिव्यरथ

यांप्रमाणे ब्रह्मादिक देवांनी महादेवांची स्तुती केल्यावर ते ब्रह्मदेवांना म्हणाले, ‘ देवांना भय कुठून आहे ? देवांनो, तुमचं आगमन उत्तम असो. तुमचं मनोगत काय आहे ? तुम्हांस न द्यावं असं माझ्याकडं काहीच नाही. मी तुमचं अवश्य कल्याण करीन. दैत्यांनी तुमचा द्वेष केल्यानं ते माझाही द्वेष करतात. कोणत्याही उपायानं त्या असुरांचा नाश व तुमचा उदय मला पाहिलाच पाहिजे.’

हे ऐकून ब्रह्मदेवादी, महादेवादी देव शिवांना म्हणाले, ‘ भगवान शिवा या असुरांनी घोर तप केलं आहे. म्हणून आमचा नाश ओढवला. आम्ही आपणांस शरण आलो आहोत. त्रिनयन शिवा, शुभ्र वर्णाच्या गोपुरांनी सुशोभित अशी तीन पुरं त्यांनी निर्माण केली. दितीचा पुत्र मयासुर फार भयंकर कलहप्रिय आहे. महादेवा, ते मयासुरासह दानव त्या त्रिपुराच्या दुर्गाचा आश्रय घेऊन, वराच्या योगानं निर्भय बनून आम्हांस त्रास देतात. त्या दानवांनी आमची उद्यानं, आमची नंदनवनं नाहीशी केली आहेत. त्यांनी रंभादी श्रेष्ठ अप्सरा व उत्तम स्त्रिया हरण केल्या आहेत. महेश्वरा, इंद्रादी देवांचं बसायचं कुमद, अंजन, वामन, ऐरावत आदी हत्ती यांचं अपहरण केलं आहे. इंद्राच्या रथाचे मुख्य सिंह त्यांच्या रथांना घोडे झाले आहेत. रथ, गज, स्त्रिया, धन इत्यादी आमचं सर्वस्व त्यांनी हरण केलं आहे. आता आमच्या प्राणांचाच आम्हांस संशय उत्पन्न झाला आहे.’

हे ऐकून देवांचे स्वामी, वर देणारे, वृषवाहन, त्रिनेत्र शिव देवांना म्हणाले, ‘ देवांनो, तुम्हांस दानवांपासून जे भय निर्माण झालं आहे ते नाश पावो. मी आता ते त्रिपुर जाळतो. पण मी सांगतो, त्याप्रमाणं तुम्ही अगत्यानं करावं. तुम्ही मला युद्धात उपयोगी असा रथ सिद्ध करून द्या.’ शिवांची ही विनंती सर्व देवांनी मान्य केली. देवांनी महादेवांसाठी पृथ्वीचा रथ केला. घोडे बांधण्यासाठी दोन लाकडे शिवांचे दोन पार्षद झाले. मेरूचे शिखर रथात बसण्याची जागा झाली. मंदार-पर्वत चाकांचा कणा झाला. या रथास चंद्र व सूर्य अशी सोन्यारुप्याची चाके झाली. देवांनी या रथाच्या चाकांना कृष्ण व शुक्ल पक्षांच्या दोन धावा तयार केल्या. कंबल व अश्वतर नागांची यंत्रे बनविली. शुक्र, गुरू बुध, मंगळ व शनी या ग्रहांनी या रथाच्या रक्षणासाठी आकाशाचे सुंदर आवरण तयार केले. रत्ने, मोती व इंद्रनीलमण्यांनी खचित असे तीन वेळूंचे जू बांधण्याच्या मधील लाकूड देवांनी तयार केले. भागीरथी सिंधू, शतद्रू, चंद्रभागा, पूर्ववाहिनी सरस्वती, वितस्ता, विपाशा, यमुना गंडकी, पश्चिमवाहिनी सरस्वती, देविका, शरयू या सर्वश्रेष्ठ नद्या त्या रथाच्या वाशांच्या ठिकाणी झाल्या.

धृतराष्ट्रवंशातील नाग या रथाची सर्व यंत्रें बांधण्यासाठी दोऱ्या झाल्या. अनेक नाग वेगयुक्त बाण बनून शिवांच्या धनुष्यात व भात्यात राहिले. सुरसा, सरमा, कद्रू, विनता, शुची, तृषा, क्षुधा इत्यादी उग्र देवता व सर्वनाशक मृत्यू, ब्रह्महत्या, गोहत्या, बालहत्या; या सर्व गदा, शक्ती इत्यादी आयुधें बनून शिवांच्या पथावर आरूढ झाल्या. देवांनी या रथास कृतयुगाचे जू केले. या युद्धयज्ञात देव कानांत सुवर्णाची कुंडले घालून ब्राह्मणादिक चार वर्ण झाले. या रथाचे जू देवांनी धृतराष्ट्र नावाच्या नागाने घट्ट बांधून ठेवले. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद व अथर्ववेद; हे शिवांच्या रथाचे चार घोडे झाले. अन्नदान, प्रमुख दाने या घोड्यांची भूषणे झाली. पद्म, महापद्म, तक्षक, कर्कोटक, धनंजय हे नाग त्या घोड्यांचे केस बांधण्याच्या दोऱ्या झाले.

ओंकारापासून निर्माण झालेली स्तोत्रे, मंत्र, यज्ञ, ऋतू, अवांतर कर्मे, उपद्रव, त्यांचे प्रतिकार, पशू मारून करण्याची इष्टी; ही या युद्धयज्ञातील उपवाहनें झाली. त्या रथाच्या घोड्याचा चाबूक ओंकारच झाला. वषट्कार चाबकाचे अग्र होते. सिनीवाली, कुहू, राका, शुभकारक अनुमती त्या रथाच्या घोड्यांच्या दोऱ्या झाल्या. कृष्णवर्णी, पिवळी, शुभ्र, मंजिष्ठ रंगाची वस्त्रे त्याच्या पताका झाल्या. सहा ऋतूंचे संवत्सर रथाचे धनुष्य झाले. पार्वती जरारहित दोरी झाली. त्रिपुर जाळणाऱ्या बाणाची निर्मिती विष्णू, चंद्र व अग्नी या तीन देवतांकडून झाली.

असा हा दिव्य रथ तयार झाल्यावर सर्व देव शिवांना म्हणाले, 'दानवरूपी शत्रूंना जिंकणाऱ्या महादेवा, देवांचं रक्षण करण्यासाठी आम्ही रथ तयार करून आपणांस दिला आहे.' शिवांनी तो रथ पाहिला. संतुष्ट होऊन ते इंद्रादी देवांना म्हणाले, 'आता या रथसंपत्तीस योग्य रथी तुम्ही मला द्यावा.' हे ऐकून सर्व देव चिंताग्रस्त झाले. विष्णूंशिवाय सारथी कोण होणार ? पण ते तर बाणात राहिले. सर्व देवांना चिंता वाटली. शेवटी ब्रह्मदेवांनी त्या रथाचे सारथ्य स्वीकारले. हे पाहून गंधर्वांसह सर्व देवांनी सिंहनाद केला. शिवही प्रसन्न होऊन रथावर बसले. शिवांच्या भाराने रथाचे अश्व पीडित होऊन जमिनीवर पडले. धूळ त्यांच्या तोंडांत गेली. ब्रह्मदेवांनी अश्वांचाचा भार दूर केल्यावर

सर्व देवांनी सिंहनाद व समुद्रासारखा घोषयुक्त जयजयकार केला.

त्यांचा रथ वेगाने धावू लागला. सर्पांनी फूत्कार करावा तसे त्याचे घोडे मुखांनी श्वासोच्छ्वास करीत होते. ध्वजाच्या काठीवर शिवांच्या आज्ञेने नंदी बसला. शुक्र व बृहस्पती हातांत दंड धारण करून रथाचे रक्षण करीत होते. अनंत भगवान, शेषनाग हातांत वाण घेऊन शिवांच्या रथाचे संरक्षण करीत होते. यम, कुबेर, इंद्र, कार्तिकस्वामी, यांनी रथाचे रक्षण केले. शिवगण रथाच्या भोवती नाचत होते. भृगू, भरद्वाज, वसिष्ठ, गौतम, ऋतू, पुलस्त्य, पुलह, मरीची, अत्री, अंगिरा, पराशर, अगस्त्य; इत्यादी ऋषींनी शिवांची स्तुती केली. तो रथ आकाशमार्गाने त्रिपुरावर चालून गेला.

## त्रिपुरात उत्पात, नारदांचे आगमन

दिव्य रथात शिव आरूढ झाल्यावर प्रमथादी पार्षदगण उग्र नाद करू लागले. नंदीची गर्जना सुरू झाली. रथाचे अश्व ओरडत होते. याच वेळी चंद्रासारखे कांतिमान नारद उड्डाण करून त्वरेने त्रिपुरपुरात आले. यावेळी मयाने त्रिपुरपुरात काही तरी उत्पात होणार हे जाणले. नारदांना पाहाताच सर्व दानवांनी आपापल्या गोत्रांचा उच्चार करून त्यांना नमस्कार केला. त्यांना अर्घ्य, पाद्य, मधुपर्क इत्यादी उपचार दानवांनी समर्पित केले. दैत्यांची पूजा स्वीकारून ते सुवर्णाच्या सिंहासनावर बसले. त्यांना मयाने मोठ्या हर्षाने आणि संतोषाने विचारले;

'नारदा, आमच्या त्रिपुरावर उत्पाताचं लक्षण निर्माण झालेलं दिसतंय. रात्री भयंकर स्वप्न दिसतात. रथाचे ध्वज भंग पावतात. वारा नसतानाच रथाचा ध्वज भूमीवर पडतो. पुरातील गच्च्या व पताकांसह गोपुरे हलतात. 'मारा, मारा' अशी भयंकर वाणी होते. नारदा, एका शिवांवाचून मी इंद्रादी देवांनाही भीत नाही. आपण भूत व भविष्य यथार्थ-त्वानं जाणता. म्हणून या उत्पातांसंबंधी आम्हांस काहीतरी सांगावं.'

त्यावर नारद म्हणाले, 'दनुपुत्रा, या उत्पाताचं कारण नीट ऐक. सन्मार्गावाचून जे इतर मार्गांचं अवलोकन करतात, त्यांचा नाश होईल, असं वेदवेत्त्या ऋषींचं मत आहे. मया, तू सन्मार्गावर आहेस. पण तू

देवांच्या शत्रूंना साह्य करतोस. म्हणून दानवांचा नाश करणारी ही उत्पादसूचक चिन्हं आहेत. कैलासपती शंकर आता लोकमय महारथात बसून या त्रिपुरासह तुला व असुरांना मारण्यासाठी येत आहेत. तेव्हा तू महातेजस्वी सदाशिवांना शरण जा.'

असे सांगून नारद आपल्या स्थानास निघून गेले. यानंतर मयासुर दानवांना म्हणाला, 'दानवांनो, तुम्ही शूर आहात. तुम्हांस पुत्र झाले आहेत. तुमची कर्तव्यं तुम्ही केली आहेत. तेव्हा तुम्ही आता भय न मानता देवांशी युद्ध करा. इंद्रासह सर्व देवांना जिंकून दिव्य देवसभेत बसून सर्व भोगांचा उपभोग भोगा. दैत्यांनो, तुम्ही अंगांत कवच घाला. हातांत शस्त्र धारण करा. पुरांच्या सीमेवर देवांशी लढण्यासाठी तयार व्हा. आपली ही तीनही पुरं अशा अंतरावर उभी करा, की ती शत्रूंना जिंकण्यासाठी समर्थ होतील. देव आकाशात संचार करणारे व शूर आहेत, हे तुम्हांस माहीत आहे. म्हणून प्रयत्न करून बाणांनी त्यांना विदीर्ण करावं.'

दानवांना असे म्हणून तो दानवराज मयासुर देवांशी युद्ध करण्यास तयार झाला. प्रथम तो दिगंबर, देवाधिदेव, मदनशत्रू, अंधकासुर व दक्ष यांचा नाश करणाऱ्या शिवांची पूजा करण्यासाठी गेला. परंतु शिवांना त्याची दया आली नाही. पण त्यांचा क्रोध थोडा शांत झाल्यावर त्या चंद्रशेखर शिवांनी मयासुरास इष्ट असा वर दिला. त्यामुळे मय दानव निर्भय झाला.

## देवासुरांचे युद्ध, विद्युन्मालीचा वध

इलावृत्तखंडात देवासुरांच्या युद्धाची भूमी होती. हे खंड विस्तृत लांब आहे. येथेच बलीचा यज्ञ झाला. वामनांनी त्यास बांधले. देवांची सर्व शुभ कर्मे याच भूमीत झाली. त्यांनी कन्यादाने येथेच केली. शिव येथेच क्रीडा करतात. इंद्रादी लोकपाल येथेच राहातात. अशा या भूमीवर भगवान शिव इंद्रास व आपल्या प्रथमगणांना म्हणाले, 'इंद्रा, विमानं, पताका, ध्वज यांनी सुशोभित असं हे तुमच्या शत्रूचं त्रिपुर दिसत आहे. हे त्रिपुर वर्तुळाकार असून अग्नीप्रमाणं लोकांना अत्यंत

ताप देणारं आहे. लोहासारखे काळे, भयंकर मुखाचे, विजयाची इच्छा करणारे, आयुधं धारण करणारे दानव या पुरातून बाहेर येत आहेत. इंद्रा, तू श्रेष्ठ आयुधं घेऊन सैन्य, शेकडो देव, माझे प्रमथादी गण यांच्या साह्यानं या असुरांचा नाश कर. मीही या त्रिपुराचं छिद्र अवलोकन करीन. ज्यावेळी पुष्यनक्षत्रात ही तीनही पुरं एकत्र येतील, त्यावेळी मी एका बाणानं ही तीनही पुरं जाळून टाकीन.'

शिवांचे हे बोलणे ऐकून देवांचा राजा इंद्र मोठ्या सैन्यासह त्रिपुरातील असुरांना जिंकण्यासाठी शिवांच्या आज्ञेने निघाला. वेगवान रथ, इंद्रादी देव, शिवांचे पार्षद युद्धासाठी निघाले. ते सिंहनाद करीत होते. त्रिपुरातील दानवही युद्धास प्रवृत्त होऊन त्यांनी त्यांना आपल्या आयुधांनी कंपित केले. उन्मत्त दानवही सिंहनाद करून नाना प्रकारची रणवाद्ये वाजवू लागलें. इकडे देवांचा सिंहनादही मोठा होता. मोठमोठ्या असुरांनी ते त्रिपुर भयंकर दिसू लागले. त्यावेळी दानव त्रिपुराच्या तटांवर वसले होते. कोणी गच्च्यांवर चढून त्या हलतात असे म्हणू लागले. कोणी शूरवीर गळ्यांत सुवर्णाच्या माळा घालून, हातांत शस्त्रे घेऊन तयार झाले. ते परस्परांशी बोलत होते. विचारविनीमय करीत होते.

तारकाक्ष नावाचा प्रमुख दैत्य क्रोधाने युद्धास तयार झाला. मोठे सर्प बिळांतून जसे बाहेर येतात, तसे दैत्य युद्धभूमीकडें त्वरेने निघाले. सिंहांनी जसे लहान हत्तींना कोंडावे, त्याप्रमाणे शिवांच्या पार्षदांनी त्या धावणाऱ्या दैत्यांना कोंडले. देवदानवांची रूपे अग्नीप्रमाणे जाज्वल्यमान भासू लागली. त्यांनी भयंकर नाद करून आपापली धनुष्ये सज्ज करून बाणांचा वर्षाव सुरू केला. त्यावेळी मांजरे व हरिणे यांच्यासारख्या विक्राळ मुखांचे शिवपार्षद पाहून आपल्या रूपसौंदर्याच्या गर्वामुळे दैत्य त्यांना हसले. देव व दैत्य बाणांची वृष्टी करून परस्परांची कवचे फोडू लागले.

दानव शिवगणांना म्हणाले, 'आता तुम्ही मरणारच. जाता कुठं ? आम्ही तुम्हांस मारू. तुम्ही मागं फिरा,' असे कठोर बोलून दानवांनी शिवगणांना तीक्ष्ण बाणांनी व्यथित केले. सिंहासारखे नेत्र असलेल्या शिवगणांनी मोठमोठ्या शिला व वृक्ष यांनी अनेक दैत्यांचा नाश केला.

दैत्यही बाणांची अखंड वृष्टी करू लागले. शिवगणांच्या शरीरांतून रक्ताचे प्रवाह वाहू लागले. देवांच्या बाण, पाषाण, वज्रे, त्रिशूल, पट्टिश इत्यादी आयुधांनी, कुऱ्हाडीसारख्या शस्त्रांनी किती तरी दैत्यांचे चूर्ण झाले.

आता तारकासुर दैत्यांना जिंकणार, असे त्रिपुरातील दैत्य बोलू लागले. इकडे रुद्रगणही दानवांस जिंकणार, अशी भाषा करू लागले. देव व दैत्य एकमेकांवर बाणांचा वर्षाव करीत सिंहनाद करीत होते. त्यावेळी तुटलेले पाय, हात, मस्तके, शुभ्र ध्वज, छत्रे, मांस व रक्त यांनी युद्धभूमी भयंकर दिसू लागली. युद्धातील चमत्कार पाहाण्यासाठी आकाशात सिद्ध, चारण, अप्सरा यांचे समुदाय जमले.आकाशात देवांच्या दुंदुभी वाजू लागल्या. दैत्यांचा पराभव झाला. सर्व देव आपल्या शस्त्रांसह तारकासुराच्या त्रिपुरात घुसले. विद्युन्माली व मयासुर यांची बिकट अवस्था झाली. तथापि विद्युन्मालीने भयंकर परिघ हातात घेऊन तो नंदीस मारला. त्यामुळे नंदी मूच्छित झाला. त्यानंतर घंटाकर्ण, शंकुकर्ण, महाकाल हे शिवपार्षद मोठ्या क्रोधाने विद्युन्मालीच्या अंगावर धावून गेले. विद्युन्मालीनें त्यांच्यावर वारंवार बाणांचे प्रहार केले. तो उच्च स्वरांत सिंहनाद करू लागला.

एवढ्यात तेजस्वी नंदी सावध होऊन विद्युन्मालीवर धावला. त्याने वज्रासारखे एक कठीण आयुध विद्युन्मालीच्या अंगावर सोडले. ते भयंकर वज्र विद्युन्मालीच्या वक्षावर आदळले. तो त्या वज्राच्या प्रहारानें ठार झाला. दानवांचे सैन्य आक्रोश करीत पळू लागले. रोषाने त्यांनी देवांवर वृक्ष व पर्वत यांची मोठी वृष्टी केली.

यानंतर प्रतापी व तेजस्वी असुरश्रेष्ठ तारकाक्ष युद्धास सन्मुख झाला. महामायावी मयासुरही शिवगणांच्या नायकांना मारू लागला. तारकाक्षाने सर्व देवसैन्यास जाळण्यास सुरुवात केली. त्याच्या प्रभावानें देवांचे सैन्य क्षीण झाले. असुरी मायेने देवांच्या सैन्यावर अग्नी पडू लागला. पूतनादिक महाभयंकर ग्रह, नक्र, भुजंग, मोठे पर्वत, सिंह, व्याघ्र, मोठे वृक्ष, सृमरासारखे मृग, आठ पायांचे शरभ, उदक व वायू यांची मायासृष्टी मयाने रचली. याप्रमाणे तारकासुर व मयासुर यांनी

मायेच्या प्रभावाने शिवगणांना पराभूत केले. मायेच्या अंधाराने तर ते अधिकच पीडित झाले.

अशा वेळी शिवगणांचे रक्षण करण्यासाठी देवांतील प्रमुख वीर आपल्या आयुधांसह शत्रूच्या सैन्यात शिरले. गदा व रोग यांसहित यम, तेजस्वी वरुण, कोटचवधी देवांसहित कार्तिकस्वामी, ऐरावतासह स्वत: इंद्र, नक्षत्रांचा स्वामी चंद्र, शनीसहवर्तमान सूर्य, मृत्यूसह महातेजस्वी शिव यांनी शत्रूच्या सैन्यात प्रवेश केला. देवांनी दानवांचे सैन्य पळवून लावले. दानवांच्या सैन्यास शिवपार्षदही मारू लागले. दानवांच्या मायेचा संहार झाल्यावर देवांच्या अस्त्रांचा प्रभाव अधिकच वाढला. शिवगणांच्या नायकांनी मोठा सिंहनाद केला. शिवगणांतील मुख्यांनी दानवसमुदायाचा नाश केला. मयासुराने कार्तिकस्वामीस बाणानें प्रहार करून तारकासुरास तो म्हणाला;

'दैत्यश्रेष्ठ, तारकासुरा, या देवसेनापतीस प्रहार करून आता मी सैन्यासह त्रिपुरात जातो. मी फार दमलो आहे. थोडी विश्रांती घेऊन मी पुन्हा या देववीरांशी युद्ध करीन. आमची अंगं शस्त्रांच्या प्रहारांनी क्षीण झाली आहेत. आपली शस्त्रं, कवचं, ध्वज, वाहनं यांचीही फार मोडतोड झाली आहे. शिवगण, नंदिकेश्वरादि नायक, ब्रह्मादिक लोकपाल जयश्रीनं शोभत आहेत. तेव्हा आता तरी यांशी युद्ध करू नये.'

मयासुराचे हे भाषण ऐकून आरक्तवर्ण नेत्रांचा तो तारकासुर विश्रांतीच्या इच्छेने दितिपुत्रांसह त्वरेने त्रिपुरात गेला. त्यावेळी हर्षयुक्त झालेले अदितिनंदन, इंद्रादी देव, शिवांचे गण यांनी शंख, मृदंग, नौबत, सिंहनाद यांसह गर्जना केली.

## अमृताच्या विहिरीमुळे असुरश्रेष्ठ जिवंत ?

त्रिपुरात आलेला मयासुर देवांच्या नाशाचा विचार करू लागला. महायशस्वी विद्युन्माली रणावर पडला, याचे त्याला मोठे आश्चर्य वाटले. त्रिपुरात सर्वत्र अनर्थ झाला होता. क्रुद्ध झालेल्या कालापासून आपले संरक्षण कसे होईल ? याचाच विचार तो करीत होता. हे त्रिपुर जिकण्यास महादेवांचेच साह्य हवे. इंद्र, यम, वरुण, कुबेर, यांच्यापासून

भीती नाही. पण तो महादेव मात्र जिंकण्यास अशक्य आहे. तो दानव-श्रेष्ठ आपल्या वीरांना म्हणाला, ' मी आता श्रेष्ठ औषधींनी युक्त अशी अमृताच्या उदकानं भरलेली एक विहिर उत्पन्न करतो. त्या जलानं मरण पावलेले दैत्य परत उठून बसतील.'

असे चिंतन करून त्या महाबलाढ्य मायावी मयासुराने मायेने एक उत्कृष्ट विहीर निर्माण केली. ती दोन योजने लांब व खोल आणि एक योजन रुंद होती. तिला पायऱ्या होत्या. ती शीतल व अमृतासारख्या स्वादाने युक्त अशा उत्तम व मधुर जलाने परिपूर्ण होती. गुणवती स्त्री-सारखी ती शोभत होती. सूर्यविकासी व चंद्रविकासी कमले, बदके यांनी ती शोभत होती. महेश्वरांनी जशी गंगा उत्पन्न केली, तशी ही विहीर मयासुराने निर्माण केली. त्या विहीरीत विद्युन्माली पडताच तो उठून बसला. त्याने मयासुर व तारकासुर यांना म्हटलें;

' कोल्ह्यासारख्या प्रमथादी गणांनी युक्त, शिवांसहित तो नंदी कुठं आहे ? आम्ही त्या नंदीस पीडा देऊन युद्ध करू. शिवांच्या आश्रयानं आम्ही युद्धात यशस्वी होऊ. जर त्यांनीच आम्हांस युद्धात मारलं, तर आम्ही यमाचे अतिथी होऊ.' तेव्हा त्याला आलिंगन देऊन मयासुर म्हणाला, ' विद्युन्माली, तुझ्याशिवाय मला हे राज्य व जीवन यांची अपेक्षा नाही. समर्थ दानवा, मरण पावलेल्या दानववीरांना जिवंत करण्यासाठी मी ही मोठी अमृताची विहीर निर्माण केली आहे. दैत्या, तू यमलोकातून परत इथं आलास, हे मोठं भाग्यच आहे.

यानंतर असुरांनी आपल्या वाद्यांच्या गर्जना केल्या. भेरीचा भयंकर आवाज ऐकून असुर युद्धास तत्पर होऊन त्रिपुरातून त्वरेनें बाहेर आले. शिवांचे पार्षदही त्रिपुरातील दानवांच्या अंगांवर धावून गेले. देव व असुर यांच्यांत घनघोर युद्ध सुरू झाले. तलवारी, शूल, धनुष्ये, बाण इत्यादी आयुधे विजेसारखी चमकू लागली. शिवगण व असुर घायाळ होऊन नरकात पडलेल्या प्राण्यांसारखे आक्रोश करू लागले. अनेक वीरांची मस्तके रणभूमीवर पडू लागली. उभय सैन्यांतील योद्धे कुऱ्हाडी, पट्टिश, तलवारी, परिघ इत्यादी आयुधांनी छिन्नभिन्न होऊन जमिनीवर पडले.

शिवांचे पार्षद वीरश्रीने युक्त होऊन अकस्मात गर्जना करू लागले. इतर सिध्दगणांचे गायन सुरू झाले. त्यावेळी शिवांचे अनेक पार्षदगण परिघ नावाच्या आयुधाने जखमी झाले. त्यांच्या मुखांतून रक्ताचा प्रवाह सुरू झाला. काही शिवगणांनी त्रिपुरनिवासी असुरांना नाराच नावाच्या लोखंडी बाणांनी, पर्वतशिखरांनी मारले. त्यानंतर मयासुराच्या आज्ञेने वरिष्ठ दानवांनी मरण पावलेल्या दैत्यांना अमृताच्या विहिरीत टाकले. ते त्वरित स्वर्गातील देवांसारखी रूपे घेऊन, उत्तम वस्त्रांनी व अलंकारांनी नटून पुन्हा उठून बसले. त्यांनी दंड ठोकून पुन्हा सिंहनाद केला.

तेव्हा शंकुकर्ण नावाचा एक शिवगण मोठ्या त्वरेने शिवांकडे गेला व त्यांना म्हणाला, 'महादेवा, आपल्या पार्षदांनी अनेक दैत्य मारले. पण ते अमृताच्या विहिरीच्या प्रभावानं पुन्हा उठून बसतात. पुनःपुन्हा ते जिवंत होतात.'

यानंतर दानवांच्या सैन्यात भयंकर उत्पात झाले. भयंकर नेत्रांचा दानव तारकासुर सिंहासारखे तोंड पसरून शंकरांच्या रथावर धावला. त्रिपुरात दुंदुभी व शंख यांचे भयानक शब्द झाले, तारकासुर शिवांच्या रथावर धावत गेला हे पाहून इतर दानवही युध्दास तत्पर झाले. तेव्हा भूमिकंप झाला. शिवांचा रथ भूमिगत झाल्याचे पाहून शंकर व ब्रह्मदेव यांच्या चित्तास क्षोभ वाटला. त्यावेळी महाबलाढ्य ब्रह्मदेवांनी त्या त्रैलोक्यरूप रथास सावरून धरले. पीतांबरधारी विष्णूंनीही मोठ्या वृषभाने रूप धारण करुन त्या रथास सावरले. तेव्हा दैत्यांचा राजा तारकासुर पंखयुक्त महापर्वतासारखा धावला. त्याने ब्रह्मदेवांवरही प्रहार केला. ब्रह्मदेव हे पाहून रागाने लाल झाले.

याच वेळी त्रिपुरातील दैत्य व दानव यांनी तारकासुराच्या सन्मानासाठी मेघगर्जनेसारखा भयंकर सिंहनाद केला. वृषभरूपधारी विष्णू हातात सुदर्शनचक्र घेऊन त्रिपुरात शिरून दैत्यांच्या सैन्याचे मर्दन करू लागले. त्या अमृतमय विहिरीतील सर्व जल विष्णूंनी प्राशन केले. या नंतर शिवांच्या पार्षदांनी अनेक असुरांना मारले. दैत्यांच्या अंगातील रक्ताच्या नद्या वाहू लागल्या. भयंकर मुखांच्या शिवगणांनी दान-

वांना मागे सारले. युद्धातून निवृत्त होऊन मयासुर व विद्युन्माली आपल्या त्रिपुरात गेले. इंद्र व नंदिकेश्वर विजयाने हसू लागले.

## सर्व दैत्य पश्चिमसमुद्रावर

संग्रामात शिवगणांनी त्रिपुरवासी दैत्यांचा पराभव केल्यावर ते भयभीत होऊन आपल्या त्रिपुरात गेले. ते मृतप्राय व म्लानवदन झाले होते. मनातून खिन्न झाले होते. उदास झालेल्या दैत्यांना तो मयराजा म्हणाला, 'दैत्यांनो, तुम्ही शिवगणांकडून पीडित होऊन आता या त्रिपुरात आला आहात. आता या युद्धात देव नक्की आपला पराभव करणार. कालाचं हे असं आश्चर्यकारक बल आहे.'

यानंतर मयासुराने मेघासारखी गर्जना केली. सर्व दैत्य तेजोहीन दिसत होते. अमृतवाणीचे रक्षण करणारे दूत दैत्यप्रमुखास म्हणाले, 'दैत्यनायका, अमृतरसानं पूर्ण असलेली विहीर कुणी बैलाचं रूप घेऊन प्राशन केली. आता ती मरण पावलेल्या स्त्रीसारखी शुष्क आहे' हे ऐकून दानवासुर मय म्हणाला, 'दानवहो, मी मायेच्या बलानं ही अमृताची विहीर निर्माण केली. तीच नष्ट झाल्यानं आपण आता या त्रिपुरात नष्ट होऊ. ती पीतांबरधारी विष्णूंनीच प्राशन केली, यात संशय नाही. दैत्यांचं सर्व काही गुप्त विष्णूंना माहीत असतं. आता आपण इथून हितकर अशा दूर देशास जाऊ. या पुरासह आपण समुद्राच्या तीरावर जाऊ. तिथं देवांचे सर्व उद्योग व्यर्थ होतील. आता आपणांस समुद्र हेच आश्रयस्थान आहे.'

असे म्हणून तो दैत्यांचा राजा मयासुर तत्काल त्रिपुरासह सिंधुनदीचा बांधव जो समुद्र त्याच्या तटावर गेला. हे पाहून त्रिनेत्र शिवांनी ब्रह्मदेवांना प्रश्न केला, 'भगवन्, आपणांस भिऊनच त्रिपुरनिवासी दानवांनी महासागराचा आश्रय घेतला आहे. ब्रह्मदेवा, हे दानव ज्या ठिकाणी गेले आहेत, तिथंच आपण आपला हा रथ त्वरेनं न्यावा.' यानंतर इंद्रादी देवांनी सिंहनाद करून ते शिवरथाबरोबर सर्व आयुधांसह मोठ्या हर्षाने पश्चिमसमुद्राकडे निघाले. तेथे पोचल्यावर त्यांनी सुंदर पताकांनी सुशोभित, रणवाद्यांची गर्जना व शंखांचे शब्द यांनी

निनादित असे त्रिपुर पाहिले. ते पाहून बलाढ्य देवही मेघासारखी गर्जना करू लागले. त्या दानवांच्या समूहातही खवळलेल्या समुद्रापेक्षा महान असा मृदंगांचा ध्वनी झाला. त्रिपुरातील शत्रूंना पाहून शिव इंद्रास म्हणाले, 'देवगणपालका, इंद्रा, हे त्रिपुरस्थान सर्व प्रकारांनी उत्तम आहे. तरी यम, वरुण, कुबेर, कार्तिकस्वामी इत्यादींच्या साह्यानं मी आताच या तीनही पुरांचा निश्चयानं संहार करीन. इंद्रा, ही तीनही पुरं ज्या समुद्रावर आहेत, तिथं तू जा.' असे म्हणून स्वत: शिवच भूमिरूप महारथात बसून समुद्रावर निघाले. शिव इंद्राला म्हणाले, 'तू बाणवृष्टी, मुसळं, वज्रे इत्यादी शस्त्रांनी सर्व दानवांसह त्रिपुराचा पराभव कर.' हे ऐकून अदितीचे इंद्रादी पुत्र युद्धासाठी क्षीरसागरावर जाऊन उभे राहिले. शिवांनी त्यांना साह्य केले. इंद्राने प्रथम त्रिपुरावर चाल केली.

## तारकासुराचा वध

अमरांचा राजा इंद्र त्रिपुरातील असुरांना मारण्यासाठी निघाला. शिवांनी त्याला अनुमोदन दिले. त्रिपुराचा नाश करण्यासाठी सर्व देव शंख व हत्ती यांच्या शब्दांसह पणव व पटह ही वाद्ये वाजवीत येत आहेत, हे त्रिपुरवासी असुरांनी पाहिले. शिव आपल्या संहारासाठी येत आहेत, असे पाहून त्रिपुरातील महाबलिष्ठ असुर प्रलयकालाच्या समुद्रासारखे प्रक्षुब्ध झाले. देवांच्या वाद्यांचे नाद ऐकून दानवही आपली वाद्ये वाजवून सिंहनाद करू लागले. असुर व देव परस्परांना मारू लागले. श्रेष्ठ नाग जसे श्वास टाकतात, पक्षी जसे भ्रमण करतात, महापर्वत जसे कापतात, मेघ जसे गर्जना करतात, व्याघ्र जसे जांभया देतात, वायू जसे जोराने वाहातात, वाढलेल्या लाटांनी समुद्र जसे क्षुब्ध होतात; तसे ते देव व दैत्य परस्परांशी युद्ध करू लागले.

त्यांच्या धनुष्यांचे मेघगर्जनेसारखे मोठमोठे शब्द होऊ लागले. ते एकमेकांना म्हणू लागले, 'अरे, भिऊ नकोस. कुठं जातोस? आता मेलास असं समज. मी इथं आहे. सामर्थ्य असेल तर प्राप्त करून पराक्रम दाखीव. हे घे आयुध. शत्रूस छिन्नभिन्न कर. मार, विदारण कर.'

असे म्हणताच दानव यमाच्या घरी गेले. कोणी तलवारीने मरण पावले कुणी कुऱ्हाडींनी शिरच्छेद पावले. कोणी मुद्‌गलांखाली चिरडून मेले. कोणी भुजांच्या प्रहारांखाली मेले. कोणी पट्टीश नावाच्या आयुधाने, कोणी शूलाने मरण पावले. रंगाने मुंज नावाच्या गवताच्या पुष्पांसारखे, शरीरांनी पर्वतांसारखे ते भयंकर दानव भयानक सुसरी व मासे यांनी व्यापलेल्या समुद्रात पडले. त्यामुळे समुद्राच्या जलातही मेघासारखी गर्जना होऊ लागली. मासे, सुसरी, तिमी, तिमिंगल इत्यादी जलचर जंतू त्यांच्या रक्ताच्या वासाने उन्मत्त झाले. ते प्राणी त्या दानवांचे रक्त पिऊ लागले. रथ, आयुधे, घोडे, वस्त्रे, अलंकार यांनी युक्त अशा दैत्यांना ते गिळू लागलें. दोन घटकांत समुद्राचा प्रदेश रक्तमिश्रित उदकांनी पूर्ण झाला.

त्यानंतर त्रिपुराच्या पूर्वेकडील महाद्वारात देवसैन्यासह महाबलाढ्य इंद्र दानवांना पीडा देत राहिला. शिवांचा पुत्र कार्तिकस्वामी त्रिपुराच्या उत्तरेकडील द्वारावर उभा राहिला. कालदंड नावाचे आयुध घेऊन यम, श्रेष्ठ परशायुध घेऊन कुबेर यांनी मयासुराच्या त्रिपुराचे पश्चिमद्वार बंद केले. दहा हजार सूर्यसमान तेजस्वी, दक्षप्रजापतीचे शत्रू, त्रिनयन भगवान शिव रथासह जाऊन त्रिपुराचे दक्षिणद्वार त्यांनी बंद केले. त्यांनी त्रिपुरातील उंच, सुवर्णमय, कैलासारखी शुभ्र, गोपुरांनी सुशोभित अशी दैत्यांची घरे वेढून टाकली. त्या घरांना उपटून त्यांनी ती समुद्रात टाकून मोठ्याने गर्जना केली.

या युद्धात पुष्पादी उपवने, कोकिळपक्ष्यांसह अशोकवृक्षांसहित त्रिपुरातील घरे वीरांच्या रक्ताने लाल झाली. शिवगण घरे उखडीत असताना दैत्यस्त्रिया, 'नाथ, बापा, प्रभो', अशा नावांनी बोलू लागल्या. आपला व आपल्या स्त्रीपुत्रांचा नाश जवळ आला आहे; हे पाहून महादैत्य क्रोधाने व्याप्त झाले. कुऱ्हाडी, मोठमोठ्या शिळा, पाषाण, त्रिशूळ, वज्रे, गोफणगुंडे, फिरवून मारण्याची आयुधे यांनी परस्परांच्या शरीरांचा व घरांचा नाश होऊ लागला. त्रिपुरातील मार्ग रक्ताच्या चिखलाने माखून गेले. सोन्याच्या विटा, स्फटिकाची फुटलेली चित्रे, तुटलेली मस्तके, पाय व हात इत्यादी व्याप्त असलेल्या मार्गांवरून सुखाने जाणे

अशक्य झाले.

यामुळे तो तारकासुर क्रोधाने डोळे लाल करून वृक्षाखाली दडून राहिला. त्याचे दार पराक्रमी शिवांनी बंद केलं. तेव्हा तो शिवांच्या भूतगणांना मारीत पुरातून बाहेर पडला. भयंकर शब्द करीत तो तेथे संचार करू लागला. शिवांचा रथ धरण्याच्या उद्देशाने तो मर्यादा उल्लं-घलेल्या समुद्रासारखा पुढे सरसावला. शेष, शिव, ब्रह्मदेव यांनी तार-कासुराशी युद्धास प्रवृत्त झाले. आकाशातील रथावर आरूढ झालेल्या शिवांनी अत्यंत क्षुब्ध होऊन तारकासुराच्या अंगसंधीचा भेद करून भयंकर सिंहनाद केला.

त्यावेळी एक पाय ऋग्वेदरूपी अश्वाच्या पृष्ठावर व एक पाय नंदीच्या पाठीवर ठेवून शिव हातात धनुष्यबाण घेऊन तीनही पुरांचा एकत्र समागम होण्याची वाट पाहू लागले. त्यावेळी अश्व व नंदी यांचे स्तन व दात त्रिशूलधारी शिवांच्या पायांच्या भाराने पीडित झाले. ते पडले. तेव्हापासून घोड्यांना स्तन व गायींना दात दिसेनासे झाले. त्यानंतर नंदीने तारकासुरास, अतिभयंकर व आरक्त नेत्रांच्या त्या असु-रास शिवांच्यासमोर कोंडून धरले. गंध देणारा सुतार जसा चंदनवृक्षास तोडतो, त्याप्रमाणे नंदीने तीक्ष्ण कुऱ्हाडीचा प्रहार त्या दानवराजावर केला. तो असुरही तलवार उपसून नंदीच्या अंगावर धावला. तेव्हा नंदीने यज्ञोपवीत होऊन तारकासुराचा शिरच्छेद केला. तारकासुर मरण पावल्यावर शिवगणांतील प्रमुखांनी भयंकर सिंहनाद केला.

हा सर्व प्रकार पाहून मयासुर विद्युन्मालीस म्हणाला, 'हा भयंकर आवाज कसा येत आहे ? शिवगणांतील प्रमुख वीर युद्ध कसं करतात?' हे ऐकून विद्युन्माली रणभूमीवर आला. तो मयासुरास म्हणाला, 'नक्ष-त्रांसारख्या नेत्रांनी शोभणारा हा तारकासुर मरण पावला हे पाहून शिवगण हर्षानं मेघासारखी गर्जना करीत आहेत.' त्यावर मयासुर त्याला म्हणाला, 'विद्युन्मालिन्, प्रस्तुतचा काळ स्वहितास अनुकूल नाही. मी या त्रिपुराचं आता पराक्रमानंच रक्षण करतो.'

असे म्हणून मयासुर व विद्युन्माली हे दैत्यश्रेष्ठ शिवगणांना मारू लागले. शिवगणांनी जे घेतले होते, ते त्यांपासून परत घेऊन त्यांना

दैत्यांनी पुरातून बाहेर घालवून दिले. पण यम व वरुण यांचे मृदंग, पणव नावाचे वाद्य, दवंडी नावाचे वाद्य, धनुष्याची दोरी, त्यांच्या हातांच्या टाळ्या, सिंहनाद यांची पूजा करून इंद्रादी देव पुन: युद्धास सज्ज झाले. देवांनी शिवांची उत्तम प्रकारे पूजा केली.

## मयासुराचे भाषण, असुरस्त्रियांची क्रीडा

तारकासुर मरण पावल्यावर मयासुराने शिवगणांना त्रिपुरातून बाहेर घालविले व तो आपल्या भयभीत झालेल्या दानवांना म्हणाला, ‘ असुरांनो, यावेळी जे कर्तव्य आहे ते मी तुम्हांस सांगतो. ज्यावेळी पुष्प-नक्षत्रावर चंद्र येईल, तेव्हा ही पुरे क्षणमात्र एकत्र होतील. त्यावेळी तुम्ही निर्भय होऊन युद्ध करावं. हा काळ मी कोकिळपक्ष्याच्या सांगण्या-वरून निश्चित केला आहे. कारण याच योगावर लक्ष ठेवून देव या त्रिपुरावर एक बाण मारतील आणि हे पुर नष्ट करतील. म्हणून दैत्यांनो, पराक्रम, बल, वैरभाव यांना ध्यानात ठेवून तुम्ही या त्रिपुराचं रक्षण करावं. शिव ज्यावेळी या त्रिपुरावर बाणाचा नेम धरतील, तेव्हा तुम्ही पूर्ण शक्तीनं त्याच्या रथास मागं फिरवावं. असं केलंत तरच ते चिंता-ग्रस्त होऊन पुष्पयोगाची प्रतीक्षा करतील.’

हे भाषण ऐकून त्रिपुरवासी मयासारखे भयंकर दानव वारंवार सिंहनाद करून मयासुरास म्हणाले, ‘ शिव या त्रिपुरावर बाण सोडणार नाहीत, अशा रीतीनं आम्ही याचं प्रयत्न करून रक्षण करू. हे दितिपुत्र आजच रणांगणावर जाण्यासाठी उत्सुक आहेत. या संग्रामात आपला जय झाला तर हे त्रिपुर कल्पांतापर्यंत आकाशात चिरंतन राहील आणि आमचा पराजय झाला तर सर्व दानव नाहीसे होतील.’

असा संकल्प करून देवांचे शत्रू दानव हर्ष पावले. प्रदोषकाळी ते आनंदाने विषयक्रीडेत रमू लागले. शीतल चंद्र उदित झाल्यावर त्रिपु-रातील असुर आपला देह व आपली घरे यांना अलंकृत करू लागले. त्यांनी लहान रस्ते, राजमार्ग, देवालये, राजवाडे, घरे, मठ यांत चाफ्याच्या फुलांसारखे अनेक दीप लावले. सर्व दानव धनसंपन्न होते. त्रिपुरातील अंधार नष्ट झाला. विषयवासनेनें युक्त असे ते दानव

पूर्वरात्री आपल्या स्त्रियांबरोबर घरी रमू लागले. त्यांच्या सुंदर स्त्रिया कामोत्पत्तीच्या घर्मबिंदूंनी शोभू लागल्या.त्या मंजुळ भाषणे करू लागल्या. वीण्यांचे मधुर स्वर उमटत राहिले. कोकिळपक्ष्यांचे शब्द कामाची वृद्धी करू लागले. दानवांना मदन आपल्या पंचबाणांनी व्यथित करू लागला.

एखादी सुंदर स्त्री पतीच्या पायांशी बसून आपले गाल त्याच्या पायांवर ठेवून प्रेमकलहाने रुदन करीत होती. काजळमिश्रित प्रेमाश्रूंनी तिचे मुखकमल शोभत होते. आणखी एक स्त्री वर्तुळाकार आरशात आपले मुख पाहून त्याची शोभा वर्णन करीत होती. एकांतातील नर्मयुक्त विनोदी भाषणे ती आठवत होती.एखादी स्त्री आपल्या रोमांचयुक्त सुंदर अवयवांनी आपल्या तरुणाशी रत झाली. आणखी एक विषयग्रस्त स्त्री आपल्या पतीशी कामक्रीडा करू लागली. एक स्त्री आपल्या पतीस फार काळानंतर प्रसन्न होऊन गोड गोड बोलू लागली. त्रिपुरातील असुरस्त्रियांची स्तने गोरोचनमिश्रित हरिचंदनाने युक्त व अमृताने भरलेल्या सुवर्णकलशांसारखे होते. त्यांच्या अधरोष्ठांना चुंबनांनी क्षते पडलेली होती. त्रिपुरात कोठे मधुर गायन होत होते. कोठे मद्यप्राशन होते. कोठे सारंगी वाजत होती. सर्व त्रिपुरात आंब्यांच्या फुलांचा सुगंध पसरला होता.

यावेळी कोणी एक स्त्री मद्यपानानें घर्मयुक्त झाली. ती श्रमल्यावर तिचा पती तिच्या गालांचा वास घेत होता. ती स्त्री त्यास म्हणाली, ‘तू असा बालकासारखा माझ्या गालांचा वास का घेत आहेस ? तुझ्या मनात असंच काही असेल तर तू सोन्याच्या कमरपट्ट्यानं शोभणाऱ्या पुष्ट व उंच अशा माझ्या विशाल कमरेशी लगट कर.’ त्रिपुरातील स्त्रिया चंद्राभोवतीच्या नक्षत्रांप्रमाणे शोभत होत्या. त्यांच्या अंगांस केशरमिश्रित सुगंधी द्रव्ये लावलेली होती. झोपाळ्यावर बसून त्या पुरुषांशी क्रीडा करीत होत्या. चमत्कारिक पदराने युक्त असा त्यांचा वेष होता. त्यांच्या अंगांवर सुवर्णाचे अलंकार होते. त्यांच्या वेणींचे वर्तुळाकार वुचडे त्या लीलेने झोके घेत असताना वरखाली होत होते. त्या झोके घेत असताना त्यांच्या तुटलेल्या माळा व कमरपट्ट्यांतून गळून पसरलेले मणी यांनी

म.पु...८

शोभत होत्या.

उत्तररात्री त्रिपुरातील दानव निद्रिस्त झाल्यावर इंद्रादिक देव शिवरथासह रणभूमीवर आले. सूर्याचा उदय होत होता.

## देव व दैत्य यांचे युद्ध, त्रिपुराचा नाश

तेजाची खाणच असा सूर्य उदयास आल्यावर सर्व देव प्रलय-कालाच्या सागराप्रमाणे गर्जना करू लागले. सहस्रनेत्रयुक्त इंद्र, कुबेर, वरुण यांच्यासह शिव त्रिपुरावर स्वारी करण्यासाठी निघाले. अनेक रूपे धारण करणाऱ्या शिवगणांनी सिंहनाद केला. रणवाद्यांचे शब्द प्रकट झाले. देवांचे सैन्य मोठ्या हलणाऱ्या वृक्षांच्या वनासारखे दिसत होते. देवांचे मोठे सैन्य पाहून दानवांतील प्रमुखांचा समुद्रासारखा क्षोभ झाला. दानव हातांत तलवारी, पट्टिश, बर्च्या, शूल, दंड, कुऱ्हाडी, धनुष्ये, वज्रे, मोठमोठी मुसळे इत्यादी आयुधे घेऊन क्रोधाने लाल नेत्र करून पंखयुक्त पर्वतांसारखे आकाशात उडाले. त्यांनी इंद्रावर प्रहार केले. विद्युन्माली, मयासुर यांसह सर्व दानव शंकरादी देवांशी युद्धास सज्ज झाले.

ते बलहीन झाल्यामुळे त्यांना जयाची खात्री नव्हती. ते क्षीण झालेल्या हस्तपादी अवयवांसारखे दिसत होते. ते क्रोधाने परस्परांनाच मारू लागले. कोणी वज्राने, कोणी बाणांनी, कोणी चक्रांनी छिन्नभिन्न झाले. जखमी असुर समुद्रात पडत. गदा, मुसळे, तोमर, कुऱ्हाडी, वज्रे, शूल, तलवारी, पट्टिश, पर्वतशिखरे इत्यादी आयुधे समुद्रात पडू लागली. त्यामुळे समुद्रातील तिमी नावाच्या मत्स्यांचा व सुसरींचा नाश झाला.

मेघासारखा कृष्णवर्णाचा दैत्य विद्युन्माली मोठ्या वेगाने नंदीवर धावून गेला. तो नंदीस म्हणाला, 'नंदिकेश्वरा, मी दनुपुत्र तुझ्याशी युद्ध करण्यासाठी आलो आहे. तू आता माझ्या हातून जिवंत सुटत नाहीस.' त्यावर तो नंदी असुरास म्हणाला, 'दानवा, अधर्मास प्रवृत्त झालेल्यांना जयाची संधी नसते. मी तुला मारण्यास समर्थ आहे.' असे म्हणणाऱ्या नंदीवर विद्युन्मालीने बाण सोडला. त्या बाणाने नंदीच्या वक्षस्थलाचे रक्त प्राशन केले. अत्यंत क्रोधाने नंदीनेही विद्युन्मालीस

वृक्षानें मारले. विद्युन्मालीनें तो वृक्ष आपल्या तीक्ष्ण बाणांनी तोडला. हे पाहून नंदीस मोठा राग आला. तो विद्युन्मालीस मारण्यासाठी धावला. दानवश्रेष्ठानें शंभर बाणांनी वेधले. नंदीने विद्युन्मालीचा रथ मोठ्या वेगाने नेला. दानवासह तो रथ खाली पडला. पण आपल्या आसुरी मायेनें विद्युन्माली त्या रथातून बाहेर पडला व त्याने नंदीवर पुन्हा शक्तीचा प्रहार केला. नंदीने ती शक्ती आपल्या अंगातून काढली व तीच पुन्हा विद्युन्मालीस मारली. या शक्तीने विद्युन्मालीचे कवच व हृदय फुटून तो भूमीवर पडला.

विद्युन्माली दैत्य मरण पावला. त्यावेळी सिद्ध, चारण, किन्नर यांनी आनंदाने पार्वतीपती शिवांचे पूजन केले. त्यानंतर मयासूर शिव-गणांचे सैन्य जाळू लागला. मयासुराच्या शूलांनी त्यांची हृदये फुटली. गदांनी मस्तके चूर्ण झाली. अंगे बाणांनी तडित झाली. आणि शिवांचे गण समुद्रात पडू लागले. यानंतर इंद्र, यम, कुबेर, नंदिकेश्वर कार्तिक-स्वामी; यांनी तारकासुर व विद्युन्माली हे दैत्य मारले असूनही मयासुर युद्धास प्रवृत्त झाला. इंद्रादी देव मयासुरास शस्त्रांनी ताडन करू लागले. मयासुर मेघासारखी गर्जना करीत होता. शिवगणांनी त्याच्यावर अनेक प्रहार केले.

याच वेळी पुष्यनक्षत्राचा योग आला. तीनही पुरे एकत्र झाली. याच वेळी अग्नी, चंद्र व विष्णू यांनी युक्त असा एक बाण त्रिनयन महादेवांनी त्वरेने त्रिपुरावर टाकला. त्रिपुरातील मयासुर आता मरणार, म्हणून शिवही कष्टी झाले. नंदी त्रिपुरात जाऊन मयासुरास म्हणाला, 'या त्रिपुराचा आता नाश होणार आहे. तू आताच घरातून बाहेर ये.' हे ऐकून मयासुर त्रिपुराच्या बाहेर आला. यानंतर शिवांच्या बाणाने त्रिपुर जळत राहिले. त्यातील हजारो घरे बाणातील अग्नीने जळू लागली. त्रिपुरातील देवालये, राजमंदिरे, रम्य गच्च्या, वने, उपवने, पतींनी आलिंगलेल्या स्त्रिया, भर्त्याशी रमत असलेल्या रमणी, त्या अग्नीने जळू लागल्या. काही स्त्रियांनी अग्नीस विनंती केली. त्या थरथर कापत होत्या. त्रिपुरातील अग्नी दानव स्त्रियांना जाळू लागला. अग्नीने जळणारी घरे समुद्रात पडत होती त्यामुळे समुद्राचे पाणी तप्त झाले.

त्यातील जीवांना त्रास झाला. सर्व दानवांसह त्रिपुर नष्ट झाले तरी मयासुराचे श्रेष्ठ राजमंदिर मात्र राहिले. देवराज इंद्राने मयासुराच्या घरासही शाप दिला. ते राहाण्यास अयोग्य झाले. ते अग्नीने व्याप्त राहिले.

आकाशातील ध्रुवाजवळ मयाचे घर होते. आपले घर राहाण्यास उपयोगी नाही हे पाहून मयासुर खिन्न झाला. घराची इच्छा करणाऱ्या मयासुरास शिवांनी एक पुर व उत्तम घर निर्माण करून दिले.इंद्रादिकांनीही मयाचा द्वेष सोडून शिवांची पूजा केली. सर्व देवांना अत्यंत हर्ष झाला. जो मनुष्य पितरांच्या श्राद्धप्रसंगी रुद्रविजयाचा हा वृत्तांत श्रवण करतो, त्यास सर्व यज्ञांचे फल प्राप्त होते. हे आख्यान अत्यंत कल्याणदायक व पुण्यकारक असून वंशात पुत्र देणारे आहे.

## तारकासुर, कार्तिकस्वामी, हिरण्यकशिपू

यानंतर एकशेपंचेचाळिसाव्या अध्यायात सूतानें तारकासुराची कथा सांगण्यासाठी कार्तिकस्वामीची उत्पत्ती सांगून तारकासुराचे आख्यान सांगितले आहे. यातच दक्षाच्या कन्यांना कश्यपांपासून झालेल्या संततीची स्थूल माहिती आली आहे. यानंतर हिरण्यकशिपूची हकिगत आली आहे. दितीचे तप, तिला वज्रशरीरी वज्रांग नावाचा पुत्र झाला व त्यानें इंद्रास पाशानें बांधून आणल्याची कथाही याच अध्यायात आली आहे. पुढल्या अध्यायात वज्रांग इंद्रास मारणारा पुत्र व्हावा म्हणून तप करीत असल्याची कथा आली आहे. त्या दैत्यास ब्रह्मदेवांच्या वराने महापराक्रमी पुत्र झाला.

तो पुढील अध्यायात देव आपल्या वंशाचा क्षय करणारे समजून पारियात्रपर्वतावर तप करण्यासाठी गेला. तेथे निरशन राहून त्याने तप केले. त्यामुळे सर्व देव उद्विग्न झाले. ब्रह्मदेव त्याला प्रसन्न होऊन 'वर माग' असे म्हणाले. तेव्हा तारकासुराने आपणांस सात दिवसांच्या बालकापासून मृत्यू यावा, असा वर मागितला. तो घरी आल्यावर सर्व दैत्य त्याच्याभोवती जमा झाले. तारकासुर त्यांचा राजा झाला. वसंतादिक त्याची सेवा करू लागले. सूर्यचंद्रादिक लोकपाल त्याची सेवा करीत

होते. त्याने युद्धात देवांना जिंकण्याचा विचार केला. सेनापतीने तारकासुराचा रथ तयार केला. सर्व दैत्य गर्जना करू लागले. सर्व देवांनी इंद्राशी विचार करून यमास मुख्य सेनापती केले. तो तयार होऊन महिषावरून रणभूमीकडे निघाला. अग्नी, वायू, इत्यादी लोकपालही आपापल्या गणांसहित निघाले.

यानंतर एकशेअठ्ठेचाळिसाव्या अध्यायात देवासुरांतील युद्धाने रणभूमी रक्ताच्या डोहांनी दुस्तर झाल्याचे वर्णन आहे. सर्व भूमी वेतालादिक भूतगणांनी व्याप्त झाली. देवासुरांच्या संग्रामात श्रीविष्णूंनी कालनेमी नावाच्या दैत्याचा वध केला. त्यांनीच ग्रसन नावाच्या दैत्याचा वध केला. देवासुरांच्या या युद्धात तारकासुरास जयाची प्राप्ती झाली. त्याने देवांना बद्ध केले. सर्व देव ब्रह्मदेवांना शरण गेले व त्यांची ते स्तुती करू लागले. ब्रह्मदेवांनी सांगितले की, तारकासुर सर्व देवदैत्यांना अवध्य आहे. त्याचा वध करणारा अद्याप जन्मास यावयाचा आहे. तो हिमालयाच्या कन्येच्या उदरी जन्म घेणार आहे. ब्रह्मदेवांनी योग्य समयाची वाट पाहाण्यास देवांना सांगितले.

नंतर ब्रह्मदेवांनी कालरात्रीस देवकार्य साधण्याबद्दल आज्ञा केली. तेव्हा ती हिमालयाच्या घरी गेली. पार्वतीच्या जन्मोत्सवाने सर्व देवांना हर्ष झाला होता. नंतर इंद्राने नारदमुनींना हिमालयाकडे पाठविले. पार्वती शिवांना द्यावी म्हणून नारदांनी हिमालयास सांगितले. इंद्राच्या प्रेरणेने मदनाने शिवांच्या मनात कामभाव निर्माण केला. त्यामुळे शिव रागावले व त्यांनी मदनास दग्ध केले. त्याच्या स्त्रीने, रतीने मोठा शोक केला व ती शिवांना शरण गेली. तो परत प्राप्त होईल असा शिवांनी तिला वर दिला. हा सर्व कथाभाग एकशेत्रेपन्नाव्या अध्यायात आला आहे.

यानंतर पुढील पांच-सहा अध्यायांत तारकासुरवधाचे आख्यान आले आहे. पार्वतीस तू काळी आहेस असे शंकरांनी म्हटल्यावर ती रागाने तपोवनात गेली. याचवेळी तारकासुराचा आडी नावाचा दैत्य पार्वतीचे रूप घेऊन शिवांपाशी गेला. या दैत्यास ओळखून शिवांनी त्याचा वध केला. ब्रह्मदेवाच्या वराने पार्वती गौरी झाली. गोरी पार्वती

शिवांपाशी येण्यास निघाली. तिला कार्तिकस्वामी नावाचा एक पुत्र झाला. सर्व देवांनी या पुत्राची स्तुती केली. तारकासुराचा वध करण्याची विनंतीही देवांनी त्यास केली, नंतर या कार्तिकस्वामींनी तारकासुराचा वध केल्याने सर्व देवांना आनंद झाला.

यानंतर पुढच्या एकशेसाठाव्या अध्यायात हिरण्यकशिपूची कथा आली आहे. तो दैत्य प्रमत्त झाल्याने देवांच्या प्रार्थनेवरून विष्णूंनी नरसिंहाचे रूप धारण करून हिरण्यकशिपूचा वध केला. यानंतर पुढच्या काही अध्यायांत मनूची सृष्टी, नारायणांचे स्वरूप, युगधर्म मार्कंडेयांना भगवंतांच्या मायेचे दर्शन, मधुकैटभ दैत्याचा वध, देवांचे भय, हयग्रीव इत्यादी दैत्यांशी युद्ध, या तारकामय संग्रामात विष्णूंनी कालनेमी दानवाचा केलेला वध, अंधकावर शंकरांचा बाण, त्याच्या रक्तापासून अनेक दैत्यांची निर्मिती, शंकरांनी मातृगणांची केलेली निर्मिती, शंकरांनी केलेला अंधकासुराचा वध; इत्यादी कथाभाग ऐकशेअठ्ठ्याहत्तर अध्यायांपर्यंत आला आहे. यानंतर शंकरांनी पार्वतीस काशीक्षेत्राची महती विवरून एकशेचौऱ्यांशिव्या अध्यायापर्यंत सांगितली आहे. यानंतरच्या काही अध्यायांत नर्मदेचेही माहात्म्य आले आहे. यानंतर पुन्हा एकशेसत्त्याऐंशीव्या अध्यायांत त्रिपुरपुराच्या दहनाची कथा आली आहे.

## पतिव्रता सावित्रीदेवीचे आख्यान

यानंतर दोनशेआठाव्या अध्यायात पतिव्रता स्त्रीचे माहात्म्य आले असून त्यानिमित्ताने सावित्रीचे आख्यान चालू झाले आहे. पूर्वी मद्रदेशात शाकल गोत्राचा अश्वपती नावाचा राजा होऊन गेला. तो पुत्राच्या इच्छेने सावित्रीदेवीची उपासना करू लागला. शंभर ब्राह्मणांकडून तो प्रतिदिवशी होम करवीत असे. दहा महिन्यांनंतर त्या राजास सावित्रीने आपले रूप दाखविले. ती त्याला म्हणाली;

'राजा, तू माझा अखंड भक्त आहेस. मी तुला एक कन्या देईन.'

इतके म्हणून सावित्रीदेवी विजेसारखी गुप्त झाली. नंतर राजाची मालती नावाची राणी गरोदर राहिली व दहाव्या महिन्यात प्रसूत

झाली. ती सावित्रीच्या प्रसादाने झालेली असल्याने तिचे नाव सावित्री ठेवण्यात आले. पुढे त्या कन्येस तारुण्य प्राप्त झाले. तेव्हा तिच्या पित्याने सत्यवान नावाच्या राजपुत्रास तिला देण्यासाठी तयारी केली नारदांनी राजास सांगितले की, हा राजपुत्र एका वर्षात क्षीणायू होईल. तेव्हा राजाने विचार केला की, शास्त्रानुसार कन्यादान एकदाच होते. राजाने आपली कन्या द्युमत्सेनाच्या पुत्रास, सत्यवानास दिली.

नारदांचे भविष्यकथन मनात ठेवून सावित्री खिन्न अंतःकरणाने धैर्य धरून पती व सासुसासरे यांची उत्तम प्रकारे सेवा करू लागली. याच वेळी राजा द्युमत्सेन राज्यावरून पदच्युत होऊन अंध झाला. राज-कन्या आपली सून झाली याचाही फारसा संतोष त्याला झाला नाही. सत्यवान मृत्यू पावणार हे समजून सावित्रीने श्वशुराची आज्ञा घेऊन सावित्रीचे त्रिरात्रव्रत केले. ठरलेल्या दिवशी सत्यवान उत्तम फुले व फळे आणण्यासाठी वनात गेला. आपण पतीसह वनात जावे, म्हणून सावित्रीने श्वशुरास विनंती केली. त्याची आज्ञा मिळताच ती सत्यवानाबरोबर वनात गेली.

आपले भय मनात तसेच ठेवून ती पतीस वनातील भिन्नभिन्न वृक्षांची माहिती विचारू लागली. तो स्वतः श्रमला असूनही तिला वनातील वृक्ष, पक्षी, मृग, दाखवून त्यांची माहिती देऊ लागला. त्याने तिला आम्रवृक्ष, वसंतऋतू, अशोकवृक्ष, पलाश, पांगारा, नागचाफा, मोगरा, कोकिळपक्षी, भ्रमर व भ्रमरी, कावळा व कावळी, कपिंजल पक्षी व त्याची स्त्री, चिमणीच्या जातीचे पक्षी, राघू, व्याघ्रांची जोडी, वानर-वानरी, मांजर, ससा, विषयासक्त हत्ती, वराह व त्याची स्त्री, म्हशीमागे धावणारा रेडा, स्त्रीसह हरिण, वनगाय व गवा, निर्मल हंस व त्याची सखी, चक्रवाक पक्षी; इत्यादींची माहिती सावित्रीस देऊन तो म्हणाला, ‘ सुंदरी, प्रिये, मी फलांचा संग्रह केला आहे. तू पुष्पांचा. आता मी समिधा गोळा करून आणतो. तोपर्यंत तू या सरोवराच्या तीरावर वृक्षाच्या छायेत विश्रांती घेत माझी वाट पाहा.’

तेव्हा त्याला सावित्री म्हणाली, ‘ नाथ, मी तुमच्या आज्ञेप्रमाणेच करीन. पण आपण फार दूर जाऊ नये. कारण या घोर अरण्यात मला

फार भय वाटतं.' यानंतर त्या सत्यवानानें सावित्रीजवळच असलेल्या वृक्षाच्या समिधा गोळा केल्या. तो त्यावेळी मरणोन्मुख असलेला तिने पाहिला. सत्यवान लाकडे तोडीत असताना त्याच्या मस्तकात वेदना उत्पन्न झाल्या. त्या वेदनांनी तो पीडित होऊन भार्येस म्हणाला, 'सावित्री, ही काष्ठं तोडण्याच्या श्रमानं मी कष्टी झालो आहे. माझ्या मस्तकात शूळ उत्पन्न झाला आहे. मला मूर्च्छा आल्यासारखं वाटतं आहे. मी आता तुझ्या मांडीवर डोकं ठेवून निद्रा करतो.' असे म्हणून सत्यवान सावित्रीच्या मांडीवर डोके ठेवून झोपी गेला.

त्याच वेळी त्या महाभाग्यसंपन्न अशा सावित्री नावाच्या पतिव्रतेने आपल्या समीपच्या प्रदेशात धर्मराजास पाहिले. तो नीलकमलाप्रमाणे श्याम होता. त्याने पीतांबर धारण केला असून तो विद्युल्लतेनें युक्त अशा मेघासमान शोभत होता. त्याची मुकुटकुंडले सूर्यासारखी तेजस्वी होती. त्याच्या गळ्यात हार होता. त्याने बाहुभूषणे धारण केली होती. असा हा यम धर्मराज आपल्याबरोबर काल व मृत्यू यांना घेऊन सावित्रीच्या समोर आला. त्याने सत्यवानाच्या देहामधून अंगुष्ठमात्र पुरुष (जीव) आपल्या पाशाने बांधून आपल्याकडे ओढून तो त्यासह दक्षिणदिशेस निघाला.

आपला पती गतप्राण झाला हे पाहून सावित्री दक्षिणदिशेस जाणाऱ्या यमाच्या मागे निघाली. ती यमराजास हात जोडून म्हणाली, 'मातृभक्तीनं ही कर्मभूमी प्राप्त होते. पितृभक्तीनं स्वर्ग मिळतो. गुरूच्या कृपेनं ब्रह्मलोक मिळतो. आणि ज्यानं हे तीन धर्म सांभाळले, त्याच्या सर्व क्रिया सफल होतात. जोपर्यंत माता, पिता, गुरू जिवंत आहेत, तोपर्यंत मनुष्यांनी अन्य धर्माचं आचरण करू नये. त्यांचं प्रिय व हित पाहून त्यांचीच शुश्रूषा करावी. इतर काही कर्मं करायची, तर त्यांचा विरोध नसावा.'

सावित्रीचे हे बोलणे ऐकून यम म्हणाला, 'सावित्री, तू आतापर्यंत केलेले मनोरथ पुरे झाले. आता तू त्वरित परत जा. तू मागं जाणार नाहीस तर मला जाण्यास अडचण होईल. तुलाही श्रम होतील. सावित्री, तू धर्मज्ञ असून गुरुपूजेबद्दल प्रीती बाळगणारी आहेस. तू सुशील

पतिव्रता आहेस. म्हणून तू मागं फीर. कारण आता तुला ग्लानी आली आहे.' त्यावर सावित्री म्हणाली, 'यमधर्मा, पती हाच स्त्रियांचा देव असून तोच त्यांचा उत्तम आश्रमही आहे. त्यांचे प्राण व धन तोच आहे. साध्वी स्त्रिया त्याच्याबरोबरच गमन करतात. पिता, बंधू, पुत्र हे स्त्रीला स्वल्प देतात. पती तर तिला अपरिमित देतो. तेव्हा त्याची पूजा कोणती स्त्री करणार नाही ? म्हणून देवोत्तमा, आपण माझ्या पतीस जिथं नेता, तिथंच मलाही जाणं भाग आहे. देवा, आपण माझ्या पतीस घेऊन जात आहात, मी तुमच्या मागं येण्यास असमर्थ होईन, तेव्हा मी या जीविताचा त्याग करीन.'

त्यानंतर यम म्हणाला, 'शुभकारके, पतिव्रते, तू महाभाग्यवती आहेस. मी तुला प्रसन्न झालो आहे. तू आता याच्या प्राणाखेरीज कुठलाही एक वर माग.' त्यावर सावित्री म्हणाली, 'धर्मज्ञा, माझा सासरा महात्मा असून अंध आहे. तो स्वराज्यापासून पदच्युत झाला आहे. त्याला नेत्र व राज्य यांची प्राप्ती व्हावी.' हे ऐकून यम म्हणाला, 'कल्याणी, तू फार दूर आलीस. आता तू माघारी जा. तुझ्या मनासारखं सर्व होईल.' यावर सावित्री त्याला म्हणाली, 'देवोत्तमा, साधूंची साधूंशी संगत जडल्यावर त्यांना क्लेश वा दुःख कुठून होणार ? तुमच्या सान्निध्यामुळं मला ग्लानी आलेली नाही. आपण देवांपेक्षाही श्रेष्ठ देव आहात. मला कधीच श्रम झाले नाहीत.'

'विशालनयने, मी तुझ्या धर्मानुकूल भाषणानं संतुष्ट झालो आहे. तू सत्यवानाच्या प्राणावाचून आणखी एक वर मागण्यास विलंब करू नकोस.'

'प्रभो, माझ्या पित्यास पुत्र नाही. मला शंभर सहोदर बंधू असावेत.'

'स्तुतियोग्य सावित्री, तू आल्या मार्गानं घरी जा. पतीच्या उत्तरक्रियेचा विचार कर. कारण परलोकी गेलेल्या पतीस परत आणण्यास तू समर्थ नाहीस. तू पतिव्रता असल्यामुळं थोडीशी माझ्या मागं येऊ शकलीस. कल्याणरूपिणी, या सत्यवानानं गुरुसेवारूपी साधन करून मोठं पुण्य संपादन केलं आहे, म्हणून मी याला घेऊन जातो. गुणवती, ज्ञान-

संपन्न पुरुषानं माता, पिता व गुरू यांची सेवा करावी. या सत्यवानानं निरंतर त्यांची सेवा केली आहे. म्हणून तू चिरकालपर्यंत याच्यासह स्वर्गात निवास करशील. मंगलकारके, तप, ब्रह्मचर्य, अग्निसेवा करून जसे पुरुष स्वर्गात जातात, तसेच ते गुरुसेवेनंही जातात. कल्याणी, माझ्या मागं येण्याचा तुझा मनोरथ पुरे. तू जो वर मागितलास तो तुला प्राप्त होईल. आता तू घरी जा.'

'देवश्रेष्ठा, आपल्या चरणांची सेवा उत्तम धर्मास कारण आहे. असा धर्म संपादन केल्यास मला ग्लानी येणार नाही. धर्माचा लाभ सर्व लाभांपेक्षा अधिक आहे. जीव कुठंही गेला तरी धर्मच त्याच्या मागं येतो. मित्र, बांधव कुणीच त्याच्याबरोबर जात नाहीत. प्राणिसंहारक देवा, ब्रह्मदेव, इंद्र, उपेंद्र (विष्णू), शिव, चंद्र, यम, सूर्य, अग्नी, वायू, वरुण, अष्टवसू, अश्विनीकुमार, कुबेर इत्यादी सर्व देव जीवास धर्मच संपादन करण्यास सांगतात. धर्मामुळंच त्यांचे मनोरथ सफल होतात. धर्मानंच सर्व काही प्राप्त होतं. राज्य, सन्मान, विद्या, रत्नं, सुवर्ण, चवऱ्या, वस्त्रं, चामरं, शृंगारसाधनं, उत्तम गंध, गायन, माला, गंध, वस्त्रं, रूप, औदार्य, सुंदर स्त्रिया इत्यादी सर्व धर्मामुळंच मिळतं. म्हणून यज्ञ, तप, दान इंद्रियनिग्रह, क्षमा, ब्रह्मचर्य, सत्य, तीर्थतीरावर उत्तम मरण, ब्रह्मयज्ञ, साधूची सेवा, देवपूजा, गुरूंची सेवा, ब्राह्मणांचं पूजन, वेदांचं अध्ययन, ब्रह्मचर्य इत्यादी साधनांनी पुण्य प्राप्त होतं.

'देवा, हे आयुष्य अनित्य आहे. म्हणूनच बालपणापासूनच धर्माचरण करावं. कारण आज कुणाला मृत्यू येणार हे कुणीही जाणत नाही. देवा, मृत्यू हा सर्वांसमोर असूनही लोक स्वतःस अमर समजतात हे महदाश्चर्य आहे. बालक तारुण्याच्या अपेक्षेनं मृत्यूस दूर समजतो. तरुण वृध्दाकडं पाहून मृत्यू दूर समजतो आणि वृध्द मृत्यूच्या मांडीवर बसूनही विषयांची इच्छा करतो! वृध्दावस्थेत पुत्रादिकांनी कितीही केलं तरी मृत्यू त्याची दुर्दशा करतोच. प्राणिमात्रांस कुठंही अभय नाही. सर्वत्र भय व मरण असतं. पण जे प्राणी सुकृत करतात, तेच स्वस्थ व निर्भय असतात.'

'विशालनयने, सावित्री, तुझ्या या धर्मयुक्त भाषणानं मी संतुष्ट

झालो आहे. तू या सत्यवानाच्या प्राणावाचून आणखी एक वर इच्छेला येइल तो वर माग.'

'देवा, पुत्रहीन प्राण्यास उत्तम लोकात गती प्राप्त होत नाही. आपण कृपा करून मला शंभर औरस पुत्र द्यावेत, अशी माझी प्रार्थना आहे.'

'सुशीले, सावित्री, माझ्या मागं येण्याचा हा तुझा मनोदय तू सोडून दे. तू जे मागितलंस ते सर्व तुला प्राप्त होईल. पण आता तू परत माघारी जा. तुझ्या येण्यानं माझ्या गमनास प्रतिबंध होतो आणि तुलाही श्रम होतात.'

'यमधर्मा, आपण धर्म व नीती यांना जाणणारे आहात. तुम्हीच जगाचे प्रभू असल्यामुळं सर्व प्रजा धर्मानं वागते. देवा, म्हणूनच यम या नावानं आपली प्रसिद्धी सर्वत्र आहे. प्रभो, आपण सर्व लोकांना धर्मानं सांभाळता, म्हणूनच आपणांस धर्मराज म्हणतात. सर्वांच्या मरणानंतर त्यांच्या पापपुण्यास अनुसरून तुम्ही त्यांच्या समीप जाता. म्हणून तुम्हांस मृत्यू हे नाव आहे. आपण सर्वांच्या आयुष्याचा काळ आहात. म्हणून काल हेही नाव आपणांस शोभतं. आपण सर्वांचा संहार करता, म्हणून आपणांस अंतक म्हणतात. आपण सूर्याचे पुत्र असल्यानं आपणांस वैवस्वत हे नाव आहे. आपण सर्वांनी आयुष्य क्षीण झालं की बळानं नेता, म्हणून प्राणहर हेही नाव आपणांस शोभतं. देवा, आपण साधूंना आश्रय आहात. जगदीशा, मी आपणांस शरण आले आहे.'

'धर्मज्ञानसंपन्न सावित्री, तुझ्या या भक्तीनं व स्तुतीनं मी प्रसन्न झालो आहे. तुझ्या या पतीस, सत्यवानास मी सोडून दिलं आहे. आता तुझा मनोरथ पूर्ण झाला आहे. आता तू घरी जा. हा सत्यवान तुझ्यासह पंचायशी वर्षं राज्य करील. नंतर तो उत्तम लोकात देवांसह क्रीडा करील. तुझ्या उदरी याच्यापासून शंभर पुत्र निर्माण होतील. ते चिरकाल पृथ्वीवर राज्य करतील. धर्मज्ञे, तू केलेल्या या स्तोत्रानं जे माझी स्तुती करतील, त्यांना दीर्घायुष्य प्राप्त होईल.'

असे म्हणून धर्मराजाने सत्यवानास पाशातून मुक्त केले व तो काल व मृत्यू यांसह गुप्त झाला. त्यानंतर सावित्री सत्यवान जेथे मरण पावला त्या ठिकाणी आली. त्या संध्याकाळी तिने आपल्या पतीचे

मस्तक मांडीवर घेतले. सत्यवानानें हळूहळू डोळे उघडले. तो सावित्रीस म्हणाला, 'प्रिये, जो मला देहातून बाहेर काढीत होता, तो कुठं आहे? तो कोण होता? या वनात आजचा दिवस निद्रेत फुकट गेला. तू उपवासानं म्लान झाली आहेस. तशात वनात आल्यानं दुःखी झाली आहेस आता आपण त्वरित निघू या.'

त्यावर सावित्री म्हणाली, 'प्राणनाथ, आता सूर्यास्त झाला आहे. आता आपण आपल्या आश्रमात जाऊ. कारण माझे सासरे नेत्रहीन आहेत. मी हे सर्व वृत्त त्यांना सांगीन.' असे म्हणून ती आपल्या आश्रमात येण्यासाठी निघाली. ती आश्रमात आली त्याच वेळी द्युमत्सेनराजास दृष्टी आली होती. त्यानें आपला पुत्र सत्यवान व सून सावित्री येत असल्याचे पाहिले. सत्यवानाने येऊन आपल्या मातापित्यांना नमस्कार केला. सत्यवानाने वनातील सर्व प्रकार सर्व तपोधन ऋषींना सांगितला. सावित्रीनेही सर्व हकीगत त्यांना कथन केली. त्याच रात्री सावित्रीनें वटसावित्रीचे व्रत यथाविधी समाप्त केले. द्युमत्सेनास पुनः राज्याची प्राप्ती झाली. सावित्रीस त्यानंतर शंभर बंधू झाले. अशा रीतीने या पतिव्रता राजकन्येने आपल्या पितृकुलाचा व पतिकुलाचा उद्धार केला. या उत्कृष्ट गुणवतीने आपल्या पतीसही यमपाशातून सोडविले. म्हणून पुरुषाने स्त्रियांचे निरंतर देवांप्रमाणे पूजन करावे. या साध्वी स्त्रियांच्या कृपेनेच त्रैलोक्याचे रक्षण होत असते.

★

# 3. तीर्थस्थानमाहात्म्य

## प्रयागला गेल्याने कोणते फल मिळते?

अध्याय एकशेतीन ते एकशेबारापर्यंत प्रयागतीर्थाचे माहात्म्य विविध अंगांनी वर्णन केले आहे. पूर्वी मार्कंडेयमुनींनी हे माहात्म्य पांडुपुत्र युधिष्ठिरास सांगितलें होते. महाभारत युद्ध समाप्त झाले. कुन्तीनंदन

युधिष्ठिरास बांधवांच्या हत्येनें अतिशय शोक झाला. तो चिंता करू लागला. 'हाय, राजा दुर्योधन अकरा अक्षौहिणींचा स्वामी होता. त्याचा नाश झाला. श्रीकृष्णांचा आश्रय घेतल्यानं आम्ही केवळ पांच पांडव वाचलो. सर्व प्रमुख वीरांना मारून आता हे राज्य कशासाठी घ्यायचं ? भोगांना काय करायचं ?' अशा विचारांनी राजा युधिष्ठिर चिंताग्रस्त झाला. आता आपण प्रायश्चित्त तरी कोणते घ्यावे ? कोणता व्रतोपवास करावा ? कोणत्या तीर्थाचे सेवन करावे ? या महापातकापासून मुक्त होऊन सर्वोत्तम विष्णुलोकास कसे जाता येईल ? श्रीकृष्णांना तरी कसे विचारावे ? त्यांनीच तर हे कर्म करायला लावले. अशा विचारांनी युधिष्ठिर व्याकुळ झाला. कुंती, द्रौपदी यांनाही शोक झाला.

यावेळी महर्षी मार्कंडेय वाराणसीत निवास करीत होते. त्यांना योगबलाने युधिष्ठिराच्या मनातील चिंता समजली. ते त्वरित हस्तिनापुरास आले. युधिष्ठिरानें त्यांचे मनापासून स्वागत केले. त्याने मुनींना सिंहासनावर बसविले. त्यांची पूजा केली. संतुष्ट होऊन मार्कंडेयांनी युधिष्ठिरास विचारले,

'राजन्, तू असा कष्टी का आहेस ? तुला चिंता कसली आहे ? कोणतं अमंगल झालं ?'

'महामुनी, राज्यप्राप्तीसाठी आम्ही जो व्यवहार केला, त्यानं मी चिंताग्रस्त झालो आहे.'

'महाबाहू राजा, रणक्षेत्रावर युद्ध केल्यास क्षत्रियास पाप नाही लागत.'

'महाप्राज्ञ, तरी आपण असं एखादं साधन सांगावं की, ज्यामुळं माझं हे पाप संपेल.'

'राजा, ऐक. सर्व पापांचा विनाश करण्यासाठी प्रयागगमन हेच श्रेष्ठ साधन आहे.'

'मुने, प्राचीनकाळी प्रयागची स्थिती कशी होती ? प्रयागाची यात्रा कशी करावी ? तिथं जाण्यानं, स्नान केल्यानं काय फल मिळतं ? हे सर्व मला सांगावं.'

## पुण्यप्रद प्रयागक्षेत्र

प्रयागात प्रतिष्ठानपुरापासून वासुकीह्रदापर्यंत जेथे कंबल, अश्वतर, बहुमूलक नामांचे नाग निवास करतात. ते स्थान तीनही लोकांत प्रजापतिक्षेत्र या नावाने प्रसिद्ध आहे. तेथे स्नान केल्यास स्वर्गाची प्राप्ती होते. तेथे मृत्यू झाल्यास पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. ब्रह्मादी देव तेथे राहाणाऱ्यांचे रक्षण करतात. सर्व पापांचा नाश करणारी अनेक तीर्थे आहेत. येथे साठ हजार धनुर्धर वीर गंगेचे रक्षण करतात. सात घोड्यांच्या रथातून जाणारा सूर्यदेव यमुनेची देखभाल करतो. श्रीहरी सर्व देवांना घेऊन या प्रयागमंडलाचे रक्षण करतात. महेश्वर हातात त्रिशूल घेऊन नेहमी वटवृक्षाचे रक्षण करतात. म्हणून अधर्मी पुरुष या प्रयागक्षेत्रात प्रवेश करू शकत नाही. प्रयागतीर्थाचे दर्शन, नामसंकीर्तन, तेथील मृत्तिकेचा स्पर्श यांनी मनुष्य पापातून मुक्त होतो.

या प्रयागक्षेत्रात पाच कुंडे आहेत. त्यांतून गंगा वाहाते. मनुष्य कितीही पापी असला तरी हजारो योजनांवर दूर असेना तो, पण गंगेचे स्मरण करीत असल्यास त्याला परम गती प्राप्त होते. गंगेच्या नामानेच, तिच्या दर्शनानेच, तिच्या स्नानानेच सात पिढ्यांची पापे नष्ट होतात. सत्यवादी, क्रोधरहित, अहिंसापरायण, धर्मानुगामी तत्त्वज्ञ, गोब्राह्मणांच्या हितात तत्पर राहून जो मनुष्य गंगा व यमुना यांच्या संगमात स्नान करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. त्याचे मनोरथ सफल होतात. येथे ब्रह्मचर्यपूर्वक राहून पितरांना तर्पण करावे. म्हणजे त्याला सर्व अभिलाषित पदार्थांची प्राप्ती होते. येथे सूर्यकन्या महाभागा यमुनानदी तीन लोकांत विख्यात असून ती भगवान शंकरांच्या निवासाने धन्य झाली आहे. हे पुण्यप्रद प्रयागक्षेत्र मनुष्यांना दुर्लभ आहे. देव, दानव, गंधर्व, ऋषी, सिद्ध, चारण आदी गंगाजलाचा स्पर्श करून स्वर्गलोकात विराजमान होतात.

## प्रयागाचे माहात्म्य

प्रयागाचे माहात्म्य ऐकल्याने मनुष्य सर्व पापांतून मुक्त होतो.

दुःखी, दरिद्री यांना तर हे प्रयागक्षेत्र उत्तम आहे. रोगग्रस्त, दीन, वृद्ध माणसाने येथे स्नान केले तर तो सुवर्णाच्या कांतीसारखा तेजस्वी बनून स्वर्गात जातो व सुंदर अप्सरांबरोबर आनंदाचा उपभोग घेतो. त्याला अभीष्ट मनोरथ प्राप्त होतात. तेथे सर्व रत्नांनी सुशोभित, अनेक रंगांच्या ध्वजांनी मंडित, अप्सरांनी समृद्ध, दिव्य विमानं यांच्यासहित तो दीव्य गीतांचा व वाद्यांचा अनुभव घेतो. त्यानंतर मात्र पुण्य क्षीण झाल्यावर त्याचे पतन स्वर्गातून खाली पृथ्वीवर होते. तो या प्रयागाची यात्रा करतो. मनुष्य देशात असो, विदेशात असो, घरात असो वा वनात असो, त्यानें प्रयागाचे स्मरण केले की, त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ती होते.

हा लोक कशा प्रकारचा असतो ? येथील भूमी सुवर्णमय असते. येथील वृक्ष इच्छेनुसार फल देतात. येथे मुनी, ऋषी व सिद्ध निवास करतात. येथे मनुष्य आपल्या पुण्यकर्मांच्या प्रभावाने हजारो स्त्रियांनी युक्त, मंगल व रमणीय मंदाकिनीच्या तटावर ऋषींच्यासह सुख भोगीत असतो. तो गुणवान व धनसंपन्न होतो. तो परत मृत्युलोकात आला तरी त्याला या गंगायमुनासंगमाची आठवण येते. तो देवपूजा व गोदान यांत रमतो.

## प्रयागमधील विविध तीर्थे, गंगामाहात्म्य

गोवंशास कष्ट देऊन मनुष्य घोर नरकात पडतो. गायींचा क्रोध मोठा भयंकर असतो. जो मनुष्य विधीस अनुसरून पुत्र, बालके यांना प्रयागात स्नान घालतो, गंगाजलाचे पान करवितो, ब्राह्मणांना दान देतो, त्याला सर्व फले प्राप्त होतात. जो मनुष्य ऐश्वर्याने युक्त होऊन बैलावर स्वार होऊन प्रयागला जातो, त्याचे तीर्थफल नष्ट होते. गंगा-यमुनेच्या संगमावर ऋषिप्रणीत विवाहविधीने आपल्या संपत्तीस अनुसरून कन्यादान करतो, त्याला नरकाचे दर्शन कधीच होत नाही. तो अक्षय-कालपर्यंत आनंदाचा उपभोग घेतो. त्याला सौंदर्यशाली स्त्रीपुत्रांची प्राप्ती होते. म्हणून आपल्या संपत्तीस अनुसरून येथे दान करावे. मग तीर्थाचे फल वाढत राहते. दानकर्ता प्रलयकालापर्यंत स्वर्गात निवास

करतो, यात संशय नाही.

जो मनुष्य प्रयागमधील अक्षयवटाखाली प्राणांचा त्याग करतो, तो रुद्रलोकात जातो. प्रलयकालीही सूर्य अक्षयवटास जाळू शकत नाही. प्रलयकाळी जेव्हा सूर्य, चंद्र, चौदा भुवनें नष्ट होतात, सारे जगत एकार्णवात जलात निमग्न होते, त्यावेळी श्रीभगवान विष्णू या प्रयागात यज्ञाराधनेत स्थित असतात. देव, दानव, गंधर्व, ऋषी, सिद्ध, चारण इत्यादी सदा या गंगायमुनेच्या संगमातील तीर्थाचे सेवन करतात. येथे प्रयागची स्तुती करून ब्रह्मादी देवगण, ऋषी, सिद्ध, चारण, लोकपाल, साध्यगण, पितर, सनत्कुमारादी ऋषी, अंगिरादी ब्रह्मर्षी, नाग, गरुड, आदी पक्षी, सिद्ध, आकाशाचारी जीव, सागर, नद्या, पर्वत, सर्प, विद्याधर यांच्यासह भगवान श्रीहरी येथे निवास करून असतात. हे प्रयागक्षेत्र पृथ्वीचे जघनस्थान आहे.

हे प्रयाग तीनही लोकांत विख्यात आहे. याखेरीज मोठे तीर्थ नाही. जो व्रतनिष्ठ मनुष्य या संगमात स्नान करतो, त्याला राजसूय व अश्वमेधयज्ञांचे श्रेय मिळते. या पृथ्वीवर दहा हजार तीर्थे आहेत. या मोठ्या तीर्थांखेरीज तीन कोटी अन्य तीर्थे आहेत. पण त्या सर्वांचा निवास या प्रयागात आहे. गंगायमुनेंच्या संगमावर प्राण सोडणाऱ्यास योगनिष्ठ व सत्यपरायण विद्वानास मिळणारी गती प्राप्त होते. ज्यांनी प्रयागची यात्रा केली नाही, ते या जगात असून नसल्यासारखेच आहेत. अशा या परमपदस्वरूप प्रयागतीर्थाचे दर्शन घेतल्यावर मनुष्याची सर्व पापे नष्ट होतात.

कंबल व अश्वतर हे दोन नाग यमुनेंच्या दक्षिणतटावर निवास करतात. येथे स्नान केल्यास, जलपान केल्यास मनुष्याची सर्व पापांतून मुक्तता होते. प्रयागक्षेत्रातील महादेवांच्या स्थानाची यात्रा केल्यास मनुष्याची मागील दहा पिढ्यांची पापे नष्ट होतात. येथे स्नान करणाऱ्या मनुष्यास अश्वमेधयज्ञाच्या फलाची प्राप्ती होते. गंगेच्या पूर्वतटावर विख्यात समुद्रकूप व प्रतिष्ठानपुर आहे. येथे मनुष्य तीन रात्री क्रोध-रहित होऊन ब्रह्मचर्यपूर्वक निवास करील, तर तो सर्व पापांपासून मुक्त होईल. त्याला अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होईल. भागीरथीच्या पूर्वतटावर

प्रतिष्ठानाच्या उत्तरेस 'हंसप्रपतन' नावाचे एक तीर्थ असून ते तीनही लोकांत प्रसिद्ध आहे. येथे स्नान केल्यास अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होते. येथील यात्रा करणारा मनुष्य चंद्र असेपर्यंत स्वर्गात प्रतिष्ठित होतो.

जो मनुष्य पुण्यप्रद उर्वशीरमण तथा विशाल हंसपांडुर नावाच्या तीर्थात आपले प्राण सोडतो, त्याला सहासष्ट हजार वर्षेपर्यंत पितरांसहित स्वर्गात स्थान प्राप्त होते. ऋषी, गंधर्व, किन्नर त्याची पूजा करतात. पुण्य क्षीण झाल्यावर तो मनुष्य स्वर्गातून पृथ्वीवर येऊन दहा हजार गावांचा भूपाल होतो. तो अनेक सहस्र नारींचा पती होतो. त्याला उर्वशीसारख्या शंभर कन्या प्राप्त होतात. तो करगोटा व नूपुर यांच्या झंकारशब्दांनी झोपेतून जागा होतो. असे प्रचुर भोग भोगून तो पुन्हा प्रयागतीर्थांची यात्रा करतो.

जो मनुष्य प्रयागतीर्थात एक मास श्वेत वस्त्र धारण करून, जितेंद्रिय होऊन नियमपूर्वक राहातो, एकदाच भोजन करतो, तो अनेक जन्मांत राजा होतो. समुद्रापर्यंतच्या पृथ्वीचा चक्रवर्ती सम्राट होतो. सुवर्णालंकारांनी विभूषित अशा शेकडो स्त्रिया त्याला प्राप्त होतात. तो धनधान्यांनी संपन्न होऊन नित्य दान करीत असतो. असे प्रचुर भोग भोगून तो पुन्हा प्रयागतीर्थाची यात्रा करतो.

जो मनुष्य रमणीय संध्यावटाच्या छायेत ब्रह्मचर्यपूर्वक जितेंद्रिय व निराहार राहून पवित्रभावाने संध्योपासना करतो, त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. जो मनुष्य कोटितीर्थास जाऊन प्राणांचा परित्याग करतो, त्याला कोटचवधी वर्षांपर्यंत स्वर्गात प्रतिष्ठा प्राप्त होते. त्यानंतर पुण्य क्षीण झाल्यावर तो स्वर्गातून परत सुंदर रूप धारण करून पृथ्वीवर येतो. सुवर्ण, मणी, मोती यांनी समृद्ध अशा कुलात तो जन्म घेतो. यानंतर वासुकिह्रदाच्या उत्तरेस भोगावती नावाचे एक तीर्थ आहे. येथेच दशाश्वमेध नावाचे आणखी एक तीर्थ आहे. तेथे स्नान करणाऱ्या मनुष्यास अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होते. तो संपत्तिशाली, सौंदर्यसंपन्न, चतुर दानी व धर्मात्मा होतो. वेदांच्या अध्ययनाने जे पुण्य मिळते, सत्य भाषणाने जे पुण्य मिळते, अहिंसाव्रताने जे पुण्य मिळते; ते सर्व प्रयागच्या

यात्रेनें प्राप्त होते. गंगेत स्नान केले की कुरुक्षेत्रासारखे फल मिळते. पण जेथे गंगा विंध्यपर्वताशी संयुक्त झाली आहे, तेथे ती कुरुक्षेत्रापेक्षा दसपट फलदायी होते.

अनेक तीर्थांनी युक्त, महाभाग्यशालिनी, तपस्विनी गंगा वाहाते, त्या स्थानाला सिद्धक्षेत्र मानतात. गंगा भूतलावर मनुष्यांना, पाताळात नागांना, स्वर्गात देवांना तारते. म्हणून ती 'त्रिपथगा' आहे. मृत प्राण्यांची हाडे जितकी वर्षे गंगेत असतात, तितकी वर्षे ते स्वर्गात प्रतिष्ठित होतात. गंगा सर्व तीर्थांत उत्तम आहे. नद्यांत महानदी आहे. महान पापे करणाऱ्यांना मोक्षदायिनी आहे. गंगा तर सर्वत्र अगदी सुलभ आहे. पण गंगाद्वार, प्रयाग, गंगासागरसंगम यांना दुर्लभ मानले आहे. या स्थानी स्नान केल्यास मनुष्य स्वर्गलोकास जातो. येथे शरीरत्याग करणाऱ्यास पुनः जन्म घ्यावा लागत नाही. ज्यांचे चित्त पापी आहे, त्यांना गंगेशिवाय गती नाही. महेश्वरांच्या जटाजूटापासून निघालेली मंगलमयी गंगा सर्व पापे हरण करणारी आहे. ही पवित्रांत पवित्र व सर्व मंगलांत मंगलरूपा आहे.

## प्रयागमधील आणखी काही तीर्थे

प्रयागचे माहात्म्य ऐकूनहीं मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. गंगेच्या उत्तरतटावर मानस नावाचे एक तीर्थ आहे. येथे तीन रात्री निराहार राहून निवास करणाऱ्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. गाय, पृथ्वी व सुवर्ण यांचे दान करण्याने जे फल मिळते, तेच फल या मानसतीर्थाच्या स्मरणाने मिळते. जो मनुष्य निष्काम भावनानें गंगेत स्नान करतो, त्याला स्वर्ग प्राप्त होतो. त्याला नरकाचे दर्शनही होत नाही. तो हंस व सारस यांनी युक्त अशा विमानात बसून देवलोकास जातो. तो तेथे त्याची झोप अप्सरांच्या मधुर गायनाने संपवितो. अशा रीतीने तो अनेक हजार वर्षांपर्यंत स्वर्गसुखाचा लाभ घेतो. पुनः पुण्यकर्म क्षीण झाल्यावर तो सुवर्ण, मणी, मोती यांनी संपन्न अशा कुलात जन्म घेतो.

माघमासात गंगायमुनासंगमात स्नान केले तर, सहासष्ट हजार तीर्थांत स्नान केल्याचे पुण्य प्राप्त होते. एक लाख गायींचे दान केल्याचे

फल मिळते. गंगायमुनासंगमावर कषाग्नीची साधना केल्यास मनुष्य सर्व अंगांनी संपन्न, निरोगी व पांच कर्मेद्रियांनी स्वस्थ होतो. या प्राण्याच्या अंगावर जितके रोमकूप असतात, तितकी सहस्र वर्षे तो स्वर्गात प्रतिष्ठित होतो. त्याचे पुण्य क्षीण झाले की, तो स्वर्गातून च्युत होऊन भूतलावर जंबूद्वीपाचा अधिपती होतो. तेथे तो प्रचुर भोग भोगतो. प्रयागतीर्थास तो येतो.

चंद्रग्रहणाच्या दिवशी जो मनुष्य संगमाच्या जलात प्रवेश करतो, तो सर्व पापांतून मुक्त होऊन सोमलोकांस जातो. तेथे चंद्रासह तो आनंदाने राहातो. यानंतर साठ हजार वर्षे तो स्वर्गलोक व ऋषी, गंधर्व यांनी सेविलेल्या इंद्रलोकात राहातो. स्वर्गातून च्युत होऊन तो पृथ्वी-वरील समृद्ध कुलात जन्म घेतो. जो मनुष्य प्रयागक्षेत्रात शिर खाली व पाय वर करून अग्नीच्या ज्वालांचे पान करतो, तो एक लाख वर्षेपर्यंत स्वर्गलोकात प्रतिष्ठित होतो. स्वर्गातून च्युत झाल्यावर तो भूतलावर अग्निहोत्री होतो. येथे प्रचुर भोग भोगून तो पुनः प्रयागाची यात्रा करतो.

जो मनुष्य प्रयागमध्ये राहून आपल्या शरीराचे मांस पक्ष्यांना खायला देतो, त्याला एक लाख वर्षेपर्यंत सोमलोकात प्रतिष्ठा मिळते. तेथून तो च्युत झाल्यावर या लोकात धर्मात्मा, गुणसंपन्न, सौंदर्यशाली, विद्वान, प्रियभाषी राजा होतो. येथे प्रचुर भोग भोगून नंतर तो प्रयागाची यात्रा करतो. प्रयागाच्या दक्षिणतटावर व यमुनेच्या उत्तरतटावर ऋणप्रमोचन नावाचे परम श्रेष्ठ तीर्थ आहे. तेथे एक रात्र निवास केल्यास, स्नान केल्यास मनुष्य सर्व ऋणांतून मुक्त होतो. तो ऋणरहित होऊन स्वर्गलोकी जातो.

## प्रयागात अनशनव्रत, यमुनामाहात्म्य

प्रयागात जे श्रद्धाळू विद्वान इंद्रियांना वश करून अनशनव्रताचे पालन करतात, ते सर्व अंगांनी संपन्न, निरोगी, पांच कर्मेंद्रियांनी स्वस्थ होतात. ते चालताना त्यांच्या प्रत्येक पावलावर अश्वमेधयज्ञाचे फल प्त होते. ते आपल्या पुढल्या दहा व मागल्या दहा कुलांचा उद्धार

करून सर्व पापांपासून मुक्त होतात व परमपदास जातात.

यानंतर राजा युधिष्ठिराने मार्कंडेयांना एक प्रश्न विचारला. तो म्हणाला, 'प्रभो, आपण मला धर्माचं माहात्म्य सांगत आहात. एका बाजूनं असं दिसतं की, धर्माची प्राप्ती थोडयाच प्रयत्नानं होते आणि दुसऱ्या बाजूनं असं दिसतं की, दशाश्वमेधसदृश अनेक व्रतं करून धर्माची प्राप्ती होते. आपण या माझ्या संदेहाचं निवारण करावं.'

या प्रश्नाचे उत्तर मार्कंडेयांनी दिले. प्रयागाचे मंडल पांच योजने आहे. या भूमीवर पाऊल ठेवताच पावलोपावली अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होते. जो मनुष्य या प्रयागमंडलात आपल्या प्राणांचा त्याग करतो, तो पूर्वीच्या सात पिढयांचा व पुढील चौदा पिढयांचा उद्धार करतो. म्हणून मनुष्याने प्रयागाचे सेवन करावे. ज्याच्या मनात श्रद्धा नाही, ज्याचे चित्त पापांनी आच्छादित आहे, अशा पुरुषाने देवांकडून सुरक्षित असलेल्या या प्रयागक्षेत्रात प्रवेश करू नये. प्रयागास लोक स्नेहाने, धनाच्या लोभाने जातात, त्यांना कोणत्या तीर्थफलाची प्राप्ती होते ? कर्तव्य, अकर्तव्य यांच्या ज्ञानाने विहीन असणाऱ्यांना गती कोणती मिळते ? या युधिष्ठिराच्या प्रश्नांचेही उत्तर मार्कंडेयांनी दिले.

जो मनुष्य जितेंद्रिय, श्रद्धायुक्त, अहिंसाव्रती होऊन पवित्र भावाने नियमपूर्वक राहून या प्रयागात एक मासभर राहील, स्नान करील त्याची सर्व पापे नष्ट होतील. त्याला परमपदाची प्राप्ती होते. प्रयागात तीनही काळी स्नान करून, भिक्षा मागून भोजन केल्यास तोही पापांतून मुक्त होतो. जो मनुष्य अजाणता प्रयागाची यात्रा करतो, त्याच्याही सर्व कामना पूर्ण होतात. तो स्वर्गलोकी प्रतिष्ठित होतो. धनधान्यांनी परिपूर्ण अशा अविनाशी पदाची त्याला प्राप्ती होते. जो जाणूनबुजून नियमानुसार या प्रयागाची यात्रा करतो, तो सर्व भोगांनी संपन्न होतो. आपल्या पितरांचा उद्धार तो करतो. या प्रयागतीर्थाचे नाव घेतल्यानेही, याचे श्रवण केले तरीही पापाचा नाश होतो.

यानंतर युधिष्ठिराने विचारले, 'महामुने, यमुनेत स्नान करण्यानं कोणतं पुण्य प्राप्त होतं ? कोणतं फल प्राप्त होतं ?' या प्रश्नाचे सविस्तर उत्तर मार्कंडेयांनी दिले. महाभागा यमुनादेवी सूर्याची कन्या आहे.

ती तीनही लोकांत विख्यात आहे. संगमस्थानावर हिला विशेष ख्याती प्राप्त झाली आहे. जेथे गंगेचा उगम होतो, तेथेच यमुनाही निर्माण झाली आहे. हिचे नाव हजार योजनांपासून घेतले तरी त्याच्या पापांचा नाश होतो. यमुनेत स्नान, जलपान व तिचे नामसंकीर्तन यांनी पुण्याची प्राप्ती होते. आपल्या सात कुलांना पवित्रता मिळते. यमुनातटावर जो आपल्या प्राणांचा त्याग करतो, त्याला परमगतीची प्राप्ती होते.

यमुनेच्या दक्षिणतटावर सुप्रसिद्ध अग्नितीर्थ आहे. पश्चिमदिशेस धर्मराजतीर्थ आहे. ते नरक या नावाने प्रसिद्ध आहे. येथे स्नान करून मनुष्य स्वर्गलोकात जातो. त्यास पुनर्जन्म येत नाही. अशा प्रकारे यमुनातटावर हजारो तीर्थे आहेत. यमुनेच्या उत्तरतटावर धर्मात्मा सूर्याचे नीरुजक (निरंजन) नावाचे तीर्थ आहे. येथे इंद्रासहित सर्व देव त्रिकाल संध्योपासना करतात. देव व सर्व विद्वज्जन या तीर्थाचे सदा सेवन करतात. अशी अनेक तीर्थे पापांचा नाश करणारी आहेत. गंगा व यमुना या दोनही नद्या समान फल देणाऱ्या आहेत. केवळ ज्येष्ठ असल्याने गंगेची पूजा सर्वत्र होते. जो मनुष्य प्रातःकाळी उठून या माहात्म्याचा पाठ करतो, श्रवण करतो, त्याची सर्व पापे नष्ट होतात. तो स्वर्गलोकास जातो.

## अन्य तीर्थांच्या संदर्भात प्रयागमाहात्म्य

प्रयागासंबंधी आणखी काही माहिती मार्कंडेयांनी युधिष्ठिरास सांगितली. या तीर्थांत सोमतीर्थ नावाचे एक महान पुण्यप्रद तीर्थ सर्व पातकांचा नाश करणारे आहे. युधिष्ठिराने पुन्हा त्यांना विचारले, 'महामुने, या भूतलावर नैमिशारण्य नावाच्या वनात पुष्कर नावाचं तीर्थ आहे. कुरुक्षेत्रही आहे. पण या सर्वांना सोडून लोक प्रयागाची प्रशंसा का करतात ? आपण त्याची एवढी स्तुती का करता ?' या प्रश्नाचे उत्तर विस्ताराने मार्कंडेयांनी दिले.

अश्रद्धाळू, अपवित्र, दुर्बुद्धी, मांगलिक कार्यांपासून विन्मुख; हे सर्व पापी आहेत. आता प्रयागाचे माहात्म्य पाहावे. ब्रह्म सर्व प्राण्यांत विराजमान असते. ब्राह्मणात त्याचा अंश विशेष प्रकारचा असतो.

त्याचप्रमाणे विद्वान लोक सर्व तीर्थांपेक्षा प्रयागाचे माहात्म्य विशेष मानतात. हे तीर्थ खरोखरच पूजनीय आहे. या प्रयागाचे स्मरण ब्रह्मही करीत असते. असे तीर्थ मिळाल्यावर मनुष्यास अन्य वस्तू प्राप्त करण्याची इच्छा होत नाही. देवत्व प्राप्त झाल्यावर कोण मनुष्य बनण्याची इच्छा करील ?

जो मनुष्य पृथ्वी, गाय, अग्नी, ब्राह्मण, शास्त्र, कांचन, जल,स्त्री माता, पिता यांची निंदा करतो, त्याची ऊर्ध्वगती होत नाही. असे प्रजापती ब्रह्माने म्हटले आहे. कर्मे करून योगाची प्राप्ती करून घेणे दुर्लभ आहे. कारण मनुष्य नित्य पापकर्मांतच रमतो. असा मनुष्य घोर नरकात जातो. जो मनुष्य हत्ती, घोडा, बैल, मणी, मोती, सुवर्ण आदी दुसऱ्याचे चोरतो, नंतर त्याचे दान करतो, तो स्वर्गात जात नाही. स्वत:ची वस्तू दान करणारा सुख भोगतो. अशा प्रकारे योग, धर्म,दाता, सत्य, असत्य, अस्ति, नास्ति यांचे जे काही फल आहे ते सांगितले आहे.

## प्रयागात सर्व तीर्थे

विद्वानांचे असे सांगणे आहे की, नैमिशारण्य, पुष्कर, गोतीर्थ, सिंधुसागर, गयातीर्थ गयेशेजारचे धेनुक, गंगासागर; अशी आणखी तीन कोटी दहा हजार अन्य तीर्थे आहेत. ही सर्व पुण्यप्रद असून प्रयागात नित्य निवास करतात. येथे तीन अग्निकुंडे आहेत. यांतून सर्व तीर्थांकडून नमस्कृत अशी गंगानदी प्रवाहित होऊन प्रयागाच्या पुढे जाते. याच प्रकारे तीनही लोकांत विख्यात अशी सूर्यपुत्री यमुनादेवी येथे गंगेशी मिळाली आहे. गंगा व यमुना यांचा हा मध्यभाग पृथ्वीचा जघनभाग आहे. भूतल, अंतरिक्ष, स्वर्गलोक यांत मिळून साडेतीन कोटी तीर्थे आहेत. पण ही सर्व प्रयागस्थित गंगेच्या सोळाव्या अंशाबरोबरही नाहीत; असे वायूने म्हटलें आहे. म्हणून गंगेची प्रधानता मानली आहे. प्रयागात कंबल व अश्वतर नाग आहेत. येथे भोगावतीतीर्थ आहे. येथे प्रजापतींची वेदी आहे. येथे शरीरधारी वेद व यज्ञ, तपोधन महर्षिगण ब्रह्माची उपासना करतात. येथे देवगण व चक्रवर्ती सम्राट यज्ञांनी समृद्ध बनतात.

तीनही लोकांत प्रयागपेक्षा मोठे अन्य तीर्थ कोणतेही नाही. सर्वांत अधिक प्रभावशाली महाभागा गंगा येथे वर्तमान आहे. हा देश तपोमय आहे. गंगेच्या भोवतीचा प्रदेश सिध्दक्षेत्र आहे. हे प्रयागमहात्म्य धन्य, स्वर्गप्रद, सत्य, सुखदायक, पुण्यप्रद, धर्मसंपन्न, परमपावन, श्रेष्ठ धर्मस्वरूप व सर्व पापांचा विनाश करणारे आहे. हे महर्षींनाही गोपनीय आहे. हे पाठ केल्यास द्विज पापरहित होतो. हे पुण्यप्रद तीथमाहात्म्य ऐकून त्याला जातिस्मरत्व (पूर्वजन्मीची आठवण) प्राप्त होते. तो स्वर्गलोकात आनंदाचा अनुभव घेतो.

## प्रयागात ब्रह्मदेव, विष्णू व शिव यांचा निवास

या प्रयागात सर्व जगताचा निवास असतो. येथे अविनाशी व सामर्थ्यशाली ब्रह्मदेव, विष्णू, शिव इत्यादी देव वास करतात. ब्रह्मदेव, विष्णू व शिव कोणत्या कारणासाठी प्रयागात निवास करतात? प्रयागाचे मंडल पाच योजनांपर्यंत आहे. येथे पापकर्माचे निवारण व प्राण्यांचे रक्षण करण्यासाठी देवगण निवास करतात. प्रतिष्ठानपुराच्या उत्तरेस गुप्तरूपाने ब्रह्मदेव निवास करतात. भगवान विष्णू प्रयागात वेणीमाधव-रूपात विद्यमान आहेत. परमेश्वर शिव अक्षयवटरूपात स्थित आहेत.

यांच्या खेरीज गंधर्वासह देवगण, सिध्दसमूह, परमऋषी या प्रयाग-क्षेत्राचे रक्षण करतात. या क्षेत्रात अनेक पापांचे हवन करून प्राणी नरकाचे दर्शन घेत नाहीत. प्रयागात अशा प्रकारे ब्रह्मदेव, विष्णू शिव, सात द्वीपे, सात समुद्र, सर्व पर्वत रक्षण करण्यासाठी तत्पर आहेत. हे प्रजापती ब्रह्मदेवांचे क्षेत्र आहे. हे प्रयाग पुण्यप्रद व परम पवित्र आहे.

## भगवान वासुदेवांकडून प्रयागाचे माहात्म्य

यानंतर धर्मराज युधिष्ठिराने आपले बंधू व पत्नी द्रौपदी यांच्या-सह ब्राह्मणांना नमस्कार करून गुरुजनांना तर्पण केलें. भगवान वासु-देवही अकस्मात तेथे आले. तेव्हा सर्व पांडवांनी श्रीकृष्णांची पूजा केली. सर्व महात्म्यांनी व श्रीकृष्णांनी धर्मपुत्र युधिष्ठिरास राज्यावर अभिषेक केला. मार्कंडेयांनीही त्याला 'स्वस्ति. तुझं कल्याण असो.' असा आशी-

र्वाद दिला. युधिष्ठिर आपल्या बंधूंसह तेथे दान देऊन निवास करू लागला. जो प्रातःकाली उठून या माहात्म्याचा पाठ करील, त्याला परमपदाची प्राप्ती होते. तो सर्व पापांतून मुक्त होऊन रुद्रलोकास जातो.

यावेळी भगवान वासुदेवांनीही प्रयागचे माहात्म्य युधिष्ठिरास सांगितले. प्रयागक्षेत्री जाऊन नित्य भगवानांचा जप करावा. हवन करावे. असे केल्याने स्वर्गाची प्राप्ती होईल. जो मनुष्य प्रयागची यात्रा करतो, अथवा तेथे निवास करतो, त्याचा आत्मा सर्व पापांतून मुक्त होतो. तो रुद्रलोकास जातो. जो प्रतिग्रहापासून विमुख, संतुष्ट, जितेंद्रिय, पवित्र, अहंकारापासून दूर आहे, त्यालाच फलाची प्राप्ती होते. जो क्रोधरहित आहे, इमानदार आहे, सत्यवादी आहे, दृढव्रत आहे, सर्व प्राण्यांशी स्वतः-प्रमाणेच व्यवहार करतो, तोच तीर्थफलाचा भागीदार होतो. सर्व ऋषींनी व देवांनी यज्ञांचे विधान सांगितले आहे. या यज्ञांचे अनुष्ठान निर्धन मनुष्य करू शकणार नाही. कारण यज्ञांसाठी अनेक उपकरणी व सामग्री लागते. यांचे अनुष्ठान राजा अथवा समृद्ध पुरुषच करील. म्हणून या यज्ञांपेक्षा श्रेष्ठ यात्रा प्रयागची आहे. दहा हजार तीर्थे व तीन कोटी नद्या माघमासात गंगेत येऊन निवास करतात.

असे सांगून भाग्यशाली व तेजस्वी वसुदेवनंदन श्रीकृष्ण अंतर्धान पावले. त्यानंतर युधिष्ठिरांनें सहकुटुंब जाऊन प्रयागक्षेत्री विधिवत स्नान केले. त्याला परमशांतीचा लाभ झाला.

## ऐरावतीनदी

यानंतर एकशे सोळाव्या अध्यायात ऐरावतीनदीचे वर्णन आले आहे. ही नदी हिमालयापासून निघाली असून तिच्यात जलक्रीडेसाठी गंधर्व व इंद्रादी देव येतात. तिच्या तटांवर तपस्वी लोकांचे आश्रम आहेत. श्रेष्ठ ब्राह्मण तिचे सेवन करतात. ही पुण्यनदी शीतल जलाने परिपूर्ण, मनोहारिणी, मनाची प्रसन्नता वाढविणारी, ऱ्हास व वृद्धी यांनी युक्त, रमणीय, चंद्रमूर्तीसारखी उज्ज्वल, वेगाने वाहणारी, ब्राह्मण व पक्षी यांनी सेवित, तपस्व्यांनी सुशोभित, पापांचा नाश करणारी, सर्व-

श्रेष्ठ, समुद्राची पट्टराणी, महर्षिगणांनी सेवित, सर्व लोकांच्या मनांत उत्सुकता निर्माण करणारी, परम मनोहर, सर्व लोकांची हितकारिणी, स्वर्गाचा मार्ग दाखविणारी, गोसमूहांनी व्याप्त, परमसुंदर, शेवाळरहित, हंस व सारसपक्षी यांच्या शब्दांनी गुंजित, कमलांनी सुशोभित, भ्रमररूपी खोल नाभीने युक्त, द्वीपरूपी ऊरू व जघनभाग असलेली, निळ्या कमलरूपी नेत्रांनी शोभणारी, फुललेल्या कमलासारख्या मुखाची, बर्फरूपी उज्ज्वल श्वेतरूपी वस्त्राने युक्त, चक्रवाकरूपी ओठांची, कल्याणमयी, बगळ्यांच्या पंक्तीसारखे दात असणारी, चंचल मत्स्यांच्या ओळीसारख्या भुवया असणारी, हत्तींच्या रमणीय गंडस्थळरूपी स्तनांनी शोभणारी, हंसरूपी नूपुरांच्या झंकाराने युक्त व कमलनालरूपी कंकणांनी सुशोभित अशी आहे.

## हिमालयाचे अद्‌भुत सौंदर्य

एकशे सतराव्या अध्यायात राजा पुरूरव्याने ऐरावतीनदीनंतर महान हिमालयपर्वत पाहिला. त्याची शिखरे गगनचुंबी होती. तेथे केवळ सिद्ध लोकच राहात असत. तेथे नद्यांच्या प्रवाहांचा घर्घर आवाज होत असतो. त्यावर देवदारवृक्षांची निळसर वने होती. मेघांची उत्तरीय वस्त्रे होती. शीतलता, मोठमोठे वृक्ष, अप्सरांची चरणचिन्हे, भयानक गुंफा, विद्याधर, किन्नर, अप्सरा, कल्पवृक्ष, गंधर्व यांनी तो संपन्न होता. तो पर्वत तपस्व्यांचे आश्रयस्थान होता. कामी जनांना तो अत्यंत दुर्लभ होता. त्यावर मृग आदी वन्य पशू स्वच्छंदाने विहार करीत होते. सिंहांच्या गर्जनेने हत्तींचे त्यावरील कळप व्याकुळ होत असत. तेथील प्रदेश कुंज व तपस्वी यांनी अलंकृत होता. तेथे वासुकी आदी नागांची आश्रयस्थाने होती. येथे तपस्वी तपोरत होते. लहानमोठ्या झऱ्यांनी तो प्रदेश रमणीय वाटे. विशाल वृक्ष, गुंफा, वेली यांनी हा प्रदेश समृद्ध झाला होता.

हा हिमप्रदेश मेघाप्रमाणे श्यामल होता. त्याला अनेक प्रकारचे वृक्षसमूह होते. शाल (साखू), ताल (ताड), तमाल, कर्णिकार (कण्हेर), शामल, न्यग्रोध (वड), अश्वत्थ (पिंपळ), शिरीष, शिंशपा, श्लेष्मातक,

आमलक, हरीतक, बिभीतक(बेहडा), भूर्ज, मुंजक, बाणवृक्ष, सप्तच्छद, महानिंब, लिंब, निर्गुडी, हरिद्रुम, देवदारू, कालेयक, पद्मक, चंदन, बेल, कैथ, लाल चंदन, आम्रात (एकलता), अरिष्टक (रिठा), अक्षोट, अब्दक (नागरमोथा), अर्जुन, हस्तिकर्ण (पलाश), कोविदार, प्राचीनामलक, धनक, मराटक, खजूर, नारळ, प्रियाळ, आम्रातक, इंगुद, तंतुमाल, धव, काश्मरी, शालपर्णी, जायफळ, सुपारी, कटुफल, वेलदोडा, मंदार, कोविदार, किंशुक, कुसुमांशुक, यवास, शमी, तुलसी, बेत, नारंगी, हिंगू, प्रियंगू इत्यादी वृक्षांनी तो पर्वत शोभत होता.

लाल अशोक, अशोक, आकल्ल, अविचारक, मुचुकुंद, कुंद, आटरूष (अडूळसा), परुषक, किरात, किंकिरात, केतकी, सफेद केतकी, शौभांजन, अंजन, कलिंग, निकोटक(अंकोल), विजयसाल, असना, आम्र, पिवळी जुई, सफेद जुई, मालती, चंपा, तुंबर, अतुंबर, मोच, लोच, लकुच, तीळ, कमल, पुष्पांकुरांनी व प्रफुल्ल फुलांनी युक्त असे चव्य, बकुल, पारिभद्र, हरिद्रक, धाराकदंब, कुटज, कदंब, आदित्यमुस्तक, कुंभ, कुंकुम, कटुफल, बोर, पाली, श्वेत डाळिंब, चंपा, बंधूक(दुपारी), सबंधूक(तीळ), कुंजांचे समूह, लाल गुलाबाची फुले, मल्लिका, करवीर, कुरबक, हिमवर, जंबू, नृपजंबू (मोठे जांभूळ), कापूर, गुरू, अगुरू, बिंब, प्रतिबिंब, संतानक; इत्यादी वृक्षांनी तो प्रदेश समृद्ध होता.

गुग्गुळवृक्ष, हिंताल, श्वेत ऊस, केतकी, करवीर, अशोक, चक्रमर्दन, पीलू, धातकी, तिंतिडीक, लोध्र,विडंग,क्षीरिकाद्रुम, अश्मन्तक, काल, जंबीर, श्वेतक, भल्लातक, इंद्रयव, वल्गुज, सिंदुवार, करमर्द, कासमर्द, अविष्टक, वरिष्टक, रुद्राक्ष, द्राक्ष, सप्तपर्ण, पुत्रजीवक, कंकोलक, लवंग, त्वग्द्रुम (दालचिनी), पारिजात; इत्यादी वृक्ष त्या पर्वतावर शोभत होते. पिपली वा नागरवल्लींच्या लता त्यावर पसरलेल्या होत्या. काळी मिरची व नवमल्लिका यांच्या लतांचे कुंज बनले होते. द्राक्ष व माधवीलता यांचे मंडप तेथे शोभत होते.

कोठे श्वेतकमल, रुरूट, स्वादुकंटक, भांडीर, विदूसार, राजजंबूक, वालुक, सुवर्चला(सूर्यमुखी)अशा अनेक वृक्षांनी हिमालय शोभून दिसत होता. कंकोळ, क्षीरकाकोली, छत्र, अतिछत्र, कासमर्दी, कंदल, कांडक,

क्षीरशाक, कालशक इत्यादी शाकांच्या झुडपांनी त्याची शोभा वाढविली होती.

तेथे आयुष्य, यश, बल प्रदान करणाऱ्या, वृद्धावस्था व मृत्यू यांचे भय दूर करणाऱ्या, तहान व भूक यांचे कष्ट निवारण करणाऱ्या सर्व प्रकारच्या औषधी होत्या. तेथे सुवासिक लता होत्या. वेणुवनात मधुर आवाज होत असे. कासपुष्पे, शरगुल्मे, कुश, ऊस, दुर्लभ कापूस, मालती इत्यादी वृक्षांनी व लतांनी तेथील शोभा वाढली होती. तगर, अतिविषा, जटामासी, गुग्गुल यांचा सुगंध तेथे पसरला होता. कण्हेरवृक्ष, जंबीर-वृक्ष, शृंगवेर, अजमोदा, कुबेरक, प्रियालक यांचे वृक्षही तेथे होते. तेथे अनेक रंगांची सुगंधित फुले फुलली होती. या वनस्थलीच्या दर्शनाने दृष्टीला आनंद होत होता. उत्पल, कल्हार, शृंगाटक, कमलनाल, करट यांनी तेथील शोभा वाढली होती.

नागलोक, स्वर्गलोक, मृत्युलोक; इत्यादी लोकांतील सर्व प्रकारची धान्ये, शाक, फळे, मुळे, कंद, फुले येथे विद्यमान होती. वृक्ष ऋतूंना अनुकूल फळांफुलांनी समृद्ध होते. तेथे अनेक रंगांचे, रूपांचे पक्षी राजा पुरूरव्याने पाहिले. मोर, शतपत्र, कलविंक, कोकिळ, कलहंस, हंस, जलकुक्कुट, खंजरीट, कुरर, कालकूट, खट्वांग, गोक्ष्वेडक, कुंभ (डोमकावळा), धार्तराष्ट्र, पोपट, बगळे, चक्रवाक, कर्कश ध्वनी करणारे पक्षी, तीतर, टिटवी, शरभ, लोहपृष्ठ, गोचर्म, गिरिवर्तक, कबूतर, सारस, मैना, जीवजीवक (चकोर), लवा, वर्तक, वार्ताक, रक्तवर्त्म, प्रभद्रक(हंसांचा प्रकार), ताम्रचूड, स्वर्णचूड, कोंबडा, काष्ठकुक्कुट, कपिंजल, कलविंक, कुंकुमचूड, भृंगराज, सीरपाद (मोठा सारस), भूलिंग, डिंडिम, नव (काक), मंजुलीतक, दात्यूह, भारद्वाज, चाष (नीलकंठ); इत्यादी पक्ष्यांचे समूह त्याने पाहिले.

त्याचप्रमाणे हरणे, वाघ, सिंह, चित्ते, शरभ, अस्वले, वानरे,ससे, रानमांजरे, मत्त हत्ती, म्हशी, नीलगायी, बैल, चमर, सृमर, गाढवे, बकरी, कुत्री, मृग, कस्तुरीमृग, अष्टपदी शरभ, क्रौंचपक्ष्याच्या आकाराचे शंबर, भयानक कृतमाल, उंट, गेंडे, डुकरे, घोडे, खेचरे; अशा अनेक वन्य पशूंनी तो प्रदेश समृद्ध होता.

## कैलासपर्वत, गंगेच्या सात धारा

यानंतर एकशे एकविसाव्या अध्यायात कैलासपर्वताचे वर्णन आले असून गंगेच्या सप्तधारांचेही विवरण आले आहे. हिमालयातील अत्रींच्या आश्रमाच्या उत्तरेस हिमालयाच्या पृष्ठभागात कैलास नावाचा पर्वत आहे. त्यावर त्रिपुरासुराचे संहारक शंकरांचा निवास आहे. त्या शिखरावर नाना प्रकारची रत्ने व कल्पवृक्ष आहेत. याच पर्वतावर श्रीमान कुबेर गुह्यकांसह निवास करतो. कैलासाच्या पायथ्याशी मंदोदक नावाचे एक सरोवर आहे. त्याचे जल मोठे पवित्र, निर्मल व शीतल आहे. ते दह्याप्रमाणे उज्ज्वल आहे. याच सरोवरापासून मंगलमयी दिव्य मंदाकिनी नदी प्रवाहित झाली आहे. त्या नदीच्या तटावर नंदन नावाचे एक महान दिव्य वन आहे. कैलासाच्या पूर्वोत्तर दिशेस चंद्रप्रभ नावाचा पर्वत असून तो रत्नांप्रमाणे चमकतो. तो सर्व धातूंनी विभूषित व अनेक प्रकारच्या सुगंधांनी समृद्ध असून सुवेलपर्वतापर्यंत फैलावलेला आहे. त्याच्या जवळ अच्छोद नावाचे एक दिव्य सरोवर आहे. त्यापासून अच्छोदिका (अच्छोदा) नावाची कल्याणमयी नदी प्रवाहित झाली आहे. या नदीच्या तटावर चैत्ररथ नावाचे एक दिव्य व सुंदर महान वन आहे.

या पर्वतावर शूरवीर यक्षसेनापती मणिभद्र गुह्यकांबरोबर निवास करतो. कैलासाच्या दक्षिणपूर्व दिशेस लाल रंगाचा हेमशृंग नावाचा एक विशाल पर्वत आहे. तोही दिव्य सुवेलपर्वतापर्यंत पसरलेला आहे. त्याची कांती सूर्याप्रमाणे आहे. तो सर्व प्रकारच्या औषधींनी व मैनशिल नावाच्या धातूने परिपूर्ण आहे. त्याच्या पायथ्याशी लोहित नावाचे एक विशाल व दिव्य सरोवर आहे. येथूनच पुण्यमय लौहित्य (ब्रह्मपुत्र) नावाचा एक नद निर्माण झाला आहे. त्याच्या तटावर विशोक नावाचे एक दिव्य व विस्तृत वन आहे. या पर्वतावर मणिधर नावाचा यक्ष राहातो.

कैलासाच्या पश्चिमोत्तर दिशेस ककुद्मान् नावाचा पर्वत असून त्यावर सर्व प्रकारच्या औषधी मिळतात. तो अंजनासारखा काळा व

तीन शिखरांनी शोभतो. या पर्वतावर भगवान रुद्रांचा गण ककुद्मी (नंदिकेश्वर) याची निर्मिती झाली. तो सर्व धातूंनी संपन्न असून त्याच्या पायथ्याशी सिद्धांनी सेविलेले मानससरोवर आहे. या सरोवरापासून लोकपावनी, पुण्यसलिला शरयू नावाची नदी प्रकटली आहे. या नदीच्या तटावर वरुणाचे वैभ्राज नावाचे एक वन आहे. या वनात प्रहेतीचा पुत्र ब्रह्मधाता नावाचा राक्षस निवास करतो. तो कुबेराचा अनुचर आहे.

कैलासाच्या पश्चिमेस सर्व औषधींनी संपन्न असा वरुण नावाचा एक पर्वत आहे. हा पर्वतश्रेष्ठ सुवर्णादी धातूंनी विभूषित आहे. हा शंकरांना आवडणारा आहे. यावर शोभाशाली, सुवर्णसदृश चमकणाऱ्या दिव्य शिला आहेत. तो आपल्या सुवर्णमय शिखरांनी आकाशाला भिडलेला आहे. येथेच शृंगवान् नावाचा एक महान दिव्य पर्वत आहे. तो समृद्धशाली व दुर्गम आहे. या पर्वतावर धूम्रलोचन भगवान शिव निवास करतात. या पर्वताच्या पायथ्याशी शैलोद नावाचे एक सरोवर आहे. त्यातून मंगलमयी, पुण्यतोया शैलोदका नावाची नदी प्रवाहित होते. हिला चक्षुषी असेही नाव आहे. ती दोन पर्वतांमधून वाहात जाऊन पश्चिमसागरास मिळालेली आहे.

कैलासाच्या उत्तरेस हिरण्यशृंग नावाचा एक अत्यंत विशाल पर्वत आहे. हा हरितालाने परिपूर्ण पर्वत गौरापर्यंत पसरलेला आहे. या कल्याणकारी पर्वतावर दिव्य औषधी मिळतात. याच्या पायथ्याशी बिंदुसर नावाचे एक अत्यंत रमणीय सरोवर आहे. ते सुवर्णमय वाळूने समृद्ध आहे. येथेच राजर्षी भगीरथाने गंगा भूतलावर आणण्यासाठी अनेक वर्षे तपश्चर्या केली. म्हणून येथेच त्रिपथगा गंगा प्रवाहित झाली. ती सोमपर्वतापासून सात भागांत विभक्त झाली. या सरोवराच्या तटावर अनेक मणिमय यज्ञस्तंभ व सुवर्णमय विमाने शोभतात. येथेच दिव्य छायापथ तथा नक्षत्रमंडल विद्यमान आहे. येथे त्रिपथगा गंगादेवी रात्री चमकते.

गंगादेवी स्वर्गलोक व अंतरिक्षलोक पवित्र करून भूतलावर आली व शिवांच्या मस्तकावर पडली. शिवांनी आपल्या योगमायेने तिला

तेथेच गुंतवून ठेवले. त्यामुळे कुपित झालेल्या गंगेचे काही थेंब पृथ्वीवर पडले. त्यांतून बहुसर नावाचे एक सरोवर बनले. तेच पुढे बिंदुसरोवर नावाने प्रसिद्ध झाले. गंगादेवी क्रोधाने आपल्याशी म्हणाली, 'मी आपल्या धारांनी पृथ्वीवरून पाताळात प्रवेश करीन.' गंगेचा हा क्रोध शिवांना समजला. त्यांनी तिला आपल्याच अंगात सामावून घेण्याचा प्रयत्न केला. याचवेळी राजा भगीरथ शिवांपुढे आला. क्षीणकाय अशा राजाला पाहून शिवांना त्याच्या प्रयत्नाची, आपण त्याच्यावर संतुष्ट झाल्याची स्मृती झाली. प्रसन्न होऊन शंकरांनी गंगानदीस सोडून दिले.

यानंतर गंगा सात धारांनी प्रवाहित झाली. त्रिपथगा गंगेचे तीन प्रवाह पूर्वाभिमुख व तीन धारा पश्चिमाभिमुख होऊन प्रवाहित झाल्या. सातवा प्रवाह स्वतः भागीरथीचा होता. पूर्वेस वाहणाऱ्या प्रवाहांची नावे नलिनी, ल्हादिनी, पावनी अशी होती. पश्चिमेकडील धारा सीता, चक्षू व सिंधू या नावांनी प्रसिद्ध झाल्या. सातवी धारा भगीरथाच्या मागे दक्षिणदिशेस वळली. ती भागीरथी या नावाने प्रसिद्ध झाली.

## काशीक्षेत्राचे माहात्म्य

यानंतर अध्याय एकशेएकोणऐंशीपासून एकशे चौऱ्यांशीपर्यंत शंकरांनी काशीक्षेत्राचे माहात्म्य विस्ताराने वर्णन करून सांगितले आहे. पूर्वी सूताने हेच माहात्म्य ऋषींना सांगितले. फार प्राचीनकाळी पूर्णभद्र नावाचा एक यक्ष होता. त्याला यज्ञ नावाचा एक पुत्र होता. त्याला हरिकेश या नावानेही प्रसिद्धी मिळाली. त्याला ब्राह्मणांबद्दल दया वाटे. तो वृत्तीने धार्मिक होता. त्याची शंकरांवर भक्ती होती. तो नित्य सदाशिवांचे चिंतन करी. हे पाहून आपल्या योगनिष्ठ पुत्रास पूर्णभद्र म्हणाला, 'पुत्रा, तू दुराचारी झालास. मी तुला पुत्र मानणार नाही. कारण यक्षकुलोत्पन्न पुरुषास हे आचरण उचित नाही. आपण यक्ष स्वभावतः क्रूर, मांसभक्षी व हिंसक आहोत. वत्सा, तू ब्रह्मदेवांनी दिलेल्या वृत्तीचा त्याग करू नकोस. तू यक्षजातीस अनुकूल अशी कर्मं कर. नाही तर तू घरातून बाहेर कुठेही जा.'

पित्याचे हे बोलणे ऐकताच हरिकेश आपले घर व नातेवाईक

यांना सोडून काशीस आला व त्याने तेथे दुष्कर तप सुरू केले. तो इंद्रिये स्वाधीन ठेवून शुष्ककाष्ठ, दगड यांच्यासारखा निश्चल राहिला. एक सहस्र वर्षे झाल्यावर त्या यक्षावर वारूळ चढले. मुंग्यांसारख्या कीटकांनी त्याचे मांस कुरतडून खाल्ले. तो केवळ अस्थिमात्र उरला होता. तो शिवांच्या ध्यानात लीन झालेला पाहून एकदा पार्वतीने शिवांना विचारले;

'महादेवा, मी तुमचं काशीमधील क्रीडावन पाहू इच्छिते. या क्षेत्राचं आश्चर्यकारक असं माहात्म्यही आपण मला सांगावं. हे तुम्हांला अतिशय प्रिय असं स्थान आहे.' हे ऐकून शंकरांनी पार्वतीस काशीक्षेत्राचे महत्त्व विस्ताराने निवेदन केले. त्यांनी तिला आपले क्रीडावनही दाखविले. हे वन नाना प्रकारच्या वृक्षांनी व वेलींनी शोभून दिसते. केतकी, तमाल, फणस, अशोक, डंडणी या वृक्षांनी हे नटलेले आहे. येथे काही ठिकाणी प्रफुल्लित कमळे आहेत. त्यांच्या रजांनी पंख शोभताना येथे पक्षी गुंजारव करीत असतात. सारसपक्षी, कोंबडे, चक्रवाक, वदके, कारंडव, उन्मत्त भ्रमर यांनी हे वन सुशोभित दिसते. सुगंधित पुष्पे व आम्रवृक्ष यांनी युक्त अशा या वनात मदयुक्त देवांगना नित्य निवास करतात. विद्याधर, सिद्ध, चारण, अप्सरा यांचाही येथे निवास असतो. सिंह, मयूर, हत्ती यांनी हे वन शोभून दिसते. हजारो प्रफुल्लित कमळे, कृष्णागरुवृक्ष, अशोक, हंसपक्षी, हरिण, चातकपक्षी, किन्नरस्त्रिया, ऋषींचे आश्रम, मोगऱ्यांच्या वेली, सिद्धांच्या स्त्रिया, हरिणांचे कळप यांनी हे वन मोक्षदायक बनले आहे. तिळवा, शेंदूर, केशर, कुसुंबा, रुप्याच्या पानांचे वृक्ष, पीतवर्णी पानांचे वृक्ष यांनी हा प्रदेश व्याप्त आहे.

शिवांचे असे हे क्रीडावन काशीत आहे. हे वाराणसीक्षेत्र माहात्म्याने अत्यंत गुप्त आहे. सर्व प्राण्यांना मोक्ष देणारे हे आहे. येथेच सिद्ध शिवांच्या प्राप्तीसाठी नाना प्रकारची व्रते करतात. येथें अप्सरा नित्य नृत्य करतात, तर गंधर्व नित्य गात असतात. म्हणून शिवांना येथे वास करावासा वाटला. येथे शिवांवर मन ठेवून सर्व कर्मे त्यांना समर्पण करण्याने मनुष्य मोक्षास जातो. तसा तो इतर क्षेत्री जात नाही. म्हणून हे महाक्षेत्र शिव कधीच सोडीत नाहीत. ते या स्थानाचा त्याग करीत

नसल्याने यास अविमुक्त क्षेत्र म्हणतात.

नैमिषारण्य, कुरुक्षेत्र, गंगाद्वार, पुष्कर या ठिकाणी निवास करणाऱ्या साधकांना मोक्ष प्राप्त होत नाही. प्रयाग अथवा काशी येथेच मोक्षाची प्राप्ती होते. प्रयागापेक्षाही हे क्षेत्र थोर असल्याने महातपस्वी जैगीषव्यऋषी योगसाधनाने येथे उत्तम गतीस पावले. ते सर्व योग्यांत शिवांच्या कृपेने मुख्य झाले. सिद्ध, ऋषी यांना येथेच मोक्ष मिळतो. या क्षेत्रात राहाणाऱ्यांना ऐश्वर्य, उत्तम भोग, सायुज्य यांची प्राप्ती होते. महायक्ष कुबेरही येथे राहून, सर्व कर्मे शिवांना अर्पण करून येथे स्थिरावला आहे. सर्व गणांचे स्वामित्व त्याला प्राप्त झाले आहे. जे संवर्तऋषी पुढे उत्पन्न होणार आहेत, तेही शिवांची भक्ती येथेच करून उत्तम सिद्धी पावतील. लोकांत वेदांचे प्रवर्तन करणारे, महातपस्वी, धर्मकर्ते योगी, मुनिश्रेष्ठ असे पराशरऋषींचे पुत्र वेदव्यास याच क्षेत्रात रमतील, असे शिवांनी पार्वतीस सांगितले.

देवर्षींसह ब्रह्मदेव, विष्णू, वायू, सूर्य, देवराज इंद्र, स्वर्गवासी महात्मे, इतर देव याच क्षेत्रात राहून महादेवांची उपासना करतात. अलर्कराजाही शिवांनाच भजणारा होईल. जे कोणी या क्षेत्रात राहून शिवांची भक्ती करतील, ते अत्यंत दुर्लभ अशा मोक्षास जातील. विषयासक्त व धर्मत्याग केलेला मनुष्य या क्षेत्रात मरण पावला तर तोही मुक्त होतो. विषयांवर ममता न करणारे, गंभीर बुद्धीचे, सात्त्विक, जितेंद्रिय, महाव्रती; असे शिवांची भक्ती करणारे ज्ञानसंपन्न होऊन उत्तम लोकात जातात. हे क्षेत्र सर्वांहून उत्तम, कल्याणदायक व ब्रह्मप्राप्तीचे कारण आहे. ही वाराणसीनगरी सर्वदा रमणीय असून त्रिभुवनांत श्रेष्ठ आहे. या नगरीत आल्याने अनेक पापांचा नाश होतो.

हा सर्व महिमा सांगून शिव पार्वतीस म्हणाले, 'देवी, एक यक्ष माझी भक्ती करून तपानं निष्पाप झाला. त्याला वर द्यायला पाहिजे.' असे म्हणून शिव त्या तपोनिष्ठ यक्षाकडे पार्वतीसह गेले. त्याचे अस्थिपंजर शरीर पाहून पार्वती शिवांना म्हणाली, 'शंकरा, तुम्हांस उग्र म्हणतात, ते योग्यच आहे. कारण या यक्षाचं हे उग्र तप पाहूनही त्याला तुम्ही वर का देत नाही ? महादेवा, हा यक्षकुमार या महापुण्यकारक

अशा काशीत राहूनच तुमची उपासना करीत आहे. मग तो असा क्लेश का भोगतो ? परमेशा, आपण त्यावर कृपा करून त्वरित वर द्यावा.'

हे ऐकून जगत्पालक शंकर त्या तपस्वी यक्षश्रेष्ठाकडे गेले. त्यांनी त्याला दिव्य ज्ञान दिले. त्यानेही ज्ञानदृष्टीने शंकरांना पाहिले. त्याला शिव म्हणाले, 'यक्षनंदना, मी तुला एक अद्‌भुत वर देतो. तुला त्रैलोक्यातील ज्ञान व माझ्यासारखं शरीरतेज यांची प्राप्ती होईल. तू सर्व दुःखरहित होशील.' हरिकेक्षास शिवांपासून वर मिळाल्यावर त्यानें शिवांना साष्टांग नमस्कार केला. तो त्यांना म्हणाला, 'भगवन्, माझी अनन्यभक्ती आपणांवर राहून, निरंतर आपल्या गणांचं स्वामित्व मला मिळावं. सर्व लोकांना अन्न देण्याचं प्रभुत्व मला प्राप्त व्हावं.'

त्यानंतर महादेव त्याला म्हणाले, 'हरिकेशा, तू जरा व मृत्यू, सर्व रोग यांतून मुक्त होऊन गणांचा अध्यक्ष होशील. लोकांना तू द्रव्य देणारा होशील. तू सर्वांना पूज्य होशील. तू सर्वांना अजिंक्य होशील. समग्र योगाचं ऐश्वर्य तुला प्राप्त होईल. तू लोकांचा अन्नदाता व या काशीचा क्षेत्रपाल होशील. तू महाबलाढ्य, अति धैर्यवान, ब्राह्मणांविषयी दयाळू, मला अत्यंत प्रिय, तीन नेत्रांनी युक्त, हातात दंड धारण करणारा, महायोगी होशील. माझे गण तुझे सेवक होतील.'

यानंतर हरिकेशास असे सामर्थ्य देऊन शिव आपल्या स्थानास निघून गेले. या काशीक्षेत्रात अडुसष्ट स्थाने असून गजचर्म धारण करणारे साक्षात सदाशिव येथे निरंतर राहातात. या क्षेत्रात केलेली जप, दान, होम, यज्ञ, तप इत्यादी कर्मे अक्षय होतात. हजारो जन्मांतील पापे या काशीत प्रवेश करताच नष्ट होतात. पापयोनीतील जीव येथे मरण पावल्यास त्यांना सद्‌गती मिळते. वस्त्रप्रद, रुद्रकोटी, महास्थान सिद्धेश्वर, गोकर्ण, रुद्रकर्ण, सुवर्णाक्ष, अमर, महाकाल, कायावरोहण; ही काशीतील स्थाने शिवांच्या वास्तव्यामुळे पवित्र आहेत. कालिंजरवन, शंकुकर्ण, स्थलेश्वर ही स्थानेही अशीच पवित्र आहेत.

हरिश्चंद्र, आम्रातकेश्वर, जलेश्वर, श्रीपर्वत, महालय, कल्याणकारक कृमिचंडेश्वर, केदार व महाभैरव; ही आठ स्थाने गुह्यांपेक्षाही

गुह्य आहेत. ही शंकरांना अत्यंत प्रिय आहेत. त्रलोक्यातील प्रसिद्ध स्थाने काशीक्षेत्राच्या चरणी निरंतर असतात.

यानंतर कार्तिकस्वामीनेही सनकादिक ऋषींना या क्षेत्राचे माहात्म्य सांगितले. या क्षेत्रात निरंतर शिवांचा निवास असल्याने येथे सिद्धी प्राप्त होतात. या क्षेत्रात मणिकर्णिकेजवळ स्मशानभूमीत एक तीर्थासारखे पवित्र, गुप्त व उत्तम असे शिवमंदिर आहे. ते फक्त योगी, ब्रह्मचारी, वेदान्तनिष्णात यांनाच दिसते. जो मनुष्य या काशीक्षेत्रात देहपात होईपर्यंत निवास करतो, त्याला सर्व प्रकारची फळे प्राप्त होतात. तो पापरहित होऊन उत्तम गतीस जातो. जो ब्राह्मण त्रिकाल भोजन करून एकाग्रचित्ताने योगात तत्पर होईल, त्यास वायूचा आहार घेणाऱ्याचे साम्य प्राप्त होईल. जो मनुष्य या काशीत क्षणमात्र ब्रह्मचर्य वृत्तीने राहील, त्यास उत्तम फळाची प्राप्ती होईल. जो इंद्रिये जिंकून या काशीत एक मास राहील, त्याला उत्तम पाशुपत नावाच्या शिवव्रताचे फल प्राप्त होईल. तो मोक्षास जाईल. शतावधी जन्मांत ज्याला योगगतीचा लाभ होत नाही, तो येथे शंकरांच्या प्रभावाने होतो. या क्षेत्रात ब्रह्महत्येचेही पाप दूर होते. त्याच्यावर शिव सदा संतुष्ट असतात आपल्या भक्तांवर कृपा करण्यासाठी महादेव आपल्या गणांसह या काशीक्षेत्रात राहातात.

या अविमुक्तक्षेत्रात अणिमादिक अष्टसिद्धींचा लाभ होतो. एखादा ज्ञानसंपन्न मनुष्य मेरुपर्वत, सप्तद्वीपे, सर्व समुद्र यांचे गुण कथन करील, पण या अविमुक्तस्थानाचे वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाही या क्षेत्री स्वकर्मानुसार वर्तन करणाऱ्याच्या कानांत अंतकाली स्वतः शिव तारकमंत्राचा उपदेश करतात. जो मनुष्य मणिकर्णिकेत देहत्याग करील, त्याला शिवांच्या कृपेने उत्तम गतीची प्राप्ती होईल.

हे सर्व काशीचे माहात्म्य ऐकून पार्वती शिवांना म्हणाली, 'शंकरा, हिमालयपर्वत, मंदराचल, गंधमादन, कैलासनिषध, महातेजस्वी मेरू, मानस, देवांची क्रीडास्थानं, नंदनवन, प्रमुख देवस्थानं, तीर्थं यांपेक्षा आपणांस काशीचं स्थानच अधिक प्रिय का ? या अविमुक्तक्षेत्रात असं कोणतं गुह्य आहे की तुम्ही त्यामुळं या स्थानात रमता ?' पार्वतीचे हे

प्रश्न ऐकून शिवांनी तिला आणखी माहात्म्य वर्णन करून सांगितले.

वाराणसीत प्रत्यक्ष शिवांचा निवास असल्याने येथे सिद्ध, गंधर्व, भागीरथीनदी यांचा निवास असतो. काशीक्षेत्रातील लिंगात त्यांचे स्थान असते. सर्व भूतांचा प्रलय झाला तरी प्राणी काशीक्षेत्राचा त्याग करीत नाहीत. गंधर्वांसह देव, यक्ष, सर्प, राक्षस हे सर्व प्रलयकाळी शिवांच्या मुखात प्रवेश करून काशीत राहातात. येथे शिवांची पूजा केल्यास तिचे ग्रहण प्रत्यक्ष शिव करतात. जो मनुष्य येथे राहून रुद्राने शिवांचे भजन करतो, दाने देतो, नित्य तप करतो, शिवांचे पूजन करतो, त्यावर शिव संतुष्ट होतात. सर्व यज्ञांची दीक्षा घेऊन जो येथे सर्व दाने देतो, त्यास शिवलोकाची प्राप्ती होते. शिवांच्या कृपेने ते संतापरहित होऊन येथे राहातात.

हे सर्व ऐकून पार्वती पुनः शिवांना म्हणाली,' देवा, तुम्ही माझ्या-साठी दक्षयज्ञाचा विध्वंस केलात. यावरून माझ्यावर आपलं प्रेम नक्कीच आहे. पण या अविमुक्त क्षेत्राचे गुण ऐकून माझ्या मनाची तृप्ती होत नाही. मला आणखी या काशीचं माहात्म्य सांगावं.' तेव्हा शंकरांनी तिला या काशीक्षेत्राचे आणखी माहात्म्य सांगितले. या अविमुक्तक्षेत्रात शिवांचे पूजन केल्यास मनुष्यास शंभरकोटी कल्पांनीही गर्भवास प्राप्त होत नाही. या क्षेत्रात शिवांच्या प्रसादाने सर्व लोक क्षय, मृत्यू, नाशवंत देह यांनी रहित होऊन शिवांच्या स्वरूपात प्रवेश करतात, शाक व पाने भक्षण करणारे, इंद्रियांचा निग्रह करणारे, रोमरंध्रांनी जल सेवन करणारे, सूर्यकिरणांना प्राशन करणारे, पाषाणभस्माचा आहार घेणारे, प्रतिमासी एकदाच दर्भाच्या अग्रानें जलाचा स्वाद घेणारे, वृक्षमूलांवर राहाणारे, शिळेवर शयन करणारे, देहाने सूर्यासारखे तेजस्वी असणारे, अन्य स्थली व्रते व जप करणारे; असे लोक त्रिकाल भोजन येथे करून वास करणाऱ्यांच्या षोडशांशही योग्यता पावत नाहीत.

कारण पुरुषांत शिवांसारखा, स्त्रियांत पार्वतीसारखी कोणीही नसून त्यांच्या निवासाने या क्षेत्रास माहात्म्य प्राप्त झाले आहे. एका जन्मातच या क्षेत्री प्राण्यांना योग व मोक्ष यांची प्राप्ती होते. या पृथ्वी-वर काशीसारखे क्षेत्र पूर्वीही झालेले नाही. पुढेही होणार नाही. कारण

या स्थानी चार अंशांनी मूर्तिमान धर्म निरंतर असल्यानें चारही वर्णांना उत्तम गती प्राप्त होते. सर्व ब्राह्मण मंत्रयुक्त यज्ञानें शिवांचेच पूजन करतात. रुद्रपूजनामुळे त्यांना कसलेच भय उरत नाही. शास्त्रांत समंत्रक व अमंत्रक अशा दोन प्रकारचे विधी आहेत. सांख्य व योग अशा दोन प्रकारचे योग आहेत. या कोणत्याही प्रकाराने शिवांचे भजन करणारा शिवरूपच होतो. त्याचा व शिवांचा वियोग कधीच होत नाही. पृथ्वीवरील लोकांत निर्गुण व सगुण अशा दोन प्रकारांचा योग आहे. सगुण योग जाणण्यास विशेष योग्य असून निर्गुणयोग मात्र मनास दुर्बोध आहे.

यानंतर शिवांनी पार्वतीस भक्ती व योग यांची माहिती दिली. नंतर पार्वतीने या क्षेत्राच्या लांबीरुंदीचे प्रमाण शिवांना विचारले. या क्षेत्राची लांबी पूर्वपश्चिम अशी दोन योजनांची असून रुंदी दक्षिणोत्तर अशी अर्ध्या योजनाची आहे. या क्षेत्रात भीष्मचंडिकेश्वरापासून पर्वतेश्वरापर्यंत भागीरथीच्या तीरावर जो प्रदेश आहे, त्यास वाराणसी म्हणतात. या स्थानी शिवांनी विनायक, कूष्मांडराज, जयंत व मदोत्कट यांची योजना केली आहे. कित्येक सिंहमुख, व्याघ्रमुख, विकट, कुबडे, ठेंगणे, नंदी, महाकाल, चंडघंट, महेश्वर, दंडी, चंडेश्वर, घंटाकर्ण महाबल; इत्यादी गण व त्यांचे नायक हातांत शूळ व मुद्गल घेऊन या क्षेत्राचे रक्षण करतात. जो मनुष्य या क्षेत्रात सुवर्णाची शिंगे, रुप्याचे खूर, वस्त्रे, कृष्णाजिन यांनी युक्त अशी दुग्धसंपन्न गाय मनोभावे वेदपारंगत ब्राम्हणांना देतो, त्याचे कुल तरून जाते. जो मनुष्य या क्षेत्रात सुवर्ण, रुपे, वस्त्रे, अन्नादिक पदार्थ ब्राह्मणास देतो त्याला अक्षय फल मिळते.

जो मानव या क्षेत्रातील तीर्थात स्नान करतो, तो सर्व रोगांपासून मुक्त होतो. येथे स्नान करणाऱ्यास दहा अश्वमेधांचे फळ मिळते. या तीर्थात दान करणारा अग्नीसारखा तेजस्वी होतो. या तीर्थात जो अन्नदानादींनी ब्राह्मणास तृप्त करतो, त्याला सौत्रामणी नावाच्या यज्ञाचे फळ प्राप्त होते. या काशीत जो विधीनुसार अग्नीत प्रवेश करतो, तो अंत:काळी शिवांच्याच मुखात जातो. येथे जो ब्राह्मणास दहा सुवर्णपुष्पे देतो, त्यास अग्निहोत्राचे फळ मिळते. धूप व गंध यांचे दान केल्यास

भूमिदानाचे फळ त्याला मिळते.

पूर्वी ब्रह्मदेवांना एक पांचवे उत्तम मस्तक उत्पन्न झाले. ते सुवर्णाच्या कांतीने युक्त होते. महादेवांनी क्रोधाविष्ट होऊन आपल्या डाव्या अंगठ्याच्या नखाने ते मस्तक तोडले. तेव्हा ब्रह्मदेवांनी महादेवांना आपल्या कपाळाने युक्त होशील, असा शाप दिला. ब्रह्महत्येने व्याकुळ होऊन महादेव हिमालयावर गेले. तेथे त्यांनी ऐश्वर्यसंपन्न नारायणांना याचना केली. तेव्हा त्या नारायणांनी आपल्या कुशीस नखाच्या अग्रानें छिद्र पाडले. त्यातून रक्ताचीं मोठी धार वाहू लागली. ती पन्नास योजने लांब गेली. देवांची शंभर वर्षें ती वाहातच होती. तरी ते अद्भुत उग्र कपाळ पूर्ण भरले नाही. भगवान विष्णूंना शिवांनी सर्व प्रकार सांगितला. नंतर ते सर्व पुण्य क्षेत्रे व तीर्थें या ठिकाणी हिंडले. पण त्यांचा हा ब्रह्मशाप काशीत दूर झाला. ही सर्व कथा पार्वतीस सांगून शिव म्हणाले,

'सुंदरी, म्हणून हे स्मशान देवांचं स्थान असून मला प्रिय आहे. मी कालरूपानं या काशीत राहातो. मीच सर्वांना उत्पन्न करतो, त्यांचा संहार करतो. म्हणून सर्व गुह्यांत हे परम प्रिय आहे. हे देवाधिदेव परमेश्वरांचं अति पवित्र तपोवन आहे. अति गुह्य उत्तम स्थान आहे. यासच महास्मशान असंही म्हणतात. या क्षेत्रातील वायूनं उडविलेले रजःकण अंगावर उडल्यास सर्व दुष्ट कर्मं करणारेही मोक्षाची गती पावतात. मेरू अथवा मंदार पर्वताएवढी पापं करणाराही काशीत सुखी होतो. हे देवाधिदेवांचं एकान्तस्थान, तीर्थ व तपोवन आहे. इथंच ब्रह्मादिक देव, नरनारायण, साध्यगण, अनन्यभक्त राहून माझी उपासना करतात.'

ब्रह्मदेव व शंकर हे ज्या ठिकाणी प्रमुख आहेत, तेथे चारही लोक आहेत. येथे मृत्यू पावल्यास पुनः जन्मास येत नाही जो मनुष्य काशी सोडणार नाही, त्याची चिंता भगवान करतात. सर्व तीर्थें, स्थाने, क्षेत्रे, स्मशाने, पुण्य तीर्थांची तीरे, कूप, प्रवाह, पुण्य पर्वत, सरोवरे यांपेक्षाही हे काशीक्षेत्र श्रेष्ठ आहे. या क्षेत्राचे सेवन व संरक्षण ब्रह्मदेव करतात. याच ठिकाणी सप्त भवने,सुवर्णाचा मेरूपर्वत आहे. जे ब्राह्मण या क्षेत्रात सूर्याची उपासना करतात, जे क्षत्रिय, वैश्य व शूद्र एकाग्रचित्ताने शिवांची

भक्ती करतात, त्यांना देहत्यागानंतर मोक्ष प्राप्त होतो.

जितेंद्रिय संन्यासी लोकांनी आठ महिने संचार करावा, पर्जन्य-काळी एकत्र निवास करावा, असा शास्त्रांत नियम आहे. पण त्यांनी या काशीत बारा महिनें राहिल्यास चालते. ज्या पतिव्रता स्त्रिया काशीत राहतात, त्या संसारातून मुक्त होऊन मोक्षास पावतात. ज्या विषया-सक्त स्त्रिया काशीत मरण पावतात, त्यांनाही उत्तम गती प्राप्त होते. अशा या स्थळाचे सेवन न करणारे लोक मूर्ख असतात. ते विष्ठा, मूत्र व रेत यांत वारंवार पडतात. काम, क्रोध, लोभ, दंभ, स्तंभ, मत्सर, निद्रा, तंद्रा, आलस्य, दुर्जनत्व, असे दहा दोष, इतर विघ्ने, उपद्रव यांना स्वत: इंद्राने निर्माण केले. पण तो काशीत असल्याने शिवांच्या कृपेने निर्विघ्न झाला आहे. सर्व पृथ्वी मधू व कैटभ या दैत्यांच्या मेदाने निर्माण झाली आहे. पण या मेदाचा संबंध काशीत नाही. म्हणून काशीखेरीज इतर क्षेत्रांत भूमीवर संस्कार करावे लागतात. देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, वासुकी नाग; हे सर्व काशीस निवास करून शंकरांची उपासना करतात. ऋषी, देव व असुर, मुमुक्षू, संन्यासी हे सर्व याच अविमुक्तक्षेत्रात निवास करतात.

ज्या प्रदेशापर्यंत भागीरथी आहे, त्या स्थानापर्यंत शिवांच्या वाराणसीक्षेत्राची मर्यादा आहे. मोक्ष साध्य करून घेण्यासाठी तपोनिष्ठ लोक या स्थानाचा त्याग करीत नाहीत. या भूमीवरील नद्या, समुद्र, पर्वत यांपैकी कोणीही या क्षेत्रात समान नाहीत. पण भूलोक, अंतरिक्ष, स्वर्ग यांतील तीर्थे या काशीच्या समान आहेत. शंकरांनी हे क्षेत्र उत्पन्न केले असल्याने तेच येथे सर्वांचा स्वीकार करतात. म्हणून येथील मानव सिद्धी पावतात. समुद्रात जशी रत्नें असतात, तसा या क्षेत्रात गुणांचा अपार विस्तार आहे. व्याधींनी व्यापलेला मानव या क्षेत्रात राहिल्यास तो शोकरहित होतो. दान, तप, यज्ञ, विद्या या साधनांनी जी इष्ट गती प्राप्त होत नाही, ती या क्षेत्रात आपोआप मिळते. नाना प्रकारचे ब्राह्मणादी वर्ण, नीच वर्ण, चांडाल, जातिहीन इत्यादी सामान्य पातके व महापातके यांनी नखशिखांत व्याप्त असतात. या सर्वांना हे क्षेत्र औषधासारखे आहे.

## वाराणसीत व्यासमुनी

स्कंदाने सांगितलेले असे हे काशीमहात्म्य सूताने सर्व ऋषींना निवेदन केले. हे वाराणसीक्षेत्र सर्व स्मशानांत गुप्त आहे. इतर स्थानी योगसाधनेवाचून मनुष्य मोक्षास जात नाही. पण या क्षेत्री एकाच जन्मी उत्तम गती प्राप्त होते. या क्षेत्री एकदा अमित तेजस्वी व्यास भिक्षेसाठी नित्य भ्रमण करीत होते. पण त्यांना भिक्षा मिळाली नाही. ते क्रुद्ध होऊन येथील लोकांना म्हणाले, 'मी सहा महिने या नगरात प्रतिदिनी भिक्षा मागतो. पण हे लोक मला भिक्षा देत नाहीत. या काशी-पुरास कोणता दोष लागला आहे, हे समजत नाही. म्हणून या नगराचं तीर्थत्व नष्ट व्हावं, असा मी शाप देतो. या नगरात तीन पुरुषांपर्यंत विद्या सारखी राहणार नाही. धन स्थिर राहणार नाही. सख्य टिकणार नाही. इथं सिद्धी प्राप्त न व्हावी म्हणून मी विघ्न निर्माण करीन.'

व्यासांची ही शापवाणी ऐकून भयभीत झालेले शिव आपल्या प्रिय पार्वतीस म्हणाले, 'देवी, सांप्रत कृष्णद्वैपायन व्यास कोपून या नगरास शाप देण्यासाठी उत्सुक झाले आहेत.' तेव्हा पार्वती त्यांना म्हणाली, 'अहो ऐश्वर्यसंपन्न देवा, या व्यासास कुणी निर्माण केलं? ते क्रुद्ध होऊन शाप का देतात?' तेव्हा शिव म्हणाले, 'पार्वती, या व्यासांनी अनेक वर्षं उत्कृष्ट तप केलं आहे. बारा वर्षं मौन धारण करून त्यांनी ध्यान केलं. नंतर त्यांना क्षुधा लागली पण या काशीत त्यांना कुणी भिक्षा घातली नाही. म्हणून ते क्रोधानं शाप देत आहेत ते शाप देत नाहीत तोपर्यंत तू त्यांना प्रसन्न करण्यासाठी उपाय शोध. प्रिये, हे कृष्णद्वैपायन नावाचे व्यास साक्षात नारायणच आहेत, असं समज, हे व्यास देवांचा देवपणाही नाहीसा करतील. आपण गृहस्थ होऊन या व्यासांना भिक्षा घालू.'

असे म्हणून पार्वतीसह शंकरांनी मनुष्यवेष धारण करून व्यासांना दर्शन दिले. ते त्यांना म्हणाले, 'ऐश्वर्यपूर्ण साधो, आपण भिक्षेसाठी आमच्या घरी आलाच नाहीत.' शिवांनी व्यासांना अमृतासमान मधुर भिक्षा दिली. तेव्हा त्यांनी भोजन करून हर्षयुक्त मनाने चिंतन केले. ते शिवपार्वतीस नमस्कार करून म्हणाले, 'शंकरा, या वाराणसीत तुम्ही,

देव, देवी पार्वती, गंगानदी, मिष्टान्न, उत्तम गती अशा वस्तू आहेत. इथं राहाणं कुणास रुचणार नाही ?' यानंतर शिव व्यासांना म्हणाले, 'महामुने, तुम्ही या क्षेत्रात राहू नये. कारण आपण महाकोपिष्ट आहात. हे ऐकून व्यास शिवांना म्हणाले, 'महादेवा, चतुर्दशी व अष्टमी या दोन दिवशी तरी आपण मला इथं राहाण्याची अनुज्ञा द्यावी.' शिवांनी व्यासांना तशी अनुमती देऊन ते अंतर्धान पावले.

अशा रीतीनें व्यासही या क्षेत्रात राहिले. देवब्राह्मणांचा द्वेष करणारे, भक्तीचा द्वेष करणारे, ब्रह्महत्या करणारे, कृतघ्न, कपटी, लोकद्वेषी, गुरुद्वेषी, तीर्थे व देव यांचा द्वेष करणारे, पापांविषयी तत्पर, कुत्सित इत्यादींचा वास या क्षेत्रात होत नाही. कारण दंडनायक कालभैरव या दुष्टांना शासन करण्यासाठी येथे राहिला आहे. काशीत राहाणाऱ्याने या दंडनायक भैरवाची यथाशक्ती गंधपुष्पादिकांनी पूजा करून या क्षेत्रपालास नमस्कार करावा.

हे काशीपुर इंद्राच्या अमरावतीपेक्षा उत्कृष्ट आहे. प्रयागाहून श्रेष्ठ आहे. या ठिकाणी देवाधिदेव शंकर अध्यक्षरूपाने शोभतात. जो येथे राहून लिंगार्चन करतो, इतरांकडून करवितो, त्यास शतकोटी कल्पांनीही पुनर्जन्म येत नाही. काशीक्षेत्रात जे महादेवांचे पूजन करतात, त्यांचे स्तवन करतात, ते सर्व पापांतून मुक्त होऊन अजरामर देव होतात. घोर कलियुग जाणून जे काशीस सोडीत नाहीत, ते नर कृतार्थ होतात. जे नर पृथ्वीवर काम, क्रोध, लोभ यांनी ग्रस्त आहेत, त्यांना भैरवाच्या मोहाने काशीबाहेर जावे लागते. या काशीत आनंदकाननात दशाश्वमेध, लोलार्क, केशव व बिंदुमाधव अशी चार व पांचवी मणिकर्णिका; अशी मुख्य तीर्थे आहेत.

### अमरकंटक, कपिलानदी इत्यादी

यानंतर ऋषींनी सूतास नर्मदानदीचे माहात्म्य विचारले. या नर्मदेच्या माहात्म्यात ओंकार, कपिलानदी व अमरेश यांची माहात्म्ये आहेत. पूर्वी महाबुद्धिवान धर्मराजाने महामुनी मार्कंडेयांना नर्मदेचे माहात्म्य विचारले होते. नर्मदानदी कशी उत्पन्न झाली ? ही श्रेष्ठ कशी झाली ? या प्रश्नांची उत्तरे मार्कंडेयांनी दिली. ही नदी सर्व

पापांचा नाश करणारी असल्याने सर्व नद्यांत श्रेष्ठ आहे. ही नदी सर्व प्राण्यांना संसारसागरातून तारते. गोदावरी, कनखल, कुरुक्षेत्र, नर्मदा-तीर, ग्राम वा अरण्य; ही सर्व पुण्यक्षेत्रेच आहेत. सरस्वतीनदीचे तीर्थ तीन दिवसांनी मनुष्यास शुद्ध करते, यमुनेचे जल सात दिवसांनी त्यास पवित्र करते, भागीरथीत एकदाच स्नान केल्यास पवित्रता येते. नर्मदेचे जल दर्शनाबरोबरच शुद्ध करणारे आहे.

कलिंगदेशाच्या पश्चिमेस अर्ध्या भागातून पुण्यकारक अमरकंटक नावाच्या पर्वतावर नर्मदानदी आहे. ती सर्व देवांना, ऋषींना रमविणारी आहे. देव, असुर, गंधर्व, तपोधन ऋषी, यांनी अमरकंटकावरील नर्मदा-तीरी तप करूनच परमसिद्धी मिळविली. या नदीत जो स्नान करून, इंद्रिये स्वाधीन ठेवून, नियमपूर्वक अहोरात्र उपोषण करील, तो आपल्या शंभर कुळांना तारील. या पर्वतावरील जलेश्वर नावाच्या नर्मदेच्या तीर्थात जो स्नान करील, यथाविधी पिंडदान करील, त्याचे पितर ब्रह्म-देवाच्या एक दिवसापर्यंत तृप्त होतात. या पर्वताच्या भोवती शिवांची कोटयवधी लिंगे आहेत. येथे नर्मदास्नान करून गंध, पुष्पे, बुक्का आदी-करून त्या लिंगांची पूजा जो करील, त्यावर कोटिलिंगस्वरूप शंकर प्रसन्न होतील यात संशय नाही.

या पर्वताच्या पश्चिमभागी सर्वेश्वर महादेव निवास करतात. तेथे स्नान करून पितरांचे श्राद्ध केल्यास त्यांची सप्तकुले स्वर्गात आनंद पावतात. असे पितृतर्पण करणारा मनुष्य अप्सरांचे समुदाय, सिद्ध व चारण यांनी युक्त अशा स्वर्गात दिव्य गंधाची उटी व अलंकार यांनी सुशोभित होऊन साठ हजार वर्षे निवास करतो. नंतर तो मृत्युलोकी येऊन सत्कुलात उत्पन्न होतो. तो धनवान, दानशूर व धार्मिक असतो. तो पुनः या तीर्थाचे स्मरण करून त्याचे सेवन करतो व आपल्या सात कुळांचा उद्धार करून कैलासास जातो.

ही श्रेष्ठ नदी नर्मदा सवाशे कोस लांब असून दोन योजने रुंद आहे. अमरकंटक पर्वतावर साठ कोटी, साठ सहस्र तीर्थे आहेत. जो मनुष्य ब्रह्मचर्य धारण करून, शुचिर्भूत होऊन, क्रोध जिंकून, इंद्रिये स्वाधीन ठेवून, हिंसेचा त्याग करून, प्राणिमात्रांच्या हितात तत्पर

होऊन या अमरकंटकावर प्राणत्याग करील, त्याला अप्सरांचे समुदाय, सिद्ध व चारण यांनी युक्त अशा स्वर्गात, दिव्य सुगंधाची उटी, पारिजातादी दिव्य पुष्पांच्या माळा, यांनी संपन्न होऊन सर्व देवगणांसह तो तेथे साठ हजार वर्षे आनंदाने क्रीडा करतो. नंतर तो पृथ्वीवर जन्मास येऊन प्रतापी राजा होतो. अनेक रत्ने, हिरे, वैडूर्यमणी यांनी तो अलंकृत होतो. त्याला अनेक दासदासी, उन्मत्त गज, अश्व, दिव्य मंदिर अशा थाटात शंभर वर्षे राहाता येते.

जो कोणी अमरकंटकावर अग्नीत अथवा सुवर्णासारख्या श्रेष्ठ जलाशयात अनशनव्रत करून प्राणत्याग करील, त्याला पुन: जन्म घ्यावा लागत नाही. जो अमरकंटकावरून उडी टाकून देहत्याग करतो, त्याच्या घरात तीन हजार कन्या व इतर सेवक त्याची आज्ञा पाळतात. तो उत्तम भोगांनी युक्त होऊन प्रलयकालपर्यंत क्रीडा करतो. अमरकंटकावरील कोटयवधी शिवलिंगांची पूजा नर्मदेत स्नान करून जो करतो, त्याच्यावर शिव संतुष्ट होतात.

या अमरकंटकाच्या पश्चिमेस महेश्वर देव आहेत. येथे जो मानव स्नान करून, इंद्रियांना जिंकून पितरांचे श्राद्ध करील, त्याची सात कुळे स्वर्गात आनंद पावतात. तो साठ हजार वर्षे स्वर्गलोकी दिव्य गंधाची उटी व उत्तम अलंकार यांनी भूषित होतो. स्वर्गातून खाली आल्यावर तो भूलोकी उत्तम कुलात जन्म घेतो. तो धनवान, दानशूर व धार्मिक होतो. तो पुन: त्या तीर्थाचे सेवन करून आपल्या सात कुळांचा उद्धार करून सप्तलोकास जातो.

अशी ही श्रेष्ठ नदी नर्मदा उगमापासून मुखापर्यंत शंभर योजने लांब व दोन योजने रुंद आहे. जो मनुष्य या अमरकंटकपर्वतावर ब्रह्मचर्याने राहून, शुचिर्भूत होऊन, हिंसेचा त्याग करून, आपला आचार शिवांना अर्पण करून प्राणत्याग करतो, तो एकलक्ष वर्षेपर्यंत स्वर्गात आनंद मिळवितो. या पर्वताच्या पश्चिमभागी त्रैलोक्यप्रसिद्ध असे जलेश्वर नावाचा एक डोह आहे. तेथपर्यंत रुद्रकोटी तीर्थ समजावे. या तीर्थावर संध्यावंदन करून पिंडदान केल्यास दहा वर्षेपर्यंत पितर तृप्त होतात. नर्मदेच्या दक्षिणभागी कपिला नावाची एक महानदी आहे.

तिच्या उभयतीरांवर अर्जुनवृक्षांची दाटी आहे. ही कपिलानदी त्रैलोक्यात प्रख्यात व पुण्यकारक आहे. लोकांना भाग्यसंपन्न करणारी आहे. या नदीच्या उगमापासून मुखापर्यंत शंभर कोटी तीर्थे आहेत.

या कपिलानदीच्या तटाकी केलेले कर्म कोटिगुणित होते. तिच्या तीरांवरचे जे वृक्ष काळाच्या क्रमाने पडतात, तेही तिच्या उदकस्पर्शाने उत्तम गतीस पावतात. या प्रदेशात आणखी एक महा भाग्यदायक विशल्यकरणी नावाची नदी आहे. हिच्या तीर्थात मानवाने स्नान केल्यास त्याच्या अंगातील व मनातील सर्व शल्ये दूर होतात. तेथे किन्नर, मोठे नाग, देवांचे समुदाय, यक्ष, राक्षस, गंधर्व, तपोधन ऋषी यांचा निवास असतो. या नदीत स्नान करून एक अहोरात्र जे उपोषण करतात, ते आपल्या शंभर कुळांना तारतात.

नर्मदानदीत कोठेही स्नान केले तरी मनुष्यास अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होते. सरस्वती, गंगा व नर्मदा यांच्या उत्तरतीरी जे कोणी राहातात, त्यांना शिवलोकी निवास प्राप्त होतो. नर्मदातीरावर स्नान व दान या दोनही कर्मांचे फल समान आहे. अमरकंटकपर्वतावर जे मानव प्राण सोडतात, ते कोटिवर्षांपर्यंत रुद्रलोकात पूजित होतात. नर्मदानदीचे उदक फेस व लाटा यांनी सुशोभित असून पुण्यकारक व पवित्र आहे. या उदकास वंदन केले तर मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. नर्मदानदी उभय तीरांवर पुण्यकारक असून ब्रह्महत्येचा नाश करणारी आहे. ही नर्मदा तीनही लोकांत रमणीय व पुण्यकारक आहे. नर्मदेतील सर्व तीर्थांपेक्षा नर्मदा व समुद्र यांच्या संगमावर दशगुणित पुण्य अधिक प्राप्त होते.

## अमरकंटकावरील ज्वालेश्वरतीर्थ

यानंतर एकशेशहाऐंशीव्या अध्यायातही नर्मदानदीचे महत्त्व निवेदन केले आहे. ही नदी सर्व नद्यांत श्रेष्ठ आणि पुण्यतीर्थांपेक्षाही हितकारक व पुण्यदायक आहे. या नदीच्या तीरांवरील तीर्थांत स्नान केल्याने मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. यानंतर मार्कंडेयांनी युधिष्ठिरास जलेश्वर नावाच्या तीर्थाचे माहात्म्य सांगितले. एकदा

ऋषींचे समुदाय, मरुद्‌गण, इंद्रादिक देव उग्रनयन शंकरांना शरण गेले व म्हणाले, 'पराक्रमी, महाभयंकर व बलोन्मत्त असा त्रिपुराचा स्वामी एक दानव बाणासुर नावाचा आहे. त्याच्या भीतीनं शिवा, आम्ही आपणांस शरण आलो आहोत. शंकरा, या दुःखापासून आपण आमचं रक्षण करावं.' असे देवांनी म्हटल्यावर शिव त्यांना अभय देऊन नर्मदा-तीरी गेले. त्यांनी दैत्याच्या वधाचा विचार केला. त्यांनी नारदांना बोलावून म्हटले,

'नारदा, या त्रिपुरातील स्त्रिया अप्सरांप्रमाणं असून पतीसच देव मानणाऱ्या आहेत. त्यांच्या बलानं हे त्रिपुर आकाशात भ्रमण करते. तुम्ही त्यांना बोध करावा.' त्या स्त्रियांचे अंतःकरण भ्रष्ट करण्यासाठी नारद त्या त्रिपुरात गेले. त्यांनी गर्विष्ठ अशा नारदांना पाहिले. रत्न-खचित कुंडले, सुवर्णाची बाहुभूषणे, मुकुट, हार, सुवर्णाचा गोफ, चंद्र-कांतमणी, कमरेतील रत्नजडित कांची (करगोटा) यांनी बाणासुर शोभत होता. त्याने नारदांचे स्वागत केले. त्याच्या पट्टराणीने नारदांना वंदन केले. नारदांनी तिला तिलधेनुदानव्रताचा महिमा सांगितला.

अशा रीतीने नारदांना बाणासुराच्या कडे पाठवून नर्मदेच्या तीरावर शंकर राहिले. तेथील अमरेश्वर नावाच्या तीर्थस्थानी राहून त्यांनी बाणासुराच्या नाशाचा विचार केला. शिवांच्या प्रभावाने त्रिपुर जळू लागले. दानव स्त्रीपुरुष अग्नीने दग्ध होत गेले. बाणासुराची शिवनिष्ठा पाहून शिवांनी त्याला वर दिला. त्रिपुरातील एक पुर शैलपर्वतावर पडले. दुसरे अमरकंटकावर पडले. त्या त्या स्थानी कोटचवधी शिवलिंगांची स्थापना झाली. याच अमरकंटावर ज्वालेश्वर नावाचे स्थान निर्माण झाले. या तीर्थात स्नान, दान, अनशनादिक कर्मे करणारा मनुष्य सार्व-भौम राजा होतो. हा अमरकंटकपर्वत स्वर्ग, मृत्यू व पाताल या तीनही लोकांत प्रख्यात आहे. हा पुण्यकारक पर्वत सर्व पर्वतांत श्रेष्ठ आहे. सिद्ध व गंधर्व या पर्वतावर सदा वास करतात. हा महापर्वत अनेक वृक्ष व वेली यांनी व्यापलेला असून नाना प्रकारच्या पुष्पांनी शोभून दिसतो. यावर पार्वतीसहित शंकर, ब्रह्मदेव, विष्णू, विद्याधरगण, इंद्र, ऋषी, किन्नर, यक्ष यांचा निवास असतो. अनेक नागांसह वासुकी या पर्वतावर

क्रीडा करतो. अशा या अमरकंटकास प्रदक्षिणा करणारा पौंडरीक नावाच्या यज्ञाचे फल मिळवितो. यावरील ज्वालेश्वरतीर्थाचे सेवन सिद्धही करतात. यात स्नान करणारे स्वर्गास जातात. यात देहत्याग करणारे पुन: जन्मास येत नाहीत. चंद्र व सूर्य यांच्या ग्रहणपर्वात जो या तीर्थावर प्राणत्याग करील, तो सर्व कर्मांतून मुक्त होतो. तो ज्ञान व विज्ञान यांनी संपन्न होऊन प्रलयकालपर्यंत कैलास नावाच्या रुद्र-लोकात निवास करतो. या अमरकंटकाच्या उभयतटी कोटचवधी ऋषी तप करीत असतात. हा पर्वत औरस, चौरस मिळून एक योजन क्षेत्रा-वर आहे. या पर्वतावरील पुण्यतीर्थांत जो सकाम वा निष्काम वृत्तीने स्नान करतो, तो सर्व पापांतून मुक्त होऊन रुद्रलोकास जातो.

## कावेरीसंगमाचे माहात्म्य

यानंतर एकशेअठ्ठ्याऐंशिव्या अध्यायात शौनकादी ऋषींनी मार्कं-डेयांना लोकांच्या हितासाठी कावेरीसंगमाचे माहात्म्य विचारले. कावेरी व नर्मदा यांचे माहात्म्य त्यांनी युधिष्ठिरास सांगितले. कावेरी व नर्मदा यांच्या संगमात यक्षश्रेष्ठ कुबेराने स्नान करून शंभर वर्षे घोर तप केले. त्याला वर देण्यासाठी महादेव प्रसन्न होऊन प्रकट झाले. आपण सर्व यक्षांचा राजा व्हावे असा वर त्याने शिवांना मागितला. शिवांनी ' तथास्तु ' म्हटल्यावर लगेच यक्षांनी कुबेराची पूजा करून त्याला राज्याभिषेक केला. असा हा कावेरीसंगम जे जाणीत नाहीत, ते जन्मास येऊन फसलेच, असे समजावे.

म्हणून प्रयत्न करून या कावेरीसंगमात स्नान करावे. कावेरी व नर्मदा या दोन पुण्यकारण नद्या आहेत. जो या संगमात स्नान करील, भगवान शिवांची पूजा करील, त्याला अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होऊन तो देहपातानंतर रुद्रलोकात पूज्य होतो. जो या संगमस्थानी अग्निप्रवेश करील अथवा अनशन करून देहत्याग करील, त्याला पुन: जन्म येणार नाही. तो उत्तम स्त्रियांसह स्वर्गलोकी साठकोटी, साठ सहस्र वर्षे शंकरां-प्रमाणे क्रीडा करील. नंतर तो पृथ्वीवर येऊन धार्मिक वृत्तीचा राजा होतो. तो भोगसंपन्न व दानी होतो. कावेरी व नर्मदा नद्यांचे जल जो

प्राशन करतो, त्याला उत्तम चांद्रायणव्रताचे फल प्राप्त होते. गंगा व यमुना नद्यांत स्नान केल्याने जे फल प्राप्त होते, ते कावेरीसंगमात स्नान करणाऱ्यास मिळते.

## नर्मदेच्या उत्तरतीरावरील तीर्थे

नर्मदेच्या उत्तरतीरावर सर्व पापांना हरण करणारे मंत्रेश्वर नावाचे एक प्रसिद्ध तीर्थ आहे. यात स्नान केल्यावर मनुष्य देवांसहित स्वर्गलोकात यथेच्छ रूप धारण करून पांच हजार वर्षे क्रीडा करतो. यानंतर मेघ जेथे उत्पन्न झाला, त्या गर्जनतीर्थात तो जातो. या तीर्थाच्या प्रभावाने रावणपुत्र इंद्रजित हे नाव पावला. यानंतर जेथे उदकाचा आवाज मेघासारखा होतो, त्या मेघनाद नावाच्या तीर्थास जाऊन मेघनाद नावाचा गण शिवगणांत प्रमुख झाला. यानंतर आम्रातकेश्वर नावाच्या तीर्थास जावे. तेथे स्नान केल्यास मानवास गोसहस्रनामाचे फल प्राप्त होते. नर्मदेच्या उत्तरतीरी विश्रुत नावाचे एक तीर्थ आहे. या तीर्थात स्नान केल्यास पिता व देव यांचे तर्पण केल्यास सर्व मनोरथ पूर्ण होतात.

यानंतर नर्मदेत ब्रह्मावर्त नावाचे एक तीर्थ आहे. तेथे ब्रह्मदेवांचा नित्य निवास असतो. या तीर्थात स्नान करणारा मनुष्य ब्रह्मलोकात स्थान मिळवितो. येथून अंगारेश्वर नावाच्या तीर्थास जावे. तेथे गेल्यावर सर्व पापांतून मुक्त होऊन मनुष्य सप्तलोकात जातो. यानंतर माणसाने उत्तम अशा कपिलातीर्थास जावे. त्याला तेथे गेल्याने एकवर्णी कपिला दान केल्याचे फळ मिळते. यानंतर देव व ऋषी यांनी सेवित अशा करजतीर्थास जावे. तेथे स्नान करणारा मनुष्य गोलोकास जातो. यानंतर कुंडलेश्वरतीर्थास जावे. हे स्थान पार्वतीसह शंकरांचे निरंतर निवासस्थान आहे. येथे स्नान केल्याने मनुष्य देवांनाही अवध्य होतो. पुढे सर्व पातकांचा नाश करणाऱ्या पिप्पलेश नावाच्या तीर्थास जावे. तेथे स्नान केल्याने मनुष्य शिवलोकी पुज्य होतो.

यानंतर मनुष्याने विमलेश्वर नावाच्या श्रेष्ठ तीर्थास जावे. तेथे प्रत्यक्ष शिवांनी देवांची एक शिला निर्माण केली आहे. या शिलेवर प्राणत्याग केल्यास शिवलोक प्राप्त होतो. यानंतर पुष्करणी नावाच्या

तीर्थास जावे. कारण तेथे स्नान केल्यास इंद्राचे अर्धासन प्राप्त होते. अशी ही नर्मदा शिवांच्या देहापासून निघून नद्यांत श्रेष्ठ झाली. ही मनुष्यास भवसागरातून तारते. सर्व ऋषी या नर्मदानदीची उत्तम प्रकारे स्तुती करतात. सर्व देव निरंतर हिचे स्तवन करतात. देव,गंधर्व, अप्सरा या नदीची स्तुती करतात. ते म्हणतात, ' नर्मदे, तू नद्यांत मुख्य असून तुझं उदक पुण्यकारक आहे. तू स्वतः समुद्रात गमन करणारी व सर्व पापांचा नाश करणारी आहेस. देवी, तुझं मुख सर्वांच्या तापत्रयास दूर करतं. तुला वारंवार नमस्कार असो. तू लोकांना पवित्र करतेस. तू सज्जनांना इष्ट वर देणारी आहेस. म्हणून तुला आम्ही वारंवार नमस्कार करतो.' जो मनुष्य विश्वास ठेवून हे नर्मदास्तोत्र म्हणतो, तो ब्राह्मण असल्यास वेदविद्येने संपन्न होतो. क्षत्रिय असल्यास विजयी होतो. वैश्य असल्यास त्याला द्रव्यादिक वस्तूंचा लाभ होतो. शूद्रास उत्तम गती मिळते. धनाची इच्छा करणाऱ्यास धनाची प्राप्ती होते. फार काय सांगावे ? प्रत्यक्ष शिवही नर्मदेत स्नान करतात. अशी ही नर्मदानदी महापुण्यकारक असून ब्रह्महत्यादिक पापांचा नाश करणारी आहे.

## नर्मदेच्या दक्षिणतीरावरील तीर्थे

यानंतर युधिष्ठिराने मार्कंडेयांना विचारले, ' मुनिश्रेष्ठा, महादेवांचा त्रिशूल कोणत्या स्थानी पडला ? त्या स्थानाचा महिमा मला सांगावा.' मार्कंडेयांनी हा महिमा निवेदन केला. नर्मदेत ज्या स्थानी शिवांचा त्रिशूल पडला, त्यास शूलभेद नावाचे तीर्थक्षेत्र म्हणतात. येथे शिवांची पूजा केल्यास सहस्र गोप्रदानांचे फळ प्राप्त होते. या तीर्थाच्या स्थानी महादेवांची पूजा केल्यास, तेथे त्रिरात्र निवास केल्यास त्यास पुनः जन्म येत नाही. यानंतर मनुष्याने भीमेश्वरास, नारदेश्वरास जावे. नंतर तूप व मध यांच्या प्रवाहाने युक्त अशा महापुण्यकारक आदित्येश्वरास जाऊन तेथील नंदिकेश्वरास आलिंगन दिल्यास जन्माचे साफल्य होते. यानंतर वरुणेश्वर, स्वतंत्रेश्वर इत्यादी स्थानांचे दर्शन घेतल्यास सर्व तीर्थस्नानांचे फल प्राप्त होते.

यानंतर ज्या ठिकाणी देव व दैत्य यांच्यांत मोठे युद्ध झाले,ज्यात

असुर मोह पावले, ते कोटितीर्थ येते. सर्व देवांनी दानवांचा शिरच्छेद येथेच केला. देवांनी येथे नंदिकेश्वरचिन्हाचा ध्वजयुक्त रथ तयार केला. त्यात आरोहण करणाऱ्या त्रिशूलधारी महादेवांची त्यांनी स्थापना केली. येथे कोटचवधी दैत्य मारले गेले. म्हणून यास कोटीश्वर असे नाव प्राप्त झाले. या तीर्थाच्या दर्शनाने स्वर्गाचा मार्ग मोकळा झाला. घृत-सहित श्रीफल भक्षण करून, दीपसहित शंकरांची प्रतिमा मस्तकावर धारण करून कोटितीर्थास प्रदक्षिणा करतो, तो सर्व पृथ्वीचा भोगसंपन्न राजा होतो. मरणानंतर तो रुद्रस्वरूप होतो. काही कालानंतर तो भूलोकी जन्म घेऊन राजा होतो. नंतर पुनः तो स्वर्गास जातो. म्हणून मानवाने त्रयोदशीस येथील शिवांचे दर्शन घ्यावे.

यानंतर सर्व पापांचा नाश करणाऱ्या परम मंगल अशा अगस्त्ये-श्वर नावाच्या तीर्थास जावे. या उत्तम तीर्थात स्नान करणारा मनुष्य ब्रह्मलोकात पूज्य होतो. जो मनुष्य एकाग्रचित्ताने कार्तिकमासी कृष्ण-पक्षात चतुर्दशीच्या दिवशी घृताने शिवांना स्नान घालतो, तो आपल्या एकवीस कुलांसह शिवपुरास जातो. तेथून त्याची अधोगती होत नाही. धेनू, जोडा, छत्री, घृत, कांबळे, भोजन यांची दाने अगस्त्येश्वरास केली तर मनुष्याचे पुण्य कोटिपटींनी वाढते. यानंतर बलाकेश्वर नावाच्या तीर्थात स्नान केल्यास मनुष्य सार्वभौम राजा होतो.

नर्मदेच्या दक्षिणतीरावर इंद्राचे एक प्रसिद्ध तीर्थ आहे. येथें एक अहोरात्र उपोषण करून दुसऱ्या दिवशी स्नान करावे. भक्तीने जनार्दनांची पूजा करावी. त्याला सहस्र गोप्रदानांचे फल मिळते. तो विष्णुलोकी जातो. यानंतर मनुष्याने ऋषितीर्थास जावे. नंतर ब्रह्मदेवांनी निर्माण केलेल्या देवतीर्थास जावे. अशा रीतीने या एकशेनव्वदाव्या अध्यायात रावणेश्वर, ऋणतीर्थ, वटेश्वर, भीमेश्वरतीर्थ, तुरानर्मदासंगम, सोम-तीर्थ, पिंगलेश्वर, कर्कोटकेश्वर, सुरेश्वर, नंदितीर्थ, दीपेश्वर, व्यासतीर्थ, ऐरंडीनदी, सलिलतीर्थ, नर्मदाइक्षुसंगम, लिंगसारतीर्थ, भंगतीर्थ, वटेश्वर-तीर्थ, संगमेश्वर, कोटितीर्थ, अंगारेश्वरतीर्थ, कठेश्वर, चंद्रभागातीर्थ, इंद्रतीर्थ, ब्रह्मावर्ततीर्थ, कपिलातीर्थ, नर्मदेशतीर्थ, संगमेश्वरतीर्थ, आदित्यायनतीर्थ, गर्गेश्वर, नागेश्वर, कुबेरभवन, मारुतालय, यमतीर्थ,

अहल्यातीर्थ, सोमतीर्थ, शुभतीर्थ, विष्णुतीर्थ, तापसेश्वर, ब्रह्मतीर्थ, सिद्धेश्वर, अंकोलतीर्थ, त्र्यंबकतीर्थ; इत्यादी अनेक तीर्थस्नानांचा महिमा या अध्यायात आला आहे.

## आणखी काही तीर्थे

याननंतर पुढल्या अध्यायात भार्गवेश, शुक्लतीर्थ इत्यादींचे विस्ताराने वर्णन आले आहे. पुढल्या एकशेब्याण्णव्या अध्यायात अनरकतीर्थ, कपिलातीर्थ, ऋषितीर्थ, गंगावदन, दशाश्वमेधजननतीर्थ, भृगुतीर्थ, गौतमेश्वर, धौतपापतीर्थ, एरंडीतीर्थ, हिरण्यदीप नावाचे तीर्थ, कनखलतीर्थ, हंसतीर्थ, वराहतीर्थ, चंद्रतीर्थ, दीपेश्वरतीर्थ, सर्वतीर्थ, शिखितीर्थ; इत्यादी तीर्थस्थानांचे वर्णन आले आहे. एकशेत्र्याण्णव्या अध्यायात अंकुशेश्वर, नर्मदेश्वर, अश्वतीर्थ, पितामहतीर्थ, सावित्रीतीर्थ, मनोहरतीर्थ, मानसतीर्थ, कुंजतीर्थ, त्रिदशज्योतितीर्थ, ऋषिकन्यातीर्थ, स्वर्णबिंदुतीर्थ, अप्सरेशतीर्थ, नरकतीर्थ, भारभूतितीर्थ, भारभूती, ऐरंडीनर्मदासंगमतीर्थ, नर्मदासमुद्रसंगम, विघहनतीर्थ, विमलेश्वर, कौशिकीतीर्थ; इत्यादी तीर्थांसह नर्मदामाहात्म्य आले आहे. प्रत्येकाच्या लहानशा कथेचाही संदर्भ थोडक्यात आहे.

एक महत्त्वाची कथा अशी आहे. दशाश्वमेधतीर्थाच्या पश्चिमेस ब्राह्मणश्रेष्ठ भृगू देवांच्या सहस्र वर्षांपर्यंत सदाशिवांची आराधना करीत होता. तेव्हा भृगूंवर वारूळ चढून त्यावर पक्षी बसत होते. तेव्हा पार्वतीने शंकरांना विचारले, 'हा कोण तप करीत आहे?' तेव्हा शिवांनी भृगू आपल्यापासून वर प्राप्त करण्यासाठी प्रार्थना करीत आहे, असे पार्वतीस सांगितले. तेव्हा पार्वती म्हणाली, 'या भृगूंच्या शिखेतून धूर निघू लागला तरी तुम्ही का प्रसन्न होत नाही? खरंच आपली आराधना फारच कठीण आहे.' 'पार्वती', शंकर म्हणाले, 'हा भृगू फार क्रोधी आहे. तू पाहाच.' असे म्हणून शिवांनी नंदीस मुनींचे वारूळ पाडण्यास सांगितले. नंदीने वारूळ पाडल्यावर भृगू त्याला क्रोधाने शाप देऊ लागले. पण शिवांचे त्यांना दर्शन झाले व त्यांनी त्यांची प्रार्थना केली. अपराधां-

बद्दल त्यांनी क्षमा मागितली. शिव भृगूंवर प्रसन्न झाले. भृगू म्हणाले, 'महादेवा, माझं हे स्थान रुद्रवेदी या नावानं प्रसिद्ध व्हावं.' असे हे भृगुतीर्थं निर्माण झाले. हे सर्व पापांतून मुक्त करते.

☆

# ४. सृष्टिरचना

## ब्रह्मदेवांची पांच मुखे, सरस्वती, मनू इत्यादींची निर्मिती

मत्स्यपुराणाच्या तिसऱ्या अध्यायात या विषयास प्रारंभ झाला आहे. मनूने मत्स्यभगवानांना विचारले, 'भगवन्, लोकपितामह ब्रह्मदेव चतुर्मुख कसे झाले ? त्यांनी कोणत्या लोकांची निर्मिती केली ?' या प्रश्नांची उत्तरे मत्स्यभगवानांनी दिली. देवांचे पितामह ब्रह्मदेवांनी कठोर तपस्या केली. तिच्या प्रभावाने अंगे (शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष, छंद), उपांगे (पुराण, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र), पद (वेदमात्रांचे पदपाठ), क्रम, इत्यादींसह वेदांचा प्रादुर्भाव झाला. मीमांसा व न्यायशास्त्र यांची निर्मिती झाली.

नंतर ब्रह्मदेवांनी दहा मानसपुत्रांना निर्माण केलें. मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, ऋतू, प्रचेता, वसिष्ठ, भृगू, नारद असे हे दहा पुत्र मुनिरूपात निर्माण झाले. यानंतर त्यांच्या शरीरापासून मातृविहीन पुत्र तयार झाले. त्यांच्या उजव्या अंगठ्यापासून दक्ष प्रजापती निर्माण झाला. त्यांच्या स्तनांपासून धर्म, हृदयापासून कुसुमायुध काम, भ्रूमध्यापासून क्रोध व ओठांपासून लोभ यांची निर्मिती झाली. बुद्धीपासून मोह, अहंकारापासून मद, कंठापासून प्रमोद, नेत्रांपासून मृत्यू यांची निर्मिती झाली. तळहातापासून भरत निर्माण झाला. ब्रह्मदेवांचे दहावे संतान कन्या असून तिचे नाव अंगजा होते.

जेव्हा ब्रह्मदेवांनी सृष्टिरचना करण्याची इच्छा केली, तेव्हा ते

सावित्रीचे ध्यान करून तप करू लागले. तेव्हा त्यांचे शरीर दोन भागांत विभक्त झाले. त्यांचा अर्धा भाग स्त्रीरूप व अर्धा पुरुषरूप झाला. ही स्त्री सरस्वती वा शतरूपा या नावाने विख्यात झाली. तीच सावित्री, गायत्री, ब्रह्माणी या नावांनी ओळखली जाते. ब्रह्मदेवांनी हिला आपली पुत्री मानले. ते तिच्यावर लुब्ध होऊन म्हणू लागले, 'कसं सुंदर रूप आहे. कसं अपूर्व सौंदर्य आहे !' सावित्री वाकून त्यांना नमस्कार करू लागली. सावित्री त्यांना प्रणाम करू लागली. तिला पाहाण्याच्या इच्छेने त्यांच्या उजव्या भागातील मागच्या बाजूत एक नूतन मुख प्रकट झाले. त्यांनी केलेल्या उग्र तपाचे फल हळूहळू नष्ट झाले. अशी पांच मुखे निर्माण झाली.

यानंतर ब्रह्मदेवांनी आपल्या मानसपुत्रांना देव, असुर, मानव, यांची प्रजा निर्माण करण्यासाठी आज्ञा दिली. त्या आज्ञेस अनुसरून पुत्रांनी विविध प्रकारची सृष्टी निर्माण केली. यानंतर ब्रह्मदेवांनी चरणांवर प्रणाम करण्यासाठी पडलेल्या अनिंदिता शतरूपाशी विवाह केला. यानंतर शतरूपास मनू नावाचा पुत्र झाला. तो स्वायंभुव या नावाने विख्यात झाला. त्यासच विराट्, अधिपुरुष अशी नावे मिळाली.

## पुत्रीची इच्छा करणारे ब्रह्मदेव दोषी का नाहीत ?
## आदिसृष्टीची निर्मिती

यानंतर मनूने विचारले, 'भगवन्, पुत्रीची अभिलाषा धरणारे ब्रह्मदेव कसे दोषी नाहीत ? विभो, आपण या शंकेचं निरसन करावं.' या शंकेचे निरसन मत्स्यभगवानांनी केले. ही शतरूपारूपी आदिसृष्टी दिव्य आहे. ही इंद्रियजन्य विषयांच्या पलीकडची आहे. शतरूपा इंद्रियांतीत आहे. या दिव्य व संपन्न तेजाची परीक्षा मांसपिंडरूप मानवी नेत्रांनी करता येणार नाही. सर्पांचा मार्ग सर्प, पक्ष्यांचा मार्ग पक्षीच जाणू शकतात. शतरूपास मानव कधीच जाणू शकणार नाही. देवांच्या कार्यांचा विचारच करू नये. गायत्री ब्रह्मदेवांच्या अंगापासून उत्पन्न झालेली असल्यामुळे हे मिथुनरूप अमूर्त व मूर्तिमान, अशा दोनही रूपांचे आहे. जेथे भगवान तेथे गायत्री, आणि जेथे गायत्री तेथे ब्रह्मदेव, अशी

स्थिती असते. ब्रह्मदेव वेदसमूहरूप व सावित्री त्यांची अधिष्ठात्री देवी असल्याने त्यांच्यावर दोष येत नाही. तरी त्यावेळी ब्रह्मदेवांनी कामास शाप दिला की, 'तू माझं मन प्रक्षुब्ध केलंस. म्हणून कामदेव, शिव तुला दग्ध करतील.' तेव्हा कामदेव त्यांना म्हणाला,

'आपण मला उगाच शाप देता. सर्व देहधारियांची इंद्रियं प्रक्षुब्ध करण्यासाठीच मला निर्माण केलं आहे. आपणच मला तशी आज्ञा केली आहे. विभो, म्हणून मी निर्दोष आहे. भगवन्, माझ्यावर कृपा करावी.' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, 'कामदेव, वैवस्वत मन्वन्तरात असुरांचे विनाशक श्रीराम यदुवंशात बलरामाच्या रूपानं अवतरतील. त्यांच्या भ्रात्याच्या, श्रीकृष्णांच्या पोटी तू पुत्ररूपानं अवतरशील. तू शरीर प्राप्त करून द्वारकेत सर्व भोग भोगशील. नंतर तू भरतवंशात महाराजाचा, वत्साचा पुत्र होशील. नंतर विद्याधरांचा अधिपती होऊन महाप्रलयापर्यंत धर्मपूर्वक सुखांचा भोग भोगून माझ्याकडं परत येशील.'

यानंतर मत्स्यभगवानांनी मनूस यदुवंशाचा परिचय करून दिला. कामदेवाच्या जन्माचा वृत्तांत सांगितला. ब्रह्मवादिनी गायत्री शतरूपा, शतेंद्रिया या नावांनीही ओळखली जात असे. हिच्या गर्भापासून ब्रह्मदेवांनी रती, मन, तप, बुद्धी, महान्, दिक् व संभ्रम; अशा सात संतानांना जन्म दिला. ब्रह्मदेवांच्या मरीची आदी दहा मानसपुत्रांनी ज्ञानात्मक संसाराची रचना केली. त्यानंतर ब्रह्मदेवांनी त्रिशूलधारी वामदेवांची व पूर्वजांचेही पूर्वज सनत्कुमारांची निर्मिती केली. भगवान वामदेवांनी आपल्या मुखापासून ब्राह्मणांची, बाहूंपासून क्षत्रियांची, मांड्यांपासून वैश्यांची व पायांपासून शूद्रांची निर्मिती केली. त्यानंतर त्यांनी वीज, वज्र, मेघ, इंद्रधनुष्य व छंद यांची रचना केली. त्यानंतर त्यांनी मेघांची रचना केली. नंतर त्यांनी जरामरणरहित व त्रिनेत्रधारी चौऱ्यांशी कोटी साध्यगणांना उत्पन्न केले.

यानंतर बुद्धिमान स्वायंभुव मनूनें कठोर तपस्या करून अनंती नावाच्या एका सुंदर कन्येचा पत्नी म्हणून स्वीकार केला. त्याला हिच्यापासून प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र प्राप्त झाले. धर्माची कन्या सुनृताने उत्तानपादापासून अपस्यती, अपस्यंत, किर्तिमार, ध्रुव या चार

पुत्रांना निर्माण केले. यांतील ध्रुवाने तीन हजार वर्षे तप करून ब्रह्म-देवांपासून एक दिव्य व अढळ असे स्थान प्राप्त करून घेतले. या ध्रुवास मनूची कन्या धन्यापासून शिष्ट नावाचा पुत्र झाला. या शिष्टाने अग्नि-कन्या सुच्छायाने कृप, रिपुंजय, वृत्त, वृक, वृकतेजस्, चाक्षुष; अशा पुत्रांना जन्म दिला. यांतील रिपुंजयाने वीरणाची कन्या वीरिणीपासून चाक्षुष मनूस जन्म दिला. याने राजपुत्री नड्वलापासून अरू, पुरू, तपस्वी शतद्युम्न, सत्यवाक्, हवी, अग्निष्टुत्, अतिरात्र, सुद्युम्न, अपरा-जित, अभिमन्यू; या दहा शूर व निष्पाप पुत्रांना जन्म दिला.

आग्नेयीने उरूच्या संयोगापासून अग्नी, सुमनस्, ख्याती, क्रतू, अंगिरस, गय; अशा सहा परम कांतिमान पुत्रांना जन्म दिला. पितरांची कन्या सुनीथाने अंगाच्या संपर्कापासून वेनास जन्म दिला. ब्राह्मणांनी या अन्यायी वेनाच्या हाताचे मंथन केले. यापासून महातेजस्वी पृथू नावाचा पुत्र प्रकट झाला. त्याला दोन पुत्र अंतर्धान व हविर्धान या नावांचे झाले. अंतर्धानाने शिखंडिनीच्या गर्भापासून मारीच नावाचा पुत्र निर्माण केला.

अग्निकन्या धीषणाने हविर्धानाच्या संयोगापासून प्राचीनर्बहिष्, सांग, यम, शुक्र, वल, शुभ; या सहा पुत्रांना जन्म दिला यांतील प्राचीनबर्ही ऐश्वर्यशाली प्रजापती होता. त्याने हविर्धान नावाच्या प्रजेचा विस्तार केला. समुद्रकन्या सुवर्णाच्या गर्भापासून दहा पुत्रांना जन्म दिला. ते सर्व धनुर्वेदाचे पारगामी विद्वान होते. ते प्रचेता या नावाने विख्यात झाले. या प्रचेतांच्या संरक्षणात वृक्ष शोभा पावत होते. पण इंद्रदेवाने अग्नीच्या साह्याने ते वृक्ष जाळून भस्म केले. त्यानंतर चंद्रमाची कन्या मारिषाने प्रचेतांचे पत्निपद स्वीकारले. त्यांच्या संयोगाने एक दक्ष नावाचा श्रेष्ठ पुत्र जन्मास आला. त्यानंतर या सोमकन्येने सर्व वृक्षांची व औषधींची निर्मिती केली. यालाच चंद्रावती नावाची नदी झाली. दक्ष प्रजापतीस ऐंशी कोटी संताने झाली. यांचाच विस्तार सर्वत्र झाला. यांतील काहींना दोन पाय होते. काहींना अनेक होते. काहींची मुखे वाकडी होती. काहींचे कान खुंटांसारखे होते. काहींचे कान केसांनी झाकले होते. काहींची मुखे घोड्यांसारखी वा अस्वलांसारखी होती. काहींची मुखे कुत्री व डुकरे यांच्या मुखांसारखी होती. काहींची उंटां-

प्रमाणे होती. या धर्मात्मा दक्षाने अनेक स्त्रियांनाही निर्माण केले. त्यांतील दहा कन्या त्याने यक्षांना दिल्या. तेरा कश्यपांना दिल्या आणि सत्तावीस कन्या त्याने चंद्राला दिल्या. याच कन्यांपासून देव, असुर व मानव आदींनी परिपूर्ण असे जग निर्माण झाले.

## दक्षकन्यांची उत्पत्ती, देवादिकांची निर्मिती

शौनकादी शिष्यांनी सूतास विचारले, 'सूता, देव, दानव, गंधर्व, नाग, राक्षस या सर्वांची उत्पत्ती कशी झाली?' या प्रश्नाचे उत्तर सूताने विस्ताराने दिले. दक्षानंतर स्त्री-पुरुषांच्या संयोगाने सृष्टीची निर्मिती झाली. दक्षाने पांचजनीच्या गर्भापासून एक हजार पुत्र निर्माण केले. यांनाच 'हर्यश्व' असे नाव आहे. यांनी नारदांच्या सांगण्यावरून विभिन्न दिशांना प्रयाण केले. समुद्राला मिळालेल्या नद्या जशा परत येत नाहीत, तसे ते परत आले नाहीत. यानंतर दक्षाने वीरिणीच्या गर्भापासून पुन: एक हजार पुत्र निर्माण केले. ते 'शबल' या नावानें प्रसिद्ध होते. तेही नारदांच्या सांगण्यावरून गेले ते परत आलेच नाहीत.

यानंतर प्रचेतानंदन प्रजापती दक्षाने वीरिणीच्या गर्भापासून साठ कन्यांना निर्माण केले. यांतील दहा कन्या दक्षानें धर्माला समर्पित केल्या. तेरा कश्यपांना, सत्तावीस चंद्राला, चार अरिष्टनेमीस, दोन भृगुनंदन शुक्रांस, दोन बुद्धिमान कृशाश्वास व दोन अंगिरांना दिल्या. यांतील मरुत्वती, वसू, यामी, लंबा, भानू, अरुंधती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या, सुंदरी विश्वा; या दहा धर्माच्या पत्नी झाल्या. यांतील विश्वानें विश्वेदेवांना, साध्यानें साध्यांना, मरुत्वतीने मरुतांना, वसूने वसूंना, भानूनें सूर्यांना, मुहूर्ताने मुहूर्तास, लंबाने घोषास, यामीनें नागवीथीस व संकल्पानें संकल्पास जन्म दिला. अरुंधतीच्या गर्भापासून भूतलावरील सर्व जीवजंतूंची निर्मिती झाली.

जे प्रभावशाली देव सर्व विश्वाला व्यापून राहातात, ते सर्व 'वसू' या नावाने विख्यात आहेत. आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास; हे आठ वसू होत. यांतील आप नावाच्या वसूस शांत, दंड, शांब, मणिवक्त्र या नावांचे चार पुत्र झाले. ते सर्व

यज्ञाचे अधिकारी झाले. उरलेल्या वसूंपैकी ध्रुवाचा पुत्र काल झाला. सोमापासून वर्चाची उत्पत्ती झाली. धरास कल्याणीपासून द्रविण व द्रव्यवाह नावांचे दोन पुत्र झाले. हरीची कन्या मनोहराने याच धराच्या संयोगाने प्राण, रमण, शिशिर या नावांच्या तीन पुत्रांना जन्म दिला. शिवाने अनलापासून मनोजव व अविज्ञातगती या दोन पुत्रांनाजन्म दिला. अग्निपुत्र कुमार कार्तिकेय हा गवतासारख्या झुडपांत निर्माण झाला होता.

याचेच अनुज शाख, विशाख व नैगमेय या नावांनी प्रसिद्ध झाले. प्रत्यूष वसूस देवल, विभू हे दोन पुत्र झाले.प्रभासास विश्वकर्मा नावाचा पुत्र झाला. तो शिल्पकलेत निपुण होता. अजैकपाद्, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, सुरराज त्र्यंबक, सावित्र, जयंत, पिनाकी व अपराजित; हे अकरा रुद्र गणेश्वर या नावांनी प्रसिद्ध झाले. यांना चौऱ्यांशी कोटी पुत्र झाले. हेच सर्व दिशांचे रक्षण करतात.

## कश्यपांचा वंशवृक्ष

अदिती, दिती, दनू, अरिष्टा, सुरसा, सुरभी, विनता, ताम्रा, क्रोधवशा, इरा, कद्रू, विश्वा, मुनी; या तेरा कश्यपांच्या पत्नी होत. चाक्षुष मनूच्या काळात तुषित नावाचे जे देवगण होते, तेच वैवस्वत मन्वन्तरात द्वादश आदित्य म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांची नावे इंद्र, धाता, भग, त्वष्टा, मित्र, वरुण, यम, विवस्वान्, सविता, पूषा, अंशुमान व विष्णू अशी होती. अदितीने मरीचीपासून या श्रेष्ठ पुत्रांना प्राप्त केले. महर्षी कृशाश्वांचे पुत्र देवप्रहरण या नावाने विख्यात झाले. दितीने महर्षी कश्यपांपासून हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष या दोन पुत्रांना प्राप्त करून घेतले. हिरण्यकशिपूस त्याच्याच समान प्रल्हाद, अनुल्हाद, संल्हाद व ल्हाद नावांचे चार पुत्र झाले. यांतील प्रल्हादास आयुष्मान्, शिवी, बाष्कल व विरोचन असे चार पुत्र झाले. विरोचनाचा पुत्र बली. बलीला शंभर पुत्र झाले. त्यांतील बाण सर्वश्रेष्ठ होता. यांशिवाय धृतराष्ट्र, सूर्य, चंद्र, चंद्रांशुतापन, निकुंभनाभ, गुर्वक्ष, कुक्षिभीम, बिभीषण; इत्यादी गुणसंपन्न पुत्र त्याला होते. यांतील बाणास सहस्र भुजा होत्या. त्याला सर्व अस्त्रांचे ज्ञान होते. याच्या तपस्येने संतुष्ट होऊन भगवान

शंकर त्याच्या नगरीत राहू लागले.

दितीच्या द्वितीय पुत्रास, हिरण्याक्षास उलूक, शकुनी, भूतसंतापन, महानाथ या नावांचे पुत्र झाले. यांच्यापासून सत्त्याहत्तर कोटींचे पुत्र-पौत्र निर्माण झाले. ते सर्व बलशाली, विशाल शरीराचे, नाना प्रकारची रूपे धारण करणारे होते. दनूने कश्यपांपासून शंभर बलशाली पुत्रांना प्राप्त केले. त्यांतील विप्रचित्ती प्रधान होता. याच्याशिवाय द्विमूर्धा, शकुनी, शंकुशिरोधर, अयोमुख, शंबर, कपिश, वामन, मरीची, मेधवान्, इरागर्भशिरा, विद्रावण, केतू, केतुवीर्य, शतऱ्हद, इंद्रजित, सप्तजित, वज्रनाभ, एकचक्र, महाबाहू, वज्राक्ष, तारक, अतिलोभा, प्रलोमा, बिंदू, महासुर, बाण, स्वर्भानू, वृषपर्वा; असे काही दनूचे आणखीही पुत्र आहेत. यांशिवाय स्वर्भानूची प्रभा, प्रलोभाची शची, मयाची उपदानवी, मंदोदरी व कुहू, वृषपर्व्याची शर्मिष्ठा, सुंदत व चंद्रा, वैश्वानराची पुलोमा व कालका या नावांच्या कन्याही होत्या. यांतील पुलोमा व कालका कश्यपांच्या पत्नी होत्या. या दोन्हींपासून पूर्वी साठ हजार दानवांची उत्पत्ती झाली. पौलोम व कालकेव संज्ञांचे दानव उत्पन्न झाले. हे हिरण्यपुरात निवास करीत होते. ब्रह्मदेवांच्या वरदानामुळे हे देवांनाही अवध्य होते. पण विजयाने (अर्जुनाने) त्यांचा संहार केला.

विप्रचित्ताने सिंहिकेच्या गर्भापासून सैंहिकेय नावाच्या पुत्रांना जन्म दिला. त्यांची संख्या तेरा होती. हे हिरण्यकशिपूचे भाचे होते. व्यंस, कल्प, राजेंद्र, नल, वातापी, इल्वल, नमुची, श्वसृप, अजन, नरक, कालनाभ, सरमाण व कालवीर्य; अशी त्यांची नावे होती. या सर्वांनी दनूचा वंश वाढविला. दैत्य संल्हादाचे पुत्र निवातकवच या नावाने प्रसिद्ध होते. ते सर्व देव, गंधर्व, नाग व राक्षस यांच्याकडून अवध्य होते. परंतु अर्जुनाने शिवांचा आश्रय घेऊन त्यांचा रणभूमीवर नाश केला. ताम्राने कश्यपापासून शुकी, श्येनी, भासी, सुग्रीवी, गृध्रिका व शुची या नावांच्या सहा कन्यांना जन्म दिला. शुकी व धर्म यांनी शुक व उलूक यांना निर्माण केले. श्येनीपासून बाजपक्षी, भासीपासून कुरर, गृध्रीने गिधाडे, पारावत, कबूतरे यांना जन्म दिला. शुचीच्या गर्भापासून हंस, सारस, क्रौंच, प्लव (कारंडवासारखे जलपक्षी) अशी

निर्मिती झाली. सुग्रीवाने बकरे, मेंढ्या, उंट, गाढव यांना जन्म दिला.

विनताचे दोन पुत्र गरुड व अरुण होत. यांच्यापासून सर्व पक्षी निर्माण झाले. यांचे तिसरे संतान सौदामिनी नावाची कन्या होती. अरुणास संपाती व जटायू हे दोन पुत्र झाले. संपातीस बभ्रू व शीघ्रग या नावांचे दोन पुत्र झाले. जटायूस कर्णिकार व शतगामी या नावांचे दोन पुत्र झाले. यांशिवाय जटायूस सारस, रज्जुबाल, भेरुंड नावांचे पुत्रही होते. या पक्ष्यांच्या पुत्रपौत्रांची संख्या अनंत आहे. सुरसा व कद्रू यांच्या गर्भांपासून सहस्र फणांचे एक एक हजार सर्प निर्माण झाले. यांतील प्रधान सर्प असे: शेष, वासुकी, कर्कोटक, शंख, ऐरावत, कंबल, धनंजय, महानील, पद्म, अश्वतर, तक्षक, एलापत्र, महापद्म, धृत-राष्ट्र, बलाहक, शंखपाल, महाशंख, पुष्पदंष्ट्र, शुभानन, शंकुरोमा, बहुल, वामन, पाणिन, कपिल, दुर्मुख व पतंजली. या सर्व सर्पांच्या पुत्रपौत्रांची संख्या अगणित होती. परंतु प्राचीनकाळी जनमेजयाच्या सर्पयज्ञात अनेक सर्प जळून मेले. क्रोधवशाने आपल्या नावासारखे दंष्ट्रधारी एक लाख राक्षसांना जन्म दिला. ते सर्व भीमसेनाने नष्ट केले. सुरभीने कश्यपां-पासून रुद्रगण, गायी, म्हशी यांना उत्पन्न केले. मुनीने मुनिसमुदाय व अप्सरासमूह यांना निर्माण केले. अरिष्टाने अनेक किन्नर व गंधर्व यांना जन्म दिला. इरापासून समस्त तृण, वृक्ष, लता, झाडी यांची निर्मिती झाली. असा हा कश्यपांचा वंशविस्तार आहे.

## मरुतांची उत्पत्ती

प्राचीनकाळी देवासुरसंग्रामात भगवान विष्णू व देवगण यांच्याकडून दैत्यांचा संहार झालेला पाहून दैत्यमाता दिती शोकाने विव्हळ झाली. ती उत्तम भूलोकात जाऊन स्यमंतपंचकक्षेत्रात सरस्वतीच्या मंगल तटावर पतिदेव महर्षी कश्यप यांची आराधना करू लागली. घोर तपश्चर्या करताना ती फलाहार करून कृच्छ्रचांद्रायणादी व्रते करू लागली. वृद्धत्व व शोक यांनी ती व्याकुळ झाली होती. तिने शंभर वर्षे कठोर तपस्या केली. तिने शोकसंतप्त होऊन वसिष्ठादी ऋषींना विचारले, 'ऋषींनो, माझ्या पुत्रशोकाचा नाश होईल असा एखादा उपाय मला सांगा ना.'

त्यानंतर ऋषींनी तिला मदनद्वादशीचे व्रत सांगितले.

ऋषींनी सांगितल्यावर दितीने हे व्रत केल्यावर तिच्या प्रभावाने महर्षी कश्यप प्रसन्न होऊन तिच्यापाशी आले. तिला सौंदर्य व यौवन यांनी संपन्न करून त्यांनी वर मागण्यासाठी सांगितले. दिती त्यांना म्हणाली, 'पतिदेवा, मी आपणांस असा एक पुत्र मागते की, जो इंद्राचा वध करू शकेल. सर्व देवांचा विनाश करणारा पुत्र मला हवा आहे.' तेव्हा मुनी तिला म्हणाले, 'शुभे, मी तुला एक अत्यंत ऊर्जस्वी व इंद्राचा वध करणारा पुत्र देईन. पण त्यासाठी तू आपस्तंबऋषींची प्रार्थना करून पुत्रेष्टियज्ञाचं अनुष्ठान कर. सुव्रते, यज्ञाची समाप्ती होताच मी तुझ्या उदरात इंद्राचा नाश करणाऱ्या पुत्रासाठी गर्भाधान करीन.' यानंतर आपस्तंबांनी अत्यंत खर्चिक असा पुत्रेष्टियज्ञ केला. 'इंद्रशत्रुर्भवस्व—इंद्राचा शत्रू निर्माण व्हावा' अशा मंत्राने आहुती दिली.

यज्ञाच्या समाप्तीनंतर दितीच्या उदरात कश्यपांनी गर्भाधान करून तिला म्हटले, 'वरानने, तू शंभर वर्षं या तपोवनात राहून गर्भाचं रक्षण कर. वरवर्णिनी, गर्भिणी स्त्रीनं संध्याकाळी भोजन करू नये. वृक्षाच्या मुळाशी तिनं कधी बसू नये. त्याच्या निकटही तिनं कधी जाऊ नये. घरातही मुसळ, उखळी इत्यादीवर बसू नये. पाण्यात शिरून स्नान करू नये. सुन्या घरात जाऊ नये. मनास उद्विग्न करू नये. नखानं, राखेनं पृथ्वीवर रेघा काढू नयेत. कठीण परिश्रमाची कामं करू नयेत. लोकांशी वादविवाद करू नये. केस मोकळे सोडून तिनं बसू नये. कधी अपवित्र राहू नये. उत्तरदिशेस डोकं करून झोपू नये. नग्न होऊन, उद्विग्न होऊन, भिजलेल्या पायांनी कधी शयन करू नये. अमंगलसूचक वाणी कधी ऐकू नये, बोलू नये. अधिक जोरानं हसू नये. नित्य मांगलिक कार्यांत तत्पर राहून गुरुजनांची सेवा करावी. सर्व औषधींनी युक्त अशा गरम जलानं स्नान करावं. प्रसन्न चित्तानं सदा आपल्या पतीचं हित चिंतावं. नक्तव्रताचं पालन करावं. अशा स्त्रीस होणारा पुत्र शीलवान व दीर्घायू होतो. या नियमांचं पालन न केल्यास गर्भपाताचा संभव असतो.'

असे म्हणून महर्षी कश्यप निघून गेले. दिती त्यांच्या कथनानुसार व्रत करू लागली. तिच्या या तपाने इंद्र भयभीत झाला. तो देवलोक

सोडून त्वरित तिच्याजवळ आला. तो तिची छिद्रे पाहात राहिला. अशी शंभर वर्षे गेली. एकदा दिती आळसाने पाय न धुता, केस मोकळे सोडून दिवसा झोपी गेली, तेव्हा देवराज इंद्राने तिच्या उदरात प्रवेश केला. त्याने आपल्या वज्राने त्या गर्भाचे सात तुकडे केले. या तुकड्यांपासून सात शिशू निर्माण झाले. इंद्राने पुनः त्यांचे प्रत्येकी सात सात तुकडे केले. ते शिशू जोराने रडू लागले. इंद्राने त्यांना 'रडू नका' असे म्हटले. मदनद्वादशीच्या प्रभावाने ते जिवंत राहिले. तिच्या उदरातच हे एकोणपन्नास तुकडे शिशुरूपात वाढू लागले. 'मा रुदत–रडू नकोस' असे यांना म्हटल्यामुळे मरुत या नावांनी ते प्रसिद्ध झाले. इंद्र दितीच्या उदरातून बाहेर आला व तिला म्हणाला, 'देवी, मला तू क्षमा कर.' देवराज इंद्राने मरुतांना देवासमान करून तो त्यांच्यासह दितीला घेऊन स्वर्गात गेला.

## मन्वन्तरांचे चौदा देव व सप्तर्षी

स्वायंभुव मन्वन्तरात याम नावाचे देवगण होते. मरीची आदी मुनी सप्तर्षी होते. या मनूचे आग्नीध्र, अग्निबाहू, सह, सवन, ज्योतिष्मान्, द्युतिमान्, हव्य, मेधा, मेधातिथी व वसू असे दहा पुत्र होते. यानंतर स्वारोचिष मनूस नभ, नभस्य, प्रसृती, भानू; असे चार पुत्र होते. या मन्वन्तरात दत्त, निश्च्यवन, स्तंब, प्राण, कश्यप, और्व व बृहस्पती हे यातील सप्तर्षी होत. यामधील देवगण तुषित या नावाने प्रसिद्ध आहेत. महर्षी वसिष्ठांचे हस्तींद्र, सुकृत, मूर्ती, आप, ज्योती, अद व स्मय नावांचे सात पुत्र प्रजापती असतात. हे झाले दुसऱ्या मन्वन्तराचे वर्णन. यानंतर औत्तमी नावाच्या तिसऱ्या मन्वन्तरात औत्तमी नावाचा मनू झाला. त्याला दहा पुत्र होते. ईष, ऊर्ज, तर्ज, शुची, शुक्र, मधू, माधव, नभस्य, नभस्, सह अशी त्यांची नावे होती. यांतील सह परम उदार व कीर्ती वाढविणारा होता. या मन्वन्तरात भावना नावाचे देवगण झाले. कौकुरुंडी, दाल्भ्य, शंख, प्रवहण, शिव, सित व संमित; हे सप्तर्षी होत. हे सातही अत्यंत ऊर्जस्वी व योगप्रवर्तक होते.

चौथे मन्वन्तर तामस या नावाने विख्यात आहे. या मन्वन्तरात

कवी, पृथू, अग्नी, अकपी, कपी, जल्प व धीमान हे सात मुनी झाले. देवगण साध्य नावाचे होते. तामस मनूस अकल्मष, धन्वी, तपोमूल, तपोधन, तपोरती, तपस्य, तपोद्युती, परंतप, तपोभोगी, तपोयोगी; असे दहा पुत्र होते. हे सदाचारी व वंशविस्तारक होते. पांचव्या रैवत मन्वन्तरात देवबाहू, सुबाहू, पर्जन्य, सोमप, मुनी, हिरण्यरोमा व सप्ताश्व; असे सात ऋषी होते. अमूर्तरजा नावाचे देवगण होते. अरुण, तत्त्वदर्शी, वित्तवान्, हव्यप, कपी, युक्त, निरुत्सुक, सत्त्व, निर्मोह व प्रकाशक असे त्याला दहा पुत्र होते. धर्म, पराक्रम व बल यांनी ते संपन्न होते.

यानंतर सहाव्या चाक्षुष नावाच्या मन्वन्तरात भृगू, सुधामा, विरजा, सहिष्णू, नाद, विवस्वान्, अतिनामा; हे सप्तर्षी होते. देवगण लेखा नामाने प्रसिद्ध होते. लेखा, ऋभव, ऋभाद्य, वारिमूल, दिवौकस अशा देवांच्या पांच योनी होत्या. चाक्षुष मनूसही रुरू आदी दहा पुत्र होते. सातवा मनू चालू असून त्याचे नाव वैवस्वत असे आहे. या मन्वन्तरात अत्री, वसिष्ठ, कश्यप, गौतम, योगी भारद्वाज, प्रतापी विश्वामित्र व जमदग्नी हे सात ऋषी आहेत. साध्य, विश्वेदेव, रुद्र, मरुत्, वसू, अश्विनीकुमार, आदित्य; हे सात देवगण आहेत. या मनूसही इक्ष्वाकू आदी दहा पुत्र भूमंडलात प्रसिद्ध आहेत.

सावर्णी मन्वन्तरात अश्वत्थामा, शरद्वान, कौशिक, गालव, शतानंद, काश्यप व परशुराम हे सात ऋषी आहेत. धृती, वरीयान्, यवस, सुवर्ण, वृष्टी, चरिष्णू, ईड्य, सुमती, वसू, पराक्रमी शुक्र हे दहा पुत्र असतील. यानंतर प्रजापती रुचीचा पुत्र रौच्य मनू होईल. भूतीचा पुत्र भौत्य हा मनू नंतर होईल. यानंतर ब्रह्मदेवांचा पुत्र मेरुसावर्णी मनू होईल. यानंतर ऋत, ऋतधामा व विष्वक्सेन या नावांचे मनू उत्पन्न होतील.

## सूर्यवंश, चंद्रवंश, इला

यानंतर अकराव्या अध्यायात सूताने सूर्यवंश व चंद्रवंश यांचे सविस्तर वर्णन करून सांगितले. पूर्वी महर्षी कश्यपांना अदितीपासून विवस्वान् (सूर्य) पुत्र झाला. त्याला संज्ञा, राज्ञी व प्रभा नावांच्या तीन

पत्नी होत्या. रेवताची कन्या राज्ञीनें रैवत नावाच्या पुत्रास व प्रभाने प्रभात नावाच्या पुत्रास जन्म दिला. संज्ञा त्वाष्ट्र (विश्वकर्मा) ची पुत्री होती. तिला वैवस्वत मनू व यम या नावांचे दोन पुत्र झाले. यमुना नावाची एक कन्याही तिला झाली. यम व यमुना ही जुळी संताने होती. काही काळानंतर त्वाष्ट्री (संज्ञा) सूर्याचे तेजस्वी रूप सहन करू शकली नाही. तेव्हा तिने आपल्याच शरीरापासून रूपवान व आपल्यासारख्या एका स्त्रीस उत्पन्न केले. ही 'छाया' या नावाने प्रसिद्ध झाली. या छायेला संज्ञा म्हणाली;

'वराननें, छाये, तू माझ्या पतिदेवांची सेवा कर. माझ्या संतानांची आईप्रमाणं काळजी घे.'

छायेने हे सर्व मान्य केले. ती विवस्वानाची सेवा करू लागली. त्यानें तिला संज्ञा समजून तिच्याशी व्यवहार सुरू केला. तिला मनूच्या रूपासारखा एक पुत्र झाला. हाच सावर्णी या नावाने प्रसिद्ध झाला. यानंतर छायेला शनी नावाचा पुत्र व तपती, विष्टी नावांच्या कन्या; अशी संताने झाली. छाया आपल्या मुलांवर विशेष प्रेम करी. हा पक्षपात पाहून यम व इतर संताने क्रुद्ध झाली. त्यांनी आपला उजवा पाय उचलून छायेस मारण्याची धमकी दिली. छायेने यमास शाप दिला, 'तुझ्या या एका पायास किडे खातील. यातून पू व रुधिर ठिबकत राहील.' या शापामुळे रागावलेला यम आपल्या पित्याकडे गेला. तो म्हणाला. 'देवा, या रागावलेल्या मातेनं मला अकारण शाप दिला. बालस्वभाव म्हणून मी आपला उजवा पाय सहज उचलला होता. तिनं मला शाप दिला. ती माझी खरी माता नाही.' तेव्हा विवस्वान म्हणाला, 'मी काय करू? कर्मफल अनिवार्य आहे. पुत्रा, मी तुला एक कोंबडा वा मोर देईन. तो तुझ्या पायातील किडे खाऊन टाकील. तो पू व रक्त यांनाही दूर करील.'

हे ऐकल्यावर यम थोडा शांत झाला. तो गोकर्णतीर्थास जाऊन तेथे कठोर तपस्या करू लागला. त्याने वीस हजार वर्षे महादेवांची आराधना केली. त्याला महादेव प्रसन्न झाले. यमाने त्यांच्यापासून लोकपालत्व, पितरांचे आधिपत्य, जगातील धर्माधर्मांचा निर्णय करण्याचा

अधिकार प्राप्त केला. इकडे विवस्वानानें त्वष्टा (विश्वकर्मा) पाशी जाऊन सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हा त्वष्टा सांत्वनपूर्वक विवस्वानाला म्हणाला, ' भगवन्, आपल्या प्रचंड तेजास सहन न करू शकणारी संज्ञा घोडीचं रूप धारण करून इथं माझ्याकडं आली होती. दिवाकर, पण मी तिला घरी घेतलं नाही. ही अनिंदिता संज्ञा आता मरुदेशास गेली आहे. तिथं घोडीच्या रूपात ती भ्रमण करीत आहे. मी तुमचं तेज कमी करण्यासाठी तुम्हांला एका यंत्रावर चढवितो. असं तेज कमी झालं की, तुम्ही आनंददायक व्हाल.'

त्याची आज्ञा सूर्याने स्वीकारल्यावर त्याला त्वष्ट्याने यंत्रावर चढवून त्याचे तेज थोडे कमी केले. त्या कमी केलेल्या तेजाचे त्याने विष्णूंचे सुदर्शनचक्र केले. त्याचे रुद्रांचे त्रिशूल व इंद्राचे वज्र निर्माण केले. सूर्यास त्याने अनुपम सौंदर्यशाली बनविले. भगवान सूर्यदेव संज्ञेस भेटण्यासाठी पृथ्वीतलावर आला. तेथे त्याला संज्ञापासून अश्विनीकुमारांची प्राप्ती झाली. संज्ञाच्या नाकाच्या अग्रभागापासून ते तयार झाल्याने त्यांना नासत्य व दस्त्र अशी नामे मिळाली. काही दिवसांनंतर संज्ञाने अश्वरूपधारी सूर्यास ओळखले. ती आनंदाने पतीबरोबर विमानात बसून स्वर्गास आली.

छायाचा पुत्र तपोधन सावर्णी मनू आज सुमेरुगिरीवर विद्यमान आहे. शनीस तपस्येच्या प्रभावाने ग्रहांची समता प्राप्त झाली आहे. काही दिवसांनंतर यमुना व तपती या दोन कन्या नद्यांच्या रूपात परिणत झाल्या. भयंकर रूपाची तिसरी कन्या विष्टी (भद्रा) काल (करण) रूपात स्थित झाली. वैवस्वत मनूस दहा महाबली पुत्र झाले. यांत इल श्रेष्ठ होता. उरलेल्या नऊ पुत्रांची नावे अशी होती. इक्ष्वाकू, कुशनाम, अरिष्ट, धृष्ट, नरिष्यंत, करूष, शर्याती, पृषध्र व नाभाग. हे सर्व पराक्रमी व दिव्य पुरुष होते. वृद्धावस्था प्राप्त झाल्यावर धर्मात्मा मनू आपल्या ज्येष्ठ पुत्रावर, इलावर राज्यभार सोपवून महेंद्रपर्वतावरील वनात गेला. इल सर्व भूपालांना पराभूत करीत चालला असताना शिवांपाशी आला. हे महान उपवन कल्पद्रुम व लता यांनी समृद्ध असून ' शरवण ' या नावाने प्रसिद्ध होते. या वनात देवेश्वर शिव उमेसह क्रीडा करीत होते.

या वनात जो कोणी प्रवेश करील त्याला स्त्रीत्व प्राप्त होईल, अशी अट त्यांची ठरली होती. राजा इलास ही शर्त माहीत नव्हती. तो स्वच्छंदाने त्या वनात आला. प्रवेश होताच त्याला स्त्रीत्व प्राप्त झाले. त्याच वेळी त्याचा घोडाही घोडीच्या रूपात परिवर्तित झाला. इलाच्या शरीरातील सर्व पुरुषत्व नष्ट झालें. आपणांस स्त्रीरूप प्राप्त झाल्याचे पाहून राजास नवल वाटले.

ही नारी इला या नावाने प्रख्यात झाली. तिचे रूप मोठे सुंदर होते.तिचे नेत्र कमलांसारखे मोठे होते. तिच्या मुखाची कांती पौर्णिमेच्या चंद्रासारखी होती. तिचे शरीर हलके होते. तिचे केस निळसर व कुरळे होते. तिचे दात अत्यंत मनोहर होते. ती मनोहर व गंभीर स्वरांत बोलत होती. तिच्या शरीराचा रंग श्यामगौरमिश्रित होता. ती हंसासारखी, हत्तीसारखी चालत असे. तिच्या भुवया धनुष्याप्रमाणे वक्र होत्या. तांब्याच्या रंगाची तिची नखे होती. अशी ही सुंदर नारी त्या वनात फिरताना विचार करू लागली, 'आपला पिता कोण ? माता कोण ? बंधू कोण ? आपला पती तरी कोण आहे ?

याचवेळी सोमपुत्र बुधाने तिला पकडण्याचा प्रयत्न केला. बुधाने विशिष्ट वेषभूषा करून हातांत कमंडलू व पुस्तक धारण करून वांबूच्या काठीत अनेक पवित्र वस्तूंना धारण केले होते. ब्रह्मचारीवेषात त्याने लांब शिखा धारण केली होती. समिधा, पुष्प, कुश, जल घेऊन तो बटूंसह वेदाचा पाठ करीत होता. तो जणू या वनात एखादी वस्तू शोधीत होता. वृक्षसमूहांच्या गर्दीत बसून त्याने इलास बोलाविले. इलाच्या निकट येऊन तो म्हणाला;

'सुंदरी, अग्निहोत्रादी सेवा सोडून तू माझ्या घरून इथं कशी आलीस ?'

'तपोधन, मी आपणांस, पतीस, कुलास विसरून गेले आहे. आपण माझ्या कुळाचा परिचय करून द्यावा.'

'वरवर्णिनी, तू इला आहेस. मी अनेक विद्यांचा ज्ञाता बुध आहे. माझा पिता ब्राह्मणांचा अधिपती आहे.'

बुधाचे बोलणे ऐकून इला बुधाच्या भवनात गेली. त्या भवनास

रत्नांचे खांब होते. येथे आल्यावर इलास कृतार्थता वाटली. ती मनाशी म्हणू लागली, 'कसा सुंदर परिसर आहे. कसं अद्‌भुत रूप आहे. किती प्रचुर धन आहे. कसं उच्च कुल आहे! माझ्या पतिदेवांचं कसं अनुपम सौंदर्य आहे!' इलानें येथे बुधाबरोबर अनेक वर्षे सुखभोग भोगले.

## इलाचा वृत्तांत, इक्ष्वाकुवंशवर्णन

अनेक दिवस झाले तरी इल राजधानीस परत आला नाही, हे पाहून त्याचे लहान बंधू राजा इलाचा (सुद्युम्नाचा) शोध घेता घेता त्याच शरवणापाशी आले. तेथे त्या सर्वांनी एका अनुपम घोडीस पाहिले. तीवर रत्नजडिस जीन होते. त्याला ओळखून सर्व बंधू चकित होऊन म्हणाले, 'अरे, हा तर आपल्या बंधूचा चंद्रप्रभ नावाचा घोडा आहे. मग हा अशा सुंदर घोडीत कसा परिणत झाला?' ते सर्व कुलपुरोहित वसिष्ठांपाशी आले. वसिष्ठांनी सर्व काही ध्यानाने ओळखून म्हटले;

'राजपुत्रांनो, पूर्वी शंभुपत्नी उमानं या शरवणात एक अट मानली होती. या वनात प्रवेश करणारा पुरुष स्त्री होणार, अशी शर्त होती. याच शर्तीमुळं राजा इलप्रमाणेच ही घोडी झाली. इलास पुनः पुरुषत्व प्राप्त करण्यासाठी तुम्हांस शिवांची आराधना करावी लागेल.'

वसिष्ठांची आज्ञा मानून सर्व बंधूंनी शिवांचे स्तोत्राने स्तवन केले. पार्वतीने व शिवांनी त्यांना एक उपाय सांगितला. इक्ष्वाकू राजाने केलेल्या अश्वमेधयज्ञाचे फल त्यांना समर्पित केले तर राजा इल निःसंदेह किंपुरुष (किन्नर) होणार होता. सर्व मनुपुत्र राजधानीस परत आले. इक्ष्वाकूनें सर्व यज्ञफल शिवांना व पार्वतीस समर्पित केले. इल यामुळे किंपुरुष बनला. तो एक मास स्त्रीरूपात राहू लागला. बुधाच्या घरी स्त्रीरूपात असताना तिने गर्भ धारण केला. तिला सर्वगुणसंपन्न असा एक पुत्र झाला व बुध स्वर्गलोकी निघून गेला.

तेव्हापासून इलाच्या नावावरून या वर्षास इलावृत नाव पडले. अशा रीतीने चंद्रवंश व सूर्यवंश यांच्या प्रारंभी सर्वप्रथम मनुनंदन इल हाच राजा झाला. इलाच्या पुरुषवंशात उत्पन्न झालेल्या राजाने, पुरूरव्याने चंद्रवंशाची वृद्धी केली. इक्ष्वाकूने सूर्यवंशाची वृद्धी केली.

किंपुरुषाच्या अवस्थेत इलाचे नाव सुद्युम्न होते. या सुद्युम्नास उत्कल, गय व महापराक्रमी हरिताश्व असे तीन अपराजित पुत्र झाले. इलाने उत्कलास उत्कलाचा, गयास गयेचा, हरिताश्वास कुरुप्रदेशाच्या पूर्वदिशेचा स्वामी केले. आपल्या ज्येष्ठ पुरुषास, पुरूरव्यास त्याने प्रतिष्ठानपुरात स्थापन करून स्वत: इल वनात निघून गेला.

मनूचा ज्येष्ठ पुत्र इक्ष्वाकू मध्यदेशाचा अधिकारी झाला. मनूच्या अन्य पुत्रांत नरिष्यंताचा शुच नावाचा महाबली पुत्र होता. नाभागास अंबरीष झाला. धृष्टास धृष्टकेतू, चित्रनाथ व रणधृष्ट असे तीन पराक्रमी पुत्र झाले. शर्यातीस आनर्त नावाचा एक पुत्र झाला. सुकन्या नावाची एक पुत्री झाली. आनर्तास रोचमान नावाचा प्रतापी पुत्र झाला. आनर्ताच्या देशाचे नाव आनर्त (गुजराथ) झाले. कुशस्थली (द्वारका) त्याची राजधानी झाली. रोचमानाचा पुत्र रेव रैवत वा ककुद्मी या नावांनी ओळखला गेला. त्याला रेवती नावाची एक कन्या झाली. ती बलरामाची भार्या झाली. करूषास अनेक पुत्र होते. ते कारूष नावाने विख्यात झाले. पृषध्राने गायीची हत्या केली, म्हणून गुरूच्या शापाने तो शूद्र झाला.

देवराज विकुक्षी इक्ष्वाकूचा पुत्र होय. यास पंधरा पुत्र झाले. यासच एकशेचौदा पुत्र आणखी झाले. त्याचा ज्येष्ठ पुत्र ककुस्थ नावाने विख्यात झाला. त्याचा पुत्र सुयोधन. त्याचा पुत्र पृथू, त्याचा विश्वग, त्याचा इंदू व त्याचा युवनाश्व पुत्र झाला. त्याचा पुत्र श्रावस्त वत्सक म्हणून ओळखला जातो. त्याने गौडदेशात श्रावस्ती नावाची नगरी वसविली. श्रावस्तास बृहदश्व व त्यास कुवलाश्व झाला. तोच पूर्वी धुंधूकडून मारला गेला म्हणून धुंधुमार या नावाने विख्यात झाला. धुंधुमारास दृढाश्व, दंड व कपिलाश्व असे तीन पुत्र झाले. प्रतापी कपिलाश्व धौंधुमारी या नावाने प्रसिद्ध झाला. दृढाश्वाचा पुत्र प्रमोद व त्याचा हर्यश्व झाला. त्याचा पुत्र निकुंभ व त्याचा संहताश्व. त्याचे अकृताश्व व रणाश्व असे दोन पुत्र.

रणाश्वाचा पुत्र युवनाश्व, त्याच्यापासून मांधाता झाला. मांधा-

तास पुरुकुत्स, धर्मसेन व प्रतापी मुचुकुंद असे तीन पुत्र झाले. यांतील पुरुकुत्साचा पुत्र नर्मदापती वसुद झाला. याचा पुत्र संभूती व याचा त्रिधन्वा झाला. याचा पुत्र त्र्य्यारुण, याचा सत्यव्रत, सत्यव्रतास हरिश्चंद्र, यास रोहित, यास वृक व वृकास बाहुक झाला. बाहुकाचा पुत्र सगर राजा झाला. या सगरास प्रभा व भानुमती नावांच्या दोन पत्नी होत्या. या दोघींनी पूर्वी पुत्रप्राप्तीसाठी और्वाग्नींची आराधना केली होती. और्वांनी त्यांना संतुष्ट होऊन वर दिला, 'तुमच्यांपैकी एकीस साठ हजार पुत्र होतील. दुसरीस एकच वंशप्रवर्तक पुत्र होईल.' तेव्हा प्रभाने साठ हजार पुत्र मागितले. भानुमतीने एकच पुत्र स्वीकारला. भानुमतीस असमंजस नावाचा पुत्र झाला. यदुवंशातील कन्येने, प्रभाने साठ हजार पुत्रांना जन्म दिला. ते अश्वमेधयज्ञाच्या घोड्याचा शोध घेत असताना विष्णूंनी त्यांना जाळून दग्ध केले.

यानंतर असमंजसाचा पुत्र अंशुमान, त्याचा दिलीप, त्याचा भगीरथ, त्याचा नाभाग पुत्र झाला. नाभागाचा पुत्र अंबरीष. याचा सिंधुद्वीप, याचा अयुतायू व याचा पुत्र ऋतुपर्ण झाला. याचा पुत्र कल्माषपाद व त्यास सर्वकर्मा झाला. त्याचा पुत्र अनरण्य व त्याचा निघ्न झाला. त्यास अनमित्र व राजा रघू असे दोन पुत्र झाले. रघूस दिलीप व त्यास अज झाला. यास दीर्घबाहू व त्यापासून राजा अजपाल झाला. अजपालास दशरथ झाला. यास नारायणांच्या अंशापासून चार पुत्र झाले. रावणाचा अंत करणारा राम ज्येष्ठ पुत्र होता. रामास कुश व लव असे दोन पुत्र झाले. कुशास अतिथी व त्यास निषध झाला. निषधाचा पुत्र नल व त्यापासून नभ झाला. त्यास पुंडरीक व त्यास क्षेमधन्वा झाला. त्याचा पुत्र प्रतापी वीरवर देवानीक, त्याचा पुत्र अहीनगू व त्याचा सहस्राश्व. त्याचा चंद्रावलोक व त्याचा तारापीड झाला. यापासून चंद्रागिरी व त्यापासून भानुचंद्र झाला. याचा पुत्र श्रुतायू महाभारतयुद्धात मारला गेला. या वंशात नल नावाचे दोन राजे झाले. एक वीरसेनाचा पुत्र व दुसरा राजा निषधाचा पुत्र. असा हा वैवस्वतवंशीय इक्ष्वाकूच्या वंशातील राजांचा वृत्तांत.

## पितृवंशवर्णन

यानंतर तेरा ते पंधरा अध्यायांत भगवान मत्स्यांनी पितरांच्या वंशाचे वर्णन केले. स्वर्गात पितरांचे सात गण आहेत. त्यांतील तीन मूर्तिरहित व चार मूर्तिमान आहेत. ते सर्व अमित तेजस्वी आहेत. अमूर्त पितृगण वैराज नावाच्या प्रजापतीची संताने आहेत. म्हणून ती वैराज या नावाने प्रसिद्ध झाली. देवगण त्यांची पूजा करतात. ते सर्व सनातन-लोक प्राप्त केल्यावर योगमार्गाने च्युत होऊन ब्रह्माच्या दिवसाच्या अंतभागी ब्रह्मवादी म्हणून उत्पन्न होतात. यावेळी त्यांना पूर्वजन्म-स्मृती असल्याने सर्वोत्तम सांख्ययोगाचा आश्रय घेऊन सिद्धी प्राप्त होते. म्हणून दात्यांनी योग्यांना श्राद्धीय वस्तू प्रदान कराव्यात.

उपर्युक्त पितरांची मानसकन्या मेना हिमवानाची पत्नी आहे. तिचा पुत्र मैनाक होय. त्याच्याही आधी क्रौंच झाला होता. याच्याच नावे क्रौंचद्वीप विख्यात झाले. नंतर मेनास उमा, एकपर्णा, अपर्णा या नावांच्या तीन कन्या झाल्या. त्या सर्व योगाभ्यासात तत्पर व तपस्विनी होत्या. हिमवानाने यांतील एक कन्या रुद्रांना, एक सितास व एक जैगी-षव्यास दिली.

मरीचींचे वंशज देवांचे पितृगण जेथे निवास करतात, ते लोक सोमपथ या नावाने विख्यात आहेत. देव या पितरांचे ध्यान करतात. हे यज्ञपरायण पितृगण अग्निस्वात या नावाने प्रसिद्ध आहेत. ते जेथे राहातात, तेथे अच्छोदा नावाची नदी वाहाते. ती याच पितरांची मानसकन्या आहे. प्राचीनकाळी पितरांनी एक अच्छोद नावाचे सरोवर निर्माण केले होते. पूर्वी अच्छोदाने एक सहस्र वर्षेपर्यंत घोर तपस्या केली. त्या तपस्येने संतुष्ट होऊन पितृगण रूपधारी होऊन वर देण्यासाठी आले. त्या रूप-संपन्न व दिव्यगंधाने युक्त अशा पितरांना पाहून सुंदरी अच्छोदा व्यग्र झाली. यामुळे ती योगापासून भ्रष्ट झाली. ती पृथ्वीवर प्रथमच पडली अमावसूने अच्छोदाबरोबर राहाण्याची इच्छा प्रकट केली. ही तिथी अमावस्या म्हणून प्रसिद्ध झाली. ही तिथी पितरांना प्रिय असून या दिवशी केलेले श्राद्ध अक्षय फलदायक होते.

तपस्या नष्ट झाल्याने अच्छोदा लज्जित झाली. आपल्यासाठी ती पुन: पितरांची प्रार्थना करू लागली. त्यांनी तिला वर दिला. 'अठ्ठाविसाव्या द्वापरयुगात तू मत्स्ययोनीत जन्मशील व तीतून मुक्त होऊन तू राजा उपरिचर वसूची कन्या होशील. तुला कन्या या अवस्थेत बदरींच्या वृक्षांनी व्यापलेल्या एका द्वीपातील महर्षी पराशरांकडून एक पुत्र प्राप्त होईल. तो बादरायण या नावानं प्रसिद्ध होईल. तो नारायणांचा अवतार असेल. तो वेदांचं विभाजन करील. त्यानंतर समुद्राच्या अंशानं उत्पन्न झालेल्या पुरुवंशी राजाकडून, शंतनूकडून तुला विचित्रवीर्य व चित्रांगद या नावांचे दोन पुत्र होतील.बुद्धिमान विचित्रवीर्याचे दोन क्षेत्रज घृतराष्ट्र व पांडुपुत्र यांना उत्पन्न करून तू प्रौष्ठपदी (भाद्रपदाची पौर्णिमा व पौष कृष्ण अष्टमी) अष्टकारूपात पितृलोकात जन्म घेशील. मनुष्यलोकात सत्यवती व पितृलोकात तू अष्टका या नावांनी प्रसिद्ध होशील. कालांतरानं तू मनुष्यलोकात अच्छोद या नावाची नदी होशील,'

स्वर्गात विभ्राज नावाचे अत्यंत तेजस्वी लोक राहातात. तेथे परम श्रेष्ठ, उत्तम, व्रतपारायण बर्हिषद् नावाचे पितर विद्यमान आहेत. येथे फल देणारे बर्ही (कुश) उपस्थित असतात. येथे पितृश्राद्ध करणाऱ्यांना आनंद प्राप्त होतो. देवता, असुर, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस इत्यादी येथे राहून पितरांसाठी यज्ञाचे विधान करतात. महर्षी पुलस्त्यांचे शेकडो पुत्र आत्मबलसंपन्न होऊन येथे निवास करतात. या पितरांची एक मानसकन्या पीवरी नावाची होती. या कन्येने तप करून भगवान विष्णूंना एक वर मागितला. आपणांसाठी तिने योगाभ्यासी, सौंदर्यशाली, जितेंद्रिय, वक्त्यांत श्रेष्ठ असा पती मागितला. 'व्यासपुत्र शुकांशी तुझा विवाह होईल', असा भगवानांनी तिला वर दिला.ते म्हणाले, 'यांच्या संबंधातून योगाभ्यासपरायण कृत्वी नावाची कन्या होईल. तू ती पांचाल नरेशास समर्पित करशील. ही तुझी कन्या ब्रह्मदत्ताची माता होईल. तिची प्रसिद्धी 'गौ' नावानं होईल. त्यानंतर तुला कृष्ण, गौर, प्रभू व शंभू असे चार पुत्र होतील. यानंतर आत्मबलानं तुला मोक्षाची प्राप्ती होईल.'

महर्षी वसिष्ठांचे सुकाली नावाचे पुत्ररूप पितर मानस या नावाने विख्यात असून ते अत्यंत सुंदर व धर्ममूर्ती आहेत. ते सर्व स्वर्गलोकाच्या

पलीकडे ज्योतिर्मासी या लोकात राहातात. येथे श्राद्धकर्ते शूद्रही कामनापूर्ती करून घेतात. या पितरांची 'गौ' नावाची मानसकन्या स्वर्गात विराजमान आहे. ही शुकांची पत्नी व साध्यांची किर्ती विस्तारणारी आहे. याचप्रकारे सूर्यमंडलात मरीचिगर्भ नावाचे अन्य लोकही राहातात. येथे अंगिरांचा पुत्र हविष्मान् पितरांच्या रूपात निवास करतो. या पितरांची एक यशोदा नावाची मानसकन्या होती. ती पंचजनाची श्रेष्ठ पुत्रवधू, अंशुमानाची पत्नी, दिलीपाची माता व भगीरथाची पितामही होती. कामदुध नावाच्या एका पितृलोकात उत्तम व्रतपरायण सुस्वधा नावाचे पितर राहातात. ते प्रजापती कर्दमांच्या लोकात आज्यप या नावाने विख्यात आहेत. महर्षी पुलहांच्या अंगापासून उत्पन्न झालेले वैश्यगण त्यांची पूजा करतात. या पितरांची एक मानसकन्या विरजा नावाची असून ती राजा नहुषाची पत्नी व ययातीची माता होती. नंतर ती ब्रह्मलोकात एकाष्टका या नावाने प्रसिद्ध झाली.

ब्रह्मांडाच्या वर मानस नावाचा एक लोक आहे. तेथे अविनाशी सोमप नावाचे पितर निवास करतात. त्यांच्या मानसकन्येचे नाव नर्मदा आहे. या पितरांची उत्पत्ती स्वधापासून झाली. यांची ही नर्मदा नावाची कन्या नदी होऊन सर्वांना पवित्र करते. यानंतर श्राद्धाचा विषय सविस्तर आला आहे.

## ययातिवंश, यदुवंश

यानंतर त्रेचाळिसाव्या अध्यायात ययातिवंश व यदुवंश यांचे वर्णन आले आहे. ययातीचा ज्येष्ठ पुत्र यदू याला तेजस्वी, धनुर्धर असे सहस्रजी, क्रोष्टू, नील, अंतिक व लघू असे पांच पुत्र झाले. सहस्रजीचा पुत्र राजा शतजी. त्याला हैहय, हय व वेणुहय असे तीन पुत्र झाले. हैहयाचा पुत्र धर्मनेत्र. त्याचा कुंती, त्याचा संहत. संहताचा पुत्र महिष्मान. याचा प्रतापी पुत्र रुद्रश्रेण्य, हा वाराणसीनगरीचा राजा झाला. याचा पुत्र दुर्दम. याचा पुत्र परम बुद्धिमान व पराक्रमी कनक होता. याला कृतवीर्य, कृतग्नी, कृतवर्मा, कृतोजा असे पुत्र झाले. यांतील कृतवीर्यापासून अर्जुनाचा जन्म झाला. हा सहस्रार्जुन नावाने प्रसिद्ध झाला. याने दहा हजार वर्षे तपश्चर्या करून दत्तात्रेयांची आराधना केली. दत्तात्रेयांनी

प्रसन्न होऊन त्याला एक हजार भुज्या दिल्या. सत्पुरुषांशी अधर्म करणाऱ्यांचे निवारण करण्याचा वर त्याला मिळाला. तिसऱ्या वराने त्याने युद्धात पृथ्वीस जिंकून धर्मानुसार तिचे पालन केले. चौथ्या वराने त्याचा वध युद्धभूमीवर त्याच्यापेक्षा बलवान हातांनी होण्याचे ठरले.

धृष्ट याचा वध परशुरामाने केला. याच्या शंभर पुत्रांपैकी पांच महारथी होते. शूरसेन, शूर, धृष्ट, क्रोष्टू, जयध्वज, वैकर्ता व अवन्ती हे सात अस्त्रविद्येत बलवान होते.जयध्वजाचा पुत्र तालजंघ. यालाही शंभर पुत्र झाले. ते सर्व तालजंघ या नावाने विख्यात झाले. हैहयवंशी या नरेशांचे कुल पांच भागांत विभक्त झाले. वीतिहोत्र, शार्यात, भोज, आवन्ती, कुंडिकेर अशी त्यांची नावे होती. वीतिहोत्राचा पुत्र प्रतापी आनर्त गुजराथचा शासक झाला. त्याचा पुत्र दुर्जेय शत्रूंचा विनाशक होता. सहस्रभुजाधारी कृतवीर्यनंदनाने, राजा अर्जुनाने धर्मपूर्वक प्रजेचे पालन केले.

## राजर्षी क्रोष्टूचा वंश

या वंशात वृष्णिवंशावतंस भगवान विष्णू कृष्ण या नावाने अवतीर्ण झाले. क्रोष्टूचा महारथी पुत्र वृजिनीवान. याला स्वाह नावाचा महाबली पुत्र झाला. वक्त्यांत श्रेष्ठ असा रुषंगू नावाचा पुत्र याला झाला. याचा पुत्र चित्ररथ. याचा पुत्र शशबिंदू. हा पुढे चक्रवर्ती सम्राट झाला. शशबिंदूस शंभर पुत्र झाले. यांपैकी प्रत्येकास शंभर पुत्र झाले. ते सर्व धनसंपत्ती, तेज, सौंदर्य, बुद्धी यांनी परिपूर्ण होते. यांतील पृथुश्रवा, पृथुयशा, पृथुधर्मा, पृथुंजय, पृथुकीर्ती व पृथुमना; हे सहा महाबली होते. उत्तम यज्ञांचे अनुष्ठान करणाऱ्या पृथुश्रव्यास सुयज्ञ नावाचा पुत्र झाला. याचा पुत्र उशना सर्वश्रेष्ठ धर्मात्मा होता. यानें पृथ्वीचे रक्षण करून शंभर अश्वमेधयज्ञांचे अनुष्ठान केले. याचा पुत्र तितिक्षू शत्रूंना ताप देणारा होता. राजर्षींत श्रेष्ठ मरुत्त तितिक्षूचा पुत्र होय. याचा पुत्र कंबलबर्हिष होय. याचा पुत्र विद्वान रुक्मकवच. यानेही अश्वमेधयज्ञ करून ब्राह्मणांना प्रचुर दक्षिणा दिली. याला रुक्मेषू, पृथुरुक्म, ज्यामध, परिघ, हरी असे पांच पराक्रमी पुत्र झाले.

ज्यामघाची पत्नी शैब्या प्रौढ झाली तरी तिला पुत्र झाला नाही. ज्यामघास एका युद्धात त्रिवाहासाठी एक कन्या प्राप्त झाली. ती त्याने पत्नीस देऊन म्हटले;

'शुचिस्मिते, ही माझी पत्नी नाही. ही तुझी सून आहे.'

'कुणाची ही स्नुषा ?'

'तुझ्या गर्भापासून जो पुत्र उत्पन्न होईल त्याची ही पत्नी होईल.'

हे ऐकून या कन्येने उग्र तपस्या केली. तपाच्या प्रभावाने वृद्धावस्थेत गेलेल्या शैब्याने गर्भ धारण केला. तिला विदर्भ नावाचा पुत्र झाला. याने त्या कन्येपासून ऋथ, कैशिक, लोमपाद या पुत्रांना जन्म दिला. हे सर्व शूरवीर व युद्धकुशल होते. लोमपादास मनू नावाचा एक पुत्र झाला. मनूचा पुत्र ज्ञाती. कैशिकाचा पुत्र चिदी. याचे पुत्र चैद्य झाले. विदर्भपुत्र ऋथास कुंती नावाचा पुत्र झाला. याचा पुत्र धृष्ट. हा पराक्रमी व रणविशारद होता. याचा पुत्र निर्वृती धर्मात्मा व शत्रुवीरांचा संहारक होता. याचा पुत्र विदूरथ. याचा पुत्र दशार्ह व याचा पुत्र व्योम. याचा पुत्र जीमूत. याचा विमल. याचा भीमरथ. याचा पुत्र नवरथ. याचा पुत्र दृढरथ, याचा पुत्र शकुनी, याचा करंभ, याचा देवरात होय. याचा पुत्र महायशस्वी देवक्षत्र. याचा पुत्र महातेजस्वी मधू झाला. याचा पुत्र पुरवसू, याचा पुरुषश्रेष्ठ पुत्र पुरुद्वान. याचा व विदर्भ राजकुमारी भद्रसेनीचा संभोग होऊन जंतू नावाचा पुत्र झाला. या जंतूची पत्नी ऐक्ष्वाकी. हिच्या गर्भापासून सत्त्वत नावाचा पुत्र उत्पन्न झाला.

अशी ही ज्यामघाची संतानपरंपरा होय. कौसल्या सात्त्वताची पत्नी होती. त्यांचे बलसंपन्न पुत्र भजी, भजमान, देवावृध, अंधक, महाभोज, वृष्णी हे पुत्र होत. यांचाही वंशविस्तार झाला. सृंजयाला दोन कन्या सृंजयी व वाह्यका भजमानाच्या दोन पत्नी होत्या. यांना वाह्यक नावाचा पुत्र झाला.याखेरीज दोन कन्या व अनेक पुत्रही त्यांना झाले. निमी, कृमिल, वृष्णी हे सर्व भजमानाच्या संयोगाने सृंजयीपासून व वाह्यकापासून उत्पन्न झाले.

यानंतर राजा देवावृधाचा जन्म झाला. याला पुत्र झाला नाही.

त्यानें अत्यंत घोर तप केले. मंत्रानें युक्त होऊन त्याने पर्णाशानदीच्या जलास स्पर्श केला. ही नदी राज्याचे कल्याण करणाचा विचार करू लागली. दुसरी एखादी स्त्री शोधण्यापेक्षा आपणच हजारो रूपे धारण करून प्रकट व्हावे, असा विचार तिने केला. नंतर पर्णाशा सुंदर रूपात प्रकट झाली. तेव्हा त्या व्रतशाली राजानें तिला पत्नीरूपात स्वीकारले. त्यांना सद्गुणसंपन्न असा बभ्रू नावाचा पुत्र झाला. हा राजा यज्ञानुष्ठानी, दानशूर, शूरवीर, ब्राह्मणभक्त, सुदृढव्रती, सौंदर्यवान, तेजस्वी, पराक्रमी होता. बभ्रूपासून कंकाच्या कन्येस कुकुर, भजमान, शशी, कंबलबर्हिष्, असे चार पुत्र झाले. कुकुराचा पुत्र वृष्णी, त्याचा पुत्र धृती, त्याचा पुत्र कपोतरोमा, त्याचा तैत्रिरी व याचा पुत्र सर्प आणि त्याचा पुत्र विद्वान नल होता. नलाचा पुत्र दरदुंदुभी झाला.

दरदुंभीने पुत्रप्राप्तीसाठी अश्वमेधयज्ञाचे अनुष्ठान केले. या विशाल यज्ञात पुनर्वसू नावाचा पुत्र प्रकट झाला, तो विद्वान, शुभाशुभ कर्मांचा ज्ञाता, यज्ञपरायण व ज्ञानी होता. याचा आहुक नावाचा पुत्र होता. याची जुळी बहीण आहुकी होती. आहुक अजेय व लोकप्रसिद्ध झाला. आहुकीचा विवाह अवन्तीनरेशाशी झाला. आहुकाच्या संयोगानें काश्याच्या कन्याने देवक व उग्रसेन या दोन पुत्रांना जन्म दिला. हे दोघे देवपुत्रांप्रमाणे कांतिमान होते. देवकास पराक्रमी व कांतिवान पुत्र झाले. देववान, उपदेव, सुदेव व देवरक्षित अशी त्यांची नावे होती. याला सात बहिणी होत्या. देवकाने त्यांना वसुदेवास समर्पित केले. देवकी, श्रुतदेवी, मित्रदेवी, यशोधरा, श्रीदेवी, सत्यदेवी व सुतापी; अशी त्यांची नावे होती.

उग्रसेनास नऊ पुत्र झाले. त्यात कंस श्रेष्ठ होता. उरलेल्यांची नावे न्यग्रोध, सुनामा, कंक, शंकू, अजभू, राष्ट्रपाल, युद्धमुष्टी, सुमुष्टिद अशी होती. त्यांना कंसा, कंसवती, सतंतू, राष्ट्रपाली, कंका नावांच्या पांच बहिणी होत्या. भासमानाचा पुत्र महारथी विदूरथ व शूरवीर राजाधिदेव विदूरथाचा पुत्र झाला. राजाधिदेवास शोणाश्व व श्वेतवाहन नावांचे दोन पुत्र झाले. ते देवांसमान कांतिमान व व्रततत्पर होते. शोणाश्वास शमी, देवशर्मा, निकुंत, शक्र व शत्रुजित असे शूरवीर व युद्धनिपुण पुत्र झाले. शमीचा पुत्र प्रतिक्षत्र, त्याचा प्रतिक्षेत्र, त्याचा

भोज व त्याचा हृदीक झाला. या हृदीकास दहा अनुपम पुत्र झाले. त्यांत कृतवर्मा ज्येष्ठ व शतधन्वा मधला होता. उरलेल्यांची नावे अशी होती; देवार्ह, नाभ, धिषण, महाबल, अजात, वनजात, कनीयक व करंभक. देवार्हास कंबलबर्हिष नावाचा विद्वान पुत्र झाला. याचा पुत्र असोमजा, याचा पुत्र तमोजा. यानंतर सुदंष्ट्र, सुनाभ व कृष्ण या नावांचे राजे पराक्रमी व कीर्तिमान होते. त्यांना संतान झाले नाही. हे सर्व अंधकवंशी मानले गेले आहेत.

## वृष्णिवंशाचे वर्णन

यानंतर पंचेचाळिसाव्या व सेहेचाळिसाव्या अध्यायांत सात्वताच्या कनिष्ठ पुत्राच्या वृष्णीच्या वंशाचे वर्णन सूताने केले. गांधारी व माद्री या दोन वृष्णीच्या पत्नी होत. गांधारीने सुमित्र व मित्रनंदन या दोन पुत्रांना व माद्रीने युधाजित, तत्पश्चात देवमीढुष, अनमित्र, शिबी, कृतलक्षण या पुत्रांना जन्म दिला. अनमित्राचा पुत्र निघ्न व यास प्रसेन व शक्तिसेन या नावांचे दोन पुत्र झाले. प्रसेनाच्या जवळ स्यमंतक नावाचा श्रेष्ठ मणी होता. श्रीकृष्णांनी हा मणी सत्राजितास समर्पित केला. कैकयराजाच्या दहा सौंदर्यशालिनीकन्या सत्राजिताच्या पत्नी होत्या. त्यांच्यापासून त्याला शंभर पुत्र झाले होते. त्यांत भंगकार ज्येष्ठ होता. यास व्रतवर्तीपासून तीन कमलनयनी सुकुमार कन्या झाल्या. सत्यभामा, व्रतिनी व पद्मावती अशी त्यांची नावे असून भंगकाराने त्या श्रीकृष्णांना समर्पण केल्या. कनिष्ठ वृश्णिनंदन अनमित्रापासून शिनीचा जन्म झाला. त्याचा पुत्र सत्यक व त्याचा पुत्र सात्यकी. सत्यवान व प्रतापी युयुधान हे दोघे शिनीचे नातू होत. युयुधानाचा पुत्र अलंग व त्याचा पुत्र द्युम्नी. याचा पुत्र युगंधर होय.

अनमित्राच्या दुसऱ्या पत्नीपासून, पृथ्वीपासून वीरवर युधाजित जन्मास आला. त्याला वृषभ व क्षत्र नावांचे दोन शूरवीर पुत्र झाले. वृषभाने काशिराजाची कन्या जयंतीशी विवाह केला. त्यांना जयंत नावाचा पुत्र झाला. तो यज्ञांत रमणारा, शूरवीर, शास्त्रज्ञ व अतिथींचा प्रेमी होता. त्याला अक्रूर नावाचा पुत्र झाला. शिबिनरेशाची एक कन्या

रत्ना नावाची होती.ती या अक्रूराची पत्नी झाली.त्यांना अकरा महाबली पुत्र झाले. त्यांची नावे उपलंभ, सदालंभ, वृकल, वीर्य, सविता, सदापक्ष, शत्रुघ्न, वारिमेजय, धर्मभृद, धर्मवर्मा व धृष्टमान; अशी होती. हे सर्व पुत्र यज्ञादी कर्मे करणार होते. अक्रूर व उग्रसेना यांना देववान व उपदेव नावांचे दोन पुत्र झाले. त्यालाच अश्विनीच्या गर्भापासून पृथू, विपृथू, अश्वत्थामा, सुबाहू, सुपार्श्वक, गवेषण, वृष्टिनेमी, सुधर्मा, शर्याती, अभूमी, वर्जभूमी, श्रमिष्ठ, श्रवण; असे तेरा पुत्र झाले.

ऐक्ष्वाकीने (माद्रीने) शूरसेन नावाच्या एका पुत्रास जन्म दिला. तोच पुढे देवमीढुष या नावाने विख्यात झाला. शूरास भोजाच्या गर्भातून दहा पुत्र व पांच सुंदर कन्यांची प्राप्ती झाली. पुत्रांत प्रथम महाबाहू वसुदेव उत्पन्न झाला. त्याची प्रसिद्धी आनकदुंदुभी या नावाने झाली. त्यानंतर देवभाग, देवश्रवा, अनाधृष्टी, शिनी, नंद, सृंजय, श्याम, शमीक, संयूप यांचे जन्म झाले. श्रुतकीर्ती, पृथा, श्रुतादेवी, श्रुतश्रवा, राजाधिदेवी अशी या पांच कन्यांची नावे होती. कृताच्या पत्नीने, श्रुतदेवीने सुग्रीव नावाच्या पुत्रास जन्म दिला. केकयदेशाच्या श्रुतकीर्तीच्या गर्भापासून राजा अनुव्रताने जन्म घेतला. चेदिदेशाच्या नरेशाची पत्नी श्रुतश्रवाने सुनीथ नावाच्या पुत्रास जन्म दिला. शूराने आपल्या पृथा नावाच्या कन्येस मैत्रीस वश होऊन वृद्ध राजा कुंतिभोजास पुत्रीरूपाने दिली. वसुदेवाची ही बहीण म्हणून कुंती या नावाने विख्यात झाली. वसुदेवाने ती पांडूस प्रदान केली.

या पांडुपत्नीने पांडूच्या वंशवृद्धीसाठी महारथी देवपुत्रांना जन्म दिला. धर्माच्या संयोगाने प्रथम युधिष्ठिराचा जन्म झाला. वायूच्या संयोगाने वृकोदर भीमाचा जन्म झाला. इंद्राच्या संयोगाने धनंजय अर्जुनाची निर्मिती झाली. अश्विनीकुमारांच्या संयोगाने माद्रवतीस (माद्रीस) रूप व शील यांनी संपन्न असे नकुल व सहदेव झाले. आनकदुंदुभी (वसुदेव) याच्या संयोगाने रोहिणीस राम (बलराम) झाला. यानंतर तिला सारण, दुर्दम, दमन, सुभ्रू, पिंडारक, महाहनू यांची प्राप्ती झाली. रोहिणीच्या गर्भातून चित्रा व अक्षी या दोन कन्या झाल्या. वसुदेवाच्या संपर्कापासून देवकीस सुषेण, कीर्तिमान, उदार, भद्रसेन, भद्र-

वास, भद्रविदेह असे पुत्र झाले. यांना कंसाने मारले.

यानंतर देवकीच्या गर्भातून श्रीकृष्णांचा जन्म झाला. त्यानंतर त्याची लहान बहीण सुभद्रा जन्मास आली. त्यानंतर देवकीला शूरी नावाचा पुत्र झाला. ताम्राच्या गर्भातून शौरिकुलाचा उद्धार करणारा सहदेव झाला. देवरक्षिताने उपासंगधर नावाच्या पुत्रास व एका सुंदर कन्येस जन्म दिला. कन्येला कंसाने मारले. विजय, रोचमान, वर्धमान व देवल हे महान आत्मबलाने संपन्न पुत्र उपदेवीस झाले. महात्मा अवगाह वृकदेवीच्या उदरापासून जन्मास आला. याच वृकदेवीस नंदन नावाचा आणखी एक पुत्र झाला.

देवकीने आपल्या सातव्या पुत्रास मदनास व भाग्यशाली गवेषणास जन्म दिला. पूर्वी श्रद्धादेवीबरोबर वनात फिरताना वसुदेवाने एका वैश्यकन्येशी रत होऊन कौशिक नावाच्या ज्येष्ठ पुत्रास जन्म दिला. वसुदेवाची नववी सुतनू व दहावी रथराजी या नावांच्या दोन पत्नी होत्या. यांच्यापासून त्याला पुंड्र व कपिल नावांचे दोन महाबली पुत्र झाले. सौभद्र व भव या नावांचे त्यांना आणखी दोन पुत्र झाले. ज्येष्ठ पुत्र जरा नावाचा निषाद झाला. तो महान धनुर्धर होता. देवभागाचा पुत्र उद्धव नावाने प्रसिद्ध झाला. देवश्रवाचा प्रथम पुत्र पंडित नावाचा होता. यशस्विनी ऐक्ष्वाकीने अनाधृष्टीशी संयोग करून शत्रुसंहारक निधूतसत्त्व नावाच्या पुत्रास जन्म दिला.

निधूतसत्त्वास श्राद्ध नावाचा पुत्र झाला. संतानहीन करूषावर कृपा करून कृष्णांनी त्याला सुचंद्र नावाचा एक पुत्र प्रदान केला. तो पराक्रमी व भाग्यशाली होता. जांबवतीचे चारुदेष्ण व सांब हे दोन पुत्र उत्तम लक्षणांनी युक्त, पराक्रमी व बलसंपन्न होते. नन्दनास तंतिपाल व तंति या नावांचे दोन पुत्र झाले. शमीकाचे चारही पुत्र, विराज, धनू, श्याम व सृंजय या नावांचे अत्यंत पराक्रमी होते. यांतील श्याम संतानहीन झाला. शमीक भोजवंशाच्या आचारव्यवहाराची निंदा करीत वनात गेला. तेथे त्याने आराधना करून राजर्षीची पदवी प्राप्त केली.

## श्रीकृष्णांचा वंश

धर्माची स्थापना व असुरांचा विनाश करण्यासाठी सामर्थ्यशाली विष्णूंनी वृष्णिकुळात जन्म घेतला. रुक्मिणी, सत्यभामा, नग्नजिताची कन्या सत्या, सुभामा, शैब्या, गांधारराजकुमारी लक्ष्मणा, मित्रविंदा, जांबवती,सुशीला,भद्रराजकुमारी कौसल्या व विजया आदी सोळा हजार देवी श्रीकृष्णांच्या पत्नी होत्या. रुक्मिणीने अकरा पुत्रांना जन्म दिला. ते सर्व युद्धकर्मात निष्णात असून त्यांची नावे प्रद्युम्न, चारूदेष्ण, सुचारू, भद्रचारू, सुदेष्ण, भद्र, परशू, चारुगुप्त, चारुभद्र, सुचारुक व चारुहास अशी होती. रुक्मिणीची एक कन्या चारुमती नावाची होती.

सत्यभामेच्या उदरापासून भानू, भ्रमरतेक्षण, रोहित, दीप्तिमान, ताम्र,चक्र व जलंधम या पुत्रांचा जन्म झाला.यांना चार लहान बहिणीही होत्या. जांबवतीस सांब नावाचा पुत्र झाला. मित्रविंदाने मित्रवान व मित्रविंद यांना व नाग्नाजिती सत्याने मित्रबाहू व सुनीथ यांना जन्म दिला. अशा रीतीने इतर पत्नींपासूनही हजारो पुत्रांची उत्पत्ती झाली. उपसंगास दोन पुत्र वज्र व संक्षिप्त या नावांचे होते. भूरीन्द्रसेन व भूरी हे दोन गवेषणाचे पुत्र होत. प्रद्युम्नास विदर्भराजकुमारीच्या गर्भापासून अनिरुद्ध नावाचा पुत्र झाला. तो बुद्धिमान व पराक्रमी होता. अनिरुद्धाच्या पुत्राचे नाव मृगकेतन होते. पार्श्वनंदिनी काश्याने सांबाच्या संयोगाने पांच पुत्रांना जन्म दिला. ते तेजस्वी, सत्यवादी, सौंदर्यशाली व पराक्रमी होते. अशी ही यादवांची संख्या तीन कोटी झाली. त्यांतील साठ लाख महाबली व पराक्रमी होते.

## तुर्वसू व द्रुह्यू यांचे वंश

अठ्ठेचाळिसाव्या अध्यायात तुर्वसू व द्रह्यू यांच्या वंशांचे वर्णन आले आहे. ययातीचा पांचवा पुत्र तुर्वसू असून त्याचा पुत्र गर्भ नावाचा होता. त्याचा पुत्र गोभानू झाला. गोभानूचा पुत्र अजेय व शूरवीर रुसारी होता. याचा पुत्र करंधम व त्याचा मरुत्त होता. याने संतानहीनतेमुळे पुरुवंशी दुष्यंतास आपले पुत्र मानले. अशा रीतीने तुर्वसूचा वंश पुरुवंशात समाविष्ट झाला. दुष्यंताचा पुत्र वरूथ. याचा पुत्र

आंडीर (भुवमन्यू) होय. आंडीरास संधान, पांड्य, केरल, चोल, कर्ण असे पुत्र होऊन त्यांच्या नावे ते ते देश प्रसिद्ध झाले. द्रुह्यूस सेतू व केतू नावांचे दोन शूरवीर पुत्र झाले. सेतूचा पुत्र शरद्वान व त्याचा पुत्र प्रचेता. प्रचेतास शंभर पुत्र झाले. ते सर्व राजे झाले.

ययातीच्या तृतीय पुत्रास, अनूस सभानर,चाक्षुष व परमेषू नावांचे शूरवीर व धार्मिक पुत्र झाले. संजयास पुरंजय नावाचा पुत्र झाला. प्रथम जनमेजय हा पुरंजयाचा पुत्र होय. याचा पुत्र महाशाल असून याचा पुत्र महामना होय. हा मोठा धर्मात्मा, सातही द्वीपांचा अधीश्वर होता. याचे उशीनर व तितिक्षू असे दोन पुत्र विश्वविख्यात होते. उशीनरास भृशा, कृशा, नवा, दर्शा, दृषद्वती या पांच पत्नी होत्या. त्यांच्या गर्भांपासून परम धर्मात्मे कुलवर्धक पुत्र उत्पन्न झाले. भृशाचा पुत्र नृग. नवाचा पुत्र नव होता. कृशाने कृशास व दर्शाने सुव्रतास जन्म दिला. दृषद्वतीचा पुत्र उशीनरनंदन राजा शिबी झाला. शिबीस पृथुदर्भ,सुवीर, केकय व मद्रक असे चार विश्वविख्यात पुत्र झाले. हे सर्व शिबिगण या नावाने प्रसिद्ध झाले. यांची समृद्ध जनपदे केकय, मद्रक, सौवीर, पौर या नावांनी विख्यात झाली. नृगाचे जनपद केकय व सुव्रताचे जनपद अंबष्ठ या नावाने प्रसिद्ध झाले. कृशाची राजधानी वृषलापुरी होती. नव नवराष्ट्राचा अधिपती झाला.

तितिक्षू पूर्वदिशेस विख्यात राजा झाला. त्याचा पुत्र वृषद्रथ व त्याचा सेन होता. सेनास सुतपा व सुतपाचा पुत्र बली झाला. यासच भगवान विष्णूंनी बांधून टाकले. या बलीचे पांच पुत्र पृथ्वीपती झाले. अंग, वंग, सुह्म, पुंड्र, कलिंग हे बलीचे क्षेत्रज पुत्र होत.

## पूरुवंशाचे वर्णन, भरतवंश

पूरूचा महातेजस्वी पुत्र राजा जनमेजय होता. त्याचा पुत्र प्राचीत्वत असून त्याने पूर्वदिशा बनविली. प्राचीत्वताचा पुत्र मनस्यू. याचा पुत्र राजा वीतायुध. याचा पुत्र धुंधुराजा. याचा पुत्र बहुविध व याचा पुत्र संयाती. याचा पुत्र रहंवर्चा. याचा पुत्र भद्राश्व. या भद्राश्वाने घृताची नावाच्या अप्सरेपासून दहा पुत्र निर्माण केले. त्यांची नावे अशी; औचेयू ,

वा ऋचेयू, हृषेयू, कक्षेयू, सतेयू, धृतेयू, विनेयू, श्रेष्ठ स्थलेयू, धर्मेयू, संतनेयू व पुण्येयू. औचेयूच्या पत्नीचे नाव ज्वलना होते. ही नागराज तक्षाची कन्या होती. हिला रन्तिनार झाला. याने आपल्या मनस्विनी नावाच्या सुंदर पत्नीपासून वीरवर धर्मात्मे पुत्र निर्माण केले.याची तिसरी संतती गौरी नावाची सुंदर कन्या होती. हीच मांधाताची जननी. इलिना यम-राजाची कन्या होती. हिला ऐलिन नावाचा पुत्र झाला. याने उपदानवी-पासून ऋष्यंत, दुष्यंत, प्रवीर व अनघ या चार पुत्रांना जन्म दिला. दुष्यंतास शकुंतलेपासून भरत झाला. हा चक्रवर्ती सम्राट होता.

या दुष्यंतपुत्राने, भरताने आकाशवाणी ऐकली,'दुष्यंत, तू आपल्या पुत्राचं भरण-पोषण कर. शकुंतलेचा अपमान नरू नकोस.' पूर्वी भर-ताच्या सर्व पुत्रांचा नाश झाला. हे पाहून मरुद्‌गणांनी बृहस्पतींचा पुत्र भरद्वाज आणून भरताच्या हाती दिला. त्याला ' मरुत्सोम' या नावाच्या यज्ञामुळे भरद्वाजाची प्राप्ती झाली. हा भरद्वाज राजा वितथ नावाने प्रसिद्ध झाला. या वितथाचा पुत्र भवमन्यू. यास बृहत्क्षत्र, महावीर्य, नर व गर्ग असे चार पुत्र झाले. नराचा पुत्र संस्कृती झाला. याला दोन महायशस्वी पुत्र गुरुधी व रंतिदेव झाले गर्गाचा पुत्र शिवी. त्याचे वंशधर शैव्य वा गर्ग या नावांनी विख्यात झाले. शिवीस आहार्यतनय व उरुक्षव हे दोन पुत्र झाले. उरुक्षवाची पत्नी विशालाने त्र्यरुण, पुष्करी कवी या तीन पुत्रांना जन्म दिला. या सर्वांना उरुक्षव म्हणतात. शेवटी त्यांना ब्राह्मणत्व मिळाले. काव्याचे वंशधर तीन महर्षी होते. अशा रीतीने गर्ग, संकृती व कविवंशात उत्पन्न झालेले लोक क्षत्रियांशाने युक्त ब्राह्मण होते.

अंगिरागोत्रीय बुहत्क्षत्राने या समृद्ध पृथ्वीचे शासन केले. यानेच पूर्वी हस्तिनापुर नावाचे नगर वसविले होते. हस्तीस अजमीढ, द्विमीढ, पुरुमीढ नावांचे तीन कीर्तिशाली पुत्र होते. अजमीढाच्या कुरुकुलात उत्पन्न झालेल्या तीन पत्नी होत्या. नलिनी, धूमिनी, केशिनी या नावांनी त्या प्रसिद्ध होत्या. अजमीढाने त्यांच्या गर्भापासून अनेक धर्मात्मा पुत्र उत्पन्न केले. अजमीढास केशिनीपासून कण्व नावाचा पुत्र झाला. याचा पुत्र मेधातिथी, याच्यापासून काण्वायन ब्राह्मणांची उत्पत्ती झाली.

धूमिनीच्या गर्भापासून अजमीढास बृहदनू झाला. याचा पुत्र बृहंत. याचा बृहन्मना पुत्र. याचा पुत्र बृहद्धनू. याचा पुत्र बृहदिषू. याचा पुत्र जयद्रथ. याचा पुत्र अश्वजित. याचा पुत्र सेनाजित. याला रुचिराश्व, काव्य, राजा दृढरथ, राजा वत्सावर्तक असे चार लोकविख्यात पुत्र झाले. वत्सावर्तकाचे वंशधर परिवत्सक नावाने ओळखले जातात. रुचिराश्वाचा पुत्र महायशस्वी पृथुसेन. याचा पौरव. याचा नीप पुत्र होय. नीपाच्या तेजस्वी पुत्रांची संख्या शंभर होती. ते सर्व राजे झाले.

काव्यापासून समर नावाचा पुत्र उत्पन्न झाला. तो नीपवंशाचा प्रवर्तक, लक्ष्मीने युक्त व कीर्तिवर्धक होता, समरास पार, संपार व सदश्व हे तीन पुत्र झाले. पारास पृथू झाला. पृथूस सुकृत झाला. यास विभ्राज नावाचा पुत्र झाला. याचा पुत्र अणुह. हा शुकदेवांचा जामात व कृत्वीचा पती होता. अणुहाचा पुत्र राजा ब्रह्मदत्त झाला. याचा युग-दत्त, याचा विष्वक्सेन. याचा उदक्सेन पुत्र. याचा पुत्र भल्लाट. याचा पुत्र जनमेजय (दुसरा). याच्या रक्षणासाठी उग्रायुधाने सर्व नीपवंशी नरेशांचा नाश केला.

हा उग्रायुध सूर्यवंशात उत्पन्न झाला होता. त्याने एकदा घोर तपस्या केली. त्याच वेळी राजा जनमेजय युद्धात पराजित झाल्याने तेथे आला. त्याला राज्य देण्यासाठी उग्रायुधाने नीपवंशियांचा संहार केला. धूमिनीच्या गर्भातून अजामीढास यवीनर झाला. त्याचा पुत्र धृतिमान. त्याचा पुत्र सत्यधृती, त्याचा प्रतापी दृढनेमी. याचा पुत्र सुधर्मा होता. याचा पुत्र प्रतापी सार्वभौम चक्रवर्ती सम्राट झाला. याच्या वंशात महा-पौरव नावाचा एक पुत्र झाला. याचा पुत्र राजा रुक्मरथ. याचा पुत्र सुपार्श्व. याचा पुत्र धर्मात्मा सुमती. याचा पुत्र संनतिमान. याचा पुत्र कृत नावाचा मोठा पराक्रमी होता. या राजाने सामवेदाच्या संहितांचे चोवीस भागांत विभक्तिकरण केले. हे उग्रायुध या कृताचे पुत्र पौरव-वंशात विशेष महत्त्वाचे होते. यांनीच पराक्रम करून पृथकाचा पिता पांचालनरेश जितेंद्रिय महाराज नीलाचा वध केला. उग्रायुधाचा पुत्र महायशस्वी क्षेम झाला. क्षेमापासून सुनीथाचा व सुनीथापासून नृपंजयाचा जन्म झाला. नृपंजयापासून विरथ झाला. हे सर्व नरेश पौरव या नावाने

विख्यात झाले.

## पूरुवंशी नरेशांची विस्तृत ओळख

यानंतर सूताने पन्नासाव्या अध्यायात पूरुवंशी नरेशांचा विस्तृत इतिहास ऋषींना सांगितला. अजमीढाची नलिनी नावाच्या पत्नीपासून राजा नीलाचा जन्म झाला. नीलानें उग्र तपस्या केल्याने सुशांतीची प्राप्ती त्याला झाली. सुशांतीस पुरुजातू व पुरुजातूस पृथू झाला. पृथूचा पुत्र भद्राश्व. भद्राश्वास मुद्गल, जय, राजा बृहदिषू, पराक्रमी जवीनर, कपिल असे पांच पुत्र झाले. या पाचांनी पंचालदेशाचे जनपद रक्षिले. मुद्गलाचे पुत्रगण मौदगल्य झाले. महायशस्वी ब्रह्मिष्ठाने मृद्गलास पितारूपाने स्वीकारले. त्याचा पुत्र इंद्रसेन, त्याचा पुत्र विंध्याश्व. याच्या संयोगाने मेनकाच्या गर्भातून जुळी संताने निर्माण झाली. यांतील एक राजर्षी दिवोदास व दुसरी यशस्विनी अहल्या.

अहल्याने शरद्वान गौतमांचा पुत्र ऋषिश्रेष्ठ शतानंदास उत्पन्न केले. शतानंदाचा पुत्र महातपस्वी, धनुर्वेदतज्ज्ञ सत्यधृती झाला. याचे वीर्य अमोघ होते. एकदा एका अप्सरेस पाहून त्याचे वीर्य स्नान करताना सरोवरात गळून गेले. या वीर्यामुळे त्या सरोवरात जुळी संताने निर्माण झाली. एकदा महाराज शंतनू शिकार खेळण्यासाठी त्या सरोवरापाशी आला. त्याने कृपावश होऊन त्या संतानांना जवळ घेतले.

दिवोदासाचा ज्येष्ठ पुत्र धार्मिक राजा मित्रयू होता. त्याला मैत्रायण व मैत्रेय झाले. राजा चैद्यवर हा मैत्रेयानाचा पुत्र. चैद्यवराचा मुलगा सुदास. याच्याच पुत्ररूपाने अजमीढ पुन: प्रकटला. याचेच दुसरे नाव सोमक होते. याचा पुत्र जंतू. तो मरण पावल्यावर अजमीढ सोमकास शंभर पुत्र झाले. अजमीढाची धूमिनी नावाची पत्नी होती. तिने पुत्रांची वृद्धी केली. जंतू मरण पावल्यावर तिने पुत्रप्राप्तीसाठी शंभर वर्षे तप केले. निरंतर अग्निहोत्र केल्याने तिच्या शरीराचा रंग धुरकट, काळसर झाला. याचवेळी अजमीढाने गर्भाधान केले. धूमिनीने ऋक्ष नावाच्या पुत्रास जन्म दिला. हा आपल्या शंभर भावांत ज्येष्ठ होता. तो रंगाने काळसर होता. याचा पुत्र संवरण, याचा कुरू. याने कुरुक्षेत्राची मशागत

केली. हे पाहून इंद्राने त्याला वर दिला. म्हणून कुरुक्षेत्र पुण्यप्रद व रमणीय क्षेत्र झाले. याच कुरूचा वंश पुढे कौरव या नावाने प्रसिद्ध झाला.

कुरूस सुधन्वा, जन्हू, महातेजस्वी परीक्षित व प्रजन हे पुत्र झाले. सुधन्वाचा पुत्र च्यवन. हा धर्म व अर्थ यांचा ज्ञाता होता. च्यवनाचा पुत्र कृमी, तो ऋक्षापासून उत्पन्न झाला होता. कृमीचा पुत्र महापराक्रमी चैद्योपरिचर वसू. तो प्रभावशाली, शूरवीर, आकाशगमन करणारा होता. चैद्योपरिचरास गिरिकाच्या संयोगाने सात संताने झाली. यांतील पहिला महारथी मगधराज होता. हाच बृहद्रथ या नावाने विख्यात झाला. यानंतर प्रत्यश्रवा, कुश, परिवाहन, यजुष् व मत्स्य असे त्याला बंधू झाले. सातवे संतान काली नावाची एक कन्या होती. बृहद्रथाचा पुत्र कुशाग्र. याचा पुत्र वृषभ व याचा पुत्र पुण्यवान. याचा पुण्य व याचा राजा सत्यधृती नावाचा होता. याचा पुत्र धनुष. याचा सर्व. याचा पुत्र संभव. याचा पुत्र राजा बृहद्रथ. याचे दोन पुत्र दोन तुकड्यांच्या स्वरूपात होते. ते जरा नावाच्या राक्षसीने जोडून दिले. म्हणून हा जरासंध या नावाने प्रसिद्ध झाला. हा क्षत्रियांचा विजेता होता. जरासंधाचा पुत्र प्रतापी सहदेव होता. याचा पुत्र लक्ष्मीवान व महाप्रतापी सोमवित् झाला. याचा पुत्र श्रुतश्रवा. हे सर्व नरेश मागध या नावाने विख्यात झाले.

जन्हूने सुरथ नावाच्या भूपालास पुत्ररूपाने जन्म दिला. याचा पुत्र वीरवर राजा विदूरथ. याचा पुत्र सार्वभौम. याचा जयत्सेन. याचा पुत्र रुचिर. याचा भौम व याचा त्वरितायू. याचा पुत्र अक्रोधन, याचा देवातिथी. याचा दक्ष. याचा पुत्र भीमसेन. याचा पुत्र पुरुवंशी दिलीप व याचा पुत्र प्रतीप. या प्रतीपास देवापी, शंतनू व बाल्हीक असे तीन पुत्र होते. बाल्हीकास सात पुत्र झाले. प्रजेने दोषी ठरविल्याने देवापी राज्य सोडून मुनी झाला. हा राजा कुष्ठरोगी होता.

शंतनू राजा झाला. हा मोठा विद्वान व महान वैद्य होता. हा ज्या वृद्धास स्पर्श करी तो युवक बनत असे. म्हणून याचे नाव शंतनू. याने जन्हुनंदिनी गंगेस आपली पत्नी मानले. त्याने हिच्यापासून देवव्रतास

(भीष्मास) उत्पन्न केले. दाशकन्या काली सत्यवतीनें शंतनूपासूनच विचित्रवीर्य नावाच्या पुत्रास जन्म दिला. महर्षी कृष्णद्वैपायन व्यासांनी विचित्रवीर्याच्या क्षेत्रात धृतराष्ट्र व पांडूस व दासीने विदुरास उत्पन्न केले. धृतराष्ट्राने गांधारीपासून शंभर पुत्रांना जन्म दिला. त्यांत दुर्योधन ज्येष्ठ होता. पांडूच्या कुंती व माद्री अशा दोन पत्नी होत्या. या दोघींपासून पांच पांडव जन्मास आले. या पांच पांडवांना द्रौपदीपासून पांच पुत्र झाले. युधिष्ठिरास प्रतिविंध्य, भीमसेनास श्रुतसेन, अर्जुनास श्रुतकीर्ती, सहदेवास श्रुतकर्मा व नकुलास शतानीक झाला. यांशिवाय पांडवांना आणखी सहा महारथी पुत्र झाले. भीमसेन व हिडिंबा यांना घटोत्कच झाला. काशी व भीम यांना सर्वंग पुत्र झाला. मद्रराज कुमारीने सहदेवाच्या संयोगानें सहोत्र नावाचा पुत्र निर्माण केला. नकुलपुत्र निरमित्र चेदिराजकुमारी करेणुमतीच्या उदरापासून जन्मास आला. पृथापुत्र अर्जुनाच्या संयोगानें सुभद्रेस महारथी अभिमन्यू झाला. युधिष्ठिरपत्नी देवकीने यौधेय नावाच्या पुत्रास जन्म दिला. अभिमन्यूचा पुत्र परीक्षित झाला. परीक्षिताचा पुत्र परम धर्मात्मा जनमेजय झाला.

जनमेजयानें आपल्या यज्ञात वाजसनेय (शुक्लयजुर्वेदाचे आचार्य)-ऋषींना ब्रह्माच्या पदावर नियुक्त केले. हे पाहून कृष्णयजुर्वेदाच्या आचार्यांनी, वैशंपायनांनी त्यांना शाप देताना म्हटले, 'तुझा हा नवीन ग्रंथ भूतलावर स्थिर होणार नाही.' या जनमेजयाचा पुत्र शतानीक. याला अधिसीमकृष्ण नावाचा पुत्र झाला.

यानंतर सूताने ऋषींनी विचारल्यावरून भविष्यातील क्षत्रिय राजांची कल्पना करून दिली. अधिसीमकृष्ण हा राजा याकाळी (पुराण-निरूपणकाळी) चालू आहे. याचा पुत्र विवकू. गंगेने हस्तिनापूर वाहून नेल्यावर हा त्या नगराचा परित्याग करून कौशांबीनगरीत प्रवेश करील. याला प्रबल असे आठ पुत्र होतील. त्यांतील ज्येष्ठ भूरी असेल. याचा पुत्र चित्ररथ नावाचा असेल. याचा शुचिद्रव, याचा वृष्णिमान, याचा सुषेण, याचा सीनथ नावाचा पुत्र राजा होईल. याला महायशस्वी नृचक्षू होईल. याचा पुत्र सुखीबल, याचा पुत्र परिष्णव, याचा पुत्र सुतपा

होईल. याचा पुत्र मेधावी, याचा पुरंजय, याचा उर्व व याचा पुत्र तिग्मात्मा होईल. याचा बृहद्रथ व याचा सुदामा होईल. याचा शतानीक व याचा उदयन होईल. यापासून वीरवर राजा वहीनर व याचा पुत्र दंडपाणी होईल. याचा पुत्र निरमित्र, याचा क्षेमक होईल. असा हा पुरुवंश. पांडुपुत्र अर्जुनाचा वंश.

## अग्निवंशाचे निरूपण

स्वायंभुव मन्वन्तरात अग्नी हा देव ब्रह्मदेवांचा मानसपुत्र होता. स्वाहाने त्याच्या संयोगापासून पावक (दक्षिणाग्नी), पवमान (गार्हंपत्य), शुची (आहवनीय)या तीन पुत्रांना जन्म दिला. यांनाही अग्नीच म्हणतात. यातील पावकास वैद्युत (पाण्यापासून), पवमानास निर्मंथ्य (मंथन करून), आणि शुचीस सौर (सूर्यापासून) ; अग्नी झाले. पवमानाच्या अग्नीस कव्यवाहन म्हणतात. पावकाचे पुत्र सहरक्ष व शुचीचे पुत्र हव्यवाहन या नावांनी ओळखले गेले. सहरक्ष असुरांचा अग्नी आहे. पितरांचा अग्नी कव्यवाहन आहे. असे हे तीन देव, असुर व पितर पृथक् पृथक् अग्नी आहेत. यांच्या पुत्रांची संख्या एकोणपन्नास आहे.

सर्वप्रथम पावन नावाचा लौकिक अग्नीदेव ब्रह्मदेवांचा पुत्र आहे. त्याचा पुत्र ब्रह्मौदनाग्नी असून तो भरत या नावाने प्रसिद्ध आहे. वैश्वानर नावाचा अग्नी शंभर वर्षांपर्यंत हव्यास वहन करतो. पुष्कर वा आकाशाचे मंथन करून अथर्वास पुत्ररूपाने जो अग्नी उत्पन्न झाला, तो दध्यङ्ङाथर्वण नावाने प्रसिद्ध झाला. यालाच दक्षिणाग्नी म्हणतात. भृगूपासून अथर्वाची व अथर्वापासून अंगिराची उत्पत्ती झाली. त्यापासून अलौकिक अग्नी निर्माण झाला. त्याला दक्षिणाग्नीही म्हणतात.

पवमान अग्नी निर्मंथ्य या नावानेही ओळखला जातो. तोच ब्रह्मदेवांचा प्रथम पुत्र गार्हपत्य अग्नी आहे. संशतीस सभ्य व आवसथ्य असे दोन पुत्र झाले, यानंतर आहवनीय अग्नीने आपणांस सोळा भागांत विभक्त केले. आणि कावेरी, कृष्णवेणा, नर्मदा, यमुना, गोदावरी, वितस्ता (झेलम), चंद्रभागा, इरावती, विपाशा, कौशिकी (कोसी), शतद्रू (सतलज), शरयू, सीता, मनस्विनी, ल्हादिनी व पवना या सोळा

नद्यांत त्याने विहार केला. असे करताना अग्नीने नद्यांच्या गर्भापासून निर्माण केलेले पुत्र धिष्णू वा धिष्ण म्हणून ओळखले गेले.

आता यांच्या विहाराची वा उपासनायोग्य स्थानांची संक्षेपाने ओळख अशी. यज्ञादी पुण्य अवसरी उपस्थित होऊन विभू, प्रवाहण, अग्नीध्र इत्यादी धिष्णू यथास्थान वावरतात. वासव वा कृशानू अग्नी यज्ञाच्या वेदीच्या उत्तरभागात स्थित होतो. या अग्नीचे एक नाव सम्राट आहे. या अग्नीस आठ पुत्र असून विप्रगण त्यांची उपासना करतात. पवमान नावाचा द्वितीय अग्नी पर्जन्यरूप असून उत्तरदिशेस स्थित पावकास समूह्य अग्नी म्हणतात. असम्मृज्य हव्यसूद अग्नीस शामित्र म्हणतात. शतधामा अग्नी सुधाज्योती आहे. यालाच रौद्रैश्वर्य या नावानेही अभिहित केले जाते. ब्रह्मज्योती अग्नीस वसुधाम व ब्रह्म-स्थानीयही म्हणतात. अजैकपाद उपासनीय अग्नी आहे. याला शाला-मुखही म्हणतात. हा वेदीच्या दक्षिणदिशेस असतो. वासव नावाच्या अग्नीचे आठही पुत्र ब्राह्मणांकडून उपासनीय आहेत.

या आठ विहरणीय अग्निपुत्रांचे वर्णन असे. बर्हिष नावाचा होत्रीय अग्नीचा पुत्र हव्यवाहन अग्नी आहे. यानंतर प्रचेता नावाच्या प्रशंसनीय अग्नीची उत्पत्ती झाली. याचेच दुसरे नाव संसहायक आहे. यानंतर अग्निपुत्र विश्ववेदास ब्राह्मणाच्छंसि म्हटले जाते. जलाने उत्पन्न होणारा अग्नी स्वांभ सेतू या नावानेही ओळखला जातो. या धिष्ण्य नावाच्या अग्नींना यज्ञात यथास्थान आवाहन होते. ब्राह्मण सोमरसा-द्वारे यांची पूजा करतात. पावक नावाच्या अग्नीस योग म्हणतात. यासच अवभृत असे नाव आहे. त्याची वरुणाबरोबर पूजा होते. हृदय नावाच्या अग्नीचा पुत्र मन्युमान असून यास जठराग्नीही म्हणतात. हा मनुष्यांच्या उदरांत राहून अन्नाचे पचन करतो. परस्परांशी घर्षण होऊन निर्माण होणाऱ्या अग्नीस विद्धाग्नी म्हणतात. मन्युमान अग्नीचा पुत्र संवर्तक. हा अत्यंत भयंकर आहे. हा समुद्रात राहून वडवानलमुखाने सतत जल-पान करतो.

समुद्रप्रवासी संवर्तक अग्नीचा पुत्र सहरक्ष असून तो मनुष्यांच्या घरांतून निवास करतो. त्यांच्या सर्व कामना तो पूर्ण करतो. सहरक्षाच

पुत्र क्रव्यादग्नी असून तो मरण पावलेल्या पुरुषांना भक्षण करतो. हे सर्व पावक नावाच्या अग्नीचे पुत्र होत. यांच्याखेरीज जे अन्य पुत्र आहेत, त्यांना सौवीर्याकडून गंधर्वांनी व असुरांनी हरण केले. अरणी-पासून मंथन केलेला अग्नी इंधनात असतो. पृथुयोनीसाठी ज्या अग्नीची नियुक्ती झाली आहे, त्याचे नाव आयू आहे. आयूचा पुत्र महिमान. त्याचा पुत्र दहन. तो पाकयज्ञांचा अभिमानी देव आहे. दहनाचा पुत्र अद्‌भुत नावाचा आहे. तो हव्य व कव्य यांना भक्षण करतो. अद्‌भुताचा पुत्र वीर नावाचा अग्नी आहे. त्याचा पुत्र विविधाग्नी असून याचा पुत्र महाकवी आहे. याचा दुसरा पुत्र अर्क. याच्यापासून आठ अग्निपुत्रांची उत्पत्ती झाली.

कामनापूर्तीसाठी यज्ञांचा जो देव आहे, त्याचे नाव रक्षोहा आहे. याचे दुसरे नाव यतिकृत असून इतरांची नावे सुरभी, वसुरत्न, नाद, हर्यश्व, रुक्मवान, प्रवर्ग्य व क्षेमावान; अशी आहेत. हे सर्व शुची नावाच्या अग्नीचे पुत्र आहेत. या सर्वांची संख्या चवदा आहे.

## भूगोलाचे सविस्तर वर्णन

यानंतर एकशेतेराव्या अध्यायात भूगोलाचे सविस्तर वर्णन आले आहे. द्वीपांचे हजारो भेद असले तरी प्रधान अशी सात द्वीपे आहेत. जंबूद्वीपाचा विस्तार एक लाख योजने आहे. हे अनेक प्रकारच्या सुंदर देशांनी व नगरांनी परिपूर्ण आहे. यात सिद्ध व चारण यांचा निवास असतो. हे सर्व प्रकारच्या धातूंनी व शिलासमूहांनी समन्वित पर्वतांनी सुशोभित असते. या पर्वतांपासून अनेक नद्या उगम पावतात. याच्या पूर्वेपासून पश्चिमेस सहा विस्तृत असे वर्षपर्वत आहेत. हिमवानपर्वत सदा बर्फाने झाकला गेलेला आहे. सुवर्णाने व्याप्त असा हेमकूट नावाचा पर्वत आहे. अतिशय सुंदर असा निषद नावाचा पर्वतही येथेच आहे.

यातील सुवर्णमय मेरुपर्वत चारही रंगांनी शोभणारा आहे. तो उल्वम (गर्भायशासम) मानला जातो. हा चारही दिशांना चोवीस हजार मैलांपर्यंत पसरला आहे. हा अव्यक्तजन्मा ब्रह्मदेवांच्या नाभी-बंधनापासून उद्‌भूत झाला आहे. याचा पूर्वभाग श्वेत रंगाचा असल्याने

याचे ब्राह्मणत्व शोभून दिसते. याचा दक्षिणभाग पिवळ्या रंगाचा असून त्यापासून वैश्यत्वाचा बोध होतो. याचा पश्चिमभाग काळसर असल्याने त्याचे शूद्रत्व प्रतीत होते. याचा उत्तरभाग लाल रंगाचा असून त्यापासून क्षत्रियत्व सिद्ध होते. यानंतर नीलपर्वत आहे. हा वैडूर्यमण्यांनी व्याप्त आहे. श्वेतपर्वत सुवर्णमय असल्याने पिवळ्या रंगाचा आहे. सुवर्णमय शिखरांनी शोभणारा शृंगवानपर्वत आहे. त्याची शिखरे मयूरपिसांच्या रंगांप्रमाणे शोभून दिसतात. या सर्व पर्वतांचा आश्रय सिद्ध व चारण यांनी घेतलेला आहे.

पृथ्वीच्या मध्यभागी इलावृत नावाचे वर्ष आहे. ते महामेरु पर्वताच्या चारही दिशांना फैलावलेले आहे. चोवीस हजार योजनांच्या समतल भूमीवर हे विस्तृतपणे पसरले आहे. यांच्या मध्यभागी महामेरु नावाचा एक पर्वत आहे. तो धूमरहित अग्नीसारखा चमकतो. मेरुपर्वताचा अर्धा दक्षिणभाग व अर्धा उत्तरभाग या नावांनी प्रसिद्ध आहे. सात वर्षांत सात पृथक् पृथक् सात वर्षपर्वत आहेत. जंबूद्वीपात नील, निषध हे दोन विशाल पर्वत असून श्वेत, हेमकूट, हिमवान व शृंगवान हे लहान पर्वत आहेत. ऋषभपर्वत जंबूद्वीपाएवढाच विस्ताराने आहे. हेमकूटपर्वत ऋषभपर्वताच्या बाराव्या भागाने लहान आहे. हिमवान त्याच्या विसाव्या अंशाने कमी आहे. हेमकूट नावाचा विशाल पर्वत अठ्याऐंशी हजार योजनांचा असून हिमवानपर्वत पूर्वेपासून पश्चिमेकडे ऐंशी हजार योजने फैलावला आहे. हिमवानाच्या संबंधित वर्षास भारतवर्ष असे नाव आहे.

हेमकूटापर्यंतचा प्रदेश किंपुरुष या नावाने ओळखला जातो. हेमकूटाच्या पुढे निषधपर्वतापर्यंत हरिवर्ष मानतात. हरिवर्षानंतर मेरुपर्वतापर्यंतचा प्रदेश इलावृतवर्ष या नावाने ओळखला जातो. इलावृतापासून नीलपर्वतापर्यंतचा प्रदेश रम्यकवर्ष नावाने विख्यात आहे. रम्यकवर्षापासून श्वेतपर्वतापर्यंतचा प्रदेश हिरण्यवर्ष या नावाने प्रसिद्ध आहे. यानंतर शृंगशाक नावाचे वर्ष आहे. याला कुरुवर्षही म्हणतात. मेरुपर्वताच्या दक्षिणेस व उत्तरेस धनुष्याच्या आकारात दोन वर्षे आहेत. त्यांच्यामध्ये इलावर्ष आहे. निषधपर्वताच्या पूर्वेस मेरूची दक्षिणवेदी व

इलावृताच्या पश्चिमेस उत्तरवेदी आहे. नीलपर्वताच्या दक्षिणेस व निषधपर्वताच्या उत्तरेस माल्यवान पर्वत आहे. गंधमादनपर्वत बत्तीस हजार योजने विस्तृत आहे.

मेरू नावाचा सुवर्णपर्वत चार रंगांनी शोभतो. तो पूर्वेस श्वेत, दक्षिणेस पिवळा, पश्चिमेस काळसर व उत्तरेस लाल आहे. हा पर्वत एखाद्या राजाप्रमाणे शोभतो. त्याची कांती तरुण सूर्याप्रमाणे आहे. तो धूमरहित अग्नीप्रमाणे सदा चमकतो. पृथ्वीच्या वर याची उंची चोवीस हजार योजने आहे. सोळा हजार योजने तो पृथ्वीच्या आत आहे. त्याचा विस्तार अठ्ठावीस हजार योजनांचा आहे. हा अनेक दिव्य औषधींनी शोभतो. या पर्वतावर देव, गंधर्व, असुर व राक्षस अप्सरांसह राहून आनंदाचा उपभोग घेतात.

या पर्वताच्या पूर्वेस भद्राश्व, दक्षिणेत भारत, पश्चिमेस केतुमाल, उत्तरेस उत्तरकुरू असे देश आहेत. त्याच्या चारही दिशांना रत्नांनी भरलेले मंदर, गंधमादन, विपुल, सुपार्श्व नावांचे पर्वत आहेत. त्यावर अरुणोद, मानस, सितोद, भद्र या नावांची सरोवरे व अनेक वने आहेत. मंदारपर्वतावर भद्रकदंबा, गंधमादनपर्वतावर जांभूळ, विपुलपर्वतावर पिंपळ व सुपार्श्वपर्वतावर वड यांचे वृक्ष आहेत.

गंधमादनच्या पश्चिमेस अमरगंडिक नावाचा पर्वत आहे. तो बत्तीस हजार समतल भूमीने संपन्न आहे. येथील निवासी केतुमाल या नावाने विख्यात आहेत. ते सर्व कालाग्नीसारखे भयानक, महान सत्त्वसंपन्न व महाबली आहेत. तेथील स्त्रियांचा रंग लाल कमलासारखा आहे. त्यावर फणसाचा एक महान दिव्य वृक्ष आहे. त्याची पाने अत्यंत चमकदार असतात. यांच्या फळांचा रस पिऊन तेथील निवासी दहा हजार वर्षांपर्यंत जिवंत राहतात. माल्यवानाच्या पूर्वभागात पूर्वगंडिका नावाचा पर्वत आहे. तो बत्तीस हजार योजने लांब व शंभर योजने रुंद आहे. त्याच्या पायथ्याशी भद्राश्व नावाचा देश आहे. येथील निवासी सदा प्रसन्न असतात. येथे भद्रमाल नावाचे वन आहे. तेथे कालाम्र नावाचा एक महान वृक्ष आहे. येथील निवासी गोरे, सत्त्वसंपन्न व महाबली असतात. तेथील स्त्रियांची कांती कुमुदिनीसारखी असते.

त्या सुंदर व प्रिय असतात: काही स्त्रिया गौरवर्णी असतात: त्यांची कांती चंद्रासारखी असते. त्यांचे शरीर चंद्रासारखे शीतल असते. त्यापासून कमलाचा गंध पसरतो. ते लोक कालाम्रफलाचा रस पितात व सदा तरुण राहातात: ते निरोगी राहून दहा हजार वर्षांपर्यंत जगतात.

नीलपर्वताच्या दक्षिणेस व निषधपर्वताच्या उत्तरेस रमणक नावाचे वर्ष आहे: येथील प्रजा गौरवर्णाची व विलासी आहे: तेथे रोहिण नावाचा एक महान वटवृक्ष आहे. त्याच्या फळांचा रस पिऊन येथील निवासी जीवननिर्वाह करतात. तेथील भाग्यवान पुरुष सदा प्रसन्न असतात. ते अकरा हजार वर्षांपर्यंत जगतात: श्वेतपर्वताच्या उत्तरेस व शृंगावानपर्वताच्या दक्षिणेस हिरण्वत नावाचे एक वर्ष आहे. येथे हैरण्वती नावाची नदी वाहाते: येथील निवासी महाबली, पराक्रमी, प्रसन्नचित्त, गोरवर्ण, कुलीन व देखणे असतात. त्यांचे आयुष्य बारा हजार पांचशे वर्षांचे असते: या वर्षात पानांनी आच्छादित असा लकुच नावाचा एक महान वृक्ष आहे. त्याच्या फलांचा रस येथील मानव पितात. शृंगावनपर्वताची तीन शिखरे फार उंच असतात! त्यांतील एक मणिमय, दुसरे सुवर्णमय, तिसरे रत्नमय असते.

या शृंगवानपर्वताच्या उत्तरेस व दक्षिणतटापर्यंत उत्तरकुरू नावाचे वर्ष असून ते परम पुण्यप्रद सिद्धांनी सुसेवित आहे: येथे अमृततुल्य जल प्रवाहित होते. वृक्षांना मधासारखी मधुर फळे येतात. त्यांच्यापासूनच येथे वस्त्रे, फले व आभूषणे यांची निर्मिती होते. काही वृक्ष अत्यंत सुंदर व कामना पूर्ण करणारे आहेत. काही मनोहर वृक्षांपासून दूध स्रवते. येथील सर्व भूमी मणिमय असून तीवर सुवर्णाची वाळू पसरलेली असते. सर्वांत शीतल, मंद व सुगंधी वायू वाहातो. देवलोकापासून च्युत झालेलें धर्मात्मे येथे जन्म धारण करतात: ते सर्व गौरवर्ण, कुलीन व स्थिर यौवनाचे असतात: त्यांच्या स्त्रिया अप्सरांप्रमाणे सुंदर असतात. ते स्त्रीपुरुष जोडप्यानेच जन्मतात व एकदुसऱ्यासाठी त्यागही करतात. ते परस्परांवर अनुरक्त, शोकरहित, सदा प्रसन्नचित्त असतात. या महापराक्रमी मानवांचे आयुष्य अकरा हजार वर्षांचे असते: कोणताही पुरुष दुसरा विवाह करीत नाही:

## भारतवर्ष, किंपुरुषवर्ष व हरिवर्ष

या भारतवर्षात स्वायंभुवादी मनूंनी प्रजांची निर्मिती केली. येथील प्रजेचे भरणपोषण करणाऱ्या मनूस भरत म्हणतात. येथे स्वर्ग, मोक्ष, भोग इत्यादींची प्राप्ती होते. या भारतवर्षाखेरीज अन्यत्र कोठेच कर्माचे विधान सांगितलेले नाही. या भारतवर्षाचे नऊ भेद आहेत. इंद्रद्वीप, कशेरुमान, ताम्रपर्ण, गभस्तिमान, नागद्वीप, सौम्यद्वीप, गांधर्व-द्वीप, वारुणद्वीप; हे आठ विभाग व नववा समुद्रांनी घेरलेला भारत-वर्षाचा विभाग. हे द्वीप दक्षिणेपासून उत्तरेकडे एक हजार योजने पसरलेले आहे. याचा विस्तार गंगाउद्‌गमापासून कन्याकुमारीपर्यंत आहे. या द्वीपाच्या चारही दिशांना म्लेच्छ जातीचे लोक राहातात. याच्या पूर्वेस किरात व पश्चिमेस यवन राहातात. मध्यभागी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा निवास असतो. यात वर्ण व आश्रम यांचे विधिपूर्वक पालन होते. या द्वीपातील मनुष्यांची गती कर्मपर असून त्यांना स्वर्ग व मोक्ष यांची अपेक्षा असते.

हे मानवद्वीप त्रिकोणाकृती असून यास जिंकणारा सम्राट मानला जातो. यांनाच विराट असेही मानतात. या महान भारतवर्षात सात विश्वविख्यात कुलपर्वत आहेत. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्षवान, विंध्य, पारियात्र हे सात कुलपर्वत असून याच्या समीप हजारो पर्वत आहेत. त्यांची शिखरे चित्रविचित्र आहेत.

या पर्वतांच्या संयुक्त प्रदेशात आर्य व म्लेच्छ जातींचा निवास आहे. हिमालयाच्या पायथ्यापासून सिंधू, गंगा, सरस्वती, शतद्रू (सतलज), चंद्रभागा (चिनाव), यमुना, शरयू, इरावती (रावी), वितस्ता (झेलम), विपाशा (व्यास), देविका, कुहू, गोमती, धूतपापा, बाहुधा, दृषद्‌वती, कौशिकी, तृतीया, निश्चीरा, गंडकी, चक्षू, लौहित्य; इत्यादी नद्या प्रवाहित होतात. वेदस्मृती, वेत्रवती, वृत्रघ्नी, सिंधू, पर्णाशा, चंदना, सदानीरा, मही, पारा, चर्मण्वती, यूपा, विदिशा, वेणुमती, शिप्रा, अवन्ती व कुंती या नद्यांचा उगम पारियात्रपर्वतात आहे.

शोण, महानदी, नर्मदा, सुरसा, क्रिया, मंदाकिनी, दशार्णा, चित्र-

कूटा, तमसा, पिप्पली, श्येनी, करतोया, पिशाचिका, विमला, चंचला, वंजुला, वालुवाहिनी, शुक्तिमन्ती, शुनी, लज्जा, मुकुटा, हृदिका या स्वच्छसलिला नद्या ऋक्षवन्तपर्वतात उगम पावतात. तापी, पयोष्णी (पूर्णा वा पैनगंगा ?), निर्विंध्या, क्षिप्रा, निषधा, वेण्या, वैतरणी, विश्वमाला, कुमुद्वती, तोया, महागौरी, दुर्गा व अंत:शिला; या सर्व पुण्यतोया नद्या विंध्याचलापासून उत्पन्न झाल्या आहेत. गोदावरी, भीमरथी, कृष्णवेणी, वंजुला (मंजीरा), कर्णाटककी, तुंगभद्रा, सुप्रयोगा, वाह्या (वर्धा), कावेरी या सर्व दक्षिणेकडील नद्या सह्यपर्वतातून उगम पावतात.

कृतमाला, ताम्रपर्णी, पुष्पजा, उत्पलावती या कल्याणमयी नद्या मलयाचलापासून निघतात. यांचे जल अत्यंत शीतल असते. त्रिषामा, ऋषिकुल्या, इक्षुला, त्रिविदा, अचला, लांगूलनी, वंशधरा, या नद्या महेंद्रपर्वतापासून निघतात. ऋषीका, सुकुमारी, मंदगा, मंदवाहिनी, कृपा, पलाशिनी, या नद्यांचा उगम शुक्तिमानपर्वतापासून आहे. या सर्व पुण्यतोया नद्या पुण्यप्रद, समुद्रगामिनी आहेत. या विश्वासाठी मातेसमान आहेत. यांना शेकडो, हजारो लहानमोठ्या नद्या मिळणाऱ्या आहेत.

यांच्या परिसरात कुरू, पांचाल, शाल्व, सजांगल, शूरसेन, भद्रकार, बाह्य, सहपटच्चर, मत्स्य, किरात, कुंती, काशी, कुंतल, कोसल, आवंत, कलिंग, मूक व अंधक या देशांची जनपदे आहेत. सह्यपर्वताच्या निकट गोदावरी नदी प्रवाहित होते. अखिल भूमंडळात हा प्रदेश अत्यंत मनोरम आहे. गोवर्धन, मंदराचल, गंधमादनपर्वत, यांवर श्रीरामांसाठी स्वर्गीय वृक्ष व दिव्य औषधी यांची विपुलता आहे. येथील मुनिवरांच्या प्रभावाने हा प्रदेश पुष्पांनी परिपूर्ण असून मनोहर आहे. बाल्हीक, वाटधान, आभीर, कालतोयक, पुरंध्र, शूद्र, पल्लव, आत्तखंडिक, गांधार, यवन, सिंधू, (सिंध), सौवीर, मद्रक, शक, द्रुह्य, पुलिंद, पारद, आहारमूर्तिक, रामठ, कंटकार, कैकेय, दशनामक; या क्षत्रियांच्या उपनिवेशांत, (प्रदेशांत) वैश्य व शूद्रही निवास करतात. यांखेरीज, कंबोज, दरद, बर्बर, पह्लव, अत्री, भरद्वाज, प्रस्थल, कसेरक, लंपक, तलगान व जांगलसहित सैनिक प्रदेश; हे सर्व उत्तरापथातील देश आहेत. पूर्व-

दिशेस अंग, वंग, मुद्गुरक, अंतर्गिरी, बहिर्गिरी, प्लवंग, मातंग, यमक, मालवर्णक, सुह्म, प्रविजक, मार्ग, वागेय, मालव, प्राग्ज्योतिष, पुण्ड्र, विदेह, ताम्रलिप्तक, शाल्व, मागध, गोनर्द ही जनपदे आहेत.

आता दक्षिणपथातील जनपदे अशी आहेत. पांड्य, केरळ, चोल, कुल्य, सेतुक, मूषिक, कुपथ, वाजिवासिक, महाराष्ट्र, महिषक, कलिंग, आभीर, सहैषीक, आटव्य, शबर, पुलिंद, विंध्यमुलिक, वैदर्भ, दंडक, कुलीय, सिराल, अश्मक, भोगवर्धन, तैत्तिरिक, नासिक्य, नर्मदेवरील अन्तःप्रातातील प्रदेश. भारुकच्छ, माहेय, सारस्वत, काच्छीक, सौराष्ट्र, आनर्त, अर्बुद; हे सर्व अपरांत प्रदेश आहेत. मालव, करूष, मेकल, उत्कल, औंड्र, माष, दशार्ण, भोज, किष्किधक, तोशल, कोसल, त्रैपुर, वैदिश, तुमुर, तुंवर, पद्म, नैषध, अरूप, शौंडिकेर, वीतिहोत्र, अवंती; हे सर्व प्रदेश विंध्यपर्वताभोवती आहेत. निराहार, सवंग, कुपथ, अपथ, कुथप्रावरण, ऊर्णादर्व, समुद्रक, त्रिगर्त, मंडल, किरात, चामर; हे पर्वतांवरील प्रदेश होत.

जंबूवर्ष, व किंपुरुषवर्ष हे दोन वर्षे अत्यंत विशाल व नंदनवनाप्रमाणे शोभणारी आहेत. किंपुरुषवर्षातील माणसांचे आयुष्य दहा हजार वर्षांचे असते. येथे जन्म घेणारांची कांती तापवलेल्या सुवर्णासारखी असते. या पुण्यमय किंपुरुषवर्षात प्लक्षाचा एक वृक्ष असून त्यापासून सतत मद्य स्रवत असतो. येथील निवासी या रसाचे पान करून निरोगी, शोकरहित व प्रसन्नचित्त होतात. येथील पुरुषांचा रंग सुवर्णासारखा व स्त्रिया अप्सरांसारख्या सुंदर असतात. हरिवर्षात सुवर्णाच्या कांतीसारखे मानव उत्पन्न होतात. ते देवलोकातून आलेले व विभिन्न रूपांचे असतात. या वर्षातील लोक इक्षुरसाचे पान करतात. त्यामुळे त्यांना वृद्धावस्था कधी येत नाही. ते चिरकाल जिवंत राहातात. त्यांचे आयुष्य अकरा हजार वर्षांचे असते. इलावृतवर्षात सूर्याचा ताप कधी होत नाही. येथील मानव वृद्ध होत नाहीत. या वर्षात नक्षत्रांसह चंद्र व सूर्य यांचा प्रकाश नसतो. येथील मानवांची शरीरे कमलकांतीने व गंधाने समृद्ध असतात. त्यांची वस्त्रे सुवर्णाच्या तारांनी तयार होतात. देवलोकातील जीव येथे जन्म धारण करतात. या इलवृतवर्षातील लोकांचे आयुष्य तेरा हजार वर्षांचे असते.

मेरुगिरीच्या दक्षिणेस व निषधपर्वताच्या उत्तरेस सुदर्शन नावाचा एक विशाल व प्राचीन जांभळांचा वृक्ष आहे. तो सदा पुष्पांनी व फलांनी समृद्ध असतो. सिद्ध व चारण त्याचे सेवन करतात. या वृक्षावरूनच या द्वीपास जंबूद्वीप असे नाव पडले आहे. या वृक्षराजाची उंची अकराशे योजने आहे. हा महानवृक्ष स्वर्गापर्यंत पसरला आहे. त्याच्या फलांच्या रसाची नदी येथे वाहाते. मेरूस प्रदक्षिणा घालून ही नदी पुन्हा जंबू-वृक्षाच्या मुळांपर्यंत येते. येथील रहिवासी सदा हर्षपूर्वक जंबूरसाचे पान करतात. त्यामुळे त्यांना वृद्धावस्थेची बाधा कधीच होत नाही. त्यांना कधी भूक लागत नाही, की त्यांना कधी थकावट येत नाही. त्यांना कसलेच दुःख होत नाही. येथे जांबूनद नावाचे सुवर्ण प्राप्त होते. यापासून देवांची आभूषणें तयार होतात. हे सुवर्ण इंद्रगोपाप्रमाणे लाल व चमकदार असते. राक्षस, पिशाच, यक्ष इत्यादी हिमालयावर निवास करतात. हेमकूटपर्वतावर अप्सरांसहित गंधर्वांचा निवास असतो. शेष, वासुकी, तक्षक इत्यादी नागांचा निवास याच पर्वतावर असतो. महामेरूवर तेहतीस देव क्रीडा करतात. नीला व वैडूर्य या मण्यांनी संपन्न अशा नीलपर्वतावर सिद्ध व ब्रह्मर्षी यांचा निवास असतो. श्वेतपर्वतावर दैत्य व दानव राहातात. पर्वतश्रेष्ठ शृंगवान पितरांचे विहारस्थल आहे.

## आणखी काही पर्वत, नद्या

एकशेएकविसाव्या अध्यायात कैलासपर्वताचे वर्णन, सप्तधारा गंगा आणि जंबूद्वीप यांचे विवरण आहे. गंगानदी हिमवानास दोन भागांत विभक्त करून दक्षिणसमुद्रास मिळते. यानंतर चक्षूनदी वीरमरू, कालिक शूलिक, तुषार, बर्बर, कार, पल्हव, पारद व शक या देशांना आप्लावित करून समुद्रास मिळते. सिंधू नदी दरद, उर्जगुड, गांधार औरस, कुहू, शिवपोर, इंद्रमरू, वसती, सैंधव, उर्बश, वर्ब, कुपथ, भीमरोमक, शुनामुख व उर्दमरू या देशांतून वाहाते. मंगलमयी गंगा गंधर्व, किन्नर, यक्ष, राक्षस, विद्याधर, नाग, कलापग्रामवासी जन, किंपुरुष, किरात, पुलिंद, कुरू, भारत, पांचाल, कौशिक, मत्स्य, मगध, अंग, उत्तर सुह्म, वंग व ताम्रलिप्त या देशांना पवित्र करते.

याच प्रकारे पुण्यतोया ल्हादिनी पूर्वाभिमुख होऊन उपका, निषाद, धीवर, ऋषिक, नीलमुख, केकर, अनेककर्ण, किरात, कालंजर, विकर्ण, कुशिक, स्वर्गभौमक; या देशांना भिजवून समुद्राच्या तटावर पोचून त्यात लीन होते. नलिनीनदी विंदुसरोवरात उत्पन्न होऊन पूर्वदिशेस वाहाते. ही कुपथ, इंद्रद्युम्नसरोवर, खरपथ, वेत्रद्वीप, शंकुपथ, इत्यादी प्रदेशांना समृद्ध करून, उज्जानक (जुनागढ)च्या मरुभूमीतून वाहून कुथप्रावरणाकडे वाहाते. इंद्रद्वीपाच्या निकट ही लवणसागरास जाऊन मिळते. याच सरोवरापासून पावनी नदी मोठ्या वेगाने पूर्वदिशेस वाहाते. ती तोमर, हंसमार्ग, समूहक देशांना भिजवून पूर्वेकडे वाहाते. तेथे अनेक पर्वतांना विदीर्ण करून कर्णप्रावरणात पोचून अश्वमुखदेशास येते. यानंतर मेरुपर्वतास भिजवून, विद्याधरांच्या लोकात जाऊन शैमिमंडलकोष्ठ नावाच्या सरोवरात ही नदी प्रवेश करते.

वंशौकसाराच्या तटावर सुरभी नावाचे एक वन आहे. यात जितेंद्रिय व विद्वान हिरण्यशृंग निवास करतो. तो कुबेराचा अनुचर, यज्ञविन्मुख, अमित तेजस्वी व पराक्रमी आहे. येथेच अगस्त्यगोत्रीय विद्वान ब्रह्मराक्षसांचेही निवासस्थान आहे. कुबेराचे हे चार अनुचर हिरण्यशृंगाच्या आश्रमात राहातात. हेमकूटपर्वताच्या शिखरांवर सर्पांचे सरोवर आहे. येथूनच सरस्वती व ज्योतिष्मती नावांच्या दोन नद्या प्रवाहित होतात, त्या क्रमशः पूर्व व पश्चिमसमुद्रास जाऊन मिळतात. पर्वतश्रेष्ठ निषधावर विष्णुपद नावाचे सरोवर आहे. नाग व विष्णुपद ही दोनही सरोवरे गंधर्वांना अनुकूल आहेत. मेरूच्या पार्श्वभागी चंद्रप्रभ नावाचे महान सरोवर असून यातून पुण्यसलिला जंबूनदी प्रकट होते. या नदीत जांबूनद नावाचे सुवर्ण मिळते. येथेच पयोद व पुंडरीकवान नावांची दोन सरोवरे आहेत. यांचे जल क्रमशः नील व श्वेत आहे. या दोन सरोवरांपासून आणखी दोन सरोवरे प्रकट झाली. त्यांतील एक उत्तरमानस या नावाने प्रसिद्ध झाले. यातूनच मृग्या व मृगकांता या दोन नद्या निघाल्या. कुरुदेशात सागरासारखी अगाध व विस्तृत अशी बारा सरोवरे असून ती कमल व मत्स्य यांनी भरलेली असतात. ही 'वैजय' या नावाने विख्यात आहेत. यांतूनच शांती व मध्वी नावांच्या

दोन नद्या प्रवाहित होतात. किंपुरुषादी आठ वर्षांत इंद्रदेव वृष्टी करीत नाही. पण तेथील नद्या अन्नोत्पादक जलांनी प्रवाहित झालेल्या असतात.

बलाहक, ऋषभ, चक्र व मैनरक हे चार पर्वत चार दिशांना लवणसागरापर्यंत पसरलेले आहेत. चंद्रकांत, द्रोण, सुमहान या पर्वतांचा विस्तार उत्तरेस महासागरापर्यंत आहे. चक्र, बधिरक व नारद हे पर्वत पश्चिमदिशेस पसरले आहेत. यांचाही विस्तार उत्तरेस महासागरापर्यंत आहे. जीमूत, द्रावण, मैनाक, चंद्र हे महापर्वत दक्षिणदिशेस आहेत. दक्षिणेकडील समुद्रात चक्र व मैनाक पर्वतांमध्ये संवर्तक नावाच्या अग्नीचा निवास आहे. तो या सागराचे जल प्राशन करतो. समुद्रात निवास करणारा और्व नावाच्या अग्नीस वडवाग्नी म्हणतात. याचे मुख घोडीसमान आहे. पूर्वी जेव्हा इंद्र पर्वतांचे पंख कापू लागला, तेव्हा हे चारही पर्वत त्याच्या भीतीने लवणसागरात दडून राहिले. हे पर्वत शुक्लपक्षात दिसतात व कृष्णपक्षात समुद्रात डुबतात.

## शाकद्वीप, कुशद्वीप, क्रौंचद्वीप, शाल्मलद्वीप

एकशेबाविसाव्या अध्यायात वरील द्वीपांचे वर्णन आले आहे. शाकद्वीपाचा विस्तार जंबूद्वीपाच्या दुप्पट असून चारही दिशांना त्याचा विस्तार तिपटीचा आहे. या द्वीपाने हा लवणसागर घेरलेला आहे. शाकद्वीपात अनेक पुण्यमय जनपदे आहेत. येथील निवासी दीर्घ आयुष्य भोगतात. त्या क्षमाशील व तेजस्वी लोकांना दुर्भिक्ष माहीत नसते. याच द्वीपात मण्यांनी विभूषित असे श्वेत रंगाचे सात पर्वत आहेत. हेच येथील वर्षपर्वत होत. हे रत्नाकराद्री नावाचे वर्षपर्वत उंच शिखरांनी व वृक्षांनी संपन्न आहेत. यांतील पहिला पर्वत मेरू असून तो देव, ऋषी व गंधर्व यांनी सुसेवित आहे. हा सुवर्णमय पर्वत पूर्वदिशेस पसरला आहे. याचेच दुसरे नाव उदयगिरी आहे. येथे मेघगण वृष्टी करण्यासाठी येतात. याच्या पार्श्वभागी सर्व औषधींनी संपन्न असा जलधार नावाचा एक अत्यंत विशाल पर्वत आहे. हा चंद्र या नावानेही विख्यात आहे. यापासूनच इंद्र नित्य जलग्रहण करतो.

येथेच महान शक्तिशाली नारद नावाचा पर्वत आहे. यासच दुर्ग-

शैलही म्हणतात. येथेच श्याम नावाचा एक अत्यंत विशाल पर्वत आहे. येथे पूर्वी सर्व प्रजा श्यामल बनली. येथेच श्यामपर्वतासारखा काळ्या रंगाचा दुंदुभी पर्वत आहे, यावर प्राचीन काळी देवांकडून दुंदुभी वाजल्यावर शत्रूंचा मृत्यू होत असे. याच्या अंतःप्रदेशात रत्नांचे समूह असतात. हा शाल्मलवृक्षांनी सुशोभित आहे. यानंतर महान अस्ताचल रजतमय आहे. यासच सोमक असेही नाव आहे. या पर्वतावर पूर्वी गरुडाने आपल्या मातेच्या हितार्थ देवांनी संचित केलेले अमृत अपहृत केले. यानंतर आंबिकेय नावाचा एक महान पर्वत आहे. यासच सुमना असेही म्हणतात. या पर्वतावर भगवान वराहांनी हिरण्याक्षाचा वध केला होता. यानंतर सर्व औषधींनी युक्त असा, स्फटिकशिलांनी व्याप्त परमरमणीय विभ्राज नावाचा पर्वत आहे. यापासून अग्नी विशेषरूपाने प्रज्वलित होतो. यालाच केशव असेही म्हणतात. येथूनच वायूच्या गतीचा प्रारंभ होतो.

ज्या प्रकारे येथील पर्वतांना दोन दोन नावे आहेत, त्याचप्रमाणे येथील वर्षांनाही दोन दोन नावे आहेत. उदयपर्वताचे वर्ष उदय व जलधार नावांनी प्रसिद्ध आहे. यांतील पहिले उदय वर्ष गतभय या नावाने ओळखले जाते. दुसरा जलधार पर्वताच्या वर्षास सुकुमार म्हणतात. तेच शैशिर या नावाने विख्यात आहे. नारदपर्वताच्या वर्षाचे नाव कौमार आहे. यासच सुखोदयही म्हणतात. श्यामपर्वताचे वर्ष अवीचक्र या नावाने ओळखले जाते. याच मंगलमय वर्षास मुनिगण आनंदक नावाने पुकारतात. सोमकपर्वताच्या कल्याणमय वर्षास कुसुमोत्कर नावाने ओळखतात. या सोमक नावाच्या वर्षास असित नाव आहे. आंबिकेय पर्वताच्या वर्षान मैनाक व क्षेमक म्हणतात. सातव्या केसरपर्वताच्या वर्षाचे नाव विभ्राज आहे. हेच ध्रुव नावानेही ओळखले जाते.

शाकद्वीपाच्या मध्यभागी शाक नावाची एक महान वनस्पती आहे. या द्वीपातील प्रजा महापुरुषांचे अनुगमन करणारी आहे. या वर्षात देव, गंधर्व, सिद्ध, चारण विहार करतात. या द्वीपात चारही वर्णांच्या प्रजांची संपन्न व सुंदर जनपदे आहेत. प्रत्येक वर्षात समुद्रगामिनी सात नद्याही आहेत. या नद्यांना दोन दोन नावे आहेत. केवळ गंगा सात धारांची,

नामांची आहे. गंगा-कुमारी या नावानेंही ओळखली जाते. हीच नदी अनुतप्ता, तपःसिद्धा, सुकुमारी, सती, नंदा-पावनी, शिबिका-द्विविधा, इक्षू-कुहू, वेणु-अमृता, सुकृता-गभस्ती; अशी गंगेची रूपे सर्व प्राण्यांना पवित्र करतात. या गंगानदीस अनेक नद, नद्या, सरोवरे येऊन मिळतात. इंद्र येथूनच जल ग्रहण करतो.

या सहायक नद्यांची नावे सांगणे कठीण आहे. त्या सर्व नद्या पुण्यतोया आहेत. यांच्या तटांवर निवास करणारे जनपदवासी सदा हर्षपूर्वक यांचे जल पीत असतात. यांच्या तटांवर शांतमय, प्रमोद, शिव, आनंद, सुख, क्षेमक व नव; हे सात विश्वविख्यात देश आहेत. येथे वर्ण व आश्रम यांचे पालन होत असते. येथील सर्व निवासी निरोगी, बलवान, मृत्युरहित असतात. त्यांच्यांत अवसर्पिणी (अधोगामिनी), उत्सर्पिणी (ऊर्ध्वगामिनी) क्रिया होत नाहीत. येथे युगव्यवस्थाही नसते. येथे सदा त्रेतायुगच असते. शाकादी द्वीपांतही वर्ण व आश्रम यांचा संकर होत नाही. धर्माचा परित्याग न केल्याने येथील प्रजा एकान्तसुखाचा अनुभव घेते. त्यांच्यांत माया-कपट नसते. लोभ, ईर्ष्या, असूया, भय नसते. धर्माचा विपर्यय नसतो. धर्म त्यांच्यासाठी स्वाभाविक कर्म असते. ते स्वधर्मानुसार एक दुसऱ्याचे रक्षण करतात.

कुश नावाचे द्वीप अत्यंत विशाल मंडलाचे आहे. त्याच्या चारही दिशांना नद्यांचे जल प्रवाहित होत असते. हे द्वीप मेघांसारख्या रंगाच्या, सर्व धातूंनी युक्त, मणिविद्रुमांनी विभूषित अशा पर्वतांनी समृद्ध वनले आहे. येथे विभिन्न आकारांचे रमणीय जनपदे व फुलाफलांनी भरलेले वृक्ष शोभा पावतात. ते धनधान्यांनी परिपूर्ण आहे. तेथे सर्व प्रकारची रत्ने प्राप्त होतात. ग्रामीण व जंगली पशूंनी ते भरलेले आहे. हे कुश-द्वीप क्षीरसागराच्या चारही बाजूंनी घेरलेले आहे. येथेही रत्नांनी समृद्ध असणारे सात पर्वत आहेत. येथील नद्या रत्नांचे भंडार आहेत. येथील पर्वत व नद्या दोन दोन नामांच्या आहेत. सूर्याप्रमाणे चमकणारा कुमुद नावाचा पर्वत विद्रुमोच्चय या नावानेही ओळखला जातो. दुसरा पर्वत येथे उन्नत या नावाने प्रसिद्ध आहे. तो सर्व धातूंनी परिपूर्ण, शिला-समूहांनी समृद्ध अशा शिखरांनी शोभतो. हा पर्वत हेमपर्वत या नावाने

ओळखला जातो.

तिसरा पर्वत वलाहक नावाचा आहे. तो अंजनासारखा काळा आहे. तो आपल्या हरितालामय शिखरांनी शोभतो. हा पर्वत द्युतिमान या नावानेंही ओळखला जातो. चौथा पर्वत द्रोण नावाचा असून या महान गिरीवर विशल्यकरणी व अमृतसंजीवनी अशा महाबलवान ओषधी मिळतातः हा समृद्धशाली पर्वत पुष्पवान या नावानें विख्यात आहेः पांचवा कंक नावाचा पर्वत असून तो सारयुक्त पदार्थांनी संपन्न आहेः या पर्वतास कुशेशयही म्हणतात. सहावा महिष नावाचा पर्वत मेघाप्रमाणे काळा आहेः तो दिव्य पुष्पे व फळे यांनी युक्त अशा वृक्षांनी संपन्न आहे. हा हरी या नावानेंही विख्यात आहे. या पर्वतावर महिष नावाचा अग्नी असून तो जलापासून उत्पन्न झाला आहे! सातवा पर्वत कुकुद्मान नावाचा असून यासच मंदर म्हणतात. हा सर्व धातूंनी युक्त व अत्यंत सुंदर आहेः या पर्वतावर अनेक प्रकारची रत्ने मिळतातः त्यांचे रक्षण प्रजापतीसह स्वतः इंद्र करतो: तोच येथील प्रजेची देखभाल करतोः याच्याच अंतर्भागी विष्कंभपर्वत दुप्पट आकाराचा आहेः

कुशद्वीपात असे हे सात पर्वत आहेतः आता सात वर्षांचे वर्णन पाहावेः कुमुदपर्वताच्या वर्षाचे नाव श्वेत आहे. यासच उन्नत या नावानेंही ओळखतात. उन्नतपर्वताचे लोहित या नावाचे एक वर्ष आहे. यास वेणुमंडलही म्हणतातः वलाहकपर्वताचे वर्ष जीमूत असून यासच स्वैरथाकार म्हणतातः द्रोणपर्वताच्या वर्षाचे नाव हरिक आहेः यासच लवणही म्हणतातः कंकपर्वताचे वर्ष ककुद् असून यासच धृतिमान् म्हणतातः महिषपर्वताच्या वर्षाचे नाव महिष असून त्याला प्रभाकर या नावानेही ओळखतातः ककुद्मीपर्वताचे वर्ष कपिल या नावाने विख्यात आहेः कुशद्वीपात ही सात विशिष्ट वर्षे व सात पृथक् पृथक् पर्वत आहेत.

आता या वर्षांतील नद्यांची माहिती अशी आहे. या प्रत्येक वर्षांत नद्याही सातच आहेत. या पुण्यसलिला नद्या दोन दोन नावांच्या आहेत. पहिल्या नदीचे नाव धूतपापा असून तिलाच योनी असेही म्हणतात.

म...१४

दुसऱ्या नदीचे नाव सीता आहे. हिलाच निशा असेही म्हणतात. तिसऱ्या नदीचे नाव पवित्रा असून तिलाच वितृष्णा म्हणतात. चौथी नदी ल्हादिनी होय: ही चंद्रमा या नावाने प्रसिद्ध आहे. पांचव्या नदीचे नाव विद्युत् असून हीच शुक्ला या नावानें प्रसिद्ध आहे. पुंड्रा ही सहावी नदी विभावरी या नावाने प्रसिद्ध आहे. सातव्या नदीचे नाव महती असून धृती या नावानेही ती प्रसिद्ध आहे. यांच्याशिवाय शेकडो, हजारो लहान-मोठ्या नद्या या प्रमुख नद्यांना मिळणाऱ्या आहेत. यांचे जल ग्रहण करून इंद्र वृष्टी करतो. या महान कुशद्वीपाच्या चारही दिशांना चंद्रा-प्रमाणे घृत व मठ्ठा यांचे भरलेले सागर आहेत. यांचा विस्तार क्षीर-समुद्राच्या दुप्पट आहे.

क्रौंचद्वीपाचा विस्तार कुशद्वीपापेक्षा दुप्पट आहे: या द्वीपाभोवती घृतसागर आहे. या क्रौंचद्वीपात देवन नावाचा पर्वत आहे. गोविंद नावाचा पर्वत येथेच आहे. यानंतर क्रौंच नावाचा पर्वत असून पावनक, अंधकारक, देवावृत् नावांचे पर्वत आहेत. पुंडरीक नावाचा विशाल पर्वत येथेच आहे: या द्वीपाच्या वर्षांची नावे अशी आहेत. क्रौंचपर्वताच्या प्रदेशाचे नाव कुशल आहे. वामनपर्वताचा प्रदेश मनोऽनुग आहे. तिसरा प्रदेश उष्ण या नावाचा आहे. यानंतर पावनक, अंधकारक व मुनिदेश असे प्रदेश आहेत. यानंतर दुंदुभिखन नावाचा देश येथेच आहे. हे द्वीप सिद्ध व चारण यांनी व्याप्त आहे. येथील निवासी प्राय: गौरवर्णाचे असून परम पवित्र आहेत. या द्वीपाच्या प्रत्येक वर्षात मंगलमयी नद्या वाहातात. गौरी, कुमुद्वती, संध्या, रात्री, मनोजवा, ख्याती, पुंडरीका; या सात प्रकारच्या गंगा येथे वाहातात. यांशिवाय अनेक लहानमोठ्या नद्या आहेत.

आता शाल्मलद्वीपाचे वर्णन पाहावे. हे द्वीप क्रौंचद्वीपाच्या पेक्षा दुप्पटीने मोठे आहे. हे घृतमंडोदसागराने घेरलेले आहे. यात पुण्यमय जनपदे आहेत. येथील निवासी क्षमाशील व तेजस्वी आहेत. यांना दीर्घायुष्य लाभते. येथे कधी दुष्काळ पडत नाही. येथील पहिल्या पर्वताचे नाव सुमना आहे. तो सूर्याप्रमाणे चमकणारा व पिवळ्या रंगाचा आहे. यानंतर दुसरा पर्वत कुंभमय नावाचा आहे. याचे दुसरे नाव सर्वसुख

आहे. हा दिव्य ओषधींनी संपन्न आहे. तिसरा सुवर्णमय व भ्रमराच्या पंखासमान रोहित नावाचा विशाल पर्वत आहे. सुमनापर्वताचा देश कुशल या नावाने व सर्वसुखपर्वताचा देश सुखोदय या नावाने ओळखला जातो. तिसऱ्या रोहितपर्वताचा देश रोहिण या नावाने प्रसिद्ध आहे.

येथे अनेक प्रकारच्या रत्नांच्या खाणी आहेत. त्यांचे रक्षण स्वतः इंद्र करतो. तोच येथील प्रजांचे पालन करतो. येथे मेघ वर्षाव करीत नाहीत. येथे शीताची वा उष्णतेची अधिकता नसते. या तीनही द्वीपांत वर्णाश्रमांचा पूर्ण प्रचार आहे. येथे ग्रहगण नाहीत, की चंद्रमा नाही. येथील निवासींत ईर्ष्या, असूया, भय इत्यादी विकार दिसत नाहीत. येथे पर्वतांपासून झरणारे जलच अन्नाचे उत्पादन करते. येथील निवासी षट्रसयुक्त भोजन करतात. त्यांच्यांत उंचनीचतेचा भाव नसतो. येथे लोभ नसतो. परिग्रहाची (दान घेण्याची) भावना नसते. लोक निरोगी व बलवान असतात. ते एकांतसुखाचा उपभोग घेतात. हे लोक तीस हजार वर्षांपर्यंत मानसी सिद्धीस प्राप्त करून सुख, दीर्घायू, सुंदर रूप, धर्म व ऐश्वर्य यांचा उपभोग घेतात. कुश, क्रौंच व शाल्मल; या तीनही द्वीपांची अशीच स्थिती असते.

## गोमेदकद्वीप, पुष्करद्वीप

आता सहाव्या गोमेदकद्वीपाचे वर्णन पाहा. गोमेदकद्वीपाने सुरोदकसागर घेरला आहे. याचा विस्तार शाल्मलद्वीपाच्या दुप्पट आहे. या द्वीपात उंच शिखरांचे दोन पर्वत आहेत. त्यांतील पहिल्याचे नाव सुमना आहे. हा पर्वत अंजनाप्रमाणे काळा आहे. दुसरा कुमुद नावाचा पर्वत सर्व प्रकारच्या ओषधींनी संपन्न, सुवर्णमय, शोभाशाली व वृक्षादींनी समृद्ध आहे. हे गोमेदकद्वीप सहाव्या सुरोदसागराच्या दुप्पट आकाराच्या इक्षुरसोदसागराने वेढलेले आहे. यात धातकी व कुमुद नावांचे दोन अत्यंत विस्तृत प्रदेश आहेत. ते 'हव्यपुत्र' या नावाने विख्यात आहेत. सुमना नावाच्या पर्वताचे जे प्रथम वर्ष आहे, यासच धातकीखंड म्हणतात. गोमेद नावाचे जे वर्ष आहे, त्याला सर्वसुखही म्हणतात. यानंतर कुमुदपर्वताच्या प्रदेशास कुमुद म्हणतात. हे दोन पर्वत अन्य

पर्वतांपेक्षा उंच आहेत. या गोमेदकद्वीपाच्या पूर्वभागात सुमना नावाचा एक पर्वत पश्चिमेपर्यंत पसरलेला आहे. या द्वीपाच्या पश्चिमार्धात कुमुद नावाचा पर्वत आहे. या द्वीपाचा दक्षिणार्ध धातकीखंड व उत्तरार्ध कुमुद या नावांनी ओळखला जातो.

यानंतर सातव्या सर्वोत्तम द्वीपाचे नाव पुष्कर असे आहे: कारण हे द्वीप अनेक पुष्करांनी, कमलांनी व्याप्त आहे: हे परिमाणाने गोमेदकद्वीपापेक्षा दुप्पट असून इक्षुरसोदकसागराने घेरलेले आहे: पुष्करद्वीपात चित्रसानू (विचित्र शिखरांचा)नावाचा एक शोभाशाली पर्वत आहे: तो अनेक चित्रविचित्र मणिमय शिखरांनी व शिलासमूहांनी सुशोभित आहे: हामहान पर्वत चित्रसानू द्वीपाच्या पूर्वभागात स्थित आहे: हा महान गिरी सत्तावीस योजने विस्तृत व चोवीस योजने उंच आहे: या द्वीपाच्या पश्चिमार्धात समुद्रतटावर मानस नावाचा एक पर्वत असून तो चंद्राप्रमाणे शोभून दिसतो: हा साडेपन्नास हजार योजने उंच आहे: मानसपर्वताच्या पूर्वाधात असूनही याचा पुत्र महावीत नावाचा पर्वत द्वीपाच्या पश्चिमभागाचे रक्षण करतो: अशा प्रकारे हा प्रदेश दोन भागांत विभक्त झाला आहे. पुष्करद्वीप स्वादिष्ट जलाच्या महासागराने घेरलेले आहे. हे गोमेदकद्वीपाच्या दुपटींनी मोठे आहे. या द्वीपातील माणसे तीस हजार वर्षांपर्यंत जिवंत राहातात. त्यांना वृद्धावस्था येत नाही: ते निरोगी व सुखी असतात.

तीनही द्वीपांत सर्वत्र सुख, दीर्घायू व सुंदर रूप यांची सुलभता असते: त्यांच्यांत उंचनीच भाव नसतो: पराक्रम व रूप या दृष्टींनी ते एकतुल्य असतात: वध करण्याजोगा, मारण्याजोगा त्यांच्यात कोणी नसतोच: त्यांच्यांत ईर्ष्या, असूया, भय, लोभ, दंभ, द्वेष, संग्रह यांचे नावही नसते. त्यांच्यांत सत्यासत्यचर्चा, धर्माधर्मविवाद, वर्णाश्रमाची चर्चा, पशुपालनव्यवसाय, शेती, त्रयीविद्या, दंडनीती, नोकरी, दंडविधान यांना स्थान नसते: तेथे वर्षा होत नाही की नद्या वाहात नाहीत. तेथे थंडी-उष्णता नसते. पर्वतावरून झरणारे, ठिबकणारे जलच अन्नाची निर्मिती करते. येथील लोक वृद्धावस्थेच्या कष्टाने रहित व सुखमय असतात: अशीच स्थिती धातकीखंड व महावीत या दोनही प्रदेशांत

असते.

अशा प्रकारे सातही द्वीप पृथक् पृथक् अशा सात समुद्रांनी घेरलेले आहेत: जो समुद्र ज्या द्वीपानंतर येतो, तो परिणामरूप त्या द्वीपाबरोबर असतो: जलाची वृद्धी झाली की जलराशीस समुद्र म्हणतात: 'ऋषि' धातूचा अर्थ गमन असून यापासून 'वर्ष' शब्द तयार झाला: या वर्षांत चार प्रकारांची प्रजा सुखपूर्वक निवास करते. पूर्वदिशेस चंद्रोदय झाला की, समुद्र जलानें भरून येतो. चंद्राचा अस्त होत चालला की समुद्राचे वाढते पाणी क्षीण होते. तथापि शुक्लपक्ष व कृष्णपक्षमध्ये पाणी वाढत असले, कमी होत असले तरी समुद्राच्या मर्यादेत कमीजास्त काही होत नाही. पाण्याचा हा चढउतार एकशेपंधरा अंगुलांपर्यंत असतो. दोनही बाजूंनी भूमीस समुद्राने घेरले की ती भूमी द्वीप होते. जल धारण केल्याने समुद्र उदधी होतो. अकस्मात झाल्याने 'गिरी' व पृथ्वीच्या संधिस्थानास बद्ध करणारा 'पर्वत' होतो.

शाकद्वीपात शाक नावाचा पर्वत असल्याने त्यास शाकद्वीप म्हणतात. कुशद्वीपात जनपदाच्या मध्यभागी विशाल कुशस्तंब असल्याने हे कुश-द्वीप झाले. क्रौंचद्वीपात क्रौंच नावाचा पर्वत असल्याने त्यास क्रौंचद्वीप नाव पडले. शाल्मलद्वीपात शालमल नावाचा महान वृक्ष असल्याने या द्वीपाचे नाव शाल्मलद्वीप झाले. गोमेदकद्वीपात गोमेद नावाचा पर्वत आहे. याच नावानें हे द्वीप ओळखले जाते. पुष्करद्वीपात कमलासारखा वृक्ष असल्याने त्यास हे नाव पडले. हा वटवृक्ष अव्यक्त ब्रह्मदेवांच्या अंशापासून निर्माण झाला आहे. म्हणून देवगण याची पूजा करतात. या द्वीपात साध्यगणांच्या सह प्रजापती ब्रह्मदेव निवास करतात. येथे महर्षींसह तेहतीस देवता उपासना करतात. येथे महर्षी व देव ब्रह्मदेवांची पूजा करतात. जंबूद्वीपापासून अनेक प्रकारची रत्ने मिळतात.

वरील सर्व द्वीपांतील व वर्षांतील प्रजा सरळ, ब्रह्मचर्य, सत्य-वादिता, इंद्रियनिग्रह, निरोगी प्रकृती इत्यादी गोष्टी पाळणारी आहे. ते सर्व स्वाभाविकपणे पंडित असतात. तेथे भोजन विनासायास प्राप्त होते. ते सहा रसांनी युक्त व महान बलवर्धक असते. पुष्करद्वीपातील पर्वत 'लोकालोक' या नावाने विख्यात आहे. त्याचा पुढला भाग प्रकाश-

युक्त व मागील भाग अंधकारयुक्त असतो. हा महान पर्वत जलराशीने वेढलेला आहे. पृथ्वीपेक्षा दसपट जल पृथ्वीचे रक्षण करते. जलापेक्षा दसपट अग्नीं सर्व बाजूंनी जलाचे रक्षण करतो. अग्नीपेक्षा दसपट वायू तेज धारण करून असतो. वायूपेक्षा दसपट आकाश भूतांना धारण करते. या आकाशापेक्षा दसपट तामस अहंकार आहे. यापेक्षा दसपट महद्भूत (महतत्त्व) आहे. आणि हे तत्त्व अनंत अव्यक्ताने धारण केले आहे: या विकृतिशील तत्त्वांचे विकार आधार-धेयभावाने कल्पित आहेत. ते परस्पर उत्पन्न होतात व एकदुसऱ्यास धारण करतात.

ते सर्व एक दुसऱ्यात प्रविष्ट झाल्यामुळे स्थिरतेस पोचले आहेत. नंतर त्यांना विशिष्टता प्राप्त होते. या तत्त्वांपलीकडील सर्व जग निर्जन आहे. तत्त्वांतील सर्व भेद प्रकाशमान आकाशात विलीन होतात. ही तत्त्वे प्राण्यांची उत्पत्ती करतात. पृथ्वीपासून वायूपर्यंतची तत्त्वे कार्या-कार्यात्मक व महतत्त्व आदि भेद कारणात्मक आहेत. असे हे सात द्वीपे, सात समुद्र इत्यादी एकदेशी प्रधान तत्त्वाचे विश्वरूप आहे.

## सूर्य व चंद्रमा यांची गती

एकशेचोविसाव्या अध्यायात सूर्य व चंद्रमा यांच्या गतीचे वर्णन आले आहे. सूर्य व चंद्रमा सात द्वीपे व सात समुद्र, भूतलाचा अर्धभाग, त्याच्या बाहेरचे अन्य प्रदेश आपल्या प्रकाशाने उद्भासित करतात. ते विश्वाच्या अंतिम सीमेपर्यंत प्रकाश पसरवितात. सामान्यत: सूर्य तीनही लोकांत शीघ्रतापूर्वक भ्रमण करतो: ‘अव्’ धातू रक्षण व प्रकाशार्थक आहे. प्रकाश पसरविणे व प्राण्यांचे रक्षण करणे यांमुळे सूर्यास ‘रवी’ म्हणतात. महनीय असल्यामुळे पृथ्वीस ‘मही’ म्हणतात. सूर्यमंडलाचे परिमाण नऊ हजार योजने आहे. या मंडलाचा विस्तार तिप्पट म्हणजे सत्तावीस हजार योजने आहे. व्यास व मंडल यांच्या दृष्टीने सूर्यापेक्षा चंद्र अत्यंत लहान आहे.

आधुनिक विद्वानांनी दिव्यलोकाची स्थिती पृथ्वीमंडलाबरोबर मानली आहे. सर्व पृथ्वी पन्नास कोटी योजने विस्तृत आहे. तिचा अर्धा भाग मेरुपर्वताच्या उत्तरोत्तर पसरलेला आहे. मेरुपर्वताच्या मध्यभागी

तो चारही दिशांना एक कोटी योजने पसरला आहे. अशा प्रकारे पृथ्वीच्या अर्ध्या भागाचा विस्तार एकोणनव्वद लाख, पन्नास हजार योजनें आहे. या सर्व पृथ्वीचा विस्तार चारही दिशांना तीन कोटी योजने आहे. पृथ्वीचे आंतरिक मंडल बाह्यमंडलाच्या तिप्पट अधिक आहे. अशा रीतीने तिचे परिमाण अकरा कोटी सदतीस लाख योजने आहे. आकाशमंडळात जितकी तारागणांची स्थिती आहे, तितकाच पृथ्वीचा विस्तार मानला आहे. पृथ्वीमंडलाच्या परिमाणाबरोबर आकाशमंडलही आहे. मेरु-पर्वताच्या पूर्वदिशेस मानसोत्तरपर्वताच्या शिखरावर वस्वौकसारा नावाची महेंद्राची पुण्यमय नगरी आहे. ती सुवर्णाने सुसज्जित आहे. मेरुच्या दक्षिणदिशेस मानसपर्वताच्या पृष्ठभागावर संयमनीपुरी आहे. येथे यमराज निवास करतो. मेरूच्या पश्चिमेस मानसपर्वताच्या शिखरावर बुद्धिमान वरुणाची सुखा नावाची रमणीय पुरी आहे. मेरूच्या उत्तरेस मानस-पर्वताच्या शिखरावर महेंद्रपुरीसारखी चंद्रदेवाची विभावरीपुरी आहे.

दक्षिणायनात सूर्य तुटलेल्या बाणाप्रमाणे शीघ्रगतीने चालतो. तो ज्योतिश्चक्रास सदा बरोबर घेऊन फिरतो. सूर्य जेव्हा अमरावतीपुरीस पोचतो, तेव्हा तो गगनमंडलाच्या मध्यभागी असतो. त्यावेळी मध्यान्ह होते. त्याचवेळी तो यमराजाच्या संयमनीपुरीत उदित होऊन विभावरी-नगरीत अस्त होताना दिसतो. सुखानगरीत याचवेळी अर्धी रात्र असते. याच प्रकारे सूर्य जेव्हा मध्यान्हकाली यमराजाच्या संयमपुरीत पोचतो, तेव्हा वरुणाच्या सुखानगरीत तो उगवताना व महेंद्राच्या वस्वौकसारा (अमरावती) नगरीत अस्त होताना दिसतो. विभावरीत या वेळी अर्धी रात्र असते. जेव्हा दोन प्रहरांच्या समयास सूर्य वरुणाच्या सुखानगरीत पोचतो, तेव्हा चंद्रदेवाच्या विभावरीपुरीत त्याचा उदय होतो. जेव्हा सूर्याचा महेंद्राच्या अमरावतीत उदय होतो, तेव्हा वरुणाच्या नगरीत त्याचा अस्त दृष्टीस पडतो. संयमनीपुरीत अर्धी रात्र यावेळी असते.

अशा प्रकारे स्वतः भ्रमण करणारा सूर्य नक्षत्रांनाही भ्रमण करायला लावतो. तो चारही दक्षिणान्त पार्श्वभागांत चालत राहातो. सूर्य उदय पावल्यावर आपल्या तेजस्वी किरणांनी दोन प्रहरी तापतो आणि नंतर हळूहळू तो किरणांसह अस्त पावतो. सूर्याच्या या उदयास्तां-

मुळे पूर्व व पश्चिम दिशांचे ज्ञान होते. सूर्य जसा पूर्वदिशेस तापतो, त्याच प्रकारे पश्चिम, उत्तर व दक्षिण दिशांनाही प्रकाश देतो. ज्या दिशांना सूर्याचा उदय होतो, ते उदयस्थान मानले जाते. जेथे सूर्याचा अस्त होतो, ते अस्तस्थान मानतात. मेरुपर्वत सर्व पर्वतांपेक्षा उत्तरेस व लोकालोकपर्वत दक्षिणदिशेस आहे. म्हणून सूर्याचे खूप दूर जाणे व पृथ्वीच्या छायेने आवृत होणे; या कारणांनी त्याची किरणे अवरुद्ध होतात. म्हणून सूर्य रात्री दिसत नाही. अशा रीतीने एक लाख किरणांनी शोभणारा सूर्य जेव्हा पुष्करद्वीपात मध्यभागी पोचतो, तेव्हा तो उंच आकाशात असल्यामुळे दृष्टीस पडतो. सूर्य एका मुहूर्तात पृथ्वीचा तिसावा भाग चालतो. त्याच्या गतीचे प्रमाण एका मुहूर्तास एकतीस लाख, पन्नास हजार योजनांपेक्षा अधिक असते.

याच क्रमाने जेव्हा सूर्य दक्षिणदिशेस जातो, तेव्हा सहा महिने भ्रमण केल्यावर तो सातव्या मासात उत्तरदिशेकडे येतो. दक्षिणायनाच्या समयी सूर्य पुष्करद्वीपात भ्रमण करतो. मानसोत्तर व मेरुपर्वतांच्या मध्ये पुष्करद्वीपचे अंतर तिप्पट आहे. आता दक्षिणदिशेकडील सूर्याच्या गतीचे परिमाण पाहा. हे दक्षिणायनमंडल नऊ कोटी पंचेचाळीस लाख योजने विस्तृत आहे. ही सूर्याची एका दिनरात्रीची गती आहे. दक्षिणायनातून निवृत्त होऊन जेव्हा सूर्य विषुववृत्तावर स्थित होतो, तेव्हा तो क्षीर-सागराच्या उत्तरदिशेस भ्रमण करीत असतो. आता विषुवमंडलाचे परि-माण पाहावे. हे विषुवमंडल तीन कोटी एकवीस लाख योजनांचे आहे. श्रवणनक्षत्रात जेव्हा सूर्य उत्तरदिशेस जातो, तेव्हा तो गोमेदद्वीपाच्या उत्तरेस भ्रमण करीत असतो. आता उत्तरदिशेच्या भ्रमणमंडलाचा दक्षिण उत्तर मध्यभागाचे प्रमाण क्रमशः पाहावे. मध्यभागी जरद्गव, उत्तरेस ऐरावत, दक्षिणेस वैश्वानर; इत्यादी स्थाने आहेत. उत्तरदिशेस सूर्याच्या मार्गास नागवीथी व दक्षिणदिशेच्या मार्गास अजवीथी म्हणतात.

दोनही आषाढ म्हणजे पूर्वाषाढा, उत्तराषाढा हे तीन अजवीथी आहेत. अभिजित्, श्रवण, स्वाती हे नागवीथी आहेत. अश्विनी, भरणी व कृत्तिका; हे तीन नागवीथी म्हणून प्रसिद्ध आहेत. रोहिणी, आर्द्रा, मृगशिरा नागवीथी आहेत. पुष्य, श्लेषा, पुनर्वसू हे तीन ऐरावतीवीथी

आहेत. या तीन वीथी उत्तरदिशेचा मार्ग दाखवितात. पूर्वाफाल्गुनी, उत्तराफाल्गुनी व मघा हे तीन 'आर्षभी 'वीथी आहेत. पूर्वभाद्रपदा, उत्तरभाद्रपदा, रेवती; हे तीनही 'गोवीथी' म्हणून प्रसिद्ध आहेत. श्रवण, धनिष्ठा, शतभिषा हे तीन 'जरद्गवतीथी' आहेत. या तीन वीथी मध्यममार्गाच्या आहेत. हस्त, चित्रा, स्वाती या तीन 'अजवीथी' असून ज्येष्ठा, विशाखा व अनुराधा या तीन 'मृगवीथी' आहेत. मूल, पूर्वाषाढा व उत्तराषाढा या 'वैश्वानर 'वीथी आहेत. या दक्षिणमार्गाच्या आहेत. उत्तर व दक्षिण दिशांतील अंतर एकतीस लाख तीन हजार सहाशे योजनांचे आहे. उत्तरायण व दक्षिणायनकालात दोनही दिशांतील व रेखांतील अंतर एकाहत्तर लाख पंचवीस हजार योजने आहे. सूर्य दोनही दिशांतील बाहेरच्या व आतील भागांत भ्रमण करतो. हे सूर्यमंडल सदा उत्तरायणात आतून व दक्षिणायनात बाहेरून भ्रमण करते. उत्तरदिशेस सूर्य एकशेऐंशी मंडलांच्या आतून फिरून त्यांना पार करतो.

आता मंडलाचे प्रमाण अठरा हजार अठ्ठावन्न योजने आहे. या मंडलाचा व्यास तिरपा आहे. सूर्य दिवसभर कुंभाराच्या चाकाप्रमाणे नाभिमंडलावर भ्रमण करतो. सूर्याप्रमाणे चंद्रमाही भ्रमण करतो. त्याचप्रकारे दक्षिणायनातही सूर्य चाकाप्रमाणे शीघ्रतापूर्वक भ्रमून त्याला पार करतो. म्हणूनच तो इतक्या विस्तृत भूमीस थोड्या समयात पार करतो. दक्षिणायनच्या समयी सूर्य साडेतेरा नक्षत्रांच्या मंडलास शीघ्रतेनें मध्यभागापासून बारा मुहूर्तांत पार करतो. पण रात्रीच्या वेळी त्याला नक्षत्रांना पार करण्यासाठी अठरा मुहूर्त लागतात. ज्याप्रमाणे कुंभाराच्या चाकाच्या मध्यभागी गती मंद असते, त्याप्रमाणे उत्तरायणाच्या समयी सूर्य मंदगतीने चालतो. म्हणून थोडीशी भूमी पार करण्यासाठी त्याला अधिक समय लागतो. उत्तरायणाच्या समयी सूर्य दिवसाच्या अठरा मुहूर्तांत तेरा नक्षत्रांच्या मध्यात भ्रमण करतो. पण रात्री या नक्षत्रांना पार करताना त्याला बारा मुहूर्त लागतात. हे चक्र या दोनही गतींतून मन्दतर गतीनें फिरते. चाकाच्या मध्यभागी असलेल्या मृत्पिंडाच्या प्रमाणे ध्रुवही या चक्राच्या मध्यभागी स्थित होऊन फिरतो. ध्रुव तीस मुहूर्तांत दोनही दिशांच्या मध्यवर्ती मंडलात भ्रमण करतो.

उत्तरायणाच्या समयी दिवसा सूर्याची गती मंद व रात्री जलद असते. दक्षिणायनात सूर्याची गती दिवसा जलद व रात्री मंद असते. लोकालोकपर्वतापासून लोकसंतानक व वैश्वानर नावांच्या पर्वतांबाहेरून सूर्य पुष्करद्वीपात पोचतो. सूर्याची प्रभा प्रभातकालीन असते. या मार्गाच्या पार्श्वभागी लोकालोकपर्वत असतो. हा दहा हजार योजने उंच आहे. हा पर्वत मंडलाकार असून त्याचा एक भाग प्रकाशयुक्त व दुसरा तिमिरयुक्त असतो. या लोकालोकपर्वतावर सूर्य, चंद्र, नक्षत्रे, तारागण इत्यादी प्रकाशित होतात. जेथपर्यंत प्रकाश पोचतो, त्यांना लोक मानले आहे. उरलेला भाग निरालोक (तमसाच्छन्न) मानला आहे. ' लोकृ ' धातूचा अर्थ दर्शन म्हणजे आलोकन आहे. जो आलोक दृष्टिपथापासून दूर आहे, तो अनालोकता आहे. सूर्य परिभ्रमण करताना ज्या समयी लोकालौक पर्वतापर्यंत पोचतो, त्यास संध्या म्हणतात. उष:काल व व्युष्टी यांत अंतर असते. ब्राह्मणांनी उष:कालास रात्रीत व व्यृष्टीस दिवसा परिगणित केले आहे.

तीन कलांचा एक मुहूर्त असतो. एका दिवसात पंधरा मुहूर्त असतात. ज्याप्रकारे अहर्गणाच्या हिशेबाने दिवसांची ऱ्हासवृद्धी होते, त्याच प्रकारे संध्येच्या मुहूर्तातही ऱ्हासवृद्धी होते. तीन तीन मुहूर्तांचे दिवसाचे पांच भाग होतात. सूर्योदय झाल्यावर तीन मुहूर्तांचा काल प्रात:काल असतो. यानंतरचा तीन मुहूर्तांचा काल संगवकाल असतो, यानंतर तीन मुहूर्तांचा काल मध्यान्ह व यानंतरचा काल अपराण्ह या नावानें ओळखला जातो. यानंतर सायंकाल होतो. याच प्रकारे रात्रीही पंधरा मुहूर्त असतात. जेथपर्यंत सूर्याचा प्रकाश पोचतो, त्याला लोक म्हणतात. यानंतरचा प्रदेश तमसाच्छन्न असतो. यासच अलोक म्हणतात. या लोक व अलोक यांच्यामधील लोकालोकपर्वतावर चार लोकपाल महाप्रलयकालापर्यंत राहातात. वैराज सुधामा, प्रजापती कर्दम, पर्जन्य हिरण्यरोमा आणि राजस केतुमान; अशी त्यांची नावे आहेत. हे सर्व लोकपाल सुखदु:ख, अभिमान, आलस्य, परिग्रह यांनी रहित असतात.

लोकालोकपर्वताचे उत्तरेकडील जे शिखर आहे, त्यास अगस्त्य-शिखर म्हणतात. त्याचे सेवन देवर्षिगण करतात. हे वैश्वानरमार्गाच्या

बाहेर आहे. हे पितृयाणमार्ग या नामाने प्रसिद्ध आहे. याच मार्गावर प्रजाभिलाषी अग्निहोत्री, लोकांना संतान देणारे ऋषिगण निवास करतात. हेच ऋषी आपल्या आशीर्वादाने प्राण्यांची कर्मे सफल करतात. त्यांचा मार्ग दक्षिणायनात आहे. हे प्रत्येक युगात आपल्या उग्र तपस्येने, धर्मशास्त्राच्या मर्यादिने स्खलित झालेल्या धर्माची पुनः स्थापना करतात. या क्रियानिष्ठ ऋषींची संख्या अठ्ठ्यांशी हजार आहे. हे सूर्याच्या दक्षिण-मार्गाचा आश्रय घेऊन प्रलयकालापर्यंत स्थित होतात. हे मृत्युगामी असतात. प्राण्यांच्या कर्मांची पूर्ती, इच्छा, द्वेषपरता, स्त्रीसहवास, सांसारिक विषयभोगांचे सेवन; या कारणांनी या ऋषींना सिद्ध असूनही स्मशानात जावे लागते.

द्वापरयुगात प्रजाभिलाषी सात ऋषी या मृत्युलोकात उत्पन्न झाले. पण पुढे त्यांना संततीबद्दल घृणा उत्पन्न झाली. यामुळे त्यांनी मृत्यूला जिंकले. या ऊर्ध्वरेत्या ऋषींची संख्या अठ्ठ्यांशी हजार आहे. हे सूर्याच्या उत्तरमार्गाचा आश्रय घेऊन प्रलयकालापर्यंत राहातात. हे लोक-कल्याणकर्ते, स्त्रीपुरुषसंपर्करहित, ईर्ष्या, द्वेष यांनी रहित, त्यागी, असल्याने त्यांना अमरत्वाची प्राप्ती झाली आहे. कामासक्त व्यक्तींना याची प्राप्ती होत नाही. सप्तर्षिमंडलाच्या वर उत्तर दिशेस जेथे ध्रुवाचा निवास आहे, तेथेच भगवान विष्णूंचे तिसरे पद स्थिरावले आहे. ते आजही आकाशात उद्भासित होत आहे. भगवान विष्णूंच्या या परमपदाची प्राप्ती झाली की, जीवांना शोक करावा लागत नाही. ध्रुवलोकाच्या प्राप्तीसाठी लोक धर्मसंपादनाचा प्रयत्न करतात.

## सूर्याची गती व त्याचा रथ

यानंतर एकशेपंचविसाव्या अध्यायात ऋषींनी सूतास विचारले, 'सूत, हे ग्रह, ही नक्षत्रं सूर्यमंडलात कशी भ्रमण करतात ? हे परस्पर मिळून फिरतात की, पृथक् पृथक् ? यांना कोण फिरवितो ? का ते स्वतःच भ्रमण करतात ?' सूताने या प्रश्नांचे स्पष्टीकरण केले. हा विषय प्राण्यांच्या मनात मोह उत्पन्न करणारा आहे. कारण प्रत्यक्ष-रूपाने दृश्य असूनही याबद्दल मोह उत्पन्न होतो. आकाशमंडलात या

चौदा नक्षत्रांच्या मध्ये शिशुमार* नावाचे चक्र आहे. तोच उत्तानपादाचा पुत्र ध्रुव आहे. हा ध्रुव स्वत: भ्रमण करून ग्रहांच्या बरोबर सूर्य व चंद्र यांनाही भ्रमण करायला लावतो. नक्षत्रगणही चक्राप्रमाणे भ्रमण करीत ध्रुवाच्या मागोमाग जातात. जे ज्योतिर्गण वायुमय बंधनात ध्रुवाशी निबद्ध असतात, ते ध्रुवाच्या मानसिक संकल्पाने भ्रमण करतात. या ज्योतिर्गणांचे भेद, योग, कालाचा निश्चय, अस्त, उदय, उत्पात, उत्तरायणात वा दक्षिणायनात गमन, विषुवरेखेवर स्थिती, ग्रहांचे वर्ण; इत्यादी सर्व कार्ये ध्रुवाच्या प्रेरणेनेंच होतात.

ज्यांच्यापासून जीवांची उत्पत्ती होते, त्या मेघांना जीमूत म्हणतात. हे मेघ एक योजन दूर असलेल्या आवह नावाच्या वायूच्या आश्रयावर असतात. यांत काही विकार उत्पन्न झाला की ते वृष्टी करतात. यासच महावृष्टी म्हणतात. पूर्वी तेजस्वी इंद्राने जीवांच्या कल्याणासाठी स्वच्छंदशाली व समृद्धिशाली पर्वतांचे पंख कापले होते. या पंखांपासून उत्पन्न झालेल्या मेघांना पुष्करावर्तक म्हणतात. पर्वतांच्या पंखांचे नाव पुष्कर होते. ते मोठे असून जलाने परिपूर्ण होते. हे अनेक प्रकारची रूपे धारण करतात. भयंकर गर्जना करतात. कल्पांताच्या वेळी वृष्टी करतात व कल्पांताचा अग्नी शमवितात. हें अमृताने युक्त असतात.

ते वायूच्या आधारावर चालतात, फिरतात. हे अंडे विदीर्ण झाल्यावर त्यापासून प्राकृतिक कपाल निर्माण झाले. यातच सामर्थ्यशाली चतुर्मुख ब्रह्मदेव उत्पन्न झाले. याच अंडकपालांना सर्व मेघांच्या रूपात मानले गेले आहे. या सर्व मेघांना समानरूपानें तृप्त करणारा धूम आहे. यांतील पर्जन्य नावाचा मेघ सर्वांत श्रेष्ठ आहे. याशिवाय ऐरावत, वामन, अंजन आदी चार दिग्गज आहेत. हत्ती, पर्वत, मेघ व सर्प; या सर्वांचे कुल एकच आहे. ते दोन भागांत विभक्त झाले असले तरी त्यांचे उत्पत्तिस्थान एकच आहे. त्यासच जल हे नाव आहे. पर्जन्यमेघ व चारही वृद्ध दिग्गज हेमंतऋत अन्नाची वृद्धी करण्यासाठी शीता-

* शिशुमार हा एक मगरीसारखा जलप्राणी आहे. तो नेहमी सर्पाप्रमाणे वेटोळे घालून असतो. या स्थितीस शिशुमारचक्र म्हणतात. या गोल नक्षत्रमंडलास म्हणून याची उपमा दिली आहे.

पासून उत्पन्न झालेल्या तुषारांची वृष्टी करतात. परिवह नावाचा सहावा वायू यांचा आश्रय आहे. हा ऐश्वर्यशाली पवन आकाशगामिनी, दिव्य अमृतरूपी जलानें संपन्न, पुण्यमयी त्रिपथगा नावानें विख्यात असलेली गंगा धारण करतो. गंगेपासून प्रकटलेल्या जलास दिग्गज आपल्या लहान-मोठ्या सोंडांनी फवाऱ्याच्या रूपात व्यक्त करतात. यासच नीहार (धुके) म्हणतात.

दक्षिणपार्श्वभागी जो पर्वत आहे, तो हेमकूट या नावाने प्रसिद्ध आहे. हा हिमालयपर्वताच्या उत्तर व दक्षिणदिशांत पसरलेला आहे. येथें पुण्ड्र नावाचे एक प्रसिद्ध नगर आहे. या नगरात तुषारांनी उत्पन्न झालेली वृष्टी होते. यानंतर हिमवानपर्वतापासून निर्माण झालेला वायू तेथे उत्पन्न झालेल्या जलबिंदूंना आपल्याबरोबर घेऊन त्या महागिरीस शिंपडून तो इभास्य नावाच्या वर्षात जातो. त्यानंतर जीवांच्या वृद्धी-साठी तेथे शेष वृष्टी होते.

सूर्यच सर्व प्रकारच्या मूळ वृष्टीला कारण आहे. या लोकात वर्षा, धूप, हिम, रात्र, दिवस, दोन संध्या, शुभाशुभ फलें ध्रुवापासूनच प्रवर्तित होतात. ध्रुवाकडून अधिष्ठित झालेल्या जलास सूर्य ग्रहण करतो. जल सर्व प्राण्यांच्या शरीरांत परमाणुरूपाने असते. म्हणूनच स्थावर-जंगम सर्व प्राण्यांची शरीरे जळताना त्यांच्यांतील जल धुराच्या रूपाने बाहेर येते. या धूमापासून मेघ होतात. म्हणून धूमास अभ्रमय स्थान म्हणतात. सूर्य आपल्या तेजोमयी किरणांनी सर्व स्थानांतून जल ग्रहण करतो. हीच किरणे वायूच्या संयोगाने समुद्रातील जलही शोषून घेतात. त्यानंतर सूर्य ऋतूंना अनुसरून जलास आपल्या श्वेत किरणांनी मेघांना देतो. वायूनें प्रेरित झाल्यावर मेघस्थित जल वृष्टीच्या रूपाने पृथ्वीवर पडते. अशा प्रकारे सूर्य सर्व प्राण्यांच्या वृद्धीसाठी सहा महिन्यांपर्यंत वृष्टी करतो. या वेळी वायूच्या आघाताने मेघनिर्घोषही होतो. या विजा अग्नीपासून निर्माण होतात. 'मिह सेचने,' म्हणजे सिंचन. या-पासून मेघ शब्द तयार झाला. याच प्रकारे 'अपो बिभ्रति' अथवा 'न भ्रश्यन्ते आपो यस्मात्,' म्हणजे ज्यापासून जलाची प्राप्ती होत नाही, त्याला अभ्र म्हणतात.

यानंतर सूर्याच्या रथाची रचना पाहा. यास एक चाक, पांच अरे आणि तीन नाभी असतात. या चक्राच्या नेमीत (धावेत) सुवर्णमयी आठ लहान लहान अरे असतात. अशा या उद्दीप्त व शीघ्रगामी रथात बसून सूर्य विचरण करतो. या रथाची लांबी एक लाख योजनें आहे. त्याचा ईषादंड (धुरा) रथाच्या मध्यभागापेक्षा दुप्पट आहे. ब्रह्मदेवांनी या रथास काही हेतूनें निर्माण केले आहे. त्याची असंग (रथाला घोडे बांधण्याची दोरी) सुवर्णमय आहे. या रथास पवनाप्रमाणे शीघ्रगामी घोडे जुंपलेले आहेत. चक्राकार गतीनें चालणारे छंदच या घोड्यांच्या रूपांत उपस्थित असतात. हा रथ वरुणाच्या रथाच्या लक्षणांशी मिळता-जुळता आहे. या रथानेंच सूर्य प्रतिदिन गगनमंडलात भ्रमण करतो. सूर्याची अंगे व रथाचे अवयव यांच्यांत समता आहे. दिवसास सूर्याच्या एकचाकी रथाची नाभी म्हणतात. वर्ष त्याचे अरे आहेत. आणि सहा ऋतू त्याची नेमी. रात्र त्याचे वरूथ (कवच), आणि धूप त्या रथावरील फडकणारी ध्वजा होय. काष्ठा त्याची नासिका व क्षण त्याच्या दातांच्या पंक्ती आहेत. निमेष या रथाचा अनुकर्ष (तळ) व कला त्याचा ईषादंड आहे. त्याच्या रथाला जोडलेल्या दोनही टोकांना अर्थ व काम म्हणतात.

गायत्री, त्रिष्टुप्, जगती, अनुष्टुप्, पंक्ती, बृहती व उष्णिक्; हे सात छंद या रथाच्या घोड्यांच्या रूपात असून ते वायुवेगानें रथ ओढतात. या रथाचे चक्र अक्षाशी बांधलेले असून अक्ष ध्रुवाशी संलग्न आहे. म्हणून चक्राबरोबर अक्ष व अक्षाबरोबर ध्रुव भ्रमण करीत असतो. या रथात बसून सूर्यदेव आकाशमंडलात भ्रमण करतो. हे मंडल कुंभाराच्या चाकाप्रमाणे आकाशात चारही दिशांना फिरत असते.

## सूर्यरथावर प्रत्येक मासात विविध देवांचे अधिरोहण

सूर्याचा हा रथ प्रत्येक मासात क्रमशः देवांकडून अधिष्ठित होतो. अनेक ऋषी, गंधर्व, अप्सरा, ग्रामणी, सर्प, राक्षस यांच्यासह तो सूर्याबरोबर फिरत असतो. हे सर्व देवगण दोन दोन मासांसाठी सूर्याच्या निकट निवास करतात. धाता व अर्यमा हे दोन देव, प्रजापती पुलस्त्य

व पुलह हे दोन ऋषी, वासुकी व संकीर्ण हे नाग, गायकांतील श्रेष्ठ तुंबुरू व नारद हे दोन गंधर्व, ऋतुस्थला व पुंजिकस्थला या दोन अप्सरा, रथकृत् व रथौजा या दोन ग्रामणी, हेती व प्रहेती हे दोन राक्षस; हे सर्वजण चैत्र व वैशाख या मासांत सूर्याच्या रथावर निवास करतात. ज्येष्ठ व आषाढ मासांत मित्र व वरुणदेव, अत्री व वसिष्ठ हे ऋषी, तक्षक व रंभक हे नाग, मेनका व सहजन्या अप्सरा, हाहा व हूहू हे दोन गंधर्व, रथंतर व रथकृत् हे ग्रामणी, पुरुषाद व वध हे राक्षस सूर्याबरोबर असतात. श्रावण व भाद्रपद मासांत इंद्र व विवस्वान् हे देव, अंगिरा व भृगू ऋषी, एलापत्र व शंखपाल नावांचे नाग, विश्वावसू व सुषेण हे गंधर्व, प्रात व रथ नावांचे ग्रामणी, प्रम्लोचा व निम्लोचन्ती या अप्सरा, हेतू व व्याघ्र हे राक्षस यांचा निवास सूर्याच्या रथावर असतो.

शरद ऋतूत दोन महिने देवगण सूर्यापाशी निवास करतात. पर्जन्य व पूषा हे देव, भरद्वाज व गौतम हे ऋषी, चित्रसेन व सुरुची हे गंधर्व, विश्वाची व घृताची या अप्सरा, ऐरावत व धनंजय हे नाग, सेनजित् व सेनानायक सुषेण हे ग्रामणी, आप व वात हे दोन राक्षस; असे सर्वजण आश्विन व कार्तिक महिन्यांत सूर्याच्या रथावर निवास करतात. हेमंतऋतूच्या दोन महिन्यांत, मार्गशीर्ष व पौष या मासांत अंश व भग देव, कश्यप व ऋतू ऋषी, महापद्म व कर्कोटक हे नाग, गानविद्येत निपुण चित्रसेन व पूर्णायू हे दोन गंधर्व, पूर्वचित्ती व उर्वशी या दोन अप्सरा, तक्षाव व अरिष्टनेमी हे सेनापती वा ग्रामणी, विद्युत् व सूर्य नावांचे दोन उग्र राक्षस यांचा निवास सूर्याबरोबर असतो. माघ व फाल्गुन मासांत, शिशिरऋतूत त्वष्टा व विष्णू हे दोन देव, जमदग्नी व विश्वामित्र हे ऋषी, कद्रुपुत्र कंबल व अश्वतर हे नाग, धृतराष्ट्र व सूर्यवर्चा हे दोन गंधर्व, तिलोत्तमा व मनोहारिणी रंभा या अप्सरा, ऋतजित् व सत्यजित् हे दोन ग्रामणी, ब्रह्मोपेत व यज्ञोपेत हे दोन राक्षस सूर्याच्या रथावर असतात.

## चंद्राच्या विचित्र गती

याच एकशेविसाव्या अध्यायात चंद्राच्या गतीचेही वर्णन आले आहे. सूर्याप्रमाणे चंद्रमाही भ्रमण करतो. त्याचीही ऱ्हास-वृद्धी होते. चंद्राचा रथ तीन चाकांचा असून त्याला आणखी दोन घोडे जुंपलेले असतात. घोडे, सारथी, हार यांनी सुशोभित होऊन चंद्राचा रथ जलाच्या मध्यापासून प्रकटतो. त्याच्या रथाला श्वेत रंगाचे दहा उत्तम घोडे जुंपलेले असतात. ते अश्व दिव्य, अनुपम, मनासारख्या गतीचे असतात. चतुःश्रवा नावाचे घोडे चंद्राच्या रथास ओढतात. त्यांचे नेत्र व कानही श्वेत रंगाचे असतात. ते सर्व शंखासारखे उज्ज्वल असतात. चंद्राच्या रथाच्या दहा अश्वांची नावे अशी आहेत; अज, त्रिपथ, वृष, वाजी, नर, हय, अंशुमान, सप्तधातू, हंस व व्योममृग. चंद्र पितरांसह देवांकडून घेरलेला असा भ्रमण करतो.

शुक्लपक्षाच्या प्रारंभी सूर्याच्या परभागी स्थित होऊन चंद्राचा परभाग दिनाच्या क्रमानें पूर्ण होतो. पंधरा दिवसांपर्यंत देवांकडून शोषित झालेल्या चंद्राच्या एक एक भागास सूर्य आपल्या एकाच किरणाने दिनाच्या क्रमानें परिपूर्ण करतो. सूर्याच्या सुषुम्ना नावाच्या किरणाने परिवर्धित चंद्राच्या कला शुक्लपक्षात वृद्धीस पावतात व कृष्णपक्षात क्षीण होतात. पुनः शुक्लपक्षात वाढतात, अशा प्रकारे सूर्याच्या पराक्रमानें चंद्राचे शरीर वृद्धिगत होते व पूर्णिमेपर्यंत ते पूर्ण होऊन संपूर्ण मंडल श्वेतवर्णाचे होते. यानंतर जलाचा सारभूत व रसात्मक असलेल्या चंद्राचे मधुसदृश जलमय अमृतास देवगण कृष्णपक्षाच्या द्वितेयेपासून चतुर्दशीपर्यंत पितात. तो कलेकलेने क्षीण होत जातो. त्यावेळी तेहतीस हजार तीनशे तेहतीस देव चंद्राचे अमृत पीत असतात.

या प्रकारे दिनाच्या क्रमानें देवगण पंधरा दिवस चंद्रामृताचे पान करतात व अमावस्येस तेथून निघून जातात. पितृगण अमावस्येस चंद्राजवळ असतात. अमावस्येपर्यंत पंधरा दिवस चंद्रामृतापासून निघणाऱ्या स्रावाचे पान करून ते अमर होतात. ते सर्व पितर सौम्य, बर्हिषद्, अग्निष्वात्त व काव्य या नावांनी ओळखले जातात. पांच वर्षांच्या कार्य-

कालाचे पितर द्विजगण काव्य म्हणून ओळखतात. सौम्य नावाच्या पितरांना पक्ष ऋतू जाणावे. दोन बर्हिषद् व अग्निष्वात्त मास, हे तीनही पितृलोकात निवास करणारे द्विज आहेत. अमावस्येनंतर चंद्राचा रिक्त भाग पूर्ण होतो. अशा प्रकारे चंद्राची वृद्धी व क्षय सूर्याच्या निमित्ताने होतात.

## ग्रहांच्या रथांचे वर्णन, ध्रुवाची प्रशंसा

एकशे सत्ताविसाव्या अध्यायात सूताने ऋषींसाठी ग्रहकक्षानुसार ग्रह, नक्षत्रे, राहू इत्यादींच्या रथांचे वर्णन केले आहे. सोमपुत्र बुधाचा रथ उज्ज्वल व तेजोमय आहे. याला वायूप्रमाणे वेगवान, पिवळ्या रंगाचे दहा घोडे जोडलेले असतात. श्वेत, पिशंग, सारंग, नील, पीत, विलोहित, कृष्ण, हरित, पूषत, पृष्णी अशी त्यांची नावे आहेत. मंगळाचा रथ सुवर्णनिर्मित असून तो आठ अंगांनी युक्त व लाल रंगाच्या आठ घोड्यांनी सज्ज असतो. त्यावर अग्नीतून प्रकटलेली ध्वजा फडकत असते. त्यावर आरूढ होऊन किशोरावस्थेचा मंगळ कधी सरळ तर कधी वक्रगतीने विचरण करतो. अंगिरांचा पुत्र देवाचार्य विद्वान बृहस्पती पिवळ्या रंगाच्या व वायुसमान वेगशाली आठ दिव्य अश्वांच्या दिव्य रथावर आरूढ झालेला असतो. तो एका राशीत एक वर्षपर्यंत राहातो. शुक्र आपल्या वेगशाली रथावर आरूढ होऊन भ्रमण करतो. त्याच्या रथास अग्नीसारखे आठ घोडे जुंपलेले असतात. तो ध्वजांनी सुशोभित असतो. शनैश्चर आपल्या लोहनिर्मित रथावर आरूढ होऊन भ्रमण करतो. त्याला वायुतुल्य वेगवान व बलवान घोडे असतात. राहूचा रथ तेजोमय असून त्याला कवचादींनी सुसज्ज केलेले काळ्या रंगाचे आठ घोडे असतात. केतूच्या रथासही वायूसमान शीघ्रगामी आठ घोडे असतात, त्याच्या शरीराची कांती भातेनाच्या धुरासारखी असते. तो दुबळ्या शरीराचा व भयंकर असतो. हे सर्व वायुरूपी दोरीने ध्रुवाशी संबद्ध असतात.

वायुरूपी अदृश्य दोरांनी बांधलेले हे सर्व अश्व भ्रमण करताना

नियमानुसार त्या रथांना ओढतात. ज्याप्रकारे ध्रुवाशी बद्ध असलेले सूर्य, चंद्र आदी ग्रह गगनमंडलात परिभ्रमण करतात, त्याच प्रकारे संपूर्ण ज्योतिर्गण ध्रुवाच्या मागे फिरत असतात. ज्या प्रकारे नदीच्या जलात नौका जलाच्या बरोबर वाहात असते, त्याच प्रमाणें देवांची गृहेही वायूच्या वेगाने भ्रमण करीत असल्यानें आकाशमंडलात त्यांना देवगृहच म्हणून ओळखतात. आकाशमंडलात जितक्या तारका आहेत, तितकीच ध्रुवाची किरणे आहेत. तेलाचा घाणा स्वतः भ्रमण करतो व आपल्या बरोबरच्या सर्व वस्तूंना फिरवितो, तसेच वायुरूपी दोरीनें बांधलेल्या ज्योती सर्वत्र भ्रमण करतात. ज्या वायूमुळे या ज्योतींचे वहन होते, त्याला 'प्रवह' म्हणतात. अशा प्रकारे ध्रुवाशी बांधलेले हे ज्योतिश्चक्र भ्रमण करीत असते. यामुळेच गगनमंडलात स्थित अशा शिशुमारचक्रात हा ध्रुव तारकांमय व तारांनी युक्त असतो. दिवसा केलेली पापे रात्री या चक्रास पाहून नष्ट होतात.

शिशुमारचक्राच्या शरीरात जितक्या तारका असतात, त्यांचे दर्शन करून, शिशुमाराची आकृती जाणून मनुष्य तितकी वर्षे जिवंत राहातो. उत्तानपादास या शिशुमारचक्राचा वरचा जबडा व यज्ञास खालचा जबडा मानतात. त्याच्या मस्तकावर धर्म स्थित असतो. हृदयात नारायण व साध्यगण, पुढच्या पायांत अश्विनीकुमार असतात. वरुण व अर्यमा त्याच्या मागच्या मांड्या आहेत. शिश्नाच्या स्थानी संवत्सर व गुदस्थानी मित्र असतो. त्याच्या शेपटीच्या भागी अग्नी, महेंद्र, मरीची, कश्यप, ध्रुव इत्यादींचा निवास असतो. ताऱ्यांचा हा स्तंभ नक्षत्रे, चंद्र, सूर्य, ग्रह. तारागण यांच्या बरोबर अस्त होत नाही की उदयही पावत नाही. आग्नीध्र व कश्यप यांच्या वंशात ध्रुवच सर्वश्रेष्ठ आहे. हा ध्रुव एकटाच मेरूच्या अंतवर्ती शिखरावर ज्योतिश्चक्रास घेऊन भ्रमण करीत असतो. त्यावेळी त्याचे मुख खाली वळलेले असते.

## भृगुवंशातील ऋषी

यानंतर एकशे अठ्ठाविसाव्या अध्यायात देवगृह व सूर्य-चंद्रांची गती यांचे वर्णन आले आहे. नंतर एकशे चौऱ्याण्णवाव्या अध्यायापासून

दोनशेदोनाव्या अध्यायापर्यंत सूतानें ऋषींना ऋषींची नामगोत्रे, त्यांचा वंशविस्तार समजावून दिला आहे. प्रथम त्यानें ब्रह्मदेवांचे चरित्र सांगितले. पूर्वी महादेवांच्या शापामुळे ऋषींनी देहत्याग केला. तेव्हा ब्रह्मदेवांनी देवांच्या माता व देवस्त्रिया पाहिल्या. त्यावेळी ब्रह्मदेवांचे वीर्य स्खलित झाले. तेव्हा देहत्याग केलेले पुरातन ऋषी निर्माण झाले. प्रथम तपोनिधी भृगू उत्पन्न झाले. नंतर अंगारांतून अंगिराऋषी उत्पन्न झाले. अत्री, मरीची, पुलस्त्य, पुलह, वसिष्ठ; इत्यादी ऋषी निर्माण झाले. पुलोम्याची दिव्य कन्या भृगुऋषींची भार्या झाली. यांच्यापासून यज्ञ करणारे बारा देव उत्पन्न झाले. भुवन, भौवन, सुजन्य, सुजन, शुची, क्रतू, मूर्धा, त्याज्य, वसुद, प्रभव, अव्यय व दक्ष; असे हे बारा भृगुवंशातील द्वादश देव होत.

भृगूंनी पौलोमीच्या उदरापासून देवांचे कनिष्ठ बंधू ब्राह्मण उत्पन्न केले. यांत प्रथम महाभाग्यशाली च्यवन व दुसरा आमुवान झाला. याचा पुत्र और्व व याचा जमदग्नी. और्वांनी भृगुवंशाची वृद्धी केली. या गोत्र-वंशात आणखीही अनेक ऋषी झाले. भृगू, च्यवन, आमुवान, और्व, जमदग्नी, वात्स्य, दंडी, नडायन, वैगायन, वीतिहव्य, पैल, शौनक, शौनकायन, जीवंती, आवेद, कार्पणी, वैहीनरी, विरूपाक्ष, रौहित्यायनी, वैश्वानरी, नील, लुब्ध, सावर्णिक, विष्णू, पौर, बालाकी, ऐलिक, अनंत-भागी, भृग, भार्गेय, मार्कंड, जवी, वीती, मंड, मांडव्य, मांडूक, फेनप, स्तनित, स्थलपिंड, शिखावर्ण, शार्कराक्षी, जालधी, सौधिक, क्षुभ्य, कुत्सन्य, मौद्गलायन, कमयिन, देवपती, पांडुरोची, गालव, सांकृत्य, चातकी, सार्पी, याज्ञपिंडायन, गार्ग्यायन, गायन, गार्हायन, गोष्ठायन, वात्यायन, वैशंपायन, वैकर्णिनी, शांकरव, याज्ञेयी, भ्राष्ट्रिकायनी, लालाटी, नाकुली, लौक्षिण्य, उपरिमंडल, अलुकी, सौचकी, चोत्स, पैंगलायनी (दुसरा), सात्यायिनी, मालायनी, कौटिली, कौचहस्तिक, सौहसोक्ती, कौवाक्षी, कौशी, चांद्रमसी, नैकजिव्ह, जिह्मक, व्यधाद्य, लोहवैरी, शारद्वतिक, नेतिष्य, लोलाक्षी, चलकुंडल, वागायनी, अनुमती, पूर्णिमागतिक, असकृत्; अशा अनेक ऋषींनी भृगुगोत्राची वृद्धी केली. जमदग्नी, विद, पौलस्त्य, वैजभृत् उभयजात. कायनी, शाकटायन,

औवेंय, मारुत; असे आणखीही काही शुभकारक ऋषी आहेत.

भृगू, च्यवन व आमुवान हे ऋषी परस्परांत विवाहयोग्य नाहीत. भृगुदास, अमार्गपथ, ग्राम्यायनी, कटायनी, आपस्तंबी, बिल्वी, नैकशी, कपी, आर्ष्टिषेण, गार्दभी, कार्दमायनी, अश्वलायनी, रूपी या नावांचे ऋषी स्वकीय वंशाची वृद्धी करणारे आहेत. यस्क, वीतिहव्य, मथित, दम, जैवंत्यायनी, मौंज, पिली, चली, भागिली, भागवित्ती, कौशापी, काश्यपी, बालपी, श्रमदागेंपी, सौर, तिथी, गार्गीय, जावाली, पौष्णायन, ग्रामद, इत्यादी ऋषी भृगुकुलाचा वंश वाढविणारे आहेतः भृगू, वीतहव्य, रैवस, वैवस हे ऋषी एकमेकांशी विवाहास योग्य नाहीत. भृगुकुलातील शालायनी, शाकटाक्ष, मैत्रेय, खांडव, द्रोणायन, रौक्मायन, आपिशली, आपिकायनी, हंसजिव्ह, असे काही ऋषी वंशवृद्धी करणारे आहेत. भृगू, वध्र्यश्व, दिवोदास हे ऋषी परस्पर विवाहास योग्य नाहीत. एकायन, यज्ञपती, मत्स्यगंध, प्रत्यूह, सौरी, औक्षी, कार्दमायनी, गृत्समद, सनक इत्यादी ऋषी वंशवृद्धी करणारे आहेत.

## अंगिरावंशातील ऋषी

मरीचिऋषींचि कन्या सुरूपा अंगिरामुनींची भार्या झाली. तिला दहा पुत्र झाले. आत्मा, आयू, दमन, दक्ष, सद, प्राण, हविष्यमान, गविष्ठ, ऋत, सत्य; अशी त्यांची नावे होती. हे सर्व अंगिरस नावांचे देव यज्ञात सोमपान करणारे आहेत. सुरूपाने अंगिराऋषींपासून बृहस्पती, गौतम, संवर्तक, उतथ्य, वामदेव, अजस्य, ऋषिज; या नावांचे पुत्र उत्पन्न केले. या गोत्रात, उतथ्य, गौतम, तौलेय, अभिजित, सार्धनेमी, लौगाक्षी, क्षीर, कौष्टिकी, राहुकर्णी, सौपुरी, कैराती, सामलोमकी, पौषजिती, भार्गवत, ऐरीडव, कारोटक, सजीवी, उपबिंदू, सुरैषी, वाहिनीपती, वैशाली, क्रोष्टा, आरुणायनी, सोमोत्रायनी, कासोरू, कौशल्य, पार्थिव, रोहिण्यायनी, रेवाग्नी, मूलप, पांडू, क्षपाविश्वकर, अरी, पारिकरारी; इत्यादी ऋषी वंशवृद्धी करणारे आहेत.

अंगिरा, उतथ्य, उशिजया या तीन प्रवरांचे ऋषी परस्परांत विवाहास योग्य नाहीत. आत्रेयायनी, सौवेष्ठय, अग्निवेश्य, शिलास्थली, बालि-

शायनी, ऐकेपी, वाराही, वाष्कली, सौ, सौटी, त्रिणकर्णी, प्रावही, आश्वलायनी, वाराही, बर्हिसादी, शिखाग्रीवी, कारकी, महाकापी, उडुपती, कौचकी, धूमित, पुष्पान्वेषी, सोमतन्वी, ब्रह्मतन्वी, सालडी, वालडी, देवरारी, देवस्थानी, हारिकर्णी,सरिद्भवी, प्रावेपी, साद्यसुग्रीवी, गोमेदगंधिक, मत्स्याच्छाद्य, मूलहर, फलाहार, गांगोदधी, कौरुपती, कौरुक्षेत्री, नायकी, जैत्यद्रौणी, जैव्हलायनी, आपस्तंबी, मौंजवृष्टी, मार्ष्ठपिंगली, महातेजा पैल, शालंकायनी, व्याख्येयव, मारुत; या सर्व ऋषींना वेदोक्त तीन प्रवर आहेत.

अंगिराऋषींचे अंगिरा, बृहस्पती व भरद्वाज हे तीन प्रवर परस्परविवाहास योग्य नाहीत. काण्वायन, कोपचय, वात्स्यतरायण, भ्राष्ट्रकृत्, राष्ट्रपिंडी, लैंद्राणी, सायकायनी, क्रोष्टावक्षी, वहुवीती, तालकृत्, मधुरावह लावकृत्, गालवित्, गाथी, मार्कंटी, पौलिकायनी, स्कंदस हे ऋषीही अंगिरागोत्रातील आहेत. अंगिरा, देवगुरू बृहस्पती, भरद्वाज, गर्ग व सैन्य या प्रवरांतील ऋषी परस्परविवाहास योग्य नाहीत. कपीतर, स्वस्तितर, दाक्षी, शक्ती, पतंजली, भूयसी, जलसंधी, बिंदुमादी, कुसीदकी, ऊर्व, राजकेशी, वौषडी, शंसपी, शाली, कलशी, कंठ, कारीरय, काटच, धान्यायनी, भावास्यायनी, भारद्वाजी, सौबुधी, लब्वी, देवमती; या ऋषींना वेदोक्त तीन प्रवर आहेत याच अंगिरावंशात अंगिरा, दमवाह्य, उरुक्षय, परस्परायणी, अर्पणी, लौक्षी, गार्ग्य, हरी, गालवी; या सर्वांना तीनच प्रवर आहेत.

यानंतर विवाहयोग्य नसलेल्या ऋषींची यादी दिलेली आहे. बृहदुक्थ, वामदेव, अत्री हे तीन प्रवर, अंगीरा, बृहदुक्थ, वामदेव हे परस्परांशी विवाहयोग्य नाहीत. अंगिरा, विरूप, रथीतर हे तीन प्रवर परस्परांशी विवाहयोग्य नाहीत. विष्णुवृद्धी, शिवमती, जतृण, कतृण, महातेजस्वी पुत्रव, वैरपरायण या ऋषींना तीन प्रवर आहेत. अंगिरा, मत्स्यदग्ध, मुद्गल या प्रवरांचे ऋषी विवाहयोग्य नाहीत. हंसजिव्ह, देवजिव्ह, अग्निजिव्ह, विराडप, अपाग्नेय, अश्वयू, परण्य, स्तावी, मौद्गल यांचा विवाह योग्य नाही. अपांडू, गुरू, शाकटायन (तिसरा), प्रागाथ, मानारी, मार्कंड, अमरण, शिव, कटू, मर्कटप, नाडायन, श्यामायन, यांचे

तीन प्रवर असून ते अंगिरा, आजमीढ, कटय; हे ऋषी परस्परविवाहास योग्य नाहीत. तित्तिरी, कपिभू, गार्ग्य यांचे अंगिरा, तित्तिरी व कपिभू या ऋषींत परस्परविवाह होत नाही.

त्याचप्रमाणे ऋक्ष, भरद्वाज, ऋषिवान, मानव, मैत्रवर आणि अंगिरा, भरद्वाज, बृहस्पती, मित्रवरऋषी, मानव हे पंचप्रवरांनी युक्त असल्यामुळे एकमेकांशी विवाहयोग्य नाहीत. भारद्वाज, हुत, शौंग, शैशिरेय हे ऋषी द्यामुष्यायण* गोत्रातील आहेत.

## अत्रिवंशवर्णन

यानंतर सूतानें ऋषींना अत्रिवंशातील गोत्रविस्तार करणारे व कर्दमायन शाखेंतील व शारायण नावाच्या ऋषींचा वृत्तांत निवेदन केला. उद्दालकी, शोण, कर्णिरथ, शौक्रतू, गौरग्रीव, गौरजी, चैत्रायण, अर्धपण्य, वामरथ्य, गोपन, तकिबिंदू, कणजिव्ह, हरप्रीती, नैद्राणी, शाकलायनी, तैलप, वैलेय, अत्री, गोणीपती, जलद, भगपाद, महातपस्वी सौपुष्पी, छंदोगेययांस श्यावाश्व, अत्री, आर्चनाशन; हे वेदोक्त तीन प्रवर असल्यानें परस्परांशी विवाह करीत नाहीत. दाक्षी, बली, पर्णवी, ऊर्णनाभी, शिलार्दनी, बीजवापी, शिरीष, मौंजकेश, गविष्ठिर, भलंदन, अत्री, गविष्ठिर, पूर्वातिथी हे वेदसंमत तीन प्रवर आहेत. म्हणून हे ऋषी विवाहयोग्य नाहीत.

यानंतर मनुराजास भगवान मत्स्यांनी अत्रिवंशातील कन्यांचे पुत्र सांगितले. कालेय, वालेय, वासरथ्य, धात्रेय, मैत्रेय; या ऋषींना अत्री, वामरथ्य, पौत्री हे एकच तीन प्रवर असल्यानें ते परस्परांशी विवाहयोग्य नाहीत.

## विश्वामित्रांचा वंश

या अत्रींचाच आणखी एक वंश मनूस भगवान मत्स्यांनी सांगितला. अत्रींना श्रीसोम (चंद्र) या नावाचा एक पुत्र झाला. या वंशातील विश्वामित्र आपल्या तपानें ब्राह्मण झाला. विश्वामित्र, देवरात, वैकृति-

---

* दत्तकास माता व पिता यांच्या गोत्रांचा संबंध असतो. म्हणून त्यास द्यामुष्यायण म्हणतात.

गालव, वतंड. सलंक, अभग, आयतायन, श्यामायन, याज्ञवल्क्य, जाबाल, सैंधवायन, ब्राभ्रव्य, करीष, संश्रुत्य, संश्रुत, उलूप, औपगहय, पयोद, जनपादप, खरवाक्, हलयम, साधित, वाक्त, कौशिक; इत्यादी ऋषींना विश्वामित्र, देवरात, उद्दाल हे तीनच प्रवर असून ते परस्परविवाह करण्यास योग्य नाहीत. देवश्रवा, सुजातेय, सौसुक, कारुकायन, वैदेहरात, कुशिक; या सर्व ऋषींना देवश्रुवा, देवराय, विश्वामित्र हेच वेदोक्त शुभप्रवर आहेत. हे ऋषी विवाहयोग्य नाहीत. धनंजय, कपर्देय, परिकूट व पाणिनी हे सर्व ऋषी त्रिप्रवरीच आहेत. विश्वामित्र, आद्य, मधुछदस; हेही त्रिप्रवरीच आहेत. कमलायजी, अश्मरथ्य, चंचुली; हेही त्रिप्रवरी असल्याने परस्परविवाहासाठी योग्य नाहीत. विश्वामित्र, लोहित, अष्टक व पूरण यांतील विश्वामित्र व पूरण हे दोन प्रवरी आहेत. उदरेणू, ऋथक, उदावही, शाटचायनी, करीराशी, शालंकायनी, लावकी, मोजायनी, खिलिखिली, विद्य, विश्वामित्र यांना तीन प्रवर असल्याने ते परस्परांशी विवाहयोग्य नाहीत.

## कश्यपांचा वंश

मरीचिऋषींना कश्यप नावाचा पुत्र झाला. या वंशाचा विस्तार एकशेअठ्ठ्याण्णवाव्या अध्यायात मत्स्यांनी मनूस विवरून सांगितला आहे. आश्रायणी ऋषिगण, मेष, कीरिटकायन, उदग्रज, माठर, भोज, विनयलक्षण, शालाहालेय, कौरिष्ट, कन्यक, आसुरायण, मंदाकिन्य, वैमृगय, श्रुती, भोजपायन, देवयान, गोमयान, अधश्छाय अभय, कात्यायन, शाक्र्याण, बर्हियोंग, गदायन, भवनंदी, महाचक्री, दाक्षपायन, योधयान, कार्तीवय. हस्तिदान, वात्स्यायन, निकृतज, आश्वलायनी, प्राग्रायण, पौलमौली, आश्ववातायन, कौवेरक, श्याकार, अग्निशर्मायण, मेषप, कैकरसप, ब्रभ्र, प्राचेय, ज्ञानसंज्ञेय, आग्नाप्रासेव्य, श्यामोदर, वैवशप, उद्वलायन, काष्ठाहारी, मारीच, आजिहायन, हास्तिक, वैकर्णेय, काश्यपेय, सासिस, हारितायन, मातंगी, भृगू, वत्सर, कश्यप, निध्रुव; हे सर्व ऋषी तीन प्रवरांनी युक्त असल्याने परस्परांशी विवाहयोग्य नाहीत.

अनसूय, नाकुरय, स्नातप, राजवर्तप, शैशिर, उदवही, सौरध्री,

रोपसेवकी, यामुनी, काद्रुपिंगाक्षी, सजातंबी, दिवावष्टाश्व हे सर्व द्यामुष्यायण गोत्रात उत्पन्न झालेले असून त्यांचे ज्ञान भक्तीनेच होते. वत्सर, काश्यप, वसिष्ठ; हे तीन प्रवरी असल्याने त्यांचा विवाह परस्परांशी होत नाही. संयाती, नभ, पिप्पल्य, जलंधर, भुजातपूर, पूर्य, कर्दम, गर्दभीमुख, हिरण्यबाहू, कैरात, काश्यप, गोभिल, कुलह, वृषकंड, मृगकेतू, उत्तर, निदाघ, मसृण, भत्स्य, महांत, शांडिल्य, दानव, देवजाती, पैप्पल, दित्सप्रयर या सर्व ऋषींना असित, देवल, कश्यप हे तीन शुभकारक प्रवर असल्याने त्यांचा परस्परविवाह होत नाही.

## वसिष्ठांचा वंशविस्तार

वसिष्ठकुलातील ऋषींना एकच प्रवर असतो. व्याघ्रपाद, औपगव, वैक्लव, शाद्वलायन, कपिष्ठल, औपलोम, अलब्ध, षठ, कठ, गोपायन, बोधप, दाकव्य, बाह्यक, वालिशय, पालिशय, वाग्ग्रंथी, आपस्थूण, शीतवृत्त, ब्राह्मपुरेयक, लोमायन, स्वस्तिकर, शांडिली, गौडिनी, वाडोहिल, सुमना, उपवृद्धी, चौली, वौली, ब्रह्मवल, पौली, श्रवस, पौडव, याज्ञवल्क्य, या ऋषींना एकच प्रवर असल्याने हे परस्परविवाह करू शकत नाहीत.

शैलालय, महाकर्ण, कौरव्य, क्रोधी, कपिंजल, वालखिल्य, भागवित्तायन, कीलायन, कालशिख, कोरकृष्ण, सुरायण, शाकाहार्य, शाकधी, काण्व, उपलप, शाकायन, उहाक, माषरावय, दाकायन. वालवय, वाकय, गोरथ, लंवायन, श्यामवय, क्रोडोदरायण, प्रलंवायन, औपमन्यू, सांख्यायन, वेदशेरक, पालंकायन, उद्गाह, बलेक्षू, मातेय, ब्रह्मवली, पर्णागारी, यांना भर्गीवसू, वसिष्ठ, इंद्रप्रमदी हे तीन प्रवर असल्याने हे ऋषी एकमेकांशी विवाह करीत नाहीत.

औपस्थल, स्वस्थली, पालोह, लोहल, माध्यंदिन, उमाक्षती, पैप्पलादी, विचक्षुषू, त्रैशृंगायन, सैवल्क, कुंडिन; या सर्वांना वसिष्ठ, मित्रावरुण, कुंडिन हे तीन प्रवर असल्याने या ऋषींचा परस्परांशी विवाह होत नाही. शिवकर्ण, वय, पादप, इत्यादी ऋषींना जातूकर्ण्य, वसिष्ठ व अत्री हे तीन प्रवर असल्याने हे ऋषी परस्परांशी विवाह करू शकत नाहीत.

## पराशरांचा वंश

यानंतर दोनशेव्या अध्यायात अगस्त्यांच्या वंशातील ऋषींची माहिती आली आहे. महातपस्वी वसिष्ठांनी निमिराजाचे पुरोहित या नात्यानें सर्वत्र यज्ञ केले. वसिष्ठांना यामुळे फार श्रम झाले. ते विश्रांती घेत असताना निमी त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला, 'आपण आणखी यज्ञ करावेत.' तेव्हा त्याला वसिष्ठ म्हणाले, 'आता तू थोडा थांब. पूर्वीच्या यज्ञांनी मी श्रमलो आहे. थोडी विश्रांती घेतल्यावर मी यज्ञ करीन.' तेव्हा राजा निमी म्हणाला, 'परलोकप्राप्तीच्या कार्यास विलंब कशासाठी ? अति-बलिष्ठ यमाशी माझं सख्य नाही. धर्मकार्यात त्वरा करावी. कारण जीवित अत्यंत चंचल आहे. तुम्ही जर यज्ञ करणार नाही तर मी दुसरीकडं जाईन.'

हे ऐकून वसिष्ठ क्रोधित झाले व त्यांनी निमीस शाप दिला. 'तुझा देहपात होईल. मी श्रमलेला आहे.' तेव्हा निमी म्हणाला, 'मी धर्मकार्याबद्दल तत्पर असून तुम्ही मला विघ्न का आणता ? अन्यांकडूनही मी धर्मकार्य करू नये, असं इच्छिता ? मला शाप देता ? मग तुमचाही देहपात होईल.' यानंतर वसिष्ठ व निमिराजा यांचा देहपात झाला. दोघांचे देहरहित जीव ब्रह्मदेवांपाशी गेले. तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, 'निमिराजा, मी आजपासून तुला स्थान देतो. राजा, तू सर्वांच्या नेत्रांच्या पापण्यांत राहाशील. तुझ्यामुळेच त्यांच्या पापण्यांची उघडझाप होईल.' यानंतर निमिराजाचा जीव सर्व माणसांच्या डोळ्यांच्या पापण्यांत गेला. यानंतर ब्रह्मदेव वसिष्ठांना म्हणाले; 'वसिष्ठा, तू मित्रावरुणांचा पुत्र होशील. तुझं नाव वसिष्ठच राहील. तू पूर्वीच्या दोनही जन्मांचं वृत्त स्मरशील.'

याच वेळी मित्र व वरुण हे देव बदरिकाश्रमात अखंड तप करीत होते. या प्रफुल्ल वनात उत्कृष्ट व गुणवती उर्वशी फुले तोडीत होती. अति सूक्ष्म असे आरक्त वस्त्र नेसलेली उर्वशी मित्र व वरुण यांच्या दृष्टीस पडली. ते तिच्या रूपावर मोहित झाले. ते कामवेगानें व्यथित झाले. त्या दोघांचे वीर्य कृष्णाजिनावर गळाले. त्यांनी ते वीर्य उदकाचे

भरलेल्या सुंदर कलशात स्थापन केले. यापासून श्रेष्ठ वसिष्ठ व अगस्त्य यांचा जन्म झाला. वसिष्ठांनी अरुंधतीशी विवाह केला. त्यांना तिच्यापासून शक्ती नावाचा पुत्र झाला. यास पराशर, याचा पुत्र व्यास. यानेच भारत नावाचा ग्रंथ तयार केला. कांडूषप, वाहनप, जैम्हप, भौमतापन, गोपाली हे या पराशरवंशातील ऋषी होत. अपोहय, वाह्यमय, ख्यातेय, कौतुजाती व हर्यश्वी हे या वंशातील पांच ऋषी कृष्णवर्णी होते. काष्णीयन, कपिसुख, काकेयस्थ, अजापती व पुष्कर हे पांच ऋषी कृष्णवर्णी होते. आविष्टायन, वालेय, स्वायष्ट, उपय व इषीकहस्त हे पांच ऋषी शुभ्रवर्णी होत. पाटिक, बादरी, स्तंब, क्रोधनायन, क्षौमी हे श्यामवर्णी होत. खल्यायन, वार्ष्णायिन, तैलेय, यूथप, तंती हे पांच ऋषी धूम्रवर्णाचे होत.

## अगस्त्यमुनींचा वंश

यानंतर दोनशेएकाव्या अध्यायात भगवान मत्स्यांनी मनूस अगस्त्यमुनींचा वंश समजावून दिला. अगस्त्य, करंभ, कौशल्य, करट, सुमेधस्, मयोभुव, गांधारकायण, पौलस्त्य, पौलह, क्रतू इत्यादी ऋषींना अगस्त्य, महेंद्र व मयोभुव हे तीन प्रवर असल्याने हे ऋषी परस्परांशी विवाहयोग्य नाहीत. पौर्णमास व पारण यांना अगस्त्य, पौर्णमास, पारण हे तीन प्रवर आहेत. म्हणून हे परस्परांशी विवाहयोग्य नाहीत.

अगस्त्यांनाच क्रतू हे नाव प्राप्त झाले. पुलहवंशातील ऋषींना अगस्त्य म्हणतात. पुलस्त्यांच्या वंशात राक्षस उत्पन्न झाल्यामुळे त्यांनी अगस्त्यांच्या पुत्रास स्वकीय पुत्र मानला. म्हणून या पुलस्त्यांच्या वंशासही अगस्त्य हे नाव मिळाले.

## धर्मऋषींचा वंश

वैवस्वतमन्वन्तरात धर्म नावाच्या ऋषींपासून दक्षकन्यांच्या उदरी जी संताने झाली, त्याची माहिती मत्स्यांनी मनूस सांगितली. धर्मापासून अरुंधतीला मोठ्या आकृतीने युक्त अशी पर्वतादिक अनेक स्थाने उत्पन्न झाली. या धर्मापासूनच धर, ध्रुव, सोम, आप, अनिल,

अनल, प्रत्यूष, प्रभास; हे अष्ट वसू झाले. यांतील धराचा पुत्र द्रविण, ध्रुवाचा पुत्र काल व कालापासून क्षणलवादिक भाग झाले. सोमास वर्चसू नावाचा ऐश्वर्यवान पुत्र झाला. आपास धीमान् नावाचा पुत्र झाला. अनलास कुमार झाला. अनिलास पुरोजवा पुत्र झाला. प्रत्यूषाचा पुत्र देवल व प्रभासाचा पुत्र विश्वकर्मा. हा देवांचा शिल्पकार होता. यास नागवीथी आदिकरून नऊ पुत्र झाले.

धर्मापासून लंवा नावाच्या स्त्रीला घोष नावाचा पुत्र झाला. भानू नावाच्या पत्नीस त्यांना भानू नावाचे पुत्र झाले. तिजपासूनच सर्व ग्रह, नक्षत्रे आणि इतर तेजस्वी पुत्र झाले. धर्मापासून मरुत्वतीस मरुत्वंत नावाचे पुत्र झाले. संकल्पा नावाच्या स्त्रीपासून त्यांना संकल्प नावाचा पुत्र झाला. मुहूर्तापासून त्यांना मुहूर्त नावाचे पुत्र झाले. साध्या नावाच्या धर्मपत्नीपासून साध्य नावाचे पुत्र त्यांना झाले. मन, उर्मनू, प्राण, नर, उषान, वीर्यवान, चित्तहार्य, अयन, हंस, नारायण, विभू, प्रभू, असे वारा साध्य नावाचे देवगण आहेत. विश्वा नावाच्या पत्नी-पासून त्यांना विश्वेदेव झाले. क्रतू, दक्ष, वत्स, सत्य, कालनाम, मुनी, कुरज, मनुज, बीज, रोममान; असे दहा विश्वेदेव आहेत.

*

# ५. सदाचारदर्शन

## देवीच्या एकशेआठ नामांचा पाठ

इतर प्रमुख पुराणांप्रमाणे मत्स्यपुराणही अनेक प्रकारच्या व्रत-माहात्म्यांनी, नाना प्रकारच्या सदाचारांनी, राजधर्मादी विवरणांनी समृद्ध आहे. तेराव्या अध्यायात पितृवंशाच्या वर्णनाच्या वेळी, सतीचा वृत्तांत सांगत असताना देवीची एकशेआठ नामे सांगितली आहेत. दक्षाने सतीस विचारले, 'पापरहिता देवी, कोणकोणत्या तीर्थस्थानांत

जाऊन तुझं दर्शन घ्यावं ? कोणत्या नामांनी तुझं स्तवन करावं ?'

तेव्हा देवीनें दक्षाला प्रमुख स्थानांचा आपल्या नामांसहित उल्लेख केला. ही देवी वाराणसीत विशालाक्षी, नैमिषारण्यात लिंगधारिणी, प्रयागात ललितादेवी, गंधमादनपर्वतावर कामाक्षी, मानससरोवरात कुमुदा, अंबरात विश्वकाया, गोमंतात गोमती, मंदराचलावर कामचारिणी, चैत्ररथवनात मदोत्कटा, हस्तिनापुरात जयंती, कान्यकुब्जात गौरी, मलयपर्वतावर रंभा, एकाम्रकात कीर्तिमती, विश्वेश्वरात विश्वा, पुष्करात पुरुहूता, केदारतीर्थात मार्गदायिनी, हिमवानाच्या पृष्ठभागात नंदा, गोकर्णतीर्थात भद्रकर्णिका, स्थानेश्वरात भवानी, बिल्वतीर्थात बिल्वपत्रिका, श्रीशैलावर माधवी, भद्रेश्वरात भद्रा, वराहशैलावर जया, कमलालयतीर्थात कमला, रुद्रकोटीत रुद्राणी, कालंजरगिरीवर काली, महालिंगतीर्थात कपिला, मर्कोटात मुकुटेश्वरी, शालग्रामतीर्थात महादेवी, शिवलिंगात जलप्रिया, मायापुरीत कुमारी, संतानतीर्थात ललिता, सहस्राक्षतीर्थात उत्पलाक्षी, कमलाक्षतीर्थात महोत्पला, गंगेत मंगला, पुरुषोत्तमतीर्थात विमला, विपाशात अमोघाक्षी, पंड्रवर्धनात पाटला, सुपार्श्वतीर्थात नारायणी, विकूटात भद्रसुंदरी, विपुलात विपुला, मलयाचलावर कल्याणी, कोटितीर्थात कोटवी, माधववनात सुगंधा, गोदाश्रमात त्रिसंध्या, गंगाद्वारात रतिप्रिया, शिवकुंडतीर्थात शिवानंदा, देविकानदीच्या तटावर नंदिनी, द्वारकापुरीत रुक्मिणी, वृंदावनात सती राधारूपानें असते.

ती मथुरापुरीत देवकी, पातालात परमेश्वरी, चित्रकूटात सीता, विंध्यपर्वतावर विंध्यवासिनी, सह्याद्रीवर एकवीरा, हरिश्चंद्रतीर्थात चंद्रिका, रामतीर्थात रमणा, यमुनेत मृगावती, करवीरात महालक्ष्मी, विनायकतीर्थात उमादेवी, वैद्यनाथात अरोगा, महाकालात महेश्वरी, उष्णतीर्थात अभया, विंध्यकंदरात अमृता, मांडव्यतीर्थात मांडवी, माहेश्वरपुरात स्वाहा, छागलांडात प्रचंडा, मकरंदकात चंडिका, सोमतीर्थात वरारोहा, प्रभासात पुष्करावती, सरस्वतीत देवमाता, समुद्रतटवर्ती महालयतीर्थात महाभागा, पयोष्णीत (पैनगंगेत) पिंगलेश्वरी, कृतशौचतीर्थात सिंहिका, कार्तिकेयात यशस्करी, उत्पलावर्तकात लोला,

शोणसंगमात सुभद्रा, सिद्धपुरात लक्ष्मी माता, भरताश्रमात अंगना, जालंधरपर्वतावर विश्वमुखी, किष्किंधापर्वतावर तारा, देवदारुवनात पुष्टी, काश्मीरमंडलात मेधा, हिमगिरीवर भीमादेवी, विश्वेश्वरात पुष्टी, कपालमोचनात शुद्धी या रूपांत ही देवी असते.

कायायरोहण (कारवण, वडोद्याजवळ) मध्ये माता, शंखोद्धारात ध्वनी, पिंडारकक्षेत्रात धृती, चंद्रभागेत काला, अच्छोदात शिवकारिणी, वेणात अमृता, बदरीतीर्थात उर्वशी, उत्तरकुरूत औषधी, कुशद्वीपात कुशोदका, हेमकूटपर्वतावर मन्मथा, मुकुटात सत्यवादिनी, अश्वतीर्थात वंदनीया, वैश्रवणालयात निधी, वेदवनात गायत्री, शिवसन्निधीत पार्वती, देवलोकात इंद्राणी, ब्रह्मदेवांच्या मुखात सरस्वती, सूर्यबिंबात प्रभा, मातांत वैष्णवी, सतींत अरुंधती, सुंदर स्त्रियांत तिलोत्तमा, चित्तात ब्रह्मकला आणि अखिल शरीरधारियांत शक्ती, या नावांनी ही देवी निवास करते.

अशी ही एकशेआठ नामे व त्यांची स्थाने यांचा पाठ करणारा, श्रवण करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो. या तीर्थांत स्नान केल्यास मनुष्य कल्पपर्यंत शिवपुरात निवास करतो. जो मनुष्य तृतीया वा अष्टमी या तिथींना शिवांपाशी जाऊन या नामांचा पाठ करील त्याला अनेक पुत्र होतील. श्राद्धप्रसंगी वा देवार्चनाच्या समयी या नामांचा पाठ जो करील त्याला परब्रह्मपद प्राप्त होईल.

## श्राद्धविधी

पंधराव्या अध्यायात सूताने पितृवंशाचे वर्णन केले. सर्व पितरांसाठी चांदीचे वा चांदीमिश्रित धातूचे पात्र स्वधाचा उच्चार करून ब्राह्मणात दान केल्याने पितर प्रसन्न होतात. श्राद्धकर्त्याने श्राद्धकाळात प्रथम अग्नी, सोम, यम यांना तर्पण करून तृप्त करावे. अग्नीच्या अभावी ब्राह्मणाच्या हातावर, जलात, अजाकर्णावर, अश्वकर्णावर, गोशालेत, जलापाशी अन्नादी वस्तू टाकाव्यात. पितरांचे स्थान आकाश सांगितले आहे. त्यांच्यासाठी दक्षिणदिशा विशेष प्रशस्त मानली आहे. प्राचीनावीत (अपसव्य) करून दिलेले जल, तिल, सव्यांग (शरीराचा उजवा भाग), दर्भ, फळाचा गीर, गोदुग्ध, मधुररस, खड्ग, लोह, मध

कुश, सांवा, तांदूळ, यव, तिळ, मूग, ऊस, श्वेत पुष्प व घृत; हे पदार्थ पितरांसाठी सर्वदा प्रिय व प्रशस्त असतात.

श्राद्धासाठी वर्जित व पितरांना अप्रिय असेही काही पदार्थ आहेत. मसूर, शण, भाजीची शेंग, काळे उडीद, कुसुमाचे पुष्प, कमल, बेल वा बिल्वपत्र, मंदार, धोत्रा, पारिभद्र (लिंब, देवदारूचे पुष्प वा पान), अडूळशाचे फूल, मेंढीचे वा बकरीचे दूध; हे पदार्थ पितृकार्यात वर्ज्य आहेत. जो मनुष्य पितरांना भक्तीने तृप्त करील, त्याला पितर हर्षित करतात. समृद्धी, स्वर्ग, आरोग्य, संतान इत्यादी फले ते प्रदान करतात. म्हणून देवकार्यापेक्षाही पितृकार्य मोठे आहे. देवांपेक्षा पितरांना दिलेले तर्पण महत्त्वाचे आहे. पितर शीघ्र कृपा करतात. ते क्रोधरहित, शस्त्रविहीन, दृढ मैत्रीयुक्त, शांतात्मे, पवित्रतापरायण, सदा प्रियवादी, भक्तांवर अनुरक्त, सुखदायक असतात. हविषान्न भक्षण करणाऱ्या या पितरांच्या अधिनायकपदावर श्राद्धाचा देव सूर्य असतो.

## श्राद्धांचे विविध भेद, त्यांचा समय, योग्य ब्राह्मण

पुढल्या सोळाव्या अध्यायात सूताने श्राद्धाविषयी आणखी माहिती ऋषींना दिली आहे. प्रतिदिन पितरांसाठी अन्नादींनी वा जलाने वा फलमूलाने श्राद्धकर्म करावे. श्राद्ध नित्य, नैमित्तिक, काम्यरूपाने करता येते. नित्यश्राद्ध अर्घ्य व आवाहनरहित असते. याला 'अदैव' मानतात. पर्वानुसार संपन्न होणारे श्राद्ध 'पार्वण' म्हणतात. हे तीन प्रकारचे असते. या पार्वणश्राद्धात पंचाग्निविद्येचा ज्ञाता, गार्हपत्यादी अग्नींचा उपासक, स्नातक, त्रिसुपर्णाचा अभ्यासक, वेदाच्या सहा अंगांचा ज्ञाता, श्रोतिय, श्रोतियाचा पुत्र, धर्मशास्त्रांचा विद्वान, सर्वज्ञ, वेदवेत्ता, कुलीन, पुराणांचा ज्ञाता, धर्मज्ञ, स्वाध्याय व जपतप यांत तत्पर, शिवभक्त, पितृपरायण, सूर्यभक्त, वैष्णव, ब्राह्मणभक्त, योगवेत्ता, शांत, आत्म्यास वश करणारा शीलवान ब्राह्मण असावा.

मुलीचा पुत्र, आपला मित्र, गुरू, कुलपतीवा आचार्य, मामा, भाऊबंद, ऋत्विक्, विद्यागुरू, सोमपायी यांना श्राद्धाच्या भोजनासाठी प्रयत्नपूर्वक बोलवावे. शिवाय विधिवाक्यांचा व्याख्याता, यज्ञाचा

मीमांसक, सामवेदाच्या स्वरांचा ज्ञाता, पंक्तिपावनांत परमपवित्र, ब्रह्मचारी, वेदज्ञ, ब्रह्मज्ञानी; हे सर्व श्राद्धाच्या भोजनासाठी अगत्यानें बोलवावेत. असे ब्राह्मण जेवल्यानेंच श्राद्ध परमार्थसंपन्न होते. पतित, अभिशस्त (कलंकित), नपुंसक, चहाडखोर, विकृत अंगांचा, रोगी, वाईट नखांचा, काळ्या दातांचा, कुंड (सधवेचा जारजपुत्र, पती जिवंत असताना जारापासून झालेला पुत्र), गोलक (विधवेचा जारजपुत्र), कुत्र्यांचा पालक, परिवित्ती (मोठा भाऊ अविवाहित असताना लहान भावानें विवाह केल्यास त्याला परिवित्ती म्हणतात.), नोकर, ज्याचे मन अन्य श्राद्धात गुंतले आहे असा, वेडा, उन्मादी, क्रूर, चोर, दंभी, मंदिरात देवपूजा करून वेतन घेणारा; असे ब्राह्मण श्राद्धकर्मात निषिद्ध मानले गेले आहेत. कृतघ्न, नास्तिक, त्रिशंकू, वर्बर, द्राव, वीत, द्रविड, कोकण इत्यादी देशांतील निवासी, संन्यासी इत्यादींचा विशेषरूपाने श्राद्धाच्या प्रसंगी त्याग करावा.

श्राद्धाच्या आधी एक-दोन दिवस श्राद्धकर्त्यानें विनीतभावानें ब्राह्मणांना निमंत्रित करावे. पितर या ब्राह्मणांच्या निकट येतात. ते वायुरूप होऊन यांच्याबरोबर राहातात. हे ब्राह्मण वसल्यावर पितरही बसतात. यावेळी श्राद्धकर्त्यानें ब्राह्मणाच्या उजव्या गुढघ्यास स्पर्श करून म्हणावे, 'मी आपणांस निमंत्रित करीत आहे.' यानंतर आपल्या बांधवांना म्हणावे, 'आपण क्रोधरहित, शौचाचारपरायण, ब्रह्मचर्यव्रती असावं.' श्राद्धकर्त्याने 'पिंडान्वाहार्यक' नावाचे श्राद्ध सदा अमावास्येस करावें. गोशालेंत वा एखाद्या जलाशयाच्या समीप दक्षिणदिशेस, गोमयानें स्थान सारवून तेथे भक्तिपूर्वक श्राद्ध करावे. श्राद्धकर्त्याने पितरांसाठी केलेल्या चरूस समसंख्येत (२, ४, ६) मुठीत धरून म्हणावे, 'मी पितरांना चरू प्रदान करीत आहे.' असे म्हणून पितरांना चरू समर्पण करावा. अग्नीत तुपाची धार सोडून चरूचे तीन भाग करून समोर ठेवावेत. हे भाग चार अंगुलांच्या विस्ताराचे असावेत. तीन दर्वी (पळी) खैराच्या वा चांदीमिश्रित धातूच्या असाव्यात. हिचे परिमाण मूठ वळलेल्या हाताबरोबर असावे. अपसव्य होऊन (जानवे डाव्या खांद्यावरून उजव्या खांद्यावर घेऊन) ताम्हण, मेक्षण (प्रणीतापात्र),

समिधा, कुश, तिल, इतर पात्रे, शुद्ध नवे वस्त्र, गंध, धूप, चंदन; इत्यादी सामग्री आपल्या उजव्या बाजूस ठेवावी.

यानंतर घराच्या दरवाज्यासमोर गोमयानें सारवलेल्या भूमीवर अपसव्य होऊन गोमूत्रानें मंडलाची रचना करावी. पुष्पसहित अक्षतांनी त्याची पूजा करावी. नंतर ब्राह्मणांना वंदन करून त्यांचे पादप्रक्षालन करावे. त्यांना कुशासनावर बसवावे. विधिपूर्वक आचमन करावे. त्यांची श्राद्धासाठी संमती घ्यावी. देवकार्यासाठी दोन व पितृकार्यासाठी तीन, अथवा दोनहो कार्यांत एक एक ब्राह्मण भोजनासाठी असावा. धनसंपन्न असूनही श्राद्धकर्त्यानें पार्वणश्राद्धात विस्तार करू नये. प्रथम विश्वेदेवास अर्घ्य समर्पित करून ब्राह्मणांची अर्घ्यादींनी पूजा करावी. श्राद्धकर्त्यानें ब्राह्मणांच्या अनुमतीने चरू कासेच्या भांड्यात ठेवून गृह्योक्ताच्या विधानानुसार विधिपूर्वक अग्नीत समर्पण करावा. अग्नी, सोम व यम यांनाही तर्पण करावे. अग्नीचा उपासक यज्ञोपवीतधारी श्रेष्ठ ब्राह्मण 'दक्षिण' नावाचा अग्नी प्रज्वलित झाल्यावर श्राद्धकर्म करतो. पर्युक्षणादीपासून निवृत्त होऊन, सर्व विधी समजावून घेऊन, प्राचीनावीती होऊन कार्य करावे.

नंतर उरलेल्या हवीचे सहा पिंड तयार करावेत. त्यांवर आपल्या डाव्या हाताने जलपात्राने तिलमिश्रित जल द्यावे. ईर्ष्या-द्वेषरहित बनून, हातात कुश घेऊन, डावा गुढघा मोडून प्रयत्नपूर्वक वेदीवर रेखा ओढून त्यांवर कुश पसरावेत. दक्षिणदिशेस मुख करून पिंडांसाठी असलेल्या कुशांवर अननेजन (जलसंस्कार) करून हातात पळी घेऊन क्रमशः एकेक पिंड घेऊन पितरांचे गोत्र, नाम उच्चारून कुशांवर एक एक करून ठेवावेत. त्या पिंडांवर प्रत्यवनेजन जल सोडावे. गंध, धूप इत्यादींनी या सहा पितरांचे पूजन करून त्यांना नमस्कार करावा. वेदमंत्रांनी त्यांना आवाहन करावे. यानंतर श्राद्धकर्त्याने कुशांवर पितरांच्या पत्नींसाठी अन्न प्रदान करून पिंडांवर आवाहन व विसर्जन इत्यादी क्रिया कराव्यात. त्यानंतर श्राद्धकर्त्यानें त्या सर्व पिंडांतून थोडा अंश घेऊन सर्वप्रथम प्रयत्नपूर्वक निमंत्रित ब्राह्मणांना द्यावा.

कारण पिंडान्नापासून काढलेला अंश अमावास्येस ब्राह्मण खातात.

म्हणून या श्राद्धाला 'अन्वाहार्यक' म्हणतात. श्राद्धकर्ता प्रथम पवित्रक धारण करून तिल व जल ब्राह्मणाच्या हातात देतो. नंतर पिंडांश समर्पित करतो. यानंतर 'आमच्या पितरांसाठी स्वधा होवो' असे म्हणून भोजन देतो. ब्राह्मणाने क्रोधाचा त्याग करून 'हे गोड आहे. पवित्र आहे' असे म्हणून भोजन करावे. भोजनानंतर ब्राह्मणांनी 'विकिरन्' क्रिया करावी. त्यावेळी जलसहित अन्न घेऊन पृथ्वीवर जलास सोडावे. त्या ब्राह्मणांनी आचमन केल्यावर जल, पुष्प, अक्षत आदी सामग्री स्वस्तिवचनपूर्वक पिंडांवर समर्पित करावी. श्राद्धफल भगवानांना समर्पण करावे. ब्राह्मणांना प्रदक्षिणा करावी.

श्राद्धकर्त्याने या वेळी दक्षिणेस मुख करून पितरांना म्हणावे, 'पितृगण, आमच्या दात्यांची, वेदांची, संतानांची वृद्धी व्हावी. आमची श्रद्धा कमी न व्हावी. दानासाठी आमच्याजवळ विपुल संपत्ती असावी. अधिक अन्न असावे. आमच्याकडे अनेकांनी मागावे. पण आम्ही कुणाजवळ याचना करू नये.' यावर ब्राह्मणांनी 'असंच होईल' असे म्हणावे. श्राद्धसमाप्तीनंतर पिंड, गाय, वकरी व ब्राह्मणांना द्यावेत, अथवा पक्ष्यांना वा जलास द्यावेत. मधला पिंड श्राद्धकर्त्याची पत्नी खाते. पितृकर्म समाप्त झाल्यावर वैश्वदेवाचे पूजन करावे. नंतर आपल्या इष्टमित्रांसह, शांतिपूर्वक पितृसेवित अन्नाचे भोजन करावे. श्राद्धकर्ता, श्राद्धभोक्ता यांनी श्राद्धाच्या भोजनानंतर त्या दिवशी पुन्हा भोजन करू नये. त्या दिवशी मार्गगमन, वाहनावर वसणे, परिश्रम करणे, मैथुन, स्वाध्याय, कलह, दिवसा शयन; या सर्वांचा त्याग करावा.

## साधारण व आभ्युदयिक श्राद्धविधी

साधारण श्राद्ध भोग व मोक्ष देणारे असते. सूर्याचे उत्तरायण, दक्षिणायनसमयी, विषुवयोगात, कृष्णपक्षातील अष्टकायोगात (मार्गशीर्ष, पौष, फाल्गुन कृष्णपक्षातील सप्तमी, अष्टमी, नवमी या तीन तिथींचा समुदाय असताना), अमावास्येस, पूर्णिमेस, आर्द्रा, मघा व रोहिणी नक्षत्रांत, द्रव्य व ब्राह्मण मिळाल्यावर, गजच्छाया, व्यतिपात, वैधृती-

योगांत, विष्टि( भद्रा )करणात साधारण श्राद्ध केले जाते. वैशाखमासाची शुक्लतृतीया (अक्षयतृतीया), कार्तिकमासाची शुक्लनवमी (अक्षयनवमी), माघमासाची पूर्णिमा, भाद्रपदमासाची शुक्लत्रयोदशी; या युगादी तिथी आहेत. या तिथींना केलेले श्राद्ध अक्षय होते.

आश्विनमासाची शुक्लनवमी, कार्तिकमासाची शुक्लद्वादशी, चैत्रमासाची शुक्लतृतीया, भाद्रपदाची शुक्लतृतीया, फाल्गुनी अमावस्या, पौषातील शुक्लएकादशी, आषाढाची शुक्लदशमी, माघमासाची शुक्लसप्तमी, श्रावणमासाची कृष्णाष्टमी, आषाढाची पूर्णिमा, कार्तिक, फाल्गुन, चैत्र व ज्येष्ठ यांची पूर्णिमा; या चौदा तिथी चौदा मन्वन्तरांच्या आदितिथी आहेत यांत केलेले श्राद्ध अक्षय फलदायी होते. ज्या तिथीस मन्वन्तराची आदितिथी माघाच्या शुक्लसप्तमीस भगवान सूर्य रथावर आरूढ होतो, ही तिथी रथसप्तमी या नावाने प्रसिद्ध आहे. या तिथीस मनुष्याने तिलमिश्रित जल प्रदान केले, तर्पण केले तर सहस्र वर्षे श्राद्ध केल्याचे फल प्राप्त होते.

विद्वान श्राद्धकर्त्याने वैशाखी पूर्णिमा, सूर्यचंद्रग्रहण, विशेष उत्सव, पितृपक्ष, तीर्थस्थान, देवमंदिर, गोशाला, दीपगृह, वाटिका; अशा एकान्तस्थानी व समयी श्राद्धकार्य करावे. या श्राद्धाच्या आधी एकदोन दिवस विनम्रभावाने शीलवान, सदाचारी, गुणी, रूपवान, आस्थावान ब्राह्मणांना निमंत्रित करावे. विश्वेदेवांना आसन प्रदान करून यव व पुष्पांनी त्यांची अर्चना करावी. दोन मातीची पात्रे ठेवून, त्यांत कुशमिश्रित पवित्रक टाकून 'शं नो देवीरभीष्टये०' हा मंत्र म्हणून ती जलाने भरावीत. 'यवोऽसि०' या मंत्राचा उच्चार करून त्यात यव टाकावेत. पुन्हा गंध, पुष्प आदींनी पूजा करून त्यांना विश्वेदेवांच्यापुढे ठेवावे. पुन्हा 'विश्वेदेवास०' इत्यादी दोन मंत्र म्हणून विश्वेदेवांना आवाहन करून वेदीवर जव विखरावेत. गंध-पुष्पादींनी अलंकृत करून 'या दिव्या आप:०' या मंत्राने त्यांना अर्घ्य प्रदान करावा.

यानंतर पितृकार्यास आरंभ करावा. प्रथम कुशांचे आसन प्रदान करावे. तीन अर्घ्यपात्रे तयार करावीत. त्यांत प्रथमतः कुशनिर्मित पवित्रक

घालून 'शंनो देवी०' या मंत्राने त्यांत जल भरावे. पुन्हा 'तिलोऽसि० या मंत्राने त्यांत तिल टाकून त्यांची गंधपुष्पांनी पूजा करावी. पितरांसाठी प्रयुक्त केलेली ही पात्रे लाकडाची, वृक्षाच्या पानांची अथवा' सुवर्णमय, रजतमय असावीत. अशा रीतीने पितरांसाठी अर्घ्य, पिंड, भोजनपात्र शक्य तो चांदीचे असावे. कारण चांदी शिवांच्या नेत्रांतून उद्भवलेली असल्याने ती शिवांना अत्यंत प्रिय आहे. पण देवकार्यात ही अशुभ मानली आहे. म्हणून देवकार्यात चांदी दूर ठेवावी.

अशा रीतीने यथाशक्ती पात्रांची व्यवस्था करून, मत्सररहित होऊन, हातात कुश घेऊन 'या दिव्या०' या मंत्रासह आपल्या पित्याचे नाव, गोत्र यांचे उच्चारण करून अर्घ्यपात्रे ठेवावीत. 'मी आपल्या पितरांना आवाहन करीन' असे ब्राह्मणांना उद्देशून म्हणावे. त्यांनी अनुमती दिल्यावर 'उशन्तस्त्वा०', 'आयान्तु नः०' या दोन ऋचांनी पितरांना आवाहन करावे. त्यानंतर 'या दिव्या०' या मंत्राने त्यांना अर्घ्य प्रदान करून गंध, पुष्प आदींनी त्यांची पूजा करावी. पिंडदानाच्या आधी त्या जलास हातात घेऊन ते पितृपात्रात ठेवून ते वेदीच्या अग्रभागी उलटून ठेवावे. आणि 'पितृभ्यः स्थानमसि' 'हे पितरांसाठी स्थान आहे' असे म्हणून त्यावर जल शिंपडावे. या कार्यातही पूर्वीप्रमाणे सावधान राहून अग्निकार्य करावे.

त्यानंतर हातात कुश घेऊन प्रशांतचित्ताने गुणकारी डाळ, शाक आदींनी युक्त असे विविध प्रकारचे खाद्यपदार्थ आपल्या दोनही हातांनी परिवेषित करावेत. या पदार्थांत दही, दूध, गोड अन्न, गोघृत, गोदुग्ध, खीर इत्यादी जे काही पितरांना दिले जाईल ते अक्षय होते. पितर गृहस्थाच्या घरी प्रथम देव असतात. म्हणून श्राद्धाच्या वेळी पितृसंबंधी सूक्तांचा पाठ करावा. पुराण, ब्रह्मदेव, विष्णू, सूर्य व रुद्र यांची विविध सूक्ते, इंद्र, अग्नी, सोम यांची पवित्र सूक्ते, बृहद्रथंतर, रौहिणसहित ज्येष्ठ साम, शांतिकाध्याय, मधुब्राह्मण, मंडलब्राह्मण; इत्यादी सूक्तांचा ब्राह्मणांकडून पाठ करावा.

ब्राह्मणांचे भोजन झाल्यावर सर्व वर्णांना नियत केलेले अन्नादी पदार्थ जलाने परिपूर्ण करून भोजन करणाऱ्यासमक्ष वाढून म्हणावे,

'माझ्या कुळात ज्यांचा अग्निसंस्कार झाला आहे, अथवा झाला नाही, ते सर्व या अन्नानं तृप्त व्हावेत. त्यांना परमगती प्राप्त व्हावी. ज्यांना माता नाही, पिता नाही, बंधू नाही, ज्यांची गोत्रशुद्धी झालेली नाही, ज्यांच्यापाशी अन्न नाही, त्यांच्या तृप्तीसाठी मी हे अन्न ठेवलं आहे. त्यांनाही तृप्ती लाभावी.' यानंतर तृप्त ब्राह्मणांच्या हातावर पाणी सोडावे. नंतर गोमय, गोमूत्र व जल यांनी सारवलेल्या जमिनीवर विधिपूर्वक दक्षिणाभिमुख कुश पसरावेत. श्राद्धकर्त्याने पित्याचे नाव व गोत्र उच्चारून प्रथम कुशांवर अवनेजन (जल शिंपडावे) द्यावे सर्व पिंडांना त्या कुशांवर ठेवावे. गंध, पुष्पादींनी पिंडांची पूजा करावी. त्यांवर प्रत्यवनेजनाचे जल शिंपडावे. डावा गुढगा टेकवून डाव्या बाजूने प्रदक्षिणा करावी कुश हातात घेऊन विधिपूर्वक पितृकार्य करावे.

श्राद्धकर्त्याने दीप लावावा. पुष्पांनी पूजन करावे. ब्राह्मणांचे पूजन करून त्यांना दक्षिणा द्यावी. पितरांना प्रसन्न ठेवण्यासाठी गाय, पृथ्वी, सोने, वस्त्र, शय्या इत्यादींचे ब्राह्मणांना दान करावे. नंतर स्वधाचा उच्चार करून श्राद्धकर्त्याने पूर्वाभिमुख होऊन विश्वेदेवांना जल प्रदान करावे. त्यांचा आशीर्वाद घ्यावा. ब्राह्मणांना म्हणावे, 'आमचे पितर सौम्य व्हावेत.' त्यावर ब्राह्मणांनी म्हणावे, 'सन्तु हो.' यानंतर यजमानाने म्हणावे, 'आमच्या गोत्राची वृद्धी व्हावी. आमच्या दात्यांची अभिवृद्धी व्हावी.' ब्राह्मण याला अनुमोदन देतील. यानंतर ब्राह्मणांनी स्वस्तिवाचन करावे. पिंडांना उचलून भक्तिपूर्वक ग्रहबली करावा हे तर्पणरूप कार्य पुत्रहीन, पुत्रवान, स्त्रिया यांसाठीही आहे.

नंतर ब्राह्मणांपुढे उभे राहून जलपात्र हातात घेऊन 'वाजे वाजे' म्हणून कुशांच्या अग्रभागाने पितरांना विसर्जित करावे. त्यानंतर पुत्र, स्त्री, बंधुबांधव यांना बरोबर घेऊन, आठ पावले त्या ब्राह्मणांच्या मागे चालून त्यांना प्रदक्षिणा करावी. नंतर परत येऊन अग्नीला प्रणाम करावा. मंत्रोच्चारणपूर्वक पर्युक्षण करावे. वैश्वदेव व नित्य बली प्रदान करावा. नंतर नोकरचाकर, पुत्र, बंधुबांधव, अतिथी यांच्यासह भोजन करावे.

आभ्युदयिक वृद्धिश्राद्ध उत्सव, हर्षसंयोग, यज्ञ, विवाह आदी

शुभ अवसरी करतात. या श्राद्धात प्रथम मातांची पूजा करून नंतर पितरांची पूजा होते. नंतर मातामह व विश्वेदेव यांची पूजा करावी. श्राद्धकर्त्याने पूर्वाभिमुख होऊन प्रदक्षिणा करून दही, अक्षत, फल, जल आदी सामग्री दुर्वा व कुश यांच्यासह पिंडांना समर्पित करावी. या आभ्युदयिक श्राद्धात 'सम्पन्नम्' या मंत्राचा उच्चार करून दोनही प्रकारच्या पितरांना अर्घ्य द्यावा. यावेळी वस्त्र, सुवर्ण इत्यादींनी ब्राह्मणांची पूजा करावी. तिळाऐवजी 'नान्दी' शब्द उच्चारून यवांनी कार्य संपन्न करावे. श्रेष्ठ ब्राह्मणांकडून मांगलिक सूक्तांचा व स्तोत्रांचा पाठ करावा.

यानंतर अठराव्या अध्यायात सूताने 'एकोद्दिष्ट' (पिता आदी केवळ एका व्यक्तीस उद्देशून केलेल्या) श्राद्धाचा विधी ऋषींनी समजावून सांगितला. याचे वर्णन स्वतः भगवान चक्रपाणी विष्णूंनी केले आहे पित्याच्या मृत्यूनंतर पुत्रांनी शौचपर्यंत काय काय करावे हे या अध्यायात आले आहे. ब्राह्मणांत दहा दिवसांच्या अशौचाचे विधान आहे. क्षत्रियांत बारा दिवसांचे, वैश्यांत पंधरा दिवसांचे, शूद्रांत एक मासाचे अशौच असते. ज्याचा मुंडनसंस्कार झालेला नाही, अशा लहान मुलाचे मरणाशौच एक रात्रपर्यंत असते. मोठ्या मुलाचे अशौच तीन रात्रीपर्यंत असते.

अशाच प्रकारे सर्व वर्णासाठी जननाशौचही असते. मरणाशौचात अस्थिसंचयनानंतर अंगस्पर्श करण्याचे विधान आहे. प्रेतात्म्यासाठी बारा दिवस पिंडदान करावे. कारण हे पिंड त्याला पाथेय म्हणून उपयोगी येतात. प्रेतात्मा बारा दिवसपर्यंत प्रेतपुरीस, यमपुरीस जात नाही. बारा दिवसपर्यंत तो आपले घर, आपला पुत्र, आपली पत्नी यांना पाहू शकतो. म्हणून दहा दिवसांपर्यंत त्याची थकावट दूर करण्यासाठी जलघट तयार असावा. अकराव्या दिवशी अकरा ब्राह्मणांना भोजन घालावे. बाराव्या दिवशी एकोदिष्ट श्राद्ध करावे. यात आवाहन, अग्नीत पिंडदान, विश्वेदेवाचे पूजन निषिद्ध आहे. या श्राद्धात एकच पवित्रक, एकच अर्घ्य, एकच पिंड यांचे विधान आहे

'उपतिष्ठताम्' या शब्दाचा उच्चार करून तिलसहित जल

प्रदान करावे. ‘स्वदितम्’ हा संपूर्ण मंत्र म्हणून अन्न पृथ्वीवर ठेवावे. आणि विसर्जनाच्या समयी ‘अभिरम्यताम्’ असे म्हणावे. वेदज्ञ पुत्राने आपल्या पित्याचे श्राद्धकार्य याप्रकारे पूर्ण करावे. पित्याच्या मृत्युतिथीस प्रतिमास कार्य करावे. सूतक संपल्यावर दुसऱ्या दिवशी सोन्याची प्रतिमा फलवस्त्राने समन्वित करून शय्यादान करावे. वस्त्राभूषणांनी द्विज-दंपतीचे पूजन करावे. त्यानंतर वृषोत्सर्ग (बैल सोडण्याचा विधी) करावा. यावेळी एका कपिला गायीचे दान करावे. भक्ष्यभोज्य पदार्थांनी युक्त असे तिलजलपूर्ण जलपात्र दान करावे. हे दान वर्षपर्यंत करावे.

एक वर्ष पूर्ण झाल्यावर सपिंडीकरण श्राद्ध करावे. यानंतर प्रेतात्मा पार्वणश्राद्धाचा भागी होतो. सपिंडीकरण श्राद्धात सर्वप्रथम विश्वेदेवांना नियुक्त करावे. त्यानंतर पितरांना स्थान द्यावे. प्रेतास वेगळे स्थान द्यावे. अर्घ्य देण्यासाठी चंदन, जल, तिल यांनी युक्त चार पात्रे तयार करावीत. प्रेतपात्रातील जलास तीन भागांत विभक्त करून पितृपात्रात घालावे. अशा रीतीने चार पिंडांना तयार करून त्यांना पितर व प्रेत यांच्या स्थानी पृथक् पृथक् ठेवावे. यानंतर ‘ये समानाः’ या दोन मंत्रांसह शेवटच्या चौथ्या पिंडास स्वर्णशलाकेने वा कुशाने तीन भागांत विभक्त करावे. यानंतर प्रेतात्मा संतुष्ट होऊन पितृरूपात परिवर्तित होतो. अग्निष्वातादी देवपितरांच्यामध्ये त्याला उत्तम व अविनाशी पद प्राप्त होते. हा प्रेतात्मा ज्या पितरांच्या मध्ये असतो, त्यांच्या पिंडांचे तीनही भाग त्या पितरांच्या पिंडांत मिळवावेत.

यानंतर संक्राती अथवा गृहणादी पर्वात त्रिपिंड श्राद्ध करावे. एकोदिष्ट श्राद्ध प्रेतात्म्याच्या मृत्यूच्या दिवशी करण्याचे विधान आहे. जो श्राद्धकर्ता पित्याच्या मृत्युतिथीत एकोदिष्ट श्राद्ध न करता केवळ अन्य श्राद्ध करतो, तो पितृघातकी समजला जातो. प्रतिवर्ष एकोदिष्ट श्राद्ध करावे.

### श्राद्धरूपी वृक्षाची पुष्पे

यानंतर एकोणिसाव्या अध्यायात ऋषींनी सूतास विचारले,

'सूत, मनुष्यास पितरांसाठी हव्य, कव्य कशा प्रकारानं द्यावं ? मृत्युलोकात दिलेलं हव्य-काव्य पितरांना पितृलोकात कसं पोचतं ? कोण पोचवितं ? मृत्युलोकी जर ब्राह्मण ते खात असतील, ते अग्नीत जात असेल, तर मग आपल्या कर्मानुसार शुभ वा अशुभ योनीत गेलेल्या पितरांना ते कसं पोचतं ?'

या प्रश्नांची उत्तरे सूताने दिली. पितरांना वसुगण, पितामहांना रुद्रगण व प्रपितामहांना आदित्यगण म्हटले जाते. अशी वैदिक श्रुती आहे. पितरांचे नाम व गोत्र त्यांच्याकडे हव्यकव्य पोचवितात. अतिशय भक्तिपूर्वक उच्चारित श्राद्धातील मंत्रही हे काम करतात. अग्निष्वात्तादी पितरांच्या आधिपत्यपदावर असतात. या देव-पितरांसमोर जे खाद्य पदार्थ पितरांचे नाम, गोत्र, काल, देश यांचा उच्चार करून श्रद्धाने अर्पण केले जातात, त्यांनी पितृगण तृप्त होतात. ते त्यावेळी त्यांच्या योनीस उपयुक्त अशा आहाराच्या रूपात परिणत होतात. शुभ कर्मांच्या प्रभावाने पिता देवयोनीत उत्पन्न झाला असेल तर त्याच्या उद्देशाने दिले गेलेले अन्न अमृत बनून त्याला प्राप्त होते. हे श्राद्धान्न दैत्ययोनीत भोगरूपात व पशुयोनीत तृणरूपात बदलते. सर्पयोनीत हे वायुरूप होऊन पितरांना मिळते. यक्षयोनीत हे अन्न द्रवरूपात व राक्षसयोनीत मांसरूपात परिवर्तित होते. दानवयोनीत मायारूपाने, प्रेतयोनीत रुधिर व जलरूपाने आणि मानवयोनीत नाना प्रकारच्या भोगरसांनी परिवर्तित होते.

रमण करण्याची शक्ती, सुंदर स्त्रिया, भोजनाचे पदार्थ, हे पदार्थ पचविण्याची शक्ती, प्रचुर संपत्ती, दान देण्याची निष्ठा, सुंदर रूप, स्वास्थ्य, ही सर्व श्राद्धरूपी वृक्षाची पुष्पे आहेत. ब्रह्मप्राप्ती त्यांचे फळ आहे. पितृगण प्रसन्न झाल्यावर मनुष्यास आयुष्य अनेक पुत्र, धन, विद्या, स्वर्ग, मोक्ष, सुख व राज्य प्रदान करतात असे ऐकले आहे की, कौशिकाचे पुत्र पूर्वी श्राद्धाच्या प्रभावाने व्याध, मृग, चक्रवाक इत्यादी योनींत पांच वेळा जन्म घेऊन मुक्त झाले व भगवान विष्णूंच्या वैकुंठधामास गेले. ही कथा पूर्वी याच ग्रंथात आपण वाचली आहेच.

## श्राद्धासाठी विविध तीर्थस्थाने

बाविसाव्या अध्यायात ऋषींनी श्राद्ध केव्हा करावे? कोण-कोणत्या स्थानी ते करावे? असे प्रश्न विचारल्यावरून सूताने सविस्तर निवेदन केले आहे. अपराण्हकाल (दिवसाचा तिसरा प्रहर), अभिजित मुहूर्त, रोहिणीचा उदयकाल या मुहूर्तांवर पितरांसाठी जे काही होईल ते अक्षय ठरेल.

गया नावाचे पितृतीर्थ सर्व तीर्थांत श्रेष्ठ व मंगलदायक आहे. तेथे पितामह स्वतः विराजमान होतात. वाराणसीनगरीही पितरांसाठी पुण्यप्रद आहे. विमलेश्वरतीर्थ, पितृतीर्थ प्रयाग, दशाश्वमेधिकतीर्थ, गंगाद्वार (हरिद्वार), नंदा, ललिता व मंगलमयी मायापुरी (ऋषिकेश), ही सर्व तीर्थे पितरांसाठी श्रेष्ठ आहेत. केदारतीर्थ, गंगासागरतीर्थ, शतद्रूमधील ब्रह्मसरतीर्थ, नैमिषारण्यातील सर्व तीर्थे, गोमतीनदी, कांचनद्वार, कृतशौचतीर्थ, इक्षुमतीनदी; ही सर्व तीर्थे पितरांना अत्यंत प्रिय आहेत. गंगेच्या संगमावर पितर सदा निवास करतात. सर्व तीर्थांत कुरुक्षेत्र हे पुण्यप्रद तीर्थ आहे. पुण्यसलिला शरयूनदी, इरावतीनदी, यमुना, देविका, काली (कालीसिंध), चंद्रभागा (चिनाब), दृषद्वती, पुण्यतोया वेणुमती, सर्वश्रेष्ठ वेत्रवती; या नद्या पितरांना अत्यंत प्रिय आहेत.

जंबूमार्ग (भडोच), नीलकुंडतीर्थ, रुद्रसर, मानससरोवर, मंदाकिनी, अच्छोदा, विपाशा (व्यासनदी), सरस्वती, पूर्वमित्रपद, वैद्यनाथ, शिप्रानदी, महाकाल, कालंजर, वंशोद्भव, हरोद्भेद, गंगोद्भेद, भद्रेश्वर, विष्णुपद, नर्मदाद्वार; ही सर्व पितृप्रियतीर्थे आहेत. ओंकार, कावेरी, कपिलोदका, चंडवेगा व नर्मदा याचा संगम, अमरकंटक; इत्यादी पितृतीर्थांत स्नानादी केल्यानें कुरुक्षेत्राच्या शंभर पटींनी अधिक फळ मिळते. शुक्रतीर्थ, सोमेश्वरतीर्थ, कायावरोहण (गुजराथमधील कारवण), चर्मण्वती, गोमती, वरुणा, औशनसतीर्थ, भैरव (केदारनाथापाशी), भृगुतुंग, गौरीतीर्थ, वैनायकतीर्थ, भद्रेश्वरतीर्थ, पापहरतीर्थ, पुण्यसलिला तपती, मूलतापी, पयोष्णी, महाबोधी, पाटला नागतीर्थ, अवन्तिका, वेणानदी, महाशाल, महारुद्र, महालिंग, दशार्णा; हीही अत्यंत पुण्यप्रद

अशी पितृतीर्थे आहेत.

शतरुद्रा, शताण्हा, विश्वपद, अंगारवाहिका, शोण, घर्घर, कालिका-नदी, वितस्ता; ही पितृतीर्थे स्नान व दान यांसाठी प्रशस्त आहेत. येथें श्राद्ध केल्यास अक्षय फल मिळते. द्रोणी, वाटनदी, धारानदी, क्षीरनदी, गोकर्ण, गजकर्ण, पुरुषोत्तमक्षेत्र, द्वारका, कृष्णतीर्थ, अर्बुदगिरी, सरस्वती, मणिमतीनदी, गिरिकर्णिका, धूतपापतीर्थ, दक्षिणसमुद्र; या पितृतीर्थांत केलेले श्राद्ध अनंत फळें देणारे होते. गुजराथमधील मेघंकरतीर्थ, मंदोदरी-तीर्थ, चंपानदी, सामलनाथ, महाशालनदी, चक्रवाक, चर्मकोट, जन्मेश्वर, अर्जुन, त्रिपुर, सिद्धेश्वर, श्रीशैल, शांकरतीर्थ, नारसिंहतीर्थ, महेंद्र, श्रीरंग, इत्यादी तीर्थस्थानी केलेले श्राद्ध फलदायी होते. तुंगभद्रानदी, भीमरथीनदी, भीमेश्वर, कृष्णावेणा, कावेरी, कुड्मलानदी, गोदावरी, त्रिसंध्यातीर्थ, सर्व तीर्थांनी नमस्कृत त्रैयम्बकतीर्थ; या सर्व तीर्थांत केलेला श्राद्धविधी अनेक पटींनी फलदायी होतो.

याच प्रकारे श्रीपर्णी, ताम्रपर्णी, जयातीर्थ, मत्स्यनदी, शिवधार, भद्रतीर्थ, पंपातीर्थ, रामेश्वर, एलापुर, अलंपुर, अंगारक, आमर्दक, अलंबुष, आम्रातकेश्वर, एकाम्रक, गोवर्धन, हरिश्चंद्र, कृपुचंद्र, पृथूदक, सहस्राक्ष, हिरण्याक्ष, कदलीनदी, रामाधिवास, सौमित्रिसंगम, इंद्रकील, महानाद, प्रियमेलक; येथील श्राद्ध प्रशस्त होते. पुण्यजला बहुदानदी, मंगलमय सिद्धवन, पाशुपततीर्थ, पार्वतीनदी, अप्सरोयुग, जामदग्न्यतीर्थ, सहस्रलिंग, राघवेश्वर, पुण्यतोया इंद्रफेना, पुष्करतीर्थ, शालग्राम, सोम पानतीर्थ, सारस्वततीर्थ, स्वामितीर्थ, मलंदरानदी, कौशिकी, चंद्रिका, वैदर्भी, वैणा, पयोष्णी, कावेरी, जालंधरगिरी; ही सर्व स्थाने श्राद्धासाठी योग्य आहेत.

यानंतर लोहदंडतीर्थ, चित्रकूट, विंध्ययोग, गंगातट, कुब्जाम्रतीर्थ (ऋषिकेश), उर्वशीपुलिन, संसारमोचनतीर्थ, ऋणमोचन, अट्टहासतीर्थ, गौतमेश्वर, वसिष्ठतीर्थ, हारीततीर्थ, ब्रह्मावर्त, कुशावर्त, हयतीर्थ (द्वारकेपाशी), पिंडारकतीर्थ, शंखोद्धार, घंटेश्वर, बिल्वक, नीलपर्वत, धरणीतीर्थ, रामतीर्थ, अश्वतीर्थ; ही सर्व स्थाने श्राद्ध व दान यांसाठी विख्यात आहेत. वेदशिर, ओघवतीनदी, वसुप्रद, छागलांडतीर्थ, बदरी-

तीर्थ, गणतीर्थ, जयंत, विजय, शक्रतीर्थ, श्रीपतितीर्थ, रैवतकतीर्थ, शारदातीर्थ, भद्रकालेश्वर, वैकुंठतीर्थ, भीमेश्वरतीर्थ, मातृगृहतीर्थ, करवीरपुर, कुशेशय, गौरीशिखर, नकुलेशतीर्थ, कर्दमाल, दिंडिपुण्यकर, पुंडरीकपुर, सप्तगोदावरीतीर्थ; अशी तीर्थे श्राद्धासाठी उपयुक्त आहेत.

अशा अनेक तीर्थांचे वर्णन सूताने केले आहे. सत्यतीर्थ, दयातीर्थ, इंद्रियनिग्रहतीर्थ; यांनाही त्याने तीर्थरूप मानले आहे. प्रातःकाल संगव म्हणून प्रसिद्ध आहे. यानंतर तीन मुहूर्तांचा मध्यान्ह व नंतर तितकाच अपराण्हकाल असतो. सायंकाळी श्राद्ध करू नयें. यावेळी राक्षसी समय असतो. सर्व कार्यांना हा निंदित काळ आहे. एका दिवसात पंधरा मुहूर्त असतात. आठवा मुहूर्त कुतप नावाने प्रसिद्ध आहे. मध्यान्हकाली सूर्य मंद असल्याने यासमयी फल प्राप्त होते. मध्यान्हकाल, खड्गपात्र, नेपालकंवल, चांदी, कुश, तिळ, गाय व दौहित्र (कन्येचा पुत्र); हे पापांना संतप्त करणारे आहेत. म्हणून 'कुतप' या नावाने विख्यात आहेत. यानंतर चार मुहूर्त स्वधासाठी उत्तम असतात. कुश व काळे तीळ हे भगवान विष्णूंच्या शरीरापासून निर्माण झाल्याने श्राद्धास अत्यंत उपयुक्त असतात. तीर्थात प्रवेश करून, हातात कुश घेऊन तिलांसहित जलांजली द्यावी. श्राद्धाची विशेषता याने वाढते. पिंड एका हाताने दिला जातो. तर्पण दोनही हातांनी करतात.

## ययातीचा पूरूस उपदेश

सदतिसाव्या अध्यायापासून ययाती व अष्टक यांच्या संवादातील उपदेशाचा वृत्तांत एकेचाळिसाव्या अध्यायापर्यंत आला आहे. छत्तिसाव्या अध्यायात ययातीने पुरूस केलेला उपदेश आहे. गंगा व यमुना यांच्यामधील सर्व प्रदेशावर पुरूचे राज्य होते. मनुष्याने दीनता, शठता, क्रोध करू नये. कुटिलता, मात्सर्य, वैर करू नये. माता, पिता, विद्वान, तपस्वी, क्षमाशील पुरुष, बुद्धिमान मनुष्य यांचा कधी अपमान करू नये. शक्तिशाली पुरुषाने सदा क्षमाशील असावे. कुरूप रूपवानाचा, निर्धन धनवानाचा, अकर्मण्य कर्मनिष्ठाचा, अधार्मिक धार्मिकाचा द्वेष करतो. गुणहीन मनुष्य गुणवानाचा द्वेष करतो. जो कधी क्रोध करीत

नाही, तो श्रेष्ठ पुरुष असतो. सहनशील पुरुष उत्तम असतो. मूर्खांपेक्षा विद्वान उत्तम असतो.

जर एखादा मनुष्य निंदा करीत असेल, शिव्या देत असेल, तर त्याची निंदा करू नये. त्याला शिवी देऊ नये. जो निंदा व शिवी सहन करतो, त्याचे आंतरिक दुःखच शिवी देणाऱ्यास जाळीत असते. क्रोधवश होऊन कोणाच्याही मर्मस्थानास दुखवू नये. कोणासही कठोर वाणीने बोलू नये. अनुचित उपाय करून शत्रूसही वश करू नये. दुसऱ्याच्या जीवास दाह देणारे, त्याला उद्वेग वाटणारे शब्द मुखातून उच्चारू नयेत. कारण पापी लोकच असे बोलतात. जो स्वभावाने कठोर असतो, दुसऱ्यास दोष देतो, कटू शब्द बोलतो, तो लक्ष्मीहीन होतो.

साधुपुरुषाचा सत्कार करावा. दुष्ट लोकांचे बोलणे साधु पुरुषाप्रमाणे स्वीकारावे. दुष्ट माणसाच्या तीक्ष्ण शब्दांनी मनुष्य रात्रंदिवस शोक व चिंताग्रस्त होतो. त्याचे वाग्बाण मर्मस्थानास दुखवितात. म्हणून विद्वान माणसाने कठोर वाणीचा प्रयोग करू नये. सर्व प्राण्यांवर दया करावी. त्यांशी मैत्री करावी. दान द्यावे. मधुर वाणीचा प्रयोग करावा. पूजनीय पुरुषांचा आदरसत्कार करावा. दुसऱ्यांना दान द्यावे व स्वतः कधी कोणास मागू नये.

## ययाती अष्टक यांच्या संवादातील उपदेश

ययातीचे पुण्य संपल्यावर तो खाली पृथ्वीवर आला. त्यावेळी त्याला राजर्षींत श्रेष्ठ व उत्तम धर्मविधीचा पालक अष्टकाने पाहिले. अष्टकाने त्याची चौकशी केली. त्याच्या पतनाचे कारण विचारले. अष्टकास ययातीने आपला परिचय करून दिला. सर्व प्राण्यांचा अपमान केल्यामुळे आपले पुण्य क्षीण झाले, असेही त्याने अष्टकाला सांगितले. पाप पुण्यकर्मांचा नाश करते. ते नरकाची प्राप्ती करून देणारे असते. श्रेष्ठ पुरुष दुराचारी पुरुषांचे अनुकरण करीत नाहीत. दुसऱ्यांची निंदा करण्याने धन नष्ट होते: जो लोककल्याणात संलग्न राहील तोच ज्ञानी व धीट मानावा. श्रेष्ठ पुरुषाने आपल्या बुद्धीपेक्षा प्रारब्ध बलवान मानावे: सुख व दुःख प्रारब्धामुळे मिळते: आपल्या शक्तीने नाही. दुःखाने

संतप्त होऊ नये. सुखानें हर्षित होऊ नये। सदा समभावानें राहावे. भाग्यास प्रबल मानून कोणत्याही प्रकारची चिंता करू नये.

दहा लाख वर्षे नंदनवनात राहाणारा ययाती भूतलावर का आला? या प्रश्नाचे उत्तर अष्टकास ययातीनेच दिले. मनुष्याचे पुण्य क्षीण झालें की, त्या मनुष्याचा त्याग देवराज इंद्र करीत असतो. जो मनुष्य आपल्या पुण्यकर्मांचे वर्णन करतो, तो भौम नावाच्या नरकात पडतो. तेथे तो गिधाड, कोल्हा, कावळा इत्यादींनी खाण्यास योग्य अशा शरीरास प्राप्त करतो. म्हणून दुष्ट व निंदनीय कर्मांचा त्याग करावा. कर्मांपासून उत्पन्न होणारा व वाढणारा मनुष्य या पृथ्वीवर विषयांत रमतो. त्याचे हे रमणेच भौम नावाचा नरक आहे.

अंतरिक्षातून पडणारा प्राणी असृक् (रक्त) होतो. नंतर तो शरीर धारण करून वीर्य बनतो. पुष्पाच्या रसाशी संयुक्त होऊन तो कर्मानुरूप योनीचे अनुसरण करतो. जीव कर्मानुसार पृथ्वीवर पशू अथवा मनुष्य होतो. तप, दान, शम, दम, लज्जा, सरलता व समस्त प्राण्यांवर दया हे सात स्वर्गलोकाचे दरवाजे आहेत. वेदांचे अध्ययन करून जो स्वतःस मोठा पंडित मानतो, दुसऱ्यांच्या यज्ञांचा नाश करतो, तो स्वतःच विनाशशील होतो. त्याचे वेदज्ञान फलित होत नाही. अग्निहोत्र, मौन, अध्ययन व यज्ञ; ही चार कर्मे मनुष्याची भयापासून सुटका करतात, पण ही कर्मे दूषितभावाने केली तर उलटे फल मिळते. विद्वान पुरुषानें सन्मानित झाल्यावर आनंदी होऊ नयें. अपमानित झाल्यावर संतप्त होऊ नये. या लोकी संत पुरुषच सत्पुरुषांचा आदर करतात. दान, स्वाध्याय, यजन यांत रमावे.

यानंतर चाळिसाव्या अध्यायात ययाती व अष्टक यांचा आश्रमधर्मासंबंधी झालेला संवाद आला आहे. शिष्यानें गुरूने बोलविले की, त्यांच्या समीप जाऊन अध्ययन करावे. न सांगता गुरूची सेवा करावी. रात्री गुरू झोपल्यावर शिष्यानें झोपावे. सकाळी त्यांच्याआधी उठावे. असा शिष्य विनम्र, जितेंद्रिय, धैर्यवान, सावधान व स्वाध्यायशील असावा. हा ब्रह्मचारी सिद्धीस पावतो. गृहस्थ पुरुषानें न्यायाने प्राप्त झालेल्या धनानें यज्ञ करावा. त्या धनाचे दान द्यावे. सदा अतिथीसह भोजन

करावे. दिल्याशिवाय दुसऱ्याची वस्तू घेऊ नये. वानप्रस्थ मुनीने वनात निवास करावा. त्याचा आहार व विहार नियमित असावा. आपल्या परिश्रमाने जीवननिर्वाह करावा. पापाने नाही. दुसऱ्यांना दान द्यावे. कोणालाही कष्ट देऊ नयेत. अशा मुनीस मोक्षाची प्राप्ती होते. संन्याशाने शिल्पकलेच्या साह्याने जीवननिर्वाह करू नये. शम-दम इत्यादी गुणांनी त्याने इंद्रियांना स्वाधीन ठेवावे. सर्वांपासून वेगळे राहावे. गृहस्थाच्या घरी त्याने झोपू नये. परिग्रहाचा भार वाढवू नये. अनेक स्थानी त्याने एकट्यानेच भ्रमण करावे. असा संन्यासीच खरा भिक्षू असतो. रूप, रस इत्यादी विषय जेव्हा तुच्छ वाटू लागतात, तेव्हा त्यांचा त्याग करून विद्वान पुरुषाने मन वश करून, सर्व वस्तूंचा त्याग करून वनवासी होण्याचा प्रयत्न करावा.

मुनी कोणास म्हणावे ? अरण्यात निवास करून ज्याला ग्राम मागे वाटतो, ग्रामास वास करताना ज्याला अरण्य मागे वाटते, त्यास मुनी म्हणावे. म्हणजे काय? जो मुनी वनात निवास करून गावात प्राप्त होणाऱ्या वस्तूंचा उपयोग करीत नाही तो वनात राहून ग्राम मागे टाकतो. ज्याने अग्नी व गृह यांचा त्याग करून गोत्र व चरण यांचा संबंध ठेवला नाही, जो मौन राहतो, एखाद्या लंगोटीची मात्र जो अपेक्षा ठेवतो, प्राणरक्षणासाठीच भोजन करतो, अशा मुनीस गावात निवास करूनही अरण्य मागे वाटते. जो मुनी सर्व कामना सोडून, कर्मांचा त्याग करून, इंद्रियसंयमपूर्वक सदा मौन राहतो, त्याला परम-सिद्धीची प्राप्ती होते. ज्याचे दात शुद्ध व स्वच्छ आहेत, ज्याची नखे व केस कापलेले आहेत, जो सदा स्नान करतो, जो यमनियमादींनी अलं-कृत आहे, शीतोष्ण सहन करून ज्याचे अंग काळे पडले आहे, ज्याचे आचरण उत्तम आहे. असा संन्यासी कोणास पूज्य वाटत नाही ?

तपस्येने मांस, हाडें, रक्त क्षीण झाल्यावर ज्याचे शरीर कृश व दुर्बळ होते, जो सुख–दुःख, राग-द्वेष आदी द्वंद्वांनी रहित असतो, जो मौनावलंबी असतो, त्याने इहलोक व परलोक जिंकला आहे. संन्यासी मुनी गायीबैलांप्रमाणे मुखाने आहार ग्रहण करतो, हाताने नाही. त्याने सर्व लोक जिंकलेले असतात. तोच मोक्षाच्या प्राप्तीसाठी समर्थ असतो

## पुराणांची नामावली, त्यांचा परिचय

त्रेपन्नाव्या अध्यायात सूताने ऋषींच्या विचारण्यावरून पुराणांचा परिचय करून दिला आहे. सूत म्हणाला, 'ऋषींनो, पुराणं सर्व-शास्त्राणां प्रथमं ब्रह्मणा स्मृतम्'—ब्रह्मदेवांनी सर्व शास्त्रांत प्रथम पुराणास निर्माण केलं. 'अनन्तरं च वक्त्रेभ्यो वेदास्तस्य विनिर्गतः'—यानंतर त्यांच्या मुखांतून वेद प्रादुर्भूत झाले. त्या कल्पांतरात शंभर कोटी श्लोकांत विस्तृत, पुण्यप्रद, त्रिवर्ण (तीन पुरुषार्थांचा समुदाय) असे एकच पुराण होते. सर्व सृष्टी जळून नष्ट झाल्यावर हयग्रीवाच्या रूपाने मत्स्य भगवानांनी व्याकरणादी सहा अंगांसहित चार वेद, पुराणे, न्यायशास्त्र, मीमांसा, धर्मशास्त्र यांचे संकलन केले. कल्पान्ताच्या आरंभी एकार्णवाच्या समयी मत्स्यांनी या विषयांचे वर्णन केले. तेव्हापासून जगतात सर्व शास्त्रे व पुराणे यांचा प्रचार झाला. कालाच्या प्रभावाने लोकांना पुराणाबद्दल उदासीनता वाटली. तेव्हा त्यांनी प्रत्येक द्वापरात व्यासरूपाने प्रकट होऊन त्या मूळ पुराणाचा संक्षेप करून ते चार लाख श्लोकांचे बनविले. तेच आता अठरा भागांत विभक्त होऊन या भूलोकी प्रकाशित झाले आहे. देवलोकात मात्र हे शंभर कोटींचे पुराण आजही आहे.

पूर्वी ब्रह्मदेवांनी महर्षी मरीचीसाठी **ब्रह्मपुराण** तयार केले. त्यात तेरा हजार श्लोक आहेत. जो मनुष्य हे पुराण लिहून जलधेनूसह वैशाखी पूर्णिमेस ब्राह्मणास दान करतो, तो ब्रह्मलोकी पूजित होतो. ज्यावेळी हे जगत सुवर्णमय कमलाच्या रूपात होते, त्या समयाचा वृत्तांत ज्यात आला आहे, ते **पद्मपुराण** नावाने ओळखले जाते. याची श्लोकसंख्या पंचावन्न हजार सांगितली जाते. सुवर्णनिर्मित कमलाबरोबर जो मनुष्य ज्येष्ठमासात हे पुराण दान करील, त्यास अश्वमेधयज्ञाच्या फलाची प्राप्ती होईल. महर्षी पराशरांनी वराहकल्पाच्या वृत्तांताचा आधार घेऊन ज्यात संपूर्ण धर्माचे विवरण केले आहे, त्या पुराणास **विष्णुपुराण** म्हणतात. या पुराणाची श्लोकसंख्या तेवीस हजारांची आहे. (ही संख्या विष्णुधर्मोत्तरपुराणासहित असावी). जो मनुष्य आषाढी पूर्णिमेस घृत-

धेनुयुक्त या पुराणाचे दान करील, त्याचा आत्मा पवित्र होईल. तो वरुणलोकास जाईल.

श्वेतकल्पात वायूने या मर्त्यलोकात ज्या धर्मांचे संकलन केले, त्याला वायवीय पुराण वा **वायुपुराण** वा **शिवपुराण** म्हणतात. (ही दोनही पुराणे वेगळी आहेत.) हे शंकरांच्या माहात्म्यांनी परिपूर्ण आहे. या पुराणाची श्लोकसंख्या चोवीस हजार आहे. जो मनुष्य श्रावणी पूर्णिमेस गुडधेनू व बैल यांच्यासह हे पुराण कुटुंबी ब्राह्मणास दान करतो, त्याचा पवित्रात्मा एक कल्पपर्यंत शिवलोकात निवास करतो. ज्यात गायत्रीचा आश्रय घेऊन विश्वासपूर्वक धर्मवर्णन केले आहे, जे वृत्रासुरवधाने संयुक्त आहे, त्याला **भागवतपुराण** म्हणतात. यात सारस्वतकल्पातील श्रेष्ठ पुरुषांचे वृत्तांत आले आहेत. हे पुराण अठरा हजार श्लोकांचे आहे. जो मनुष्य याचे लेखन करून हे सुवर्णमय सिंहासह भाद्रपद पूर्णिमेस दान करील, तो परमगतीस, मोक्षास जाईल.

ज्यात बृहत्कल्पाचा आश्रय घेऊन देवर्षी नारदांनी धर्माचा उपदेश केला आहे, त्याला नारदीय वा **नारदपुराण** म्हणतात. यात पंचवीस हजार श्लोक आहेत. जो मनुष्य आश्विनाच्या पौर्णिमेस धेनूसह या पुराणाचे दान करील, तो पुनः जन्मास येणार नाही. त्याला परमसिद्धी प्राप्त होईल. ज्यात पक्ष्यांचा आश्रय घेऊन एका मुनीच्या प्रश्नावरून धर्मचारी मुनींकडून धर्म व अधर्म यांचा विचार केला आहे, ज्याचे मार्कंडेयांनी वर्णन केले आहे त्यास **मार्कंडेयपुराण** म्हणतात. याची श्लोकसंख्या नऊ हजार आहे. जो मनुष्य हे पुराण लिहून सुवर्णनिर्मित हत्तीसह कार्तिकी पूर्णिमेस दान करील, त्याला पुंडरीकयज्ञाचे फळ प्राप्त होईल. ज्यात ईशानकल्पातील वृत्तांताचा आश्रय घेऊन अग्नीने महर्षी वसिष्ठांना उपदेश केला आहे, त्याला आग्नेय वा **अग्निपुराण** म्हणतात. याची श्लोकसंख्या सोळा हजार आहे. जो मनुष्य हे लिहून पुस्तक सुवर्णनिर्मित कमल व तिलधेनू यांच्यासहित मार्गशीर्षातील पौर्णिमेस विधिविधानासह दान करील, त्याला संपूर्ण यज्ञाचे फळ प्राप्त होईल.

ज्यात अघोरकल्पाच्या वृत्तांताचा आश्रय घेऊन सूर्याच्या माहा-

त्याचे वर्णन ब्रह्मदेवांनी मुनीसाठी केले व ज्यात जगाची स्थिती आणि प्राणिसमूह यांचे वर्णन केले आहे, ज्यात प्रायः भविष्यकालीन चरित्रांचे वर्णन झाले आहे, त्यास **भविष्यपुराण** म्हणतात. त्यात चौदा हजार पांचशे श्लोक आहेत. जो मनुष्य ईर्ष्याद्वेषरहित होऊन पौषमासाच्या पौर्णिमेस गुळासह पूर्ण कुंभाचे दान करतो, त्याला अग्निष्टोमयज्ञाच्या फलाची प्राप्ती होते. ज्यात रथन्तरकल्पातील वृत्तांताचा आश्रय घेऊन सावर्णी मनूनें नारदांसाठी भगवान श्रीकृष्णांचे श्रेष्ठ माहात्म्य वर्णन केले आहे, ज्यात ब्रह्मवराहाचा वृत्तांत वारंवार आला आहे, त्यास **ब्रह्मवैवर्तपुराण** म्हणतात. यात अठरा हजार श्लोक आहेत. जो मनुष्य माघमासातील पौर्णिमेस या पुराणाचे दान करतो, त्यास ब्रह्मलोक प्राप्त होतो.

ज्यात कल्पांताच्या समयी अग्नीचा आश्रय घेऊन देवाधिदेव महेश्वरांनी अग्निर्लिंगाच्या मध्ये राहून धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांच्या प्राप्तीसाठी उपदेश केला आहे, त्या पुराणास स्वतः ब्रह्मदेवांनी **लैंग वा लिंगपुराण** म्हटले आहे. यात अकरा हजार श्लोक आहेत. जो मनुष्य फाल्गुनमासाच्या पौर्णिमेस तिलधेनूसह या पुराणाचे दान करतो, त्याला शिवांच्या साम्यत्वाची प्राप्ती होते. ज्यात मानवकल्पात महावराहाचे पुनः माहात्म्य ध्यानात घेऊन भगवान विष्णूंनी पृथ्वीस उपदेश केला आहे, त्याला भूतलावर बारावे **वराहपुराण** म्हणतात. या पुराणाची श्लोकसंख्या चोवीस हजार आहे. जो मनुष्य गरुडाची सुवर्णमूर्ती बनवून ती तिलधेनूसह, या पुराणासह चैत्री पौर्णिमेस ब्राह्मणास दान करतो, त्याला भगवान विष्णूंच्या पदाची प्राप्ती होते.

ज्यात कल्पांतासमयी स्वामी कार्तिकानें माहेश्वरधर्माचा आश्रय घेऊन शिवांचे चरित्र कथन केले आहे, त्याला **स्कंदपुराण** म्हणतात. ते तेरावे पुराण होय. हे एक्क्याऐंशी हजार एकशे श्लोकांचे आहे. जो मनुष्य हे लिहून याचे सुवर्णमय त्रिशूलासह सूर्य मीनराशीवर आल्यावर दान करतो, त्याला शिवपद प्राप्त होते. ज्यात ब्रह्मदेवांनी त्रिविक्रमाच्या माहात्म्याचा आश्रय घेऊन त्रिवर्गाचे वर्णन केले आहे, त्याला **वामनपुराण** म्हणतात. हे चौदावे पुराण होय. यात दहा हजार श्लोक आहेत. हे

कूर्मकल्पाचे अनुगमन करणारे व मंगलप्रद आहे. जो मनुष्य शरद्कालीन विषुवयोगास याचे दान करतो, त्याला विष्णुपदाची प्राप्ती होते. ज्यात कूर्मरूपी भगवान जनार्दनांनी रसातलातील इंद्रद्युम्नाच्या कथेच्या प्रसंगाने धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांचे माहात्म्य ऋषींना वर्णन करून सांगितले आहे, त्यास कूर्मपुराण म्हणतात. हे पंधरावे पुराण असून लक्ष्मीकल्पाशी संबंध ठेवणारे आहे. यात अठरा हजार श्लोक आहेत. जो मनुष्य सूर्याच्या उत्तरायणाच्या व दक्षिणायनाच्या प्रारंभी सुवर्णनिर्मित कूर्मासह या पुराणाचे दान करतो, त्याला एक हजार गोदानांचे फळ मिळते.

ज्यात कल्पाच्या प्रारंभी भगवान जनार्दनांनी मत्स्यरूप धारण करून मुनींच्यासाठी नृसिंहावताराचा आश्रय घेऊन सातही कल्पांचा वृत्तांत वर्णन केला आहे, त्याला मत्स्य वा मात्स्यपुराण म्हणतात. यात चौदा हजार श्लोक आहेत. हे सोळावे पुराण होय. जो मनुष्य विषुवयोगावर सुवर्णनिर्मित मत्स्य, दुभती गाय यांच्यासह हे पुराण दान करतो, त्याला समग्र पृथ्वीच्या दानाचे फळ प्राप्त होते. ज्यात भगवान श्रीकृष्णांनी गरुडकल्पाच्या समयी ब्रह्मांडापासून झालेल्या गरुडाच्या उत्पत्तीचा आश्रय घेऊन उपदेश केला आहे, त्याला गरुडपुराण म्हणतात. हे सतरावे पुराण असून यात एकोणीस हजार श्लोक आहेत. जो पुरुष सुवर्णनिर्मित हंसासह पुराणाचे दान करतो, त्याला सिद्धी प्राप्त होऊन शिवलोकात निवास मिळतो. ज्यात ब्रह्मदेवांनी पुनः ब्रह्मांडाच्या माहात्म्याचा आश्रय घेऊन भविष्यकल्पाचे वर्णन केले आहे त्यास ब्रह्मांडपुराण म्हणतात. हे शेवटचे अठरावे पुराण होय. यात बारा हजार दोनशे श्लोक आहेत. जो मनुष्य व्यतिपात नावाच्या योगात पिवळ्या रंगाच्या लोकरीच्या वस्त्रासह या पुराणाचे दान करतो, त्यास राजसूययज्ञाच्या फळाची प्राप्ती होते.

## आणि ही उपपुराणे

याच अध्यायात शेवटी उपपुराणांचे वर्णन आले आहे. पद्मपुरा-

णात जे नृसिंहावताराचे वर्णन आले आहे, त्याला **नृसिंहपुराण** म्हणतात. त्यात अठरा हजार श्लोक आहेत. ज्यात स्वामिकार्तिकाने नंदीच्या माहात्म्याचे वर्णन केले आहे, त्यास **नंदीपुराण** म्हणतात. जेथे भाविष्याच्या चर्चेसहित सांबाचे वर्णन केले आहे, त्यास **सांबपुराण** म्हणतात. सूर्यमहिमा यात आहे, म्हणून आदित्यपुराण असेही याला म्हणतात. वरील अठरा पुराणांशिवाय जी पुराणे आहेत, ती त्यातूनच निघाली आहेत, असे समजावे. पुराणांची सर्गादी पांच अंगे असून त्यांत आख्यानेही असतात. सर्ग (ब्रह्मदेवांनी केलेली सृष्टिरचना), प्रतिसर्ग (ब्रह्मदेवांच्या मानसपुत्रांनी केलेली सृष्टिरचना), वंश (सूर्य, चंद्र, अग्नी इत्यादी), मन्वन्तरे (स्वायंभुव आदी मनूंचा कार्यकाल), वंशानुचरित (पूर्वोक्त वंशातील श्रेष्ठ व्यक्तींची चरित्रे), अशी पांच लक्षणे पुराणांची आहेत. या पांचही लक्षणांनी युक्त अशा सर्व पुराणांत ब्रह्मदेव, विष्णू, सूर्य व रुद्र, भुवनमाहात्म्य यांची वर्णने आहेत. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचीही वर्णने यांत आहेत. यांच्या विरुद्ध आचरण करणाऱ्यांना जे फळ मिळते, त्याचे वर्णन यांत आहे.

सत्त्वगुणप्रधान पुराणांत भगवत विष्णूंच्या माहात्म्याची, रजोगुणप्रधान पुराणांत ब्रह्मदेवांची व तमोगुणप्रधान पुराणांत अग्नी व शिव यांची महती असते. उपपुराणांत सरस्वती व पितर यांचे वृत्तांत असतात सत्यवतीनंदन व्यासांनी या पुराणांची रचना करून यांतील कथानकांना संबंधित अशा पूर्ण महाभारत नावाच्या इतिहासाची रचना केली. हा ग्रंथ वेदांच्या अर्थाने संपन्न आहे. याची श्लोकसंख्या एक लाख आहे महर्षी वाल्मीकींनी ज्या रामकथेचे वर्णन केले आहे, त्याच्याही आधी शंभर कोटी श्लोकांत ब्रह्मदेवांनी ही कथा नारदांना सांगितली. नारदांनी ती वाल्मीकींना दिली. धर्म, अर्थ, काम यांच्या साधनेसाठी त्यांनी रामायणाचा प्रचार केला. विद्वान लोक या पुराणांना पुरातन कल्पांच्या कथा मानतात. या पुराणांचा अभ्यास धन, यश व आयुष्य यांची वृद्धी करणारा आहे ही परमपवित्र व यशाचा खजिना आहेत. पितरांनाही परम प्रिय आहेत. देवांनाही अमृताप्रमाणे असूनही मनुष्यांची पापे दूर करणारी आहेत.

## नक्षत्रपुरुष व्रतविधी

यानंतर चोपन्नाव्या अध्यायापासून पुढे सुमारे शंभराव्या अध्यायापर्यंत विविध व्रतविधींची माहिती आली आहे. मत्स्यभगवानांनी मनूसाठी या व्रतांचे वर्णन केले आहे. पूर्वी नारदांनी एक प्रश्न भगवान शिवांना विचारला होता. कोणत्या साधनाने मनुष्यास धनसंपत्ती, सौंदर्य, आरोग्य, आयुष्य, भाग्य, इत्यादींचा लाभ होईल ? हा तो प्रश्न होता. तेव्हा महादेवांनी नारदांना नक्षत्रपुरुषव्रताचा विधी समजावून दिला.

चैत्रमासात भगवान विष्णूंचे कीर्तन करून एक विष्णूंची मूर्ती बनवावी. या मूर्तीची पूजा करावी. मूलनक्षत्रात 'विश्वधराय नमः' म्हणून दोनही चरणांची, रोहिणीनक्षत्रात 'अनन्ताय नमः' म्हणून दोनही घोटयांची, अश्विनीनक्षत्रात 'वरदाय नमः' म्हणून दोनही गुढघ्यांची व मांडयांची, पूर्वाषाढा व उत्तराषाढा नक्षत्रांत 'शिवाय नमः' म्हणून दोनही पायांची, पूर्वाफाल्गुनी व उत्तराफाल्गुनी नक्षत्रांत 'पाञ्चशराय नमः' म्हणून जननेंद्रियाची पूजा करावी.

कृत्तिकानक्षत्रात 'शार्ङ्गधराय नमः' म्हणून भगवान विष्णूंच्या कटीची पूजा करावी. पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा या नक्षत्रांत 'केशिनिषूदनाय नमः' म्हणून दोनही पार्श्वभागांची पूजा करावी. रेवतीनक्षत्रात 'दामोदराय नमः' म्हणून दोनही कुक्षींची पूजा करावी. अनुराधानक्षत्रात 'माधवाय नमः' म्हणून वक्षःस्थळाची पूजा करावी. धनिष्ठात 'अघौघविध्वंसकराय नमः' म्हणून पृष्ठभागाची पूजा करावी. विशाखानक्षत्रात 'श्रीशङ्खचक्रासिगदाधराय नमः' म्हणून भुजांची पूजा करावी.

हस्तनक्षत्रात 'मधुसूदनाय नमः' म्हणून विष्णूंच्या चारही हातांची पूजा करावी. पुनर्वसुनक्षत्रात 'साम्नामधीशाय नमः' म्हणून अंगुलींच्या अग्रभागांची पूजा करावी. आश्लेषानक्षत्रात 'मत्स्यशरीरभाजः पादौ शरणं व्रजामि' म्हणून नखांची पूजा करावी. ज्येष्ठानक्षत्रात 'कूर्मस्य पादौ शरणं व्रजामि' म्हणून कंठस्थानाची पूजा करावी. श्रवणनक्षत्रात 'वराहाय नमः' म्हणून भगवानांच्या दोनही कानांची पूजा करावी.

पुष्यनक्षत्रात 'दानवसूदनाय नृसिंहाय नमः' म्हणून मुखाची अर्चना करावी. स्वातीनक्षत्रात 'कारणवामनाय नमो नमः' म्हणून वामनरूपधारी भगवानांच्या दातांची पूजा करावी. शतभिषक्‌नक्षत्रात 'भार्गवनन्दनाय नमः' म्हणून मुखाच्या मध्यभागाची पूजा करावी. मघा नक्षत्रात 'रामाय नमोऽस्तु' म्हणून रघुनंदनांच्या नाकाची पूजा करावी. मृगशिरानक्षत्रात 'विघूर्णिताक्ष राम! ते नमोऽस्तु' म्हणून उत्तमांगरूप नेत्रांची पूजा करावी. चित्रानक्षत्रात 'शान्ताय बुद्धाय नमः' म्हणून त्या भगवानांच्या ललाटाची पूजा करावी. भरणीनक्षत्रात 'विश्वेश्वर कल्किरूपिणे नमोऽस्तु' म्हणून भगवान विष्णूंच्या शिराची पूजा करावी. आर्द्रानक्षत्रात 'हरये नमस्ते' म्हणून भगवानांच्या केसांची पूजा करावी. व्रती मनुष्याने या नक्षत्रदिवसांत श्रेष्ठ ब्राह्मणांचीही भक्तिपूर्वक पूजा करावी.

## आदित्यशयन व्रतविधी

पंचावन्नाव्या अध्यायात आदित्यशयन व्रतविधीचे विवरण आले आहे. या व्रतात विधिपूर्वक भगवान शंकरांची पूजा करावी लागते. हस्तनक्षत्रासह सप्तमीस रविवार असेल तर ही तिथी सर्व कामना पूर्ण करणारी असते. या दिवशी सूर्याच्या नामांनी भगवती पार्वती व महादेव यांची पूजा करावी. उमापती शंकर व सूर्य यांच्यांत भेद मानू नये. हस्तनक्षत्रात 'सूर्याय नमः' म्हणून त्यांच्या घोटच्यांची पूजा करावी. चित्रानक्षत्रात 'अर्काय नमः' म्हणून दोनही घोटच्यांची, स्वातीनक्षत्रात 'पुरुषोत्तमाय नमः' म्हणून पिढऱ्यांची, 'धात्र नमः' म्हणून गुढघ्यांची व अनुराधानक्षत्रात 'सहस्रभानवे नमः' म्हणून दोनही मांड्यांची पूजा करावी. ज्येष्ठानक्षत्रात 'अनंगाय नमः' म्हणून गुह्यप्रदेशाची, मूलनक्षत्रात 'इंद्राय नमः' व 'भीमाय नमः' म्हणून कटिभागाची पूजा करावी.

पूर्वाषाढा व उत्तराषाढानक्षत्रांत 'त्वष्ट्रे नमः व 'सप्ततुरंगाय नमः' म्हणून नाभीची, श्रवणनक्षत्रात 'तीक्ष्णांशवे नमः' म्हणून दोनही कुक्षींची, धनिष्ठात 'विकर्तनाय नमः' म्हणून पृष्ठभागाची, शतभिषनक्षत्रात 'ध्वान्तविनाशाय नमः' म्हणून सूर्याच्या वक्षःस्थलाची पूजा

करावी. पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदानक्षत्रात ‘चंडकराय नमः’ म्हणून दोनही भुजांची, रेवतीत ‘साम्नामधीशाय नमः’ म्हणून दोनही हातांची पूजा करावी. अश्विनीनक्षत्रात ‘सप्ताश्वधुरंधराय नमः’ म्हणून नखांची व भरणीत ‘कठोरधाम्ने नमः’ म्हणून सूर्याच्या कंठाची पूजा करावी. कृत्तिकानक्षत्रात ‘दिवाकराय नमः’ म्हणून ग्रीवेची, रोहिणीत ‘अम्बुजेशाय नमः’ म्हणून सूर्याच्या ओठांची, मृगशिरात ‘हरये नमस्ते’ म्हणून जिव्हेची, आर्द्रा नक्षत्रात ‘रुद्राय नमः’ म्हणून दातांची, पुनर्वसु-नक्षत्रात ‘सवित्रे नमः’ म्हणून नाकाची, पुष्यात ‘अम्भोरुहवल्लभाय नमः’ म्हणून ललाटाची व ‘वेदशरीरधारिणे नमः’ म्हणून शिवांच्या केसांची पूजा करावी. आश्लेषात ‘विबुधप्रियाय नमः’ म्हणून मस्तकाची, मघात ‘गो-गणेशाय नमः’ म्हणून दोनही कानांची, पूर्वाफाल्गुनीत ‘गो-ब्राह्मणनन्दनाय नमः’ म्हणून शंभूंच्या नेत्रांची आणि उत्तराफाल्गु-नीत ‘विश्वेश्वराय नमः’ म्हणून दोनही भुवयांची पूजा करावी.

‘पाश, अंकुश, त्रिशूल, कमळ, कपाळ, सर्प, चंद्रमा व धनुष्य धारण करणाऱ्या शिवांना नमस्कार असो. गजासुर, कामदेव, त्रिपुर व अंधकासुर आदींच्या विनाशाचे कारण श्रीशिव यांना नमस्कार असो.’ अशी प्रार्थना करून प्रत्येक अंगाची पूजा करावी व ‘विश्वेश्वराय नमः’ म्हणून भगवान शंकरांचे पूजन करावे. यानंतर भोजन करावे.

## श्रीकृष्णाष्टमी व्रतविधी

हे व्रत समस्त पापांचा नाश करणारे आहे. या व्रताने मनुष्यास शांती, मुक्ती व विजय यांची प्राप्ती होते. मार्गशीर्षात शंकरांची व पौषात शंभूंची पूजा करावी. माघात देवाधिदेव महेश्वरांची, फाल्गुनात महा-देवांची, चैत्रात स्थाणूंची, वैशाखात शिवांची पूजा करावी. ज्येष्ठात पशुपतींची, आषाढात उग्रांची अर्चना करावी. श्रावणात शर्वांची, भाद्र-पदात त्र्यंबकांची, आश्विनात हरांची व कार्तिकात ईशानाची पूजा करावी. धनसंपत्तीची इच्छा करणाऱ्याने सर्व मासांच्या कृष्णपक्षातील अष्टमींना आपल्या शक्तीस अनुसरून गाय, पृथ्वी, सुवर्ण, वस्त्र यांनी शिवभक्त ब्राह्मणांचे पूजन करावे. रात्री गोमूत्र, गोघृत, गोदुग्ध, तिल,

यव, कुशोदक, गोशृंगोदक, शिरीषपुष्प, मंदारपुष्प, बिल्वपत्र, दही यांच्या मिश्रणाने वा पंचगव्याने शंकरांची पूजा करावी.

## रोहिणीचन्द्रशयन व्रतविधी

सत्तावन्नाव्या अध्यायात शंकरांनी नारदांना रोहिणीचंद्रशयन व्रत-विधी समजावून सांगितला आहे. चंद्राच्या नामांनी भगवान नारायणांच्या प्रतिमेची पूजा करावी. सोमवारी पूर्णिमा असल्यास अथवा पूर्णिमेस रोहिणीनक्षत्र आल्यास मनुष्याने सकाळी स्नान वगैरे करून 'आप्या-यस्व०' इत्यादी मंत्रांचा एकशेआठ वेळा जप करावा. नंतर फुलांनी भगवान मधुसूदनांची पूजा करावी.

'सोमाय नमः' म्हणून भगवानांच्या दक्षिणचरणाची, 'शान्ताय नमः' म्हणून वामचरणाची, 'अनन्तधाम्ने नमः' म्हणून त्यांच्या गुढघ्यांची व पिंडऱ्यांची, 'जलोदराय नमः' म्हणून त्यांच्या दोनही मांड्यांची आणि 'अनन्तबाहवे नमः' म्हणून जननेंद्रियाची पूजा करावी. 'कामसुखप्रदाय नमो नमः' म्हणून चंद्ररूप भगवानांच्या कटिभागाची अर्चना करावी. याचप्रकारे 'अमृतोदराय नमः' म्हणून उदराची व 'शशांकाय नमः' म्हणून नाभीची पूजा करावी. 'चंद्राय नमोऽस्तु' म्हणून कंठाची व 'द्विजानामधिपाय नमः' म्हणून दातांची पूजा करावी. 'चंद्रमसे नमः' म्हणून मुखाची, 'कुमुद्वन्तवनप्रियाय नमः' म्हणून ओठांची, 'वनौषधीनां नाथाय नमः' म्हणून नाकाची, 'आनंदबीजाय नमः' म्हणून दोनही भुवयांची, 'इन्दीवरव्यासकराय नमः' म्हणून नेत्रांची, 'समस्ताध्वरवन्दिताय दैत्यनिषूदनाय नमः' म्हणून दोनही कानांची, 'उदधिप्रियाय नमः' म्हणून चंद्राच्या ललाटाची, 'सुषुम्ना-धिपतये नमः' म्हणून केसांची पूजा करावी. 'शशांकाय नमः' म्हणून मस्तकाची व 'विश्वेश्वराय नमः' म्हणून किरीटाची पूजा करावी. 'रोहिणिनामलक्ष्म्यै सौभाग्यसौख्यामृतसागराय पद्मश्रियै नमः' म्हणून लक्ष्मीस नमस्कार करावा. मंत्राचा उच्चार करून सुगंधित पुष्प, नैवेद्य, धूप, दीप इत्यादींनी इन्दुपत्नी रोहिणीदेवीचे पूजन करावे.

दुसऱ्या दिवशी स्नान केल्यावर 'पापविनाशाय नमः' म्हणून

ब्राह्मणास घृत व सुवर्ण यांनी भरलेला जलपूर्ण कलश दान करावा. चंद्ररूप भगवान विष्णूंना कदंब, नीलकमळ, केवडा, जातिपुष्प, कमळ, शतपत्रिका, सिंदुवार, चमेली, श्वेतपुष्पे, करवीरपुष्प, चाफा इत्यादी फुले वाहावीत:

## जगद्धात्री सतीची आराधना

यानंतर अठ्ठावन्नाव्या अध्यायात तलाव, बाग, विहीर, पुष्करणी, देवमंदिर यांच्या निर्मितीचे विधान आले आहे. पुढल्या अध्यायात वृक्ष लावण्याचा विधी सांगितला आहे: साठाव्या अध्यायात सौभाग्यशयन-व्रताचा विधी सांगून जगद्धात्री सतीची आराधना कशी करावी हे विशद केले आहे.

सतीच्या आराधनेसाठी चैत्रमासाच्या शुक्ल तृतीयेस मनुष्याने तिलमिश्रित जलाने स्नान करावे. या दिवशी शंकराचा विवाह सतीशी झाला होता. गौरी व शंकर यांची यथाविधी पूजा करावी. ' पाटलायै नमोऽस्तु ', ' शिवाय नमः ' या मंत्रांनी क्रमशः पार्वती व शिव यांच्या चरणांचे, ' जयायै नमः ', ' शिवाय नमः ' म्हणून दोघांच्या जंघाचे, ' त्रिगुणाय रुद्राय नमः ', ' भवान्यै नमः ' म्हणून घोट्याचे, ' भद्रेश्वराय नमः ', ' विजयायै नमः ' म्हणून गुढघ्यांचे, ' हरिकेशाय नमः ', ' वरदायै नमः ' म्हणून ऊरूंचे, ' शंकराय नमः ', ' ईशायै नमः ' म्हणून दोनही कटिभागांचे, ' कोटव्यै नमः ', ' शूलिने नमः ' म्हणून कुक्षिभागांचे, ' शूलपाणये नमः ', ' मंगलायै नमः ' म्हणून उदरांचे पूजन करावे. ' सर्वात्मने नमः ', ' ईशान्यै नमः ' म्हणून दोनही स्तनांची, ' वेदात्मने नमः ', ' रुद्राण्यै नमः ' म्हणून कंठाची, ' त्रिपुरघ्याय नमः ', ' अनन्तायै नमः ' म्हणून दोनही हातांची पूजा करावी.

यानंतर ' त्रिलोचनाय नमः ', ' कालानल प्रियायै नमः ' म्हणून बाहूंची, ' सौभाग्यभवनाय नमः ' म्हणून आभूषणांची पूजा करावी. ' स्वाहास्वधायै नमः ', ' ईश्वराय नमः ' म्हणून दोघांच्या मुखमंडलाची, ' अशोकमधुवासिन्यै नमः ' या मंत्राने ऐश्वर्य प्रदान करणाऱ्या ओठांची, ' स्थाणवे नमः ', ' चंद्रमुखप्रियायै नमः ' म्हणून मुखाची, ' अर्धनारी-

श्वराय नमः', 'असितांग्यै नमः' म्हणून नाकाची, 'उग्राय नमः' 'ललितायै नमः' म्हणून दोनही भुवयांची, 'शर्वाय नमः', 'वासव्यै नमः' म्हणून केसांची, 'श्रीकंठनाथाय नमः' म्हणून शिवांच्या केसांची पूजा करावी: 'भीमोग्रसमरूपिण्यै नमः', 'सर्वात्मने नमः' म्हणून दोघांच्या मस्तकांची पूजा करावी: या प्रकारे शिवपार्वतींची पूजा करून त्यांच्यासमोर सौभाग्याष्टक ठेवावे.

## अनन्ततृतीया व्रतविधी

या व्रतासाठी व्रतीनें भाद्रपद, वैशाख, पौष अथवा मार्गशीर्ष मासाच्या शुक्लपक्षातील तृतीया तिथीस स्नान करून गोरोचन, गोमूत्र, गोमय, दही व चंदन यांचा तिलक लावावा. हे व्रत ललितादेवीस अत्यंत प्रिय आहे. देवीस पंचगव्याने स्नान घालावे. नंतर दुधानें स्नान घालून श्वेतपुष्प, अनेक फळे, श्वेत जिरे, मीठ, गूळ, दूध, तूप इत्यादींनी देवीची पूजा करावी. प्रत्येक शुक्लपक्षातील तृतीयेस देवीच्या मूर्तीची चरणापासून मस्तकापर्यंत संक्षेपानें पूजन करावे.

'वरदायै नमः' म्हणून दोनही चरणांचे, 'श्रियै नमः' म्हणून दोनही घोटयांचे, 'अशोकायै नमः' म्हणून दोनही मांडयांचे, 'पार्वत्यै नमः' म्हणून दोनही गुडघ्यांचे, 'मंगलकारिण्यै नमः' म्हणून दोनही ऊरूंचे, 'वामदेव्यै नमः' म्हणून कटिप्रदेशाचे, 'पद्मोदरायै नमः' म्हणून उदराचे, 'कामश्रियै नमः' म्हणून वक्षःस्थलाचे अर्चन करावे. 'सौभाग्यदायिन्यै नमः' म्हणून दोनही हातांची, 'श्रियै नमः' म्हणून बाहूंची, उदराची, मुखाची, 'दर्पणवासिन्यै नमः' म्हणून दातांची, 'स्मरदायै नमः' म्हणून हास्याची, 'गौर्यै नमः' म्हणून नाकाची, 'उत्पलायै नमः' म्हणून नेत्रांची, 'तुष्टयै नमः' म्हणून ललाटाची, 'कात्यायन्यै नमः' म्हणून शिराची, केसांची पूजा करावी. यानंतर 'गौर्यै नमः', 'धिष्ण्यै नमः', 'कान्त्यै नमः', 'श्रियै नमः', 'रम्भायै नमः', 'ललितायै नमः' 'वासुदेव्यै नमः', म्हणून देवीच्या चरणांना नमस्कार करावा.

## रसकल्याणिनी व्रतविधी

यानंतर त्रेसष्टाव्या अध्यायात पापनाशिनी अशा आणखी एका तृतीयेचे वर्णन शिवांनी नारदांसाठी केले. माघमासात शुक्लपक्षाच्या तृतीयेस प्रात:काळी व्रतीने गोदुग्ध व तिलमिश्रित जलाने स्नान करावे. देवीच्या मूर्तीस मध व उसाचा रस यांनी स्नान घालावे. नंतर सुगंधित जलाने स्नान घालून तिला कुंकवाचे अनुलेपन करावे. यानंतर 'ललितायै नमः' म्हणून देवीच्या दोनही चरणांची व दोनही घोटयांची पूजा करावी. 'शान्तै नमः' म्हणून मांड्यांची व गुढघ्यांची, 'श्रियै नमः' म्हणून पायांची, 'मदालसायै नमः', म्हणून कटिभागाची, 'अमलायै नमः' म्हणून उदराची, 'मदनवासिन्यै नमः' म्हणून दोनही स्तनांची, 'कुमुदायै नमः' म्हणून खाद्यांची, 'माधव्यै नमः' म्हणून भुजांची, भुजांच्या अग्रभागांची, 'कमलायै नमः' म्हणून मुखाची व स्मिताची, 'रुद्राण्यै नमः' म्हणून भुवयांची व ललाटाची, 'शंकरायै नमः' म्हणून केसांची, 'विश्ववासिन्यै नमः' म्हणून मुकुटाची, 'कान्त्यै नमः' म्हणून शिराची पूजा करावी.

यानंतर 'मदनायै नमः' म्हणून ललाटाची, 'मोहनायै नमः' म्हणून दोनही भुवयांची, 'चंद्रार्धधारिण्यै नमः' म्हणून दोनही नेत्रांची, 'तुष्टयै नमः' म्हणून मुखाची, 'उत्कण्ठिन्यै नमः' म्हणून कंठाची, 'अमृतायै नमः' म्हणून दोनही स्तनांची, 'रंभायै नमः' म्हणून डाव्या कुक्षीची, 'विशोकायैनमः' म्हणून कटिभागाची, 'मन्मथाधिष्ण्यै नमः' म्हणून हृदयाची, 'पाटलायै नमः' म्हणून उदराची, 'सुरतवासिन्यै नमः' म्हणून कटिप्रदेशाची, 'चंपकप्रियायै नमः' म्हणून ऊरूंची' 'गौर्यै नमः' म्हणून मांड्यांची व गुढघ्यांची, 'गायत्र्यै नमः' म्हणून घोटयांची, 'धराधरायै नमः' म्हणून दोनही चरणांची, 'विश्वकायै नमः' म्हणून शिराची पूजा करून 'भवान्यै नमः,' 'कामिन्यै नमः,' 'कामदेव्यै नमः,' 'जगत्प्रियायै नमः' म्हणून चरणांना प्रणिपात करावा.

## आर्द्रानन्दकरी तृतीयाव्रतविधी

चौसष्टाव्या अध्यायात आणखी एका पापनाशिनी तृतीयेचे वर्णन आले आहे. या तिथीस आर्द्रानन्दकरी म्हणतात. शुक्लपक्षाच्या तृतीयेस पूर्वाषाढा वा उत्तराषाढा, रोहिणी, मृगशिरा, हस्त अथवा मूल नक्षत्र असेल तर त्या दिवशी कुश व चंदनमिश्रित जलाने स्नान करावे. श्वेत वस्त्र धारण करून श्वेत चंदनाचा अनुलेप करावा. महादेवांसहित दिव्य आसनावर भवानीची सुवर्णमय मूर्तीची श्वेत पुष्पांनी आणि सुगंधित पदार्थांनी भक्तिपूर्वक पूजा करावी.

'वासुदेव्यै नमः', 'शंकराय नमः', म्हणून गौरीशंकरांच्या दोनही चरणांचे, 'शोकविनाशिन्यै नमः', 'आनन्दाय नमः', या नावांनी दोनही जंघांचे, 'रंभायै नमः', 'शिवाय नमः', म्हणून दोनही ऊरूंची, 'आदित्यै नमः', 'शूलपाणये नमः', म्हणून कटिप्रदेशाचे, 'माधव्यै नमः', 'भवाय नमः', म्हणून नाभीचे, 'अनन्दकारिण्यै नमः' 'इन्दुधारिणै नमः', म्हणून दोनही स्तनांचे. 'उत्कण्ठिन्यै नमः।', 'नील-कण्ठाय नमः', म्हणून कंठाचे, 'उत्पलधारिण्यै नमः', 'रुद्राय नमः', म्हणून दोनही हातांचे, 'परिरम्भिण्यै नमः', 'त्रिशूलाय नमः', म्हणून दोनही भुजांचे, 'विलासिन्यै नमः', 'वृषेशाय नमः', म्हणून मुखाचे, 'सस्मेरलीलायै नमः', 'विश्ववक्त्राय नमः', म्हणून हास्याचे, 'मदन-वासिन्यै नमः', 'विश्वधाम्ने नमः', म्हणून दोनही नेत्रांचे, 'नृत्यप्रियायै नमः', 'ताण्डवेशाय नमः', म्हणून दोनही भुवयांचे, 'इन्द्राण्यै नमः', 'हव्यवाहाय नमः', म्हणून ललाटाचे, 'स्वाहायै नमः', 'गंगाधराय नमः'. म्हणून मुकुटाचे पूजन करावे. पार्वती व परमेश्वर यांना वंदन करावे. यानंतर पूजनाचा सर्व विधी वर्णन केला आहे.

## भीमद्वादशी व्रतविधी

यानंतर पासष्टाव्या अध्यायात अक्षयतृतीया व्रताचा विधी, सहा-ष्टव्यात सारस्वतव्रतविधी, सदुसष्टाव्या अध्यायात चंद्र-सूर्य ग्रहणाच्या-वेळी करावयाचा स्नानविधी, अडुसष्टाव्या अध्यायात सप्तमीस्नपन-

व्रतविधी, एकोणसत्तराव्यात भीमद्वादशी व्रतविधी इत्यादींचे वर्णन आले आहे.

माघमासाच्या शुक्लपक्षाच्या दशमीस शरीरास तूप लावून तिलमिश्रित जलाने स्नान करावे. 'ॐनमो नारायण' या मंत्राने भगवान विष्णूंची पूजा करावी. 'श्रीकृष्णाय नमः' म्हणून दोनही चरणांची, 'वैकुंठाय नमः' म्हणून कंठाची, 'सर्वात्मने नमः' म्हणून मस्तकाची, 'श्रीवत्सधारिणे नमः' म्हणून वक्षःस्थलाची अर्चना करावी. नंतर 'शंखिने नमः', 'चक्रिणे नमः', 'गदिने नमः', 'वरदाय नमः' आणि 'सर्वं नारायणस्य' म्हणून आवाहन करावे.

यानंतर 'दामोदराय नमः' म्हणून उदराची, 'पंचशराय नमः' म्हणून जननेंद्रियाची, 'सौभाग्यनाथाय नमः' म्हणून दोनही जंघांची, 'भूतधारिणे नमः' म्हणून दोनही गुढघ्यांची, 'नीलाय नमः' म्हणून पिंढऱ्यांची आणि 'विश्वसृजे नमः' म्हणून दोनही चरणांची पूजा करावी. यानंतर 'दैव्यै नमः', 'शान्त्यै नमः', 'लक्ष्म्यै नमः', 'श्रियै नमः', 'पुष्टयै नमः', 'तुष्टयै नमः', 'धृष्टयै नमः', 'हृष्टयै नमः' या मंत्रांनी भगवती लक्ष्मीची पूजा करावी. यानंतर 'विहगनाथाय नमः', 'वायुवेगाय नमः', 'पक्षिणे नमः', 'विषप्रमाथिने नमः' या मंत्रांनी गरुडाची पूजा करावी.

यानंतर गंध, पुष्प, धूप, नाना प्रकारची पक्वान्ने यांनी श्रीकृष्णांची, महादेवांची, गणेशांची पूजा करावी. गायीच्या दुधाच्या खिरीचे मौन-पूर्वक भोजन करावे. नंतर पुरुषाने शंभर पावले चालून वड वा खैर यांच्या काडयांनी दात साफ करावेत. मुख धुऊन आचमन करावे. सायंकालीन संध्या करावी. भगवान नारायणांना नमस्कार करावा. यानंतरचा सर्व विधी पुढे विस्ताराने दिला आहे.

## पण्यस्त्री व्रतविधी

सत्तराव्या अध्यायात मूल्य देऊन खरेदी केलेल्या स्त्रीसाठी एक विधी भगवान शंकरांनी ब्रह्मदेवांना सांगितला आहे. द्वापरयुगात श्रीकृष्णांना सोळा हजार पत्नी होतील. एकदा वसंतऋतूत सर्व नारी

कमलपुष्पांनी सुशोभित अशा सरोवराच्या तटावर जातील. त्यावेळी कोकिळपक्षी कूजन करतील. भ्रमरांचा गुंजारव होईल. शीतल, मंद व सुगंधित वायू सुटेल. यावेळी यदुकुलातील विश्वात्मा भगवान श्रीकृष्ण त्यांच्यासह भ्रमण करतील. याचवेळी अलंकारांनी सुशोभित असलेला सांब या सरोवरापाशी येईल. त्याला पाहून सर्व स्त्रिया अनुरागजन्य दृष्टीनें त्याच्याकडे पाहातील. जगदीश्वर कृष्णांना ध्यानदृष्टीने सर्व प्रकार समजून त्या स्त्रियांना शाप देतील. 'तुमचं चोरांकडून अपहरण होईल.'

यानंतर श्रीकृष्णांनी भविष्यात त्यांचे कल्याण कसे होईल हेही सांगितले. ते म्हणाले, 'महर्षी दाल्भ्यांनी सांगितलेलं व्रत करून तुमचा दासीभाव संपेल. तुमचा उद्धार होईल.' इतके बोलून श्रीकृष्ण निघून जातील. यानंतर अनेक दिवसांनी भगवान वासुदेव पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी मौसलयुद्धाचे आयोजन करतील. यदुवंशाचा विनाश होईल. दस्युगण अर्जुनाला पराजित करून श्रीकृष्णांच्या पत्नींचे अपहरण करतील. आपल्या दुर्गतीनें दुःखी होऊन त्या समुद्रात निवास करतील. त्यावेळी योगात्मे महर्षी दाल्भ्य तेथे येतील. डोळचांत पाणी आणून त्या सर्वजणी त्यांच्या चरणांना प्रणाम करून विलाप करतील. प्रचुरभोग, दिव्य पुष्पमाला, अनुलेपन, जगदीश्वर पती, द्वारकापुरी, नाना रत्नांनी निर्माण केलेली गृहे, देवरूपी कुमार, इत्यादींचे स्मरण होऊन त्या प्रश्न करतील,

'भगवन्, चोरांनी बलपूर्वक आम्हास लुटलं आहे. वशीभूत केलं आहे. आम्ही आमच्या धर्मापासून च्युत झालो आहोत. आता आपणच आमचे आश्रयदाते आहात. भगवान केशवांनी आम्हास पूर्वीच सूचित केलं आहे. श्रीकृष्णांची सोबत होऊनही कोणत्या पापानं आम्हांस असा कुधर्म प्राप्त झाला हे समजत नाही. तपोधना, पण्यस्त्रियांना जो धर्म असेल तो आम्हांस सांगावा.' यानंतर दाल्भ्यांनी त्यांना पण्यस्त्रीधर्म विवरण करून सांगितला. ते म्हणाले,

'नारींनो, पूर्वकाली तुम्ही अप्सरा होता. तुम्ही सर्व अग्नीच्या कन्या होता. तुम्ही एकदा मानससरोवरात जलक्रीडा करण्यात मग्न होता. याचवेळी तुमच्याजवळ नारदमुनी आले. त्यावेळी तुम्ही गर्ववश

होऊन त्यांना प्रणाम केला नाही. उलट त्यांना तुम्ही प्रश्न केलात, 'देवर्षे, भगवान नारायण आमचा पती कसा होईल ?' यावेळी नारदांनी तुम्हांस वरदान व शाप देताना म्हटले, 'तुम्ही चैत्र व वैशाखातील शुक्लपक्षातील द्वादशीस सुवर्णाच्या उपकरणांसह दोन शय्या दान कराव्यात. पुढल्या जन्मी तुम्हास नारायण पती म्हणून प्राप्त होईल. सुंदरता व सौभाग्य यांनी अभिमानी होऊन तुम्ही मला प्रणाम नाही केला. म्हणून नारायणांचा वियोग होऊन तुम्ही चोरांकडून लुटल्या जाल... सुंदरींनो, पूर्वी दानवांच्या, असुरांच्या, शेकडो पत्नींना देवराज इंद्रानं म्हटलं होतं, 'तुम्ही दांभिकांपासून सदा दूर राहावं. तुम्ही गायी, पृथ्वी, सुवर्ण, अन्न यांचं दान करावं. ब्राह्मणांची आज्ञा पाळावी.'

यानंतर त्याने एका व्रताचा महिमाही सांगितला. रविवारी हस्त, पुष्य अथवा पुनर्वसू नक्षत्र असेल तर त्या दिवशी सर्वौषधिमिश्रित जलाने स्नान करावे. नंतर नामसंकीर्तनाबरोबर पुंडरीकाक्षांची अर्चना करावी. 'कामाय नमः' म्हणून दोन पायांची, 'मोहकारिणे नमः' म्हणून जंघांची, 'कंदर्पनिधये नमः' म्हणून जननेंद्रियाची, 'प्रीतिमते नमः' म्हणून कटीची, 'सौख्यसमुद्राय नमः' म्हणून नाभीची, 'रामाय नमः' म्हणून उदराची, 'हृदयेशाय नमः' म्हणून हृदयाची, 'आल्हादकारिणे नमः' म्हणून दोनही स्तनांची, 'उत्कंठाय नमः' म्हणून कंठाची, 'आनंदकारिणे नमः' म्हणून मुखाची, 'पुष्पचापाय नमः' म्हणून वामांगाची, 'पुष्पबाणाय नमः' म्हणून दक्षिणांगाची, 'मानसाय नमः' म्हणून ललाटाची, 'विलोलाय नमः' म्हणून केसांची, 'सर्वात्मने नमः' म्हणून देवाधिदेव पुंडरीकाक्षांच्या सर्वांगाची पूजा करावी.

यानंतर 'शिवाय नमः', 'शान्ताय नमः', 'पाशांकुशधराय नमः', 'गदिने नमः', 'पीतवस्त्राय नमः', 'शंखचक्रधराय नमः', 'नारायणाय नमः', 'कामदेवात्मने नमः', म्हणून भगवान विष्णूंची पूजा करावी. 'सर्व शान्त्यै नमः', 'प्रीत्यै नमः', 'रत्यै नमः', 'श्रियै नमः', 'पुष्टयै नमः', 'तुष्टयै नमः', 'सर्वार्थसम्पदे नमः', म्हणून लक्ष्मीचेही पूजन करावे. याप्रकारे वृतिनी नारीने चंदन, पुष्पमाला, धूप, नैवेद्य आदींनी कामदेव-स्वरूप भगवान विष्णूंची पूजा करावी. ब्राह्मणांना दानधर्म करावा.

## विशोकद्वादशी व्रतविधी

एकाहत्तराव्या अध्यायात अशून्यशयन (द्वितीया) व्रतविधीची माहिती आलेली आहे. बहात्तराव्या अध्यायात अंगारकव्रताचा विधी समजावून दिला आहे. पुढल्या त्र्याहत्तराव्या अध्यायात शुक्र व गुरू यांच्या पूजेचा विधी आलेला आहे. पुढल्या अध्यायात कल्याणसप्तमी व्रतविधीचे माहात्म्य वर्णन केले आहे. या नंतरच्या अध्यायांत विशोक सप्तमीव्रतविधी, फलसप्तमी व्रतविधी, शर्करसप्तमी व्रतविधी, कमल-सप्तमी व्रतविधी, मंदारसप्तमीव्रतविधी, शुभसप्तमी व्रतविधी; इत्यादी व्रतांची माहात्म्ये आलेली आहेत. एक्क्यांशिव्या अध्यायात विशोकद्वादशी व्रतविधी सांगितला आहे.

व्रतीने आश्विनमासाच्या दशमीतिथीस अल्प आहार घेऊन नियम-पूर्वक राहावे. एकादशीस त्याने उत्तराभिमुख वा पूर्वाभिमुख बसून तोंड धुवावे. निराहार राहून केशवांची व लक्ष्मीची आराधना करावी. दुसऱ्या दिवशी उठून सर्वौषधी व पंचगव्यमिश्रित जलाने स्नान करावे. श्वेत वस्त्र व श्वेत पुष्पांची माळ भगवानांना अर्पण करावी. अशी पूजा करताना 'विशोकाय नमः', म्हणून दोन चरणांची, 'वरदाय नमः', म्हणून दोनही जंघांची, 'श्रीशाय नमः', म्हणून दोनही गुढग्यांची, 'जलशायिने नमः', म्हणून दोनही ऊरूंची, 'कंदर्पाय नमः', म्हणून गुह्यप्रदेशाची, 'माधवाय नमः', म्हणून कटिप्रदेशाची, 'दामोदराय नमः', म्हणून उदराची, 'विपुलाय नमः', म्हणून दोनही पार्श्वभागांची, 'पद्मनाभाय नमः', म्हणून नाभीची, 'मन्मथाय नमः', म्हणून हृदयाची, 'श्रीधराय नमः', म्हणून विष्णूंच्या वक्षःस्थलाची, 'मधुजिते नमः', म्हणून दोनही हातांची, 'चक्रिणे नमः', म्हणून डाव्या भुजाची, 'गदिने नमः', म्हणून उजव्या भुजांची, 'वैकुंठाय नमः', म्हणून कंठाची, 'यज्ञ-मुखाय नमः', म्हणून मुखाची, 'अशोकनिधय नमः', म्हणून नाकाची, 'वासुदेवाय नमः', म्हणून दोनही नेत्रांची, 'वामनाय नमः', म्हणून ललाटाची, 'हरये नमः', म्हणून दोनही भुवयांची, 'माधवाय नमः', म्हणून केसांची, 'विश्वरूपिणे नमः', म्हणून किरिटाची, 'सर्वात्मने

नमः', म्हणून शिराची पूजा करावी.

मोठ्या हर्षाने फल, पुष्पमाला, चंदन आदींनी भगवान गोविंदांची पूजा करून 'देव्यै नमः', 'शान्त्यै नमः', 'लक्ष्म्यै नमः', 'श्रियै नमः', 'पुष्टयै नमः', 'तुष्टयै नमः', 'वृष्टयै नमः', 'हृष्टयै नमः', इत्यादींचा, उच्चार करून लक्ष्मीची अर्चना करावी. द्विजदंपतीस वस्त्र, पुष्पमाला, चंदन आदी अर्पण करून 'जलशायिने नमोऽस्तु' म्हणून जलशायी भगवानांना नमस्कार करावा. विविध प्रकारची दाने करावीत. या व्रतासाठी कमल, करवीर, बाण, कुंकुम, केतकी, सिंदुवार, मल्लिका, गंधपाटला, कादंब कुब्जक, जाती, अशी पुष्पे प्रशस्त मानली गेली आहेत.

## नवग्रह शांतिविधी

ब्याऐंशिव्या अध्यायात गुडधेनुदानविधीचा महिमा वर्णन केला आहे. यानंतरच्या अध्यायात पर्वतदानाचे दहा भेद सांगितले आहेत. धान्यशैल, लवणाचल, गुडाचल, हेमपर्वत, तिलशैल, कार्पासपर्वत, घृतशैल, रत्नशैल, रजतशैल व शर्कराशैल; या दहा पर्वतदानांचा विधी विस्ताराने पुढील अध्यायांतून आला आहे. यानंतर त्र्याण्णव्या अध्यायात शांतिक, पौष्टिक कर्मांच्या, नवग्रहशांतीच्या विधीचे वर्णन केले आहे.

सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पती, शुक्र, शनी, राहू, केतू; हे लोकांना हितकारी ग्रह आहेत. श्वेत तांदुळांच्या वेदीच्या मध्यभागी सूर्याची, दक्षिणेस मंगळाची, उत्तरेस बृहस्पतीची, पूर्वोत्तरकोणात बुधाची, पूर्वेस शुक्राची, दक्षिणपूर्वकोणात चंद्राची, पश्चिमेस शनीची, पश्चिमदक्षिणकोणात राहूची व पश्चिमोत्तरकोणात केतूची स्थापना करावी. या सर्व ग्रहांत सूर्याची शिव, चंद्राची पार्वती, मंगळाची स्कंद, बुधाची विष्णू, बृहस्पतीची ब्रह्म, शुक्राची इंद्र, शनीची यम, राहूची काल, केतूची चित्रगुप्त; अशा अधिदेवता मानल्या गेल्या आहेत. अग्नी, जल, पृथ्वी, विष्णू, इंद्र, ऐन्द्री, प्रजापती, सर्प, ब्रह्मा; या सर्व क्रमशः प्रत्यधिदेवता आहेत. यांशिवाय विनायक, दुर्गा, वायू, आकाश, अश्विनीकुमार यांनाही व्याहृतींच्या उच्चारणांसह आवाहन करावे. ज्या ग्रहाचा जो रंग, त्या रंगाचे फूल त्या ग्रहास वाहावे. त्यांना विविध प्रकारचे नैवेद्य अर्पण करावेत.

वेदीच्या पूर्वोत्तरकोणात एका छिद्ररहित कलशाची स्थापना करावी. दही व अक्षता यांनी त्याला सुशोभित करावे. आम्रपल्लव, वस्त्र, फले, पंचरत्न यांनी त्याला अलंकृत करावे. वरुण, गंगादी नद्या, सर्व समुद्र, सरोवरे यांना आवाहन करून स्थापन करावे. यजमानाने स्नान करून तूप, यव, तांदूळ, तिल; इत्यादींचे हवन करावे. मंदार, पलाश, खैर, आघाडा, पिंपळ, औदुंबर, शमी, दुर्वा, कुश अशा नवग्रहांच्या समिधा असाव्यात. यजमानाने सर्व देवदेवतांसाठी पृथक् पृथक् मंत्राने समिधांचे हवन करावे. चरू आदी हवनीय पदार्थांत तूप मिसळून मंत्रोच्चारपूर्वक हवन करावे. नंतर व्याहृतींचा उच्चार करून तुपाच्या दहा आहुती द्याव्यात. श्रेष्ठ ब्राह्मणाने उत्तराभिमुख अथवा पूर्वाभिमुख बसून प्रत्येक देवतेस मंत्रोच्चारपूर्वक चरू आदी पदार्थांच्या आहुती द्याव्यात.

'आकृष्णेन रजसा०' या मंत्राने सूर्यासाठी हवन करावे. 'आप्यायस्व०' या मंत्राने चंद्राला आहुती द्यावी. मंगळासाठी 'अग्निर्मूर्धा दिवः ककुत्०' या मंत्राचा पाठ करावा. बुधासाठी 'अग्ने विवस्वदुषस०' आणि देवगुरू बृहस्पतीसाठी 'परिदीया रथेन०' या मंत्रांचे पाठ करावेत. शुक्रासाठी 'शुक्रं ते अन्यद्०' हा मंत्र आहे. शनीसाठी 'शं नो देवीरभीष्टये०' या मंत्राने हवन करावे. राहूसाठी 'कया नश्चित्र आभुव०' हा मंत्र आहे. केतूच्या शांतीसाठी 'केतुं कृण्वन्०' या मंत्राचा उच्चार करावा.

यानंतर 'आ वो राजानमध्वरस्य रुद्रम्' या मंत्राचा उच्चार करून रुद्रासाठी हवन करावे. यानंतर उमेसाठी 'आपो हि ष्ठा०' या मंत्राने, कार्तिकस्वामीसाठी, 'स्यो ना०' या मंत्राने, विष्णूंसाठी 'इदं विष्णुः०' या मंत्राने, ब्रह्मदेवांसाठी 'तमीशानम्०' या मंत्राने व इंद्रासाठी 'इन्द्रमिद्देवताय' या मंत्राने आहुती द्यावी. याच प्रकारे यमासाठी 'अयं गौः०' या मंत्राने हवन करावे. कालासाठी 'ब्रह्मजज्ञानम्०' हा मंत्र आहे. चित्रगुप्तासाठी 'अज्ञातम्०' हा मंत्र असून अग्नीसाठी 'अग्नीं दूतं वृणीमहे' मंत्र आहे. वरुणासाठी 'उदुत्तमं वरुणपाशम्' हा मंत्र आहे.

वेदांत पृथ्वीसाठी 'पृथिव्यन्तरिक्षम्०' असा मंत्र आहे. विष्णू-

साठी 'सहस्त्रशीर्षा पुरुषः०' हा मंत्र आहे. इंद्रासाठी 'इन्द्रायेन्द्रो मरुत्वत०' हा मंत्र असून देवीसाठी 'उत्तानपर्णे सुभगे०' असा मंत्र आहे. प्रजापतीसाठी 'प्रजापतिः०' हा हवनमंत्र आहे. सर्पांसाठी 'नमोऽस्तु सर्पेभ्यः०' असा मंत्र असून ब्रह्मदेवांसाठी 'एष ब्रह्मा य ऋत्विग्भ्यः०' असा मंत्र आहे. विनायकासाठी 'अनूनम्०' असा मंत्र असून 'जातवेदसे सुनवाम०' हा मंत्र दुर्गामंत्र म्हणून ओळखला जातो. 'आदिप्रत्नस्य रेतस०' हा आकाशाचा मंत्र आहे. 'क्राणां शिशुर्महीनां च०' हा वायूचा मंत्र आहे. 'एषो उषाअपूर्व्यात्०' हा अश्विनीकुमारांचा मंत्र आहे. 'मूर्धानं दिव०' या मंत्राने हवनकुंडात पूर्णाहुती टाकावी.

हवन समाप्त झाल्यावर मांगलिक गायन, वादन, मंगल अभिषेक इत्यादी कार्यक्रम व्हावा. यजमानाला चार ब्राह्मणांनी अभिषेक करताना म्हणावे, 'ब्रह्मा, विष्णू, महेश अभिषेक करोत. जगदीश्वर वसुदेवनंदन श्रीकृष्ण, सामर्थ्यशाली संकर्षण (बलराम), प्रद्युम्न, अनिरुद्ध या सर्वांनी विजय प्रदान करावा. इंद्र, अग्नी, यम, निऋती, वरुण, पवन, कुबेर, ब्रह्मासह शिव, शेषनाग, दिक्पाल या सर्वांनी तुमचं रक्षण करावं. कीर्ती, लक्ष्मी, घृती, मेधा, पुष्टी, श्रद्धा, क्रिया, नती (नम्रता), बुद्धी, लज्जा, वपु, शांती, तुष्टी, कांती या सर्व माता धर्माच्या पत्नी आहेत. त्यांनी तुम्हांस अभिषेक करावा. सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पती, शुक्र, शनी, राहू, केतू या सर्वांनी तृप्त होऊन तुम्हांस अभिषेक करावा. देवता, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, सर्प, ऋषी, मुनी, गाय, देवमाता, देवपत्नी, वृक्ष, नाग, दैत्य, अप्सरा, अस्त्र, शस्त्र, नृपगण, वाहन, औषध, रत्न, कालाचे अवयव, नद्या, सागर, पर्वत, तीर्थस्थान, मेघ, नद; या सर्वांनी सर्व कामनांच्या सिद्धीसाठी तुम्हांस अभिषेक करावा.'

यानंतर यजमानाने प्रसन्नचित्ताने ऋत्विजांना दक्षिणा द्यावी. दान देताना पृथक् पृथक् प्रार्थना करावी. यानंतर होमहवन, प्रार्थना, आहुती, लक्षहोम; इत्यादींचे विस्ताराने वर्णन आले आहे.

## माहेश्वर व्रतविधी

अध्याय चौऱ्याण्णव्या नवग्रहांच्या स्वरूपांचे वर्णन आले आहे. पंचाण्णव्या अध्यायात माहेश्वरव्रताचा विधी समजावून दिला आहे. हे तीनही लोकांत शिवचतुर्दशी नावाने विख्यात आहे. व्रतीने मार्गशीर्ष शुक्ल त्रयोदशीस एकदा भोजन करून शंकरांना प्रार्थना करावी. 'भगवन्, मी आपणांस शरण आलो आहे. मी चतुर्दशीस निराहार राहून आपली नीट अर्चना करून सुवर्णाच्या वृषभाचं दान करीन व दुसऱ्या दिवशी भोजन करीन.' असा निश्चय करून रात्री नियमपूर्वक शयन करावे. प्रातःकाली स्नानजपादी उरकून कमलपुष्पांनी, पुष्पमालांनी, चंदनाने पार्वतीसहित शंकरांची पूजा करावी. 'शिवाय नमः' म्हणून दोनही चरणांची, 'सर्वात्मने नमः' म्हणून शिराची, 'त्रिनेत्राय नमः' म्हणून नेत्रांची, 'हरये नमः' म्हणून ललाटाची, 'इन्दुमुखाय नमः' म्हणून मुखाची, 'श्रीकंठाय नमः' म्हणून खांद्यांची, 'सद्योजाताय नमः' म्हणून कानांची, 'वामदेवाय नमः' म्हणून भुजांची आणि 'अघोरहृदयाय नमः' म्हणून हृदयाची पूजा करावी.

'तत्पुरुषाय नमः' म्हणून स्तनांची, 'ईशानाय नमः' म्हणून उदराची, 'अनन्तधर्माय नमः' म्हणून दोनही पार्श्वभागांची, 'ज्ञान-भूताय नमः' म्हणून कटीची, 'अनन्तवैराग्यसिंहाय नमः' म्हणून ऊरूंची अर्चना करावी. व्रतीने 'अनन्तैश्वर्यनाथाय नमः' म्हणून गुढघ्यांची, 'प्रधानाय नमः' म्हणून जंघांची, 'व्योयात्मने नमः' म्हणून घोटयांची पूजा करावी. नंतर 'व्योमकेशात्मरूपाय नमः' म्हणून केसांची व पाठीची अर्चना करावी. 'पुष्टयै नमः' व 'तुष्टयै नमः म्हणून पार्वतीची पूजा करावी. यानंतर जलपूर्ण कलशासह श्वेतपुष्पे, श्वेतपुष्पमाला, वस्त्र, पंचरत्नयुक्त सुवर्णमय वृषभ, नानाप्रकारचे खाद्य पदार्थ यांचे दान करावे.

अशा रीतीने सर्व चतुर्दशींस शिव-पार्वतींचे पूजन करावे. प्रत्येक मासात प्रत्येक नामाचा उच्चार करावा. 'शंकराय नमस्तेऽस्तु', 'नमस्ते करवीरक', 'त्र्यंबकाय नमस्तेऽस्तु', 'महेश्वराय नमः', 'महादेवाय

नमः', 'स्थाणवे नमः', 'पशुपतये नमः', 'नाथ नमस्ते', 'शंभवे नमः', 'परमानंद नमस्ते', 'सोमार्धधारिणे नमः', 'भीमाय नमः' असे मार्गशीर्षादी मासांतील चतुर्दशीस म्हणून पार्वतीपती शंकरांची अर्चना करावी.

## विभूतिद्वादशी व राजा पुष्पवाहन

यानंतर शहाण्णव्या अध्यायात सर्वफलत्यागव्रतविधी समजावून दिला आहे. सत्याण्णव्या अध्यायात 'आदित्यवारकल्पविधान' स्पष्ट केले आहे. अठ्ठ्याण्णव्या अध्यायात संक्रांतिव्रताचा उद्यापनविधी आला आहे. नव्याण्णव्या अध्यायात विभूतिद्वादशी व्रताची माहिती आली आहे. या व्रताच्या संबंधात राजा पुष्पवाहनाचा वृत्तान्त शंभराव्या अध्यायात आला आहे.

रथन्तरकल्पात पुष्पवाहन नावाचा एक राजा होता. त्याचे तेज सूर्यासारखे असून तो सर्व लोकांत विख्यात होता. त्याच्या तपस्येने संतुष्ट होऊन ब्रह्मदेवांनी त्याला एक सोन्याच्या कमळासारखे विमान दिले. होते. तो इच्छेनुसार त्यायोगें कोठेंही जाऊ शकत असे. सर्व देवलोक, सात द्वीपे यांत तो फिरत असे. पुष्करद्वीपनिवासी या पुष्पवाहनाचा सातव्या द्वीपावर अधिकार होता. ब्रह्मदेवांनी विमान दिल्यामुळें त्याला सर्व देव व दानव पुष्पवाहन म्हणत असत. त्याच्या पत्नीचे नाव लावण्यवती होते. शंकरांना जशी पार्वती प्रिय, तशी राजाला ही राणी प्रिय वाटे. तिला दहा हजार पुत्र होते. ते परम धार्मिक व धनुर्धारी होते.

एकदा मुनिवर वाल्मीकी राजाकडे आले. राजाने त्यांना विचारले, 'मुनीन्द्र, कोणत्या कारणानं मला हे वैभव प्राप्त झालं? देवांगनांना पराजित करणारी ही सुंदर भार्या मला कशी प्राप्त झाली? माझ्या थोड्या तपानं संतुष्ट होऊन ब्रह्मदेवांनी मला हे कमलगृह कसं प्रदान केलं? प्रचेत, आपण या सर्व बाबींचा उलगडा करावा.'

यानंतर वाल्मीकींनी राजास सर्व वृत्तांत सांगताना म्हटले, 'राजन्, तुझा पूर्वजन्म एका भीषण अशा व्याधकुलात झाला होता. दिवसरात्र तू पापकर्मांत रमत होतास. तुझं शरीर बेडौल होतं. तुझ्या

त्वचेस दुर्गंधी यायची. तुझी नखं फार वाढली होती. तुझं रूपही मोठं कुरूप होतं. तुला त्या जन्मी कुणी मित्र नव्हता. कुणी पुत्र नव्हता. कुणी बंधुबांधव नव्हता. माता नव्हती, बहीण नव्हती. पिता नव्हता. तुला एकच एक अनुकूल अशी पत्नी होती. एकदा भयंकर अनावृष्टी झाली. भुकेनं पीडित होऊन तू अन्नाच्या शोधात होतास. तुला कोणतीच खाद्य-वस्तू प्राप्त झाली नाही.

'एवढ्यात तुझी दृष्टी कमळांनी शोभणाऱ्या एका सरोवरावर पडली: त्यातील अनेक कमलपुष्पं घेऊन तू वैदिश नावाच्या नगरीस गेलास. तू तिथं ती कमलं विकण्याचा प्रयत्न केलास. सर्व दिवसात कुणी विकत घेणारा तुला भेटला नाही. तेव्हा तू पत्नीसह एका भवनाच्या प्रांगणात गेलास. तिथं रात्री तू मंगल शब्द ऐकलेस. मंडपाच्या मध्यभागी भगवान विष्णूंची पूजा होत होती. तिथं अनंगवती नावाची एक वेश्या माघ-मासातील विभूतिद्वादशीच्या व्रताची समाप्ती करून सुवर्ण कल्पवृक्ष, लवणाचल, शय्या यांचं दान करीत होती. तिला पाहून तुझ्या मनात हातातील कमलपुष्पांचा विचार आला. तू ती पुष्पं भगवंतांना वाहण्या-साठी अनंगवतीस दिलीस.

'तुझ्यावर अनंगवती अत्यंत प्रसन्न झाली. या वेळी तुला तीनशे नाणी मिळाली. पण तुम्ही दोघांनी त्यांचा स्वीकार केला नाही. तिनं तुम्हांस भोजनासाठी अन्न दिलं. पण तुम्ही ते त्या दिवशी स्वीकारलं नाही. त्या रात्री तुम्ही जागरण केलंत. दुसऱ्या दिवशी त्या अनंगवतीनं आदरसत्कार करून तुला निरोप दिला: राजेंद्रा, या पुण्यकृत्यामुळं या जन्मी तू राजराजेश्वराच्या रूपात जन्मास आलास. तुझं सारं पाप नष्ट झालं. तुला हे कमलमंदिर प्राप्त झालं. अनंगवती वेश्या या वेळी कामदेवाची पत्नीच्या सवतीच्या रूपानं जन्माला आली. या वेळी तिचं नाव प्रीती होतं. ती सर्व लोकांना आनंद देते. म्हणून राजा, आता तू गंगातटावर जाऊन विभूतिद्वादशीचं अनुष्ठान कर.'

मुनींच्या सांगण्यानुसार राजानें अखंडव्रताचे पालन केले.

## स्नान व तर्पणविधी

यानंतर एकशेंएकाव्या अध्यायात शंकरांनी सांगितलेल्या देवव्रत, रुद्रव्रत, नीलव्रत, प्रीतिव्रत, कामव्रत, सौम्यव्रत, सौभाग्यव्रत, आयुव्रत, कीर्तिव्रत, वीरव्रत, पितृव्रत, आनंदव्रत, धृतिव्रत, अहिंसाव्रत, सूर्यव्रत, विष्णुव्रत, शीलव्रत, दृढव्रत, धेनुव्रत, धराव्रत, महाव्रत, प्राप्तिव्रत, भानुव्रत, वार्षव्रत, त्र्यंबकव्रत, घृतव्रत, इंद्रव्रत, अश्वव्रत, रुद्रव्रत, भवानीव्रत, धामव्रत, शिवव्रत, विश्वव्रत; इत्यादी साठ व्रतांचा महिमा वर्णन केला आहे. एकशेदोनाव्या अध्यायात स्नान व तर्पणविधी यांचे माहात्म्य सांगितले आहे.

शरीर व मन यांच्या शुद्धीसाठी प्रथम स्नानाचे महत्त्व सांगण्यात आले आहे. मूलमंत्राच्या साहचानें, 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राने जलात तीर्थांची कल्पना करावी. हातांत कुश धारण करून विधिपूर्वक आचमन करावें. मंत्रानें गंगेस आवाहन करावें. म्हणावें, 'देवी, तू विष्णूंच्या चरणांपासून प्रकट झाली आहेस. म्हणून तुला वैष्णवी म्हणतात. जन्हुनंदिनी, नलिनी, दक्षा, पृथ्वी, विहगा, विश्वकाया, अमृता, शिवा, विद्याधरी, सुप्रशान्ता, विश्वप्रसादिनी; ही सर्व तुझीच नावं आहेत.'

यानंतर संपुटित हाताने या नामांचा जप करून आपल्या मस्तकावर जल शिंपडावे. विधिपूर्वक पृथ्वीला आमंत्रित करून शरीरास माती लावून स्नान करावे. जलाच्या बाहेर येऊन श्वेतवस्त्र धारण करावे. उपवीती होऊन देवांना तर्पण करताना देव, यक्ष, नाग, गंधर्व, अप्सरा, असुर, क्रूर, सर्प, गरुड, वृक्ष, शृगाल, अन्य पक्षी यांना आमंत्रित करून जल समर्पण करावे. सनक, सनन्दन, सनातन, कपिल, आसुरी, वोढू व पंचशिख यांनाही जलानें तृप्त करावे. मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, प्रचेता, वसिष्ठ, भृगू, नारद; या देवर्षींना व ब्रह्मर्षींना तर्पण करावे.

नंतर अपसव्य करून (जानवे उजव्या खांद्यावर घेऊन) डावा गुढगा जमिनीवर टेकवून अग्निष्वात्त, सौम्य, हविष्मान्, उष्मप, सुकाली,

बर्हिषद्, आज्यप इत्यादी पितरांना भक्तिपूर्वक तिल, जल, चंदन आदींनी तृप्त करावे. हातात कुश घेऊन यम, धर्मराज, मृत्यू, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र, चित्रगुप्त; या पितरांना विधिपूर्वक तर्पण करावे. त्यानंतर आपला पिता, आजोबा इत्यादींना तृप्त करावे.

यानंतर विधिपूर्वक आचमन करून भूमीवर कमलाचे चित्र रेखावे. अक्षद, पुष्पे यांनी सूर्याची पूजा करावी. लालचंदनमिश्रित जलानें सूर्यास अर्घ्य द्यावेत. म्हणावे, ‘ सूर्यदेवा, आपण विष्णुरूप आहात. आपणांस नमस्कार असो. आपण शिवरूप आहात. आपणांस वारंवार नमस्कार असो. पद्मासन, आपण सदा कुंडलं आणि बाजूबंद यांनी शोभत असता. आपणांस अभिवादन असो. सर्वत्र गमन करणाऱ्या सत्यदेवा, आपणांस प्रणाम असो. भास्करा, आपण मजवर प्रसन्न व्हावं. दिवाकरा, प्रभाकरा, आपणांस नमस्कार असो. ’ अशी प्रार्थना करून सूर्यास तीनदा प्रदक्षिणा घालून नमस्कार करावा. ब्राह्मण, गाय, सुवर्ण यांना स्पर्श करून घरी जावे.

## राजाने कसे वागावे ?

यानंतर अध्याय दोनशेपंधरा ते दोनशेत्रेचाळीसपर्यंत भगवान मत्स्यांनी राजा मनूस राजाच्या कर्तव्यासंबंधानें विस्तारानें उपदेश केला आहे. राजाने स्वत: परीक्षा करून आपले सहकारी शूर, कुलीन वंशातील, बलिष्ठ व संपन्न असे निवडावेत. मंत्री रूप, व्यवसाय, पराक्रम, धैर्य, गुण, क्षमा यांनी युक्त असे व क्लेश सहन करणारे असावेत. ते धर्म जाणणारे, प्रिय भाषण करणारे, राजास हितोपदेश करणारे असावेत. सामान्य गुणांच्या लोकांची परीक्षा घेऊन त्यांच्या योग्यतेनुसार त्यांनाही कामे नेमून द्यावीत.

कुलीन, सुशील, धनुर्विद्येत निपुण, गज व अश्व यांच्याबद्दल कुशल, शकुन, अपशकुन जाणणारा, सर्व कर्मांच्या कृतीचा ज्ञाता, सरळ बुद्धीचा, सैन्याच्या व्यूहांचा ज्ञाता, असा ब्राह्मण वा क्षत्रिय राजाचा सेनापती असावा. आकृतीनें उंच, तेजस्वी, रूपवान, सर्व कार्यांत दक्ष, प्रिय भाषण

करणारा, उन्मत्त नसणारा, सर्वांचे चित्त हरण करणारा द्वारपाल सजात असावा. सत्यवादी, सर्व भाषांत निपुण, सशक्त, कलांचे स्वरूप जाणणारा, नीतिज्ञ; असा दूत राजास योग्य असतो. कुलीन, तेजस्वी, शूर, विश्वासू, सेवेत आसक्त, अव्यग्रचित्त; असे उत्तम पुरुष राजाने रक्षणासाठी नेमावेत. फितूर न होणारा, विश्वासू, मनुष्य राजास तांबूल देण्यास योग्य समजावा.

तसेच संधी (शत्रूंशी सख्य), विग्रह (शत्रूंशी युद्ध), यान (शत्रूंवर स्वारी), आसन (राजाची शक्ती कुंठित झाल्यावर त्याने वाट पाहाणे), द्वैध (दुर्बलांशी विरोध, सबलांशी सख्य), आश्रय (मित्रांस साह्य करणे) या सहा गुणांना जाणणारा पुरुष संधी व विग्रहासाठी राजाने नेमावा. राजाच्या सेवकांनी केलेल्या व न केलेल्या कार्यांचा ज्ञाता, आय, व्यय, सर्व लोकांचे वृत्त जाणणारा; असा पुरुष देशाचे रक्षण करण्यासाठी योजावा. रूपाने सुंदर, तरुण, तेजस्वी, पूर्ण विश्वासपात्र, कुलीन, शूर व क्लेश सहन करणारा पुरुष राजाने खड्ग धारण करणारा नेमावा. शूर, बलाढ्य, गज-अश्व-रथ यांविषयी चतुर, सर्व दुःखें सहन करणारा, पवित्र असा पुरुष धनुष्य धारण करणारा असावा. शुभाशुभांचा ज्ञाता, शकुनांचा ज्ञाता, अश्वविद्येत निपुण, भूमिभागज्ञानात चतुर असा मनुष्य राजाच्या अश्वशालेवर असावा.

रथींचे बलाबल जाणणारा, दृष्टी स्थिर असणारा, प्रिय भाषण करणारा, शूर, विद्यासंपन्न असा पुरुष राजाचा सारथी असावा. फितुर न होणारा, पवित्र, चतुर, पाकशास्त्राचा ज्ञाता मनुष्य राजाने पाकशालेवर नेमावा. पाकशालेतील पुरुषांचे केस व नखें कापलेली असावीत. शत्रू व मित्र यांना समान लेखणारा, धर्मशास्त्र जाणणारा, कुलीन ब्राह्मण धर्माधिकारी असावा. सर्व देशांतील लिपी जाणणारा, सर्व शास्त्रांत निपुण असा पुरुष सर्वाधिकारी असावा. तो उत्तम, समांतर ओळींत अक्षरे लिहिणारा, साम, दान, दंड, भेद यांत कुशल, मितभाषणी असावा.

सुवर्णादिक धातू, वस्त्रें, व्याघ्राजिनादी पदार्थ, रत्नें, यांची परीक्षा करणारा, सारासार वस्तूंचा ज्ञाता, फितुर न होणारा, निरंतर पवित्र,

सर्वत्र निपुण, सर्वदा सावध असा पुरुष भांडारगृहावर अध्यक्ष असावा. राजाने आपल्या द्रव्यप्राप्तीच्या स्थानी, व्ययस्थानी धनाध्यक्ष नेमावा. वंशपरंपरागत, उत्तम परीक्षक, फितुर न होणारा, धर्मात्मा, कुलीन असा वैद्य असावा. गज, अश्व यांचे ज्ञाते राजाने नेमावेत. फितुर न होणारा, अति बुद्धिमान, कुलीन, सर्व कर्माबद्दल उत्सुक असा पुरुष राजाने किल्ल्यांच्या रक्षणासाठी नेमावा. गृहरचनेचे शास्त्र जाणणारा, हस्त-लाघवाने युक्त, दीर्घदर्शी, शूर असा पुरुष राजाने उद्यानासाठी व भाल-दारीसाठी नेमावा.

मंत्राने सोडणें, हातानें मोडणे, अस्त्रांचे मंत्रांनी सोडणे, सोडलेल्या अस्त्रांचा उपसंहार करणे, यांबद्दलचा ज्ञाता, स्वस्थचित्त, कुशल पुरुष धनुर्विद्येचा शिक्षक असावा. वृद्ध, कुलीन, सुयुक्त भाषण करणारा, पितृ व पितामह यांच्या परंपरेनें शुची व नम्र असा पुरुष राजाने आपल्या अंतःपुरातील कार्यांवरील अध्यक्ष नेमावा. राजाने गजाध्यक्ष, राजमहात, अश्वाध्यक्ष, किल्लेदार, भालदार, धनुर्विद्याशिक्षक, अंतःपुरातील अध्यक्ष असे सात अधिकारी नेमावेत.

कारण अधिकारी पुरुषांच्या कर्मविपर्यासानें राजा नाश पावतो. म्हणून निश्चय, पराक्रम, भक्ती, शास्त्रादिकश्रवण, शौर्य, कुल, नीती अशा गुणांच्या पुरुषांचा राजाने संग्रह करावा. सर्व मंत्र्यांशी विचार-विनिमय करून राजानें स्वतःच विचार करून निर्णय घ्यावा. राजानें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, धर्मशास्त्र, दंडनीतिरूप अर्थशास्त्र इत्यादी जाणणाऱ्या ब्राह्मणांचा संग्रह करावा. अधम शास्त्रे जाणणाऱ्या मूढांचा संग्रह त्याने करू नये. कारण असे लोक प्रजेस काट्याप्रमाणे दुःखच देणारे असतात. राजानें वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध ब्राह्मणांची नित्य सेवा करावी. त्यांच्यापासून नम्रत्व, नीती इत्यादींचे शिक्षण घ्यावे. अनीती व उन्माद यांनी अनेक राजांचे ऐश्वर्य नष्ट झाले आहे. जितेंद्रिय राजाच प्रजेस स्वाधीन ठेवतो. राजाने यज्ञमार्गानें परमेश्वराची आराधना करावी. त्यानें ब्राह्मणांना दान द्यावे. सर्वांकडून कर ग्रहण करावा. त्याने प्रजेशी पिता व बंधूप्रमाणे वागावे.

राजानें संग्रामातून पराङ्मुख होऊ नये. युद्धातून मागे फिरू नये.

प्रजेचे रक्षण करावे. ब्राह्मणांची सेवा करावी. दरिद्री, अनाथ, वयोवृद्ध, तपोवृद्ध, विद्यावृद्ध, ज्ञानवृद्ध, विधवा इत्यादींचे राजाने पालनपोषण करावे. स्वधर्मापासून भ्रष्ट झालेल्या लोकांना राजाने पुन: धर्मात घ्यावे. ऋषींच्या आश्रमांत अन्न, तेल व पात्रे यांची व्यवस्था करावी. राजाने सर्व ऋषींना सन्मानपूर्वक वागवावे. त्यांची नित्य पूजा करावी. त्याने वक्रबुद्धीचा स्वीकार करू नये. राजाने आपले छिद्र दुसऱ्यास समजू न द्यावे. इतरांचे मात्र जाणावे. अविश्वास दाखविणाऱ्यावर विश्वास ठेवू नये. विश्वासू पुरुषावरही अविश्वास ठेवू नये.

राजाने स्वकार्याचे बकासारखे चिंतन करून पराक्रमाविषयी सिंहासारखे असावे. लांडग्याप्रमाणे शत्रुधनाचा अपहार करावा. ससा-प्रमाणे स्वार्थसाधक वस्तूंचा गुप्तरीतीने संग्रह करावा. राजाने रान-डुकरासारखा तीक्ष्ण प्रहार शत्रूवर करावा. आपला आकार बाहेरून चित्रविचित्र मयूरासारखा सजवून प्रजापालनाविषयी कुत्र्यासारखे विश्वासू असावे. राजाने सर्वांशी कोकिळपक्ष्यासारखे मधुर भाषण करावे. त्याने काकपक्ष्यासारखे निरंतर शंकित असावे. आपली स्थिती कोणासही त्याने समजू देऊ नये. राजाने परीक्षा केल्याशिवाय भोजन व शयन करू नये. वस्त्रे, पुष्पे, अलंकार इत्यादी वस्तूंचा स्वीकार त्याने नीट परीक्षा केल्यावरच करावा. परीक्षा केल्याशिवाय त्याने जलाशया-तही प्रवेश करू नये. राजाने सर्पाप्रमाणे क्रूर अशा गजावर वा अश्वावर आरोहण करू नये. अज्ञात स्त्रीशी त्याने गमन करू नये. त्याने देवांच्या उत्सवांत वास न करावा.

राजाने स्वकीय राज्यलक्ष्मीचे संरक्षण स्वत: करावे. त्याने आपल्या सेवकांना द्रव्यादींनी संतुष्ट करावे. जाणत्यांची सर्वत्र योजना करावी. स्त्रियांबद्दल नपुंसक, उग्र कर्मावर तीक्ष्ण अशी योजना करावी. तीक्ष्ण साधनांचा उपक्रम राजाने करू नये. त्याने परदेशातून आलेल्यांचा बहुमान करावा. वेतन दिल्याखेरीज त्याने कधी सेवा घेऊ नये. वेतनाशिवाय सेवक राजास भीती उत्पन्न करतात. त्याने गुणी सेवकांचा बहुमान करावा. दुष्ट सेवकांना शासन करावे. त्याने व्यापारी, मंत्रविद्या व मसलत यांत निष्णात असलेले ज्योतिषी, वैद्य, संन्यासी, बातमीदार;

इत्यादींना नेमावे, पण त्याने एकाच्याच प्रिय भाषणावर विश्वास मात्र ठेवू नये. आपणांवर प्रीती कोण करतात, आपला द्वेष कोण करतात, हे राजाने जाणावे.

## राजसेवकाने कसे वागावे ?

राजा जे वाक्य बोलेल ते श्रवण करावे. त्याच्या वचनावर आक्षेप घेणारे, निंदामय भाषण सेवकाने कधीही करू नये. राजास अनुकूल असेच बोलावे. अप्रिय पण हितकारक असेल ते त्याने राजास एकांतात बोलावे. सेवकाने सर्वत्र राजकार्य करावे. राजधनाचा नाश होईल असे काही करू नये. त्याने राजासारखी क्रीडा करू नये. अप्रिय ते वर्जावे. राजापेक्षा अधिक वेष करू नये. द्यूतादी कर्मांत त्याने आपले कौशल्य दाखवावे. पण राजाच अधिक होईल, असे त्याने करावे. अंत:पुरातील अधिकारी, शत्रूंचे दूत, दूर गेलेले अधिकारी यांशी राजाज्ञेवाचून स्नेह-संबंध ठेवू नये. राजाचे गुह्य कृत्य सेवकाने लोकांत प्रसिद्ध करू नये. सेवकाने राजास प्रिय वचने बोलावीत. अतिशयोक्तीची भाषणे वारंवार करू नयेत. राजाच्या पुढे कपाळावर आठ्या चढवू नयेत.

राजाची दुष्कर्मे सेवकाने कोठेही बोलू नयेत. राजाने दिलेली वस्त्रे, शस्त्रे, अलंकार स्वत:च धारण करावीत. इतरांना देऊ नयेत. सेवकाने दिवसा निद्रा घेऊ नये. आज्ञेवाचून त्याने राजद्वारात प्रवेश करू नये. सेवकाने राजाच्या दक्षिण अथवा वामभागी बसावे. त्याच्या पुढे बसू नये. जांभई, थुंकणे, खोकणे, क्रोध, जेठा मारून बसणे, भुवया वाकड्या करणे, ओकारी आणणे, ढेकर देणे; ही राजापुढे वर्ज करावीत. चतुर पुरुषाने स्वत:चेच वर्णन राजापुढे करू नये. इतरांकडून युक्तीने ते करवावे. सेवकाने निरंतर आलस्यरहित असावे. अंत:करण निर्मल करून राजाविषयी प्रीती धारण करावी. सेवकाने कपट, लोभ, दुसऱ्याचे दोष सुचविणे, नास्तिकत्व, क्षुद्र कर्म, चपलत्व यांचा त्याग करावा. त्याने एकाग्र मन करून ऐश्वर्यप्राप्तीसाठी राजाची सेवा करावी. राजसेवा ऐश्वर्यवृद्धी करणारी आहे. सेवकाने राजाचा पुत्र, मित्र, प्रधान यांना नित्य नमस्कार करावा. प्रधानांनी राजाचा विश्वास

कदापी धरू नये. जेणेकरून राजा आपणांविषयी अनुकूल राहील असेच सेवकाने वर्तावे. सेवकाविषयी राजा उदास झाला, असे कधी होऊ नये.

## राजधानी कशी असावी ?

सार्वभौम राजाने मध्यदेशात आपली राजधानी करून तेथे वास करावा. त्या देशात तृणे, काष्ठे भरपूर असून तो रमणीय असावा. सर्व मांडलिकांनाही तो देश मान्य असावा. तो देश वैश्य, शूद्र, ब्राह्मण यांनी युक्त असावा. शत्रूच्या स्वाधीन होण्यास तो देश अशक्य असावा. पर्जन्याची अपेक्षा नसेल तर नद्यादिकांच्या पाटांच्या पाण्याने धान्य समृद्ध असावे. अनेक फुले, फळे यांनी तो देश युक्त असावा. राजधानीचे स्थान आपत्काली परचक्राचा प्रवेश होण्यास दुर्घट असावे. सर्प, व्याघ्र, चोर यांनी रहित असावे.

अशा देशात ज्ञानसंपन्न राजाने सहा प्रकारचे किल्ले बांधावेत. १. भुईकोट किल्ला, २. धनुष्यांचा किल्ला, ३. मनुष्यांचा कोट, ४. झाडीतील किल्ला, ५. पाण्यात बांधलेला किल्ला आणि ६. पर्वतावरील किल्ला. यांपैकी डोंगरी किल्ला सर्वोत्तम होय. असा किल्ला सभोवती खंदक व वळकट तट यांनी वेढलेला असावा. त्यावर शेकडो तोफा, मोठमोठी यंत्रे असावीत. राजधानीचे सीमाद्वार पताकांनी सुशोभित असावे. राजा हत्तीवर बसून बाहेर जाईल व आत येईल एवढे ते उंच व रुंद असावे. राजधानीत चार मोठे राजमार्ग असावेत. मुख्य मार्गासमोर एक मोठे देवालय असावे. दुसऱ्या रस्त्याच्या समोर राजमंदिर असावे. तिसऱ्या मार्गावर धर्माध्यक्षाचे गृह असावे. चौथ्या रस्त्यावर गोपुरे व मनोरे असावेत. राजाचे नगर लांब, चतुष्कोण वा वर्तुळाकार असावे.

नदीच्या तीरी वास करणाऱ्या राजाने अर्धचंद्राकार नगर वसवावे. राजाने स्वतःच्या प्रासादाच्या दक्षिणभागी धनाचे भांडारगृह असून त्याच्या दक्षिणेस गजशाला असावी. या गजशालेचे मुख पूर्वेस वा उत्तरेस असावे. शस्त्रशाला, पाकशाला, शिल्पशाला अग्नेयकोणात असाव्यात. राजमंदिराच्या उत्तरेस पुरोहिताचे गृह असावे. सर्व मंत्री, वेदवत्ते, वैद्य

यांची घरे व धान्यागार ही राजवाड्याच्या उत्तरेस असावी. गायी, बैल यांचे गोठे, अश्वशाला यांची योजना राजमंदिराच्या उत्तरेस असावी. अश्वशालेत रात्री अखंड दीप असावा. कोंबड्या, वानरे, माकडे, सवत्स गायी यांना अश्वशालेत ठेवावे. तेथेच शेळ्यांचा संग्रह करावा. पशूंचे शेण सूर्यास्त झाल्यावर काढू नये. या पशूंना शिकविणाऱ्यांची घरे यथास्थानी असावीत.

योद्धे व शिल्पशास्त्रज्ञ यांना किल्ल्यात एकसारखी घरे बांधून द्यावीत. किल्ल्यात मोठे रोग उत्पन्न होतात. म्हणून राजानें गायी, अश्व, गज यांच्या रोगांची चिकित्सा करून त्यांवर उपाय करणाऱ्यांची वसती किल्ल्यातच ठेवावी. अनेक प्रकारच्या आयुधांनी युक्त असे हजारो सैनिक किल्ल्यात असावेत. राजाने किल्ल्यांचे दरवाजे शत्रूस न समजतील असे करावेत. धनुष्ये, गोफणी, भाले, गुरगुज (रवीच्या दांड्यासारखे आयुध), बाण, तलवारी, चिलखते, लोखंडी सोटे, गोळे, व्याघ्र, बरच्या, पाषाण, मुद्गर, त्रिशूल, पट्टे, कुऱ्हाडी, संगिनी, परशू, चक्रे, कवचे, ढाली, कुदळी, सराटे, वेताच्या छड्या, घोड्यावरील सामान, कोंडा, कोयते, निखारे, कोळसे; इत्यादींचा संग्रह राजानें किल्ल्यात करावा.

राजानें सर्व प्रकारची वाद्यें, सर्व औषधी, सर्व जातींची तृणे व काष्ठे यांचाही संग्रह करावा. गूळ, सर्व तेले, गोरस, पशूंच्या उदरांतील चरबी, शिरांसहित अस्थी, बैलाच्या चर्माची नौबद, सर्व धान्ये, अभ्रक, सातू, गहू, रत्ने, सर्व प्रकारची वस्त्रे, सुवर्णादिक धातू, कमलांचे बी, मूग, उडीद, हरभरे, तीळ, सर्व धान्यांचे बी, घूल, गोमय, ताग, वृक्षाचा चीक, पारा, भुर्जपत्रे, कथिल, लाख, टाकणखार, इत्यादी उपयोगी पदार्थ राजाने किल्ल्यात ठेवावेत. सर्प, मदोन्मत्त हत्ती, सिंह, पक्षी यांचाही संग्रह राजानें करावा.

असाणा, बैलघाटी, काकमेचक विष, आवळे, अडुळसा, सालवण, पिठवण, रानमूग, रानउडीद, मेदा व महामेदा, पांढरी व काळी उपळसरी, चिकणा मध, वावडिंग, श्वासनाशक औषधी, भुईकोहळा, डोरलीमूळ, रिंगणीमूळ, अतिविष, शिंगाड्याचा वेल, नील, दर्भ, रेणुकबीज, शिवणीमूळ, गुळवेल, पांढरी भुईकोहळी, ऊस, धामणीचा वृक्ष, वाघंटी,

कडू तोंडली, एरंड, वचनाग, रानगांजा, बडीशेप, द्राक्षी, काळा उंबर, ज्येष्ठमध, खजुराचा वृक्ष, शुक्रधातूचे पोषण करणारी व त्याचा नाश करणारी वनस्पती, पुष्करमूळ, कोथिंबीर, वेखंड, काळा वाळा, साखर, गूळ, काकवी, रानवांगी, महावला, नागवला, शुभ्रकण्हेर, मोह, जस्ताचे फूल, राजहंस नावाची वनस्पती, वाळंतशोप, पाथरी, शतावरी, साखर-लिंबू, चवक, माड, कुहिरीचा वृक्ष, कायफळ, राजगिरा, काळें शिरस, धने, उन्हाळी, गोकर्णी, महाळुंगी, सागरगोटी, मोठा ताग, किराईत, काकडीचे वेल, गुंजाची वेल, पुनर्नवा, पिवळी कस्तुरी, चांदवेल, जायफळ, उंडणीचा वृक्ष, सालींसहित धान्ये, शेंगांतून निर्माण होणारी धान्ये, दूध, मध, ताक, तेल, मज्जा, वसा, घृत, कळंव, अक्रोड, वदाम, सोमवल्ली, शुभ्र वा निळी कोरांटी; इत्यादींचा संग्रह राजाने आपल्या पुरीत करावा.

अशीच आणखीही वृक्षांची, वेलींची नावे दोनशेसतराव्या अध्यायात आली आहेत: दोनशेअठराव्या अध्यायात संग्रहात ठेवण्याजोग्या औषधी वनस्पतींची विस्तृत सूची आहे. बेलफळ, पाडळीची वेल, हिंग, पिंपळी, शिवणी, साळई, भोकरी, अतिविष, शेवगा, मोरवेल, मंजिष्ठ, कवठी, ईर्डलिंबू, लाख, एलची, हिरडा, मनशीळ, शमी, जस्ताचे फूल, कडू दुध्याभोपळा, कवठ, कोष्ठकोळिंजन, उंदिरकानी, चक्रवर्ती, जटामांसी, हळद, मोचरस, सुंठ, मिरी, सैंधव, समुद्राचे मीठ, वावडिंग, मोहऱ्या, मदनवृक्ष, अर्जुनवृक्ष; इत्यादी अनेक वृक्षांचे व वनस्पतींचे औषधी गुण त्यांच्या प्रयोगांसह सांगितले आहेत. यांचा धूप ज्या घरात जळतो, त्यात कृमी, विष, बेटकुळचा, सर्प, यक्षिणी इत्यादींचा त्रास होत नाही. सबंध दोनशेअठरावा अध्याय या औषधी वनस्पतींच्या प्रदीर्घ यादीसाठीच प्रसिद्ध आहे.

दोनशेएकोणिसाव्या अध्यायात राजाने रक्षणासाठी कोणती साधने राजधानीत ठेवावीत, यासंबंधी वर्णन आहे. विष देणारा वा घालणारा मनुष्य राजाने कसा ओळखावा, विषयुक्त अन्न कसे पारखावे, पशुपक्ष्यांवर या अन्नाचा कोणता परिणाम होतो; इत्यादींची विस्तृत चर्चा येथे आलेली आहे.

## राजा व त्याची प्रजा

राजाच्या पुत्राच्या गुरूनें त्यास धर्म, अर्थ व काम यांसंबंधी कसे शिक्षण द्यावे, यासंबंधीचे विवेचन दोनशेविसाव्या अध्यायात आले आहे. गुरूनें त्याला शिल्पविद्या, कौशल्यविद्या शिकवावी. राजपुत्राच्या रक्षणा-साठी अनेक सेवक असावेत. कोपिष्ट, विषयलुब्ध, अपमान पावलेलें यांची संगत राजपुत्रास असू नये. राजपुत्राची योजना सर्व अधिकारांवर गुरूनें व राजानें करावी. मृगया, मद्यप्राशन, द्यूत ही राजाने वर्ज्य करावीत. यांच्या सेवनानें अनेक राजांचा नाश झाला आहे. पृथ्वीपतीनें दिवसा निद्रा घेऊ नये.

राजानें कठोर भाषण, गालिप्रयत्न, उग्र दंड यांचा अवलंब करू नये. राजधानी, गाव, राजमंदिरे, किल्ले यांचा उच्छेद होऊ न देणे. काम, क्रोध, मद, गर्व, लाभ, हर्ष यांना राजानें वर्ज्य करावे. राजानें बाह्य शत्रूंस जिंकावे. शत्रूच्या पराभवाबद्दल त्याने प्रयत्नशील असावे. राजानें गुरूबद्दल आदराने वागावे. राजा, प्रधान, देश, किल्ला, दंड, भांडारगृह व मित्र ही राजाची सात अंगे आहेत. प्रधानादिकांनी राजाचे रक्षण करावे. राजानेही राज्याच्या हितासाठी प्रधानादिकांचे रक्षण करावे. राजाने मृदुवृत्तीने सर्वत्र वागू नये. कोमल स्वभावाने राजाचा पराभव होतो. उग्र स्वभावही बरा नाही. अति क्रूरतेमुळे लोक भयभीत होतात. म्हणून राजाने प्रसंगी मृदू व प्रसंगी भयंकर अशी वृत्ती ठेवावी.

राजानें सर्वांशी विनोद करू नये. कारण सेवक मग राजाची अमर्यादा करतात. राजानें सर्व व्यसने वर्ज्य करावीत. राजानें सर्वांशी हास्यपूर्वक मधुर संभाषण करावे. राजाची दृष्टी प्रायः सर्वत्र स्थूल असावी. राजानें सर्व कार्यांत दीर्घसूत्री नसावे. दीर्घसूत्री राजाचा कार्य-नाश होतो. राजाने आपला संकेत गुप्त ठेवावा. राजाची मसलत प्रसिद्ध झाल्यास त्याच्यावर सर्व विपत्ती येतात. राजाची सर्व कार्ये सिद्ध झाल्या-वरच ती इतरांना समजतात. एकाकी राजानें मसलत करू नये. तशीच ती अनेक लोकांशीही करू नये. नावाड्यांची परीक्षा झाली नसेल तर राजाने त्या नावेवर बसू नसे. पृथ्वी जिंकणाऱ्या राजास जे कोणी विरोध

करतील, त्यांना राजाने साम, दान, दंड व भेद यांनी वश करावे. आपली प्रजा वृद्धिंगत होईल, इकडे राजाने लक्ष द्यावे.

जो राजा आपल्या राष्ट्राचे रक्षण न करता प्रजेला दुःख देतो, तो स्वकीय बांधवांसह लवकरच राज्यावरून पदच्युत होतो. माता-पिता जसे अपत्याचे रक्षण करतात. तसे राजाने आपल्या प्रजेचे रक्षण करावे. दैविक साधन चिंतन करण्यास अशक्य असल्याने मनुष्यास क्रियारूप साधनच मुख्य आहे. पृथ्वीचे पालन करणाऱ्या राजावर जननेची प्रीती वसते. राज्यलक्ष्मीची वाढ होते.

## नाना नैसर्गिक वा दैवी उत्पात व त्यांची शांती

यानंतर दोनशेएकविसाव्या अध्यायात दैव श्रेष्ठ की प्रयत्न श्रेष्ठ असा प्रश्न उपस्थित झाला असून पुरुषप्रयत्नच श्रेष्ठ असल्या:चा निर्वाळा देण्यात आला आहे. पुढल्या अध्यायात सामादिकांचे, या चार उपायांचे वर्णन आले आहे. यानंतरच्या अध्यायात फितुरीचे उपाय सांगितले आहेत. नंतरच्या अध्यायात दान (देणगी) या उपायाची महती वर्णन केली आहे. पुढल्या अध्यायात दंडाचे विवेचन आले आहे. राजाने दंड कसा, कोणास, किती करावा; यांसंबंधी पुढल्याही काही अध्यायांत वर्णन आले आहे. दंड व प्रायश्चित्तविधी यांचे वर्णन दोनशेसत्ताविसाव्या अध्याया-तही आले आहे. नाना अपराध व त्यांनुसार शासन यांचे विस्तृत वर्णन येथे आहे. चोरी, अभक्ष्यभक्षण, व्यभिचार अशा अपराधांपासून वृक्षवेली तोडण्यापर्यंतच्या अनेक अपराधांच्या व दंडांच्या नोंदी केलेल्या आहेत.

दोनशेअठ्ठाविसाव्या अध्यायात आकाशात, अंतरिक्षात, भूमीवर जे महान उत्पात होतात, त्यांची शांती कशी करावी, यासंबंधी उपचार सांगितले आहेत. अद्‌भुत सूचित करणाऱ्या अरिष्टांचे निवारण करण्याचे उपाय पुढल्या अध्यायात आले आहेत.

उल्कापात, सर्व दिशा प्रज्वलित होणे, चंद्र-सूर्यांना खळे पडणे, सायंकाळी आकाशात अनेक रंगांचे ढग दिसणे, धान्य व उदक यांत विकार उत्पन्न करणारी वृष्टी होणे, अकस्मात नाश ओढविणे, भूकंप होणे, सरोवरातील जलात विकार उत्पन्न होणे, इंद्रधनुष्य दिसणे, भूमीचा

ऱ्हास होणे, राक्षस, भूते, पिशाचे यांचे दर्शन होणे, दशदिशा अंधारून येणे, देवांच्या प्रतिमांनी नृत्य करणे, कंपित वा प्रज्ज्वलित होणे, मूर्तींच्या मुखातून धूम, तेल, रक्त, वपा येणे, मूर्तीपासून गर्जना व रुदन होणे, त्यांच्या अंगांतून घाम येणे, त्यांनी भोजन करणे, मूर्तींनी आयुधे फेकणे, प्रतिमांची मुखे खाली होणे, त्यांनी स्थलांतर करणे, देवयात्रेत ध्वज, रथ, कणा यांचे उत्पात होणे; इत्यादी उत्पात व त्यांची शांती यांचे विवरण यात आले आहे.

पुढल्या अध्यायांतही हाच विषय चालू आहे. वृक्षांचे रडणे, अवेळी फळे व फुले येणे, शुष्क वृक्षास अंकुर फुटणे, उभे वृक्ष पडणे, पडलेले पुन्हा उभे राहाणे, विनाकारण वृक्षाची फांदी पडणे, वृक्षातून दूध निघणे, वृक्षापासून मद्याचा स्राव होणे, रोग नसताना वृक्ष सुकणे, शुष्क झालेली झाडे पल्लवित होणे, झाडांनी अग्नीनें पेटून रुदन करणे; इत्यादी दोषांचे राजावर होणारे परिणाम या अध्यायात सांगितले आहेत.

## उदकजनित दोषांचा परिहार

ज्या देशात नद्या, डोह, झरे इत्यादी नगरापासून असून दूर जातात, किंवा समीप येतात, त्यांचे माधुर्य नष्ट होते. त्यांचे प्रवाह निस्तेज, गढूळ, फेसयुक्त झाले तर, ते कृमिकीटकांनी व्याप्त असतील तर राजा व प्रजा यांना सहा महिन्यांच्या आत परचक्राचे भय असते. जेथे डोह, नद्या, सरोवरे यांतून शब्द उत्पन्न होतात, भूमी न खणता उदक निर्माण होते, सरोवरे निर्माण केली तर त्यात पाणी ठरत नाही, त्यांत कृमिकीटके निर्माण होतात, तेव्हा तेथील लोकांना मृत्यूचे भय प्राप्त होते. या उत्पातांच्या भयापासून उत्पन्न झालेल्या वृत्तीसाठी वरुण-देवाच्या मंत्राचा जप करावा. घृतमिश्रित परमान्न ब्राह्मणांना द्यावे. त्यांना शुभ्र वस्त्र, गोप्रदान, उदककुंभ यांचे दान द्यावे.

## प्रसूतीची विकृती

ज्या देशात किंवा कुलात स्त्रिया अकाली प्रसवतात, ज्यांना विकृत मुले होतात, ज्यांना एकदम जुळी मुले होतात, एखादीस मनुष्याखेरीज इतर संतती होते, कोणास मुखविरहित संततीं होते, स्त्रियांना प्रसूतीच्या

वेळी अति विकार होतो. कित्येक कन्या अंगहीन वा काही अधिक अंगांनी प्रसवतात. जेथे स्त्रियांपासून पशू, पक्षी, सर्प उत्पन्न होतात, अशा देशाचा वा कुलाचा नाश होतो. दोनशेपस्तिसाव्या अध्यायात हा विषय आला आहे.

प्रसूतीपासून अद्‌भुत विकार घडले तर, मानवस्त्रियांना पशू, पक्षी झाले तर राजाने त्या सर्वांना आपल्या देशातून घालवून द्यावे. प्रसूत झालेल्या स्त्रियांची पूजा करावी व ब्राह्मणांना दान देऊन संतुष्ट करावे. म्हणजे प्रसूतीच्या संबंधीची अरिष्टे दूर होतील.

## आणखी काही विकृती

अशाच आणखी काही नैसर्गिक विकृतींचे वर्णन दोनशेछत्तिसाव्या अध्यायात आले आहे. कधी रथादिक वाहनें अश्व इत्यादी जोडले नसतानाच चालतात. अशा वेळी महाभय उत्पन्न होते. कधी नगारे इत्यादी वाद्ये न वाजविताच वाजली जातात, तर कधी वाजविली असताना वाजत नाहीत. अचल वस्तू चल होतात. चल वस्तू अचल होतात. आकाशात वाद्यांचा नाद होतो, गंधर्वांचे गायन ऐकू येते, गायी आपल्या पुच्छांनी स्त्रियांना प्रहार करतात, उखळासारखे पदार्थ एकाएकी भंग पावतात; अशावेळी शस्त्रांपासून भय उत्पन्न होते. अशावेळी वायूची पूजा करावी. मंत्राचा जप करून ब्राह्मणांना दान द्यावे.

अशाच आणखी काही विकृत बाबींचे वर्णन दोनशेसदतिसाव्या अध्यायात आलेले आहे. ज्यावेळी अरण्यातील मृग, पक्षी ग्रामात प्रवेश करतात, ग्रामातील मृग, पक्षी अरण्यात जातात, जलातील प्राणी स्थलावर येतात, भूमीवरील जलात प्रवेश करतात, ते निर्भय होऊन भयंकर शब्द करतात, राजद्वारी वा सीमाद्वारी कोल्ही रडतात, तर दुःख होते. रात्री संचार करणारे दिवसा फिरतील, दिवसा फिरणारे प्राणी रात्री हिंडतील, तर ते ग्राम ओस पडेल. गावातील पशु-पक्षी क्रुद्ध होऊन सायंकाळी भयंकर शब्द करतील, मंडलाकार भ्रमण करून आक्रोश करतील तर ते ग्राम शून्य, निर्जन होईल. प्रदोपकाली कोंबडा आक्रोश

करून ओरडेल, हेमंतऋतूत कोकिळपक्षी शब्द करील, सूर्योदयास कोल्ही सूर्याकडे पाहून रुदन करतील तर तेथे भय प्राप्त होईल. पारवा वा कबूतर गृहात प्रवेश करील, मांसभक्षी पक्षी घरावर बसेल, घरावर मध-गृह, माशा संचार करील, तर घराच्या यजमानास मृत्यू येईल. तट, द्वार, तोरण, बाजार, दुकान, ध्वजछत्र, आयुधादिक यांवर जर मांसभक्षी गिधाडादी पक्षी बसतील तर, तेथे वारुळे होतील तर, मधाचा स्राव झाला तर तो देश नाश पावेल.

जेथे उंदीर, टोळ अधिक होतील, तेथील लोक क्षुधेने पीडा पावतील. काष्ठ, कोलीत, अस्थी, शिंग यांपैकी एखादे मुखात घेऊन कुत्री संचार करतील तर राष्ट्रास पीडा होईल. कावळे मुखात धान्य घेऊन संचार करतील तर युद्धवीर लोकांना दुःख देतील. पांढरा कावळा मैथुनासक्त दिसेल तर त्या देशाचा राजा मृत्यू पावेल. त्या देशाचा नाश होईल. जेथे घरावर व दारावर घुबड दिसेल, तेथे घराचा यजमान मरण पावेल. त्याच्या धनाचा नाश होईल. अशावेळी शांतीसाठी 'देवाः कपोता' या मंत्राने दक्षिणा देऊन होम करावा. पांच ब्राह्मणांकडून या मंत्राचा जप करावा. ब्राह्मणांना वस्त्रदान करावे. गोप्रदानें करावीत.

देव, राजे यांची मंदिरे, तोरणे, गच्च्या, दारे, तट, घरे दृढ असताना अकस्मात पडली तर राजास मरण संभवते. असे काही उत्पात दोनशेअडतिसाव्या अध्यायात दिले आहेत. धुराळा, धूर यांनी दिशा व्याप्त झाल्या, चंद्र, सूर्य, अश्विनीनक्षत्र निस्तेज दिसले तर देशात भय होते. राक्षस दृष्टीस पडला तर, ब्राह्मण अधार्मिक झाले तर, ऋतु-चर्या विपरीत झाली तर, अपूज्य लोकांची पूजा झाली तर राष्ट्रास अपाय होईल. धूमकेतूचा उदय होणे, वारंवार ग्रहणे येंणे, चंद्र-सूर्याची मंडले सच्छिद्र दिसणे, इत्यादी लक्षणे भयदायक समजावीत. स्त्रिया सर्व कृत्यांत कलही झाल्या तर, परस्परांना ताडन करू लागल्या तर, शास्त्र-विहित कर्मे खंडित झाली तर, शांतिकर्माला अग्नी प्रदीप्त झाला नाही तर, मुंग्या, गिधाडे उत्तरेकडे गमन करू लागले तर, शांतिकर्मातील उदककुंभ पाझरू लागला तर, होमाचे पदार्थ अकस्मात नाहीसे होऊ लागले तर, अति हास्य आले तर, नेत्रांतून अश्रुपात फार झाला तर

देवब्राह्मणांबद्दल विनय न राहिला तर, मंगलकार्यात वाद्ये बेसुर वाजली तर, गुरू व मित्र यांचा द्वेष होत असला तर, ब्राह्मणादिकांचा अपमान झाला तर, नास्तिकबुद्धी उत्पन्न झाली तर, राजा अथवा देश नाश पावतो.

जो राजा ब्राह्मणाचे द्रव्य अपहरण करतो, त्यास शारीरिक दंड करतो. त्याचे स्मरण करीत नाही, त्यास पूज्य मानीत नाही, त्यावर क्रुद्ध होते, त्याची निंदा करतो, प्रजेवर अनेक प्रकारचे विलक्षण कर बसवितो, त्याचा नाश होतो. या सर्व वाईट चिन्हांच्या उपशमासाठी शची नावाच्या पत्नीसह इंद्राची पूजा करावी. भोज्य पदार्थ, बली देवांना अर्पण करावेत. साधूंची, ब्राह्मणांची पूजा करून त्यांना विपुल द्रव्य द्यावे. वरीलपैकी उत्पात झाल्यावर जर सात दिवसांत उत्तम पर्जन्यवृष्टी होईल तर तो उत्पात विफल होतो.

## ग्रहयज्ञ, लक्षहोम, कोटिहोम

दोनशे एकोणचाळिसाव्या अध्यायात राजाने ग्रहयज्ञ कसा करावा? लक्षहोम वा कोटिहोम कसा करावा? यांसंबंधी मार्गदर्शन केले आहे. राजाने ज्योतिषशास्त्रज्ञ ब्राह्मण, गुरू, ऋत्विज यांसह नदीचा संगम, देवांचा अग्रभाग यांतील समांतर भूभागाची यज्ञासाठी परीक्षा करावी. या भूमीवर एका हाताचे उत्कृष्ट समांतर चौकोनी कुंड तयार करावे. लक्षहोमासाठी औरस-चौरस कुंड करावे. कोटिहोमासाठी चार हातांचे समांतर चौकोनी कुंड तयार करावे. प्रतिहोमद्रव्यात दोन उत्तम ऋत्विज आणावेत. चार होमद्रव्यांसाठी वेदपारंगत आठ ऋत्विज असावेत. ग्रहयज्ञ समाप्त होईपर्यंत कंद, मूले व फले यांचा आहार असावा. दही, दूध इत्यादींचे भक्षण करावे.

कुंडासमीप देवता स्थापनार्थ घातलेल्या ओटयावर अनेक प्रकारची रत्ने स्थापन करावीत. कुंड व ओटा यांच्याभोवती वाळू घालून अग्नी प्रदीप्त करावा. नंतर गायत्रीमंत्राने दशसहस्र होम करावा. 'मानस्तोके' या मंत्राने साठ हजार आहुती, सूर्यादी नवग्रह प्रभृती तेहतीस मंत्रांनी प्रत्येक मंत्रास तीन आहुती, विष्णुदेवाच्या मंत्राने चार अवदाने (आहुती),

कोहळ्याची पांच अवदाने, फळांच्या सोळा आहुती, दशसहस्र बोरांच्या आहुती, श्रीमंत्राने चवदा सहस्र आहुती, इंद्राच्या मंत्राने पांच हजार आहुती द्याव्यात. अशा लक्ष आहुती देऊन होमानंतर मंगलस्नान करावे.

सुवर्णाच्या उत्तम मंगलकारक अशा सोळा कलशांनी यजमानास स्नान घालावे. यामुळे ग्रहसूचित अरिष्टांची शांती होईल. ग्रहपीडेचे दुःख कमी होईल. यजमानाने प्रयत्न करून ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. गज, अश्व, रथ, भूमी, वस्त्रे, शेकडो गायी इत्यादींची दक्षिणा द्यावी. एक मास पूर्ण झाला की लक्षहोम समाप्त करावा. भागीरथी, यमुना, सरस्वती, नर्मदा, देविका या नद्यांच्या तीरांवर कोटिहोम करावा. या यज्ञात सोळा ऋत्विज असावेत. चैत्र व कार्तिक महिन्यांत कोटिहोम करणाऱ्या यजमानाने ऋत्विज व मुख्य आचार्य यांच्यासह एक वर्षपर्यंत होमासंबंधीची नियमपूर्वक कंकणे बांधून दीक्षा घ्यावी. व्रतस्थ असावे. या कोटिहोमात संवत्सर प्रतिपदेच्या दिवशी आरंभ करावा. यजमानाने एक वर्षभर दूध वा फल यांचा आहार ठेवावा. सातू, गहू, मूग, सावे, राळे, साळी, उडीद, तीळ, मोहऱ्या, पळसाच्या समिधा हे पदार्थ होमासाठी तयार ठेवावेत. तुपाची धार अधिक प्रशस्त आहे.

कोटिहोम सुरू झाला की, यजमानाने प्रथम मासी ऋत्विजांना दुग्धमिश्रित खीर अर्पण करावी. द्वितीय मासी त्यांना तिलमिश्रित ओदन (शिजलेला भात) अर्पण करावे. हे ओदन धर्म, काम व अर्थ या पुरुषार्थांना उपयुक्त आहे. तृतीय मासात ब्राह्मणांना सांजाचे भोजन द्यावे. चतुर्थ मासात त्यांना मोदकभोजन द्यावे. पांचव्या मासात दहीभात द्यावा. सहाव्या मासात त्यांना सातूंचे भोजन द्यावे. सातव्या मासात तळलेले वडे, घारगे इत्यादी पदार्थांचे भोजन द्यावे. आठव्या मासात घृतपक्व घीवर, अनारसे इत्यादी पदार्थ भोजनासाठी द्यावेत. साठ दिवसांनी पिकणाऱ्या साळीचा भात नवव्या मासी द्यावा. दहाव्या मासात सातू व साळी यांचा भात द्यावाः अकराव्या मासात माषान्न-(उडीद) सहित भोजन द्यावे. बाराव्या मासात अनेक प्रकारची पक्वान्ने त्यांना वाढावीत.

यजमानाने स्वतः पवित्र असावे. नूतन वस्त्रे परिधान करून

ऋत्विजांकडून सकाळपासून मध्यान्हकालापर्यंत होम करावा. त्यांना प्रतिमासी होमाची दक्षिणा द्यावी. इंद्रादिक लोकपाल, सूर्यादी नवग्रह यांचा संतोष या होमानें झाल्यावर ते सर्व मनोरथ पूर्ण करतात. ग्रह-यज्ञातील देवांसाठी पशुहिंसेसह सर्व दानें करून कोटिहोम शंभर अग्नी स्थापन करून करावा. प्रत्येक शंभर होमांना पूर्णाहुती द्यावी. प्रत्येक सहस्रहोमास त्या शतहोमांच्या पूर्णाहुतीपेक्षा द्विगुणित मोठी पूर्णाहुती द्यावी. लक्षहोमापर्यंत या क्रमानें शतलक्ष संख्येपर्यंत होम करावा.

यानंतर नवग्रहादिक स्थापित सर्व देवांप्रीत्यर्थ सोळा ऋत्विजांनी पुरोडाश सिद्ध करावा, यजमानाने दाने देऊन ऋत्विजांना संतुष्ट करावे. पितरांना संतुष्ट करून शास्त्रविधीने त्यांना पिंडदान करावे. कोटि-होमाची समाप्ती झाल्यावर समान काटा वा दांडी करून तिला दोन शिंकी बांधावी. यजमानानें प्रथम सुवर्णानें स्वतःची व रुप्याने पत्नीची तुला करावी. योग्य अशी दक्षिणा दिल्यास राजसूययज्ञाचे फल प्राप्त होते. यज्ञेश्वर कमलनयन श्रीहरी यज्ञानें प्रसन्न व्हावेत, म्हणून प्रार्थना करावी. सर्व कर्मे परमेश्वरास अर्पण करावीत. तो परमेश्वर संतुष्ट झाला की, सर्व जग संतुष्ट होते.

## राजाने आक्रमण केव्हा करावे ?

राज्यातील प्रजेच्या आक्रोशावरून राजा शत्रूपासून पराजित झाला आहे. असे समजून येताच राजाने शत्रूवर चाल करावी. राजाचे अंतःकरण शुद्ध नसेल तर त्याने ही चाल करू नये. चैत्री पूर्णिमा वा मार्गशीर्षाची पूर्णिमा पाहून राजानें शत्रूवर स्वारी करावी. शक्यतो मार्ग-शीर्षातच निघावे. कारण चैत्रातील उन्हाळा मनुष्याच्या शक्तींचा नाश करतो. शत्रूवर चाल करण्यासाठी प्रतिकूल काळ कोणता ? आकाश, अंतरिक्ष, भूमी यांवर उत्पात होत असतील, भूमिकंप होईल, उल्का-पात होईल, निरभ्र आकाशातून वीज पडेल, अशा प्रतिकूल काली राजाने शत्रूवर स्वारी करावी. शत्रू दुःखाने, दुर्भिक्षानें पीडित असेल, तो अति क्रोधित असेल, तेव्हा राजाने स्वारीची शीघ्रता करावी. ज्याचे सैन्य उवांनी त्रस्त झाले असेल, ज्याच्या देशात मद्याची मोहोळे लागली

असतील, ज्याच्या राज्यात अकाली चिखल झाला असेल, लोक वेदांचा त्याग करणारे असतील, अमंगल भाषा करणारे असतील, प्रजा राजा-बद्दल उदास असेल अशा राजास जिंकण्यास राजानें त्वरा करावी:

ज्याच्या सैन्यातील नायक परस्परांचा द्वेष करीत असतील, राजा दुर्व्यसनांत गुंतला असेल, तर त्या राजावर आक्रमण करावे. ज्याच्या योध्यांची शस्त्रे कधी स्फुरण पावत नाहीत, ज्याच्या सैन्यातील लोक रात्री निद्रेत दुःस्वप्नें पाहातात, अशा स्थितीत शत्रूवर राजाने आक्रमण करावे. ज्या राजाच्या दक्षिणभागाच्या हस्तपादादिक अंगे स्फुरण पावत राहातात, शकुन होत आहेत, अशा राजाने शत्रूवर आक्रमण करावे. ज्योतिषशास्त्रानुसार शुभकाल पाहून राजाने शत्रूवर आक्रमण करावे. त्याच्याजवळ पायदळ व गज असावेत. हेमंत व शिशिर या दोन ऋतूंत रथ व अश्व यांची सेना असावी. ग्रीष्मात गर्दभ व उंट यांची सेना असावी. वसंत व शरदऋतूंत रथ, गज, अश्व, पायदळ; अशी चतुरंग सेना असावी. या तीनही ऋतूंची कारणेही या दोनशेविसाव्या अध्यायात सांगितली आहेत.

## शुभाशुभ स्फुरणे

यानंतर दोनशेएकेचाळिसाव्या अध्यायात जय-पराजय, शुभाशुभ यांची लक्षणे सांगितली आहेत. शरीराचे दक्षिणांग स्फुरण पावले तर ते शुभ समजावे. देहाचा डावा भाग स्फुरण पावला तर अशुभ समजावा. मस्तकात स्फुरण झाल्यास पृथ्वीचा लाभ होतो. ललाट स्फुरण पावल्यास स्वकीय स्थानाच्या ऐश्वर्याची वृद्धी होते. भ्रूकुटी व नासिका स्फुरण पावल्यास प्रिय व्यक्ती भेटते. नेत्रस्थानी स्फुरण झाल्यास सेवक प्राप्त होतात. डोळ्याच्या समीप झाल्यास धनाची प्राप्ती होते. नेत्रांचा मध्य-भाग स्फुरण पावल्यास शुभकार्याची उत्कंठा लागते. नेत्र मिटले असूनही स्फुरण पावल्यास संग्रामात जय प्राप्त होतो. नेत्रांचे प्रांतभाग स्फुरण पावल्यास स्त्रियांपासून सुख मिळते. कानांचा भाग स्फुरण पावल्यास प्रिय वार्तेचे श्रवण होते.

नाकाच्या ठिकाणी स्फुरण पावल्यास प्रीतियुक्त सुखाची प्राप्ती

होते. खालचा ओठ स्फुरण पावला तर आनंदाची प्राप्ती होते. कंठस्थानी स्फुरण झाल्यास सुखाचा लाभ होतो. स्कंधाच्या स्थानी स्फुरण पावल्यास सुख मिळते. वक्षःस्थलाच्या दक्षिणभागी स्फुरण झाल्यास जय मिळतो. भुजांचे स्फुरण झाले की, सत्पुरुषांशी स्नेह जमतो. हाताचे स्फुरण झाल्यास धन प्राप्त होते. पृष्ठभाग स्फुरण पावल्यास पराजय होतो. कुक्षीत स्फुरण झाल्यास प्रिय मनुष्याची भेट होईल. स्त्रीचे स्तन स्फुरण पावले तर ती त्वरित प्रसूत होईल. नाभिस्थानी स्फुरण झाल्यास स्थान-भ्रंश होईल. आतडी स्फुरण पावल्यास धन प्राप्त होईल. गुढग्यांच्या ठिकाणी स्फुरण झाले तर बलवान शत्रूंशी तह होईल. पोटऱ्यांत स्फुरण झाल्यास देशाच्या काही दिशांतील भागांचा नाश होतो. पायांच्या ठिकाणी स्फुरण झाल्यास उत्तम स्थानाची प्राप्ती होते. तळपाय स्फुरण पावला तर लाभाचीं प्राप्ती होते. असे फल शरीरावरील तीळ व फुटकुळी यांचेही मानावे.

## स्वप्नांची शुभाशुभ फले

दोनशेचाळिसाव्या अध्यायात स्वप्नांतील शुभाशुभांची फले सांगितली आहेत. नाभीखेरीज इतर अवयवांवर तृण वा वृक्ष उगविणे, मस्तकावर कास्यपात्राचे चूर्ण होणे, मुंडन व नग्नत्व पाहाणे, मलीन वस्त्र परिधान करणे, अभ्यंग करणे, चिखल अंगाला लागणे, उंच प्रदेशावरून खाली येणे, हिंदोल्यावर बसणें, अश्वाचे मरण होणे, आरक्त पुष्पांच्या वृक्षांचे दर्शन होणें, वराह, अस्वल, गर्दभ, उंट यांवर बसणे, नृत्य-गायन-हास्य-विवाह, गायन यांचा योग घडणे, तंतुवाद्यरहित वाद्ये वाजणे, झऱ्यात वा नदीत स्नान करण्यासाठी जाणें, गोमयाने युक्त असे स्नान करणे, कर्दममिश्रित पाण्याने स्नान करणे, मातेच्या उदरात प्रवेश होणे, चितेवर चढणे, प्रतिपदेच्या दिवशी गुडी पडलेली पाहणे, चंद्र-सूर्यांचे पतन पाहाणे, देव-ब्राह्मण-गुरू यांचा क्रोध होणे, कुमारीचे आलिंगन होणे, पुरुषांचे परस्पर मैथुन होणे, स्वतःच्या अवयवांची हानी होणे, रेत अथवा वांती होणे, फुले व फळे यांचा नाश होणे, घरे पडणे, त्यांत सडासंमार्जन होणे, पिशाच, राक्षस, गिधाड इत्यादी मांसभक्षक पक्षी,

वानर, अस्वल, मनुष्य यांची क्रीडा पाहाणे, काषायवस्त्र पांघरणे, स्त्रियांशी संभोगादी क्रीडा करणे, स्त्रियांची परस्पर क्रीडा होणे, घृततैलादिकांचे प्राशन करणे वा त्यांनी स्नान करणे, आरक्त वर्णाची पुष्पे व चंदन धारण करणे; इत्यादी स्वप्ने, दुःस्वप्ने समजावीत.

ही स्वप्ने सत्पुरुषांना सांगितली तर त्यांचा परिहार होतो. या स्वप्नांवर पुन्हा निद्रा केली की, त्यांचे फल निष्फल होते. अथवा दुसऱ्या दिवशी प्रातःकाली तीळ व आवळा यांचा कल्क अंगाला लावून स्नान केल्यास, वासुदेवांची स्तुती केल्यास, भारत वा भगवत यांतील राजेंद्रमोक्ष श्रवण केल्यास या स्वप्नांचे अरिष्ट कमी होते.

रात्रीच्या प्रथम प्रहरातील स्वप्नें एका वर्षानें फलद्रूप होतात. द्वितीय प्रहरातील स्वप्ने सहा महिन्यांनी फलास येतात. तृतीय प्रहरातील स्वप्ने तीन महिन्यांनी सफल होतात. चतुर्थ प्रहरातील स्वप्नें एका महिन्यातच फलद्रूप होतात. पहाटेची स्वप्ने दहा दिवसांनी सफल होतात.

पर्वत, देव, राजे यांची मंदिरे, अश्व, गज, वृषभ यांवर स्वप्नात बसणे हितकारक होते. शुभ्र पुष्पांचे वृक्ष पाहाणे, त्याकडे जाणे, उत्तम पुष्पमाला, तशीच वस्त्रे धारण करणे, चंद्र, सूर्य, नक्षत्रे यांना ग्रहण करणे, गुडीस आलिंगणे, ती उभारणे, भूमी व समुद्र यांची मृत्तिका भक्षण करणे, शत्रूंचा वध करणे, काही वाद, द्यूत, संग्राम यांत जय पावणे, आर्द्र मत्स्य व पायस भक्षण करणे, सुरा, रक्त, मद्य, दूध, उदक यांचे प्राशन, आकाश निरभ्र पाहाणे, म्हशी, गायी, सिंहिणी, हत्तिणी, घोडी यांचे दूध वासरासारखे मुखाने पिणे, देव, ब्राह्मण, गुरू, मातापिता इत्यादींपासून प्रसाद प्राप्त होणे; हे सर्व स्वप्नात प्रतीत झाले तर ते शुभकारक समजावे.

स्वप्नात गायीच्या शिंगांतील उदक वा चंद्रमंडलापासून निघालेले जल यांचा अभिषेक मस्तकावर झाला तर राज्य मिळते. राज्याभिषेक होणे, शिरच्छेद होणे, मरण, अग्नीने शरीर, वस्त्र, घर जळणे, छत्र, चामरादी राजचिन्हांचा लाभ होणे, वीणादी तंतुवाद्ये वाजणें, उदकात तरंगणे, दुर्गम स्थानांचे उल्लंघन होणे, हस्तिनी, घोडी, गाय प्रसूत होणे. अश्वावर आरूढ होणे; इत्यादी स्वप्नांतील दर्शने शुभकारक समजावीत.

सुंदर स्त्रियांचा लाभ, त्यांचे आलिंगन, शृंखलाबंधन, विष्ठालेपन; इत्यादी स्वप्नांतील प्रकार शुभकारक आहेत. जिवंत राजे, मित्र, देवता, स्वच्छ पाणी इत्यादींचे दर्शन उत्तम जाणावे.

## आणि असे शकुन, अपशकुन

यानंतर दोनशेत्रेचाळिसाव्या अध्यायात वैवस्वत मनूस भगवान मत्स्यांनी शकुनांचे वर्णन करून सांगितले आहे. रेचादिक अयोग्य औषधे, माष (उडीद) इत्यादी कृष्णवर्णीय धान्ये, कापूस, तृण, गोवऱ्या, काष्ठे, सधूम अग्नी, गूळ, तैल इत्यादी पदार्थ शकुनाबद्दल अशुभ आहेत. अभ्यंग केलेला, मलीन, मुंडित, नग्न मनुष्य, केस मोकळे सोडलेला, रोगाने पीडित, काषायवस्त्री धारण केलेला, उन्मत्त, दीन, नपुंसक, चांडाल, श्वपच, बंदिशालेवरील रक्षक, प्राण्यांची हिंसा करणारा, पापकर्मी, गर्भिणी स्त्री, रंगवलेली मडकी, रुदनसहित शव, इत्यादी वस्तू गमनकाली वर्ज्य आहेत. प्रयाणकाली ध्वज, वाहने इत्यादींवर गिधाडे आदी मांसभक्षक पक्षी बसणे, वाहनांचे स्खलन होणे, अंगावरील वस्त्र कोठेतरी अडकणे, घरातून बाहेर निघताना दारादिकांना मस्तकणे लाग, छत्र, ध्वज, वस्त्रे इत्यादींचे पतन; ही सर्व अशुभ आहेत.

शुभ्र पुष्पे, जलपूर्ण कुंभ, उदकात निर्माण झालेले पक्षी, मांस, मत्स्य हे प्रयाणकाली शुभशकुन आहेत. गायी, वृषभ, अश्व, गज, नाग, बोकड, देव, मित्र, सत्पुरुष, ब्राह्मण, निर्धूम प्रदीप्त अग्नी, वेश्या, दूर्वा, आर्द्र गोमय (शेण), सुवर्ण, रौप्य, ताम्र, रत्ने, अभ्रकादी औषधे, यव (सातू), मोहऱ्या, पालखी, भद्रपीठ, सुवर्ण, रौप्य, ताम्र अथवा औदुंबर-वृक्ष यांचे केलेलें दीड हात उंचीचे आसन, खड्ग, छत्र, पताका, मृत्तिका, आयुध, छत्रचामरादी राजचिन्हे, घृत, दही, दूध, अनेक जातींची फले, स्वस्तिक, वर्धमान (यज्ञातील पुरोडाश करण्याचा परळ), नंद्यावर्त (तगरीचे फूल), कौस्तुभाकृती भूषण, मंगलवाद्यांचा मधुर शब्द, गांधर-षड्ज-ऋषभ इत्यादी स्वर; हे सर्व शुभशकुनकारक समजावेत.

प्रयाणसमयी वायू, रुक्ष व वाळूसह सुटला असेल, वेगात असेल तर ते भयदायक लक्षण मानावे. पृष्ठभागाकडून मंद व स्निग्ध वाहाणारा

सुखकारक वायू. रुक्ष स्वरयुक्त क्रव्याद (मांसभक्षी पशू), विद्युल्लतेनें व्याप्त असे मागून येणारे सजल मेघ, इंद्रधनुष्य; इत्यादी प्रयाणकाली शुभशकुन होत. चंद्र-सूर्यांची खळी, अतिवृष्टी, ही गमनाला वर्ज्य मानावीत. प्रयाणसमयी सर्व ग्रह प्रयाणदिशेस जाणारे, विशेष करून तसा बृहस्पती असेल तर गमन करणारास हिताचे होते. आस्तिक्यबुद्धी, श्रेष्ठांच्या वाक्यावर विश्वास, पूज्य लोकांचा सत्कार, इत्यादी शुभकारक समजावेत. प्रयाणाच्या वेळी मनात उत्साह असेल तर ती जयाची खूण समजावी. सर्वत्र विजयाचा घोष होणे, मंगलदायक पदार्थांची प्राप्ती होणे, शुभ लक्षणांचे श्रवण होणे; ही सर्व निरंतर विजयप्राप्तीची लक्षणे मानावीत.

## काही कथाभाग

यानंतर दोनशेचव्वेचाळिसाव्या अध्यायापासून पांच-सहा अध्यायांत इतर पुराणांतील प्रमुख आख्यानें व विषय आले आहेत. भगवान विष्णूंचे माहात्म्य पुढे आले असून त्यांनी भूलोकी वामनावतार धारण करून बलीस कसे बद्ध केले, विष्णूंचे अति लघुरूप त्रैलोक्यव्यापी कसे झाले, इत्यादी कथा आलेल्या आहेत. दितीची कथाही आलेली आहे. यानंतर प्रल्हाद-बली यांचा संवाद आला आहे. प्रल्हादानें ध्यानयोग करून अदितीचे सामर्थ्य जाणले. विप्रचित्ती, शिबी, शंकू, अयःशंकू, अयःशिरा, अश्वशिरा, भंगकार, महाहनू, प्रताप, प्रघस, शंभू, कुकुर; इत्यादी दैत्यांची महती बली वर्णन करून सांगतो. प्रल्हादाने देवांचे सामर्थ्य वर्णन केले. त्यानेंच देवांची निंदा केल्यामुळे बलीस ऐश्वर्यभ्रष्ट होण्याचा शाप दिला. बलीच्या पराभवासाठी वामनांचा अवतार झाला.

या अवताराची कथा दोनशेसेहेचाळिसाव्या अध्यायात आलेली आहे. यानंतर पुढल्या अध्यायात वराहाच्या अवताराचे आख्यान आले आहे. यातच सर्व ब्रह्मांडाचे वर्णन आले आहे. पुढल्या अध्यायातही असेच ब्रह्मांडाचे वर्णन आहे. वराहाने पृथ्वीस स्वस्थानी कसे आणून सोडले, याचेही वर्णन आहेः पुढे अमृतमंथन, कालकूटाची उत्पत्ती, समुद्रातून निघालेले पदार्थ, सुरासुरांच्या युद्धात देवांचा विजय; असा कथाभाग

दोनशेंएकावन्नाव्या अध्यायापर्यंत आला आहे.

## असा हा वास्तुपुरुष

दोनशेंबावन्नाव्या अध्यायात वास्तुविद्येच्या वर्णनास सुरुवात झाली आहे. देवालये, राजमंदिरे, इतर सामान्यगृहे यांची रचना कशी करावी ? असा एक महत्त्वाचा प्रश्न ऋषींनी सूतास केला. सूतानें या प्रश्नाचे सविस्तर उत्तर दिले. भृगू, अत्री, वसिष्ठ, विश्वकर्मा, मयासूर, नारदमुनी, नग्नजितराजा, विशालाक्ष, इंद्र, ब्रह्मदेव, कुमार कार्तिकेय, नंदिकेश्वर, शौनक, गर्गाचार्य, वासुदेव श्रीकृष्ण, अनिरुद्ध, शुक्र, बृहस्पती ; हे वास्तुशास्त्राचे प्रवर्तकाचार्य आहेत.

पूर्वी शिवांनी अंधकासुराचा वध केला. त्या भयानक युद्धप्रसंगी त्रिशूलधारी उग्र शंकरांच्या ललाटामधून पृथ्वीवर घाम गळाला. त्यापासून पृथ्वीवर अति क्रूर अशा मुखाचे प्राणी उत्पन्न झाले. त्या भूताने अंधकासुरांचे रक्त प्राशन केले. तरी त्याची तृप्ती झाली नाही: म्हणून त्याने सदाशिवांच्या अग्रभागी राहून उग्र तप सुरू केले. त्याने त्र्यैलोक्य-भक्षणाविषयीच्या सामर्थ्याचा वर शिवांकडून मिळविला. ते भूत सर्व विश्वास व्यापू लागले. भयभीत झालेल्या देवांनी, ब्रह्मदेवांनी, शंकरांनी, दानवांनी, असुरांनी, राक्षसांनी त्या भूतास धरून ठेविलें. ज्या देवानें त्यास धरले तो त्याच स्थानी राहिला. अशा सर्व देवांच्या निवासामुळे त्यास वास्तुपुरुष म्हटले गेले. याच्या शांतीसाठी प्रत्येक घरी वास्तुशांती नावाचा विधी सुरू झाला.

## घरबांधणीस शुभमुहूर्त

यानंतर पुढल्या दोनशेत्रेपन्नाव्या अध्यायात गृहासंबंधी उत्तम कालनिर्णयाचा विधी आलेला आहे. जो मनुष्य चैत्रमासात गृहरचनेस आरंभ करतो, तो रोगग्रस्त होतो. वैशाखमासात गृहरचना करणाऱ्यास गायी व रत्ने यांची प्राप्ती होते. ज्येष्ठात घर बांधण्यास काढले तर बांधणारा मरण पावतो. आषाढात घर बांधणारा सेवक, रत्ने, गज, अश्व इत्यादींची प्राप्ती करून घेतो. श्रावणात बांधणाऱ्यास सेवक प्राप्त

होतात. भाद्रपदात घर बांधण्यास सुरुवात केली तर काही तरी हानी होते. आश्विनात प्रारंभ केला तर पत्नीचा नाश होतो. कार्तिकात गृह-रचनेस प्रारंभ केला तर धनधान्य प्राप्त होते. मार्गशीर्षात अन्नाचा लाभ होतो. पौषमासात आरंभ केला तर चोरांपासून भीती असते. माघमासी अनेक प्रकारचा लाभ होतो. तरी घरात अग्नीची बाधा संभवते. फाल्गुनात आरंभ केल्यास सुवर्ण व पुत्र यांचा लाभ होतो: याचप्रमाणे अश्विनी, रोहिणी, मूळ, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मृग, स्वाती, हस्त व अनुराधा ही नक्षत्रे घर बांधण्यासाठी उत्तम आहेत.

रवी व मंगळ यांखेरीज इतर पांचही वारी गृहारंभ केल्यास शुभकारक होईल. व्याघात, शूल, व्यतीपात, अतिगंड, विष्कंभ, गंड, परिघ, वज्र या कुयोगांवर घर बांधण्यास आरंभ करू नये. श्वेत, मैत्र, महेंद्र, गांधर्व, अभिजित, रौहिण, वैराज, सावित्र यांतील एखाद्या मुहूर्तावर घर बांधण्यास प्रारंभ करावा. चंद्र व सूर्य यांचे बल पाहून गृहाचे खांब उभे करावेत. याचप्रमाणे देवालये, राजमंदिरे, कूप, वापी यांच्या बांधणीच्या वेळीही मुहूर्त पाहावा. भूमीची परीक्षा करावी. शुभ्र, आरक्त, पीत, कृष्ण या चार भूमींतील प्रत्येक भूमी क्रमाने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना प्रशस्त आहे. मधुर स्वादयुक्त भूमी ब्राह्मणा-साठी, क्षत्रियात तीक्ष्ण रसयुक्त, वैश्यास कटुरसाची व शूद्रास तुरट-रसाची उपयुक्त होते.

भूमीच्या परीक्षेचा आणखीही विधी सविस्तर वर्णन केला आहे. जी बीजे त्रिरात्रीत उगवतात ती भूमी ज्येष्ठ समजावी. पांच रात्रींत जीत बीजे उगवतात ती भूमी उत्तम समजावी. सात दिवसांनी बीजांना जीत अंकुर येतात, ती कनिष्ठ मानावी. अशा भूमीची परीक्षा करून पंचगव्य व यज्ञोपयोगी औषधी यांच्या मिश्रउदकाने त्या भूमीवर सिंचन करावे. त्या प्रदेशात सुवर्णाच्या शलाकेने रेघा काढून त्यांत एक्याऐंशी स्थाने निर्माण करावीत. पंचेचाळीस देवतांचे पूजन करावे. बाह्यभागा-वर बत्तीस देवता, आतील भागावर तेरा देवता स्थापन करून त्यांची पूजा करावी.

ईशानकोणापासून त्या त्या देवतांची पृथक् पृथक् पूजा करावी.

बाह्यभागातील बत्तीस देवता अशा– १ शिखी, २ पर्जन्य, ३ जयंत, ४. वज्रायुध इंद्र, ५ सूर्य, ६. अश्विनीकुमार, ७ भृश, ८ आकाश, ९ वायू, १० पूषा, ११ वितथ, १२ गृहक्षत, १३ यम, १४ गंधर्व १५ भृंगराज, १६ मृग, १७ पितृगण, १८ दौवारिक. १९ सुग्रीव, २० पुष्पदंत. २१ जलाधिपती वरुण, २२ असुर, २३ शोष, २४ पाप, २५ रोग, २६ अही, २७ मुख्य, २८ भल्लाट, २९ सोम, ३० सर्प, ३१ अदिती व ३२ दिती. ईशान, आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य या चार स्थानांवर क्रमाने आप, सावित्र, जय व रुद्र असून त्यांचे पूजन करावे. मध्यभागाच्या नऊ स्थानांतील मध्यभागी ब्रह्मदेव आहेत. त्यांच्या भोवती पूर्वादींच्या क्रमाने आठ देवता असतात त्या अशा; १) अर्यमा, २) सविता, ३) विवस्वान्, ४) विबुधाधिप, ५) मित्र, ६) राजयक्ष्मा, ७) पृथ्वीधर व ८ अपवत्स.

## आपले घर कसे असावे ?

या वास्तूच्या स्थानांचा विस्तृत विचार याच अध्यायात आला आहे. पुढल्या अध्यायात आकृती व नाम यांवरून चतु:शालागृहाचा विचार झाला आहे. पुढल्या दोनशेपंचावन्नाव्या अध्यायात वास्तूच्या स्तंभांचे विवरण आले आहे. स्तंभांची नावे, त्यांचे प्रकार असून रुचक, वज्र, द्विवज्र, प्रलीनक, वृत्त; हे पांच स्तंभ उत्तम असतात. वेली, वक्र-तंतू, कुंभ व पत्र यांच्या आकृतींनी स्तंभ चित्रित करावेत. ते स्तंभ आरशासारखे प्रतिबिंब दिसण्यासाठी लखलखीत असावेत. या स्तंभाच्या नवमांशाच्या अंतराने त्यावर पद्म, कुंभ यांची आकृती असावी. तुळई स्तंभाएवढीच जाड असावी. तीखालची लग जाडीला थोडी कमी असावी. गृहांना दारे कोणत्या स्थानी असावीत ? सर्व लोकांची घरे आत प्रवेश करताना दक्षिणभागी असावीत. सर्व वास्तूंत पूर्वेकडे इंद्र व जयंत या देवतांच्या मध्यभागी पूर्वद्वार असावे. दक्षिणद्वार यम व वितथ या देवांच्या मध्ये असावे. पश्चिमद्वार पुष्पदंत व वरुण यांच्या मध्यभागी असावे. भल्लाट व सोम या देवांच्या मध्यभागी उत्तरद्वार असावे. गृहद्वारासमोर वृक्ष असल्यास त्यापासून अनेक

दोष उत्पन्न होतात. स्नानादिकानंतरचा कर्दम घरासमोर आला तर घरात शोक उत्पन्न होतो. दारासमोर कूप आल्यास मनुष्य नित्य अपस्माराने आजारी होतो. दारासमोर झरा असेल तर गृहस्वामीस व्यथा होते. दरवाज्यासमोर कील (खिळा वगैरे) असल्यास गृहस्वामीस भय निर्माण होते. स्थापित देवता गृहसन्मुख आल्यास गृहस्वामीचा नाश होतो. मलमूत्रादिक अमंगल पदार्थांचे स्थान व उकिरडा दरवाज्यासमोर असल्यास गृहस्वामीची पत्नी पांच पुरुषांपेक्षा अधिक पुरुषांशी व्यभिचार करणारी होईल.

अंत्यजाच्या घरासमोर आपल्या गृहाचे दार असेल तर त्यापासून गृहस्वामीस शस्त्रभय राहील. घराचे दार आपोआप उघडले असता गृहस्वामीस उन्माद होईल. ते दार आपोआप लागले गेले तर गृहपतीचा कुलक्षय होईल. गृहद्वार प्रमाणापेक्षा अधिक केले असलें तर राजापासून भय प्राप्त होईल. द्वाराचे मान कमी झाल्यास चोराचे भय होईल. गृहद्वार हे इतरांच्या जाण्यायेण्याचा मार्ग झाला तर गृहात अनेक दोष उत्पन्न होतील. गुगुलवृक्षाची पाने, कमले, चमत्कारिक वेली यांनी मुख्य द्वार सुशोभित करावे. बली, अक्षता, उदक यांनी वारंवार महाद्वारातील देवतांची पूजा करावी.

वटवृक्ष गृहाच्या पूर्वेकडे असला तर तो गृहस्वामीचे मनोरथ पूर्ण करतो. गृहाच्या दक्षिणेस उंबर व पश्चिमेस पिंपळ असल्यास यजमानास ते हितकारक आहेत. पिंपरीचे झाड घराच्या उत्तरेस असेल तर गृहपतीस धनाची प्राप्ती होते. कंटकयुक्त निवडुंग व फलांसहित आसनवृक्ष हे क्रमाने भार्या व प्रजा यांची हानी करतात. म्हणून हे अनिष्टकारक वृक्ष तोडावेत. पुन्नाग (उंडणी), अशोक, बकुल, शमी, तिलक (तिळवा), चंपक, डाळिंबी, पिंपळी, द्राक्षी, पुष्पवेली इत्यादी त्या अहितकारक वृक्षाभोवती लावल्यास ते बाधकारक होत नाहीत. जंबीर (कागदी लिंबू), सुपारीचा वृक्ष, फणस, केतकी, जाई, आवळी, कमल, मोगरी, नारळ, केळी, पाटला; इत्यादी वृक्ष गृहाची समृद्धी करतात.

## घराची स्थानपरीक्षा

यानंतर दोनशेछप्पन्नाव्या अध्यायात ज्ञानसंपन्न पुरुषाने आपली वास्तू बांधताना स्थानपरीक्षा कशी करावी, हे सांगितले आहे. देव, धूर्त, प्रधान चव्हाटा यांच्या समीप घर बांधू नये. राजा अथवा यजमान यांच्याजवळ आपले घर नसावे. गृहाचे प्रदेश चार असतात. अग्रभागाचा प्रदेश, उत्सर्ग या नावाने प्रसिद्ध असल्याने त्या ठिकाणी धर्मशालादिक केले तर शुभदायक असते. घराच्या मागील पृष्ठभाग डाव्या बाजूने वर्तुळाकार असल्यास उत्तम समजावा. पृष्ठभाग दक्षिणभागाने वर्तुळाकार असल्यास गृहस्वामीचा नाश होतो. घराचा दक्षिणभाग शीर्षक या नावानें प्रसिद्ध असून तोही दक्षिणभागाने वर्तुळाकार असल्यास नाशकारक होतो. तो डाव्या बाजूनें वर्तुळाकार असावा.

अशी भूमी नक्की करून ज्योतिषशास्त्रज्ञाने सांगितलेल्या शुभकारक मुहूर्तावर गृह बांधण्यास प्रारंभ करावा. अधोभागी रत्न घालून, त्यावर सर्व औषधीबीजयुक्त शिला स्थापन करावी. शुभ्र वस्त्र परिधान केलेल्या यजमानाने वेदपारंगत चार ब्राह्मण व शिल्पी (सुतार, गवंडी इत्यादी) यांच्यासह गृहासंबंधी स्तंभास स्नान घालावे. पीतरंगाच्या अक्षता, वस्त्रे, अलंकार इत्यादींनी त्याची पूजा करावी. वेदमंत्राच्या घोषात, मंगलकारक गीत व वाद्ये यांच्या स्वरांत तो स्तंभ त्या शिलेवर स्थापन करावा. यावेळी 'वास्तोष्पते पतिजानीहि' या मंत्राने मध व घृत या द्रव्यांनी होम करावा. पायसाचे भोजन ब्राह्मणांना द्यावे.

असा होम पांच वेळा करावा. यानंतर उजव्या हाताची तर्जनी, मधले बोट, अंगठा या तीन बोटांनी प्रदक्षिणेच्या क्रमाने वास्तूतील एक्याऐंशी वा चौसष्ट रेघा काढून भाग करावेत. प्रवाळ, रत्न, सुवर्ण, काही फळे यांचे वस्त्रगाळ चूर्ण करून त्याचे उदक सर्व एक्याऐंशी वा चौसष्ट भागांत शिंपडावे. भस्म, कोळसा, काष्ठ, नख, शस्त्र, चर्म, शिंग, अस्थी, नरकपाल; यांनी वास्तूमधील स्थानभाग काढू नयेत. काढले तर दुःख व भय होईल. या वास्तुस्थलाचे वर्णन विस्तृतपणे आले आहे.

एकदा घर बांधले की ते वाढवू नये. वाढविल्यास सर्व दिशांनी

वाढवावे. केवळ पूर्वेकडूनच वाढविले तर घरात राहाणाऱ्या लोकांत वैर उत्पन्न होते. केवळ दक्षिणेकडे वाढविल्यास घरातील लोकांचा अकाली मृत्यू होईल. पश्चिमेसच वाढविले तर अर्धभागाचा नाश होईल. उत्तरेस वाढविले तर यजमानास संतापजनक होते. पूर्वदक्षिणकोणात ते वाढविले तर अग्नीपासून भय निर्माण होते. नैर्ऋत्येकडून वाढविले तर घरातील बालकांना क्षयाचा त्रास होतो. वायव्यदिशेस वाढविले तर यजमानाच्या शरीरात वायुरोगाची पीडा होते. ईशान्यदिशेस घर वाढविले तर अन्न-नाश होतो. वास्तूतील देवतास्थान ईशान्यकोणात असावे. पाकगृह आग्नेयकोणात व त्याच्या उत्तरभागी उदकस्थान असावे. घराचे सर्व साहित्य नैर्ऋत्यदिशेस ठेवावे. स्नान करण्याची जागा बाहेरच्या ठिकाणी असावी. धन, धान्यांची स्थले वायव्यदिशेस असावीत.

## घरासाठी लाकडे कोणती असावीत ?

दोनशेसत्तावन्नाव्या अध्यायात गृहरचनेस काष्ठे कोणती आणावीत हे सांगितले आहे. धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, रेवती ही नक्षत्रे वर्ज्य करून ज्योतिषाने सांगितलेल्या मुहूर्तावर ज्ञात्याने वनात जावे. वृक्षाजवळ जाऊन त्याची बलिदानयुक्त पूजा करावी. वृक्ष-च्छेदनानंतर जे काष्ठ पूर्वेस वा उत्तरेस पडेल ते गृहरचनेस उत्तम मानावे. क्षीरवृक्ष (चीक निघणारा) गृहरचनेस योजू नये, पक्ष्यांनी वास केलेले वृक्ष, वायू व अग्नी यांनी पीडित असलेले वृक्ष, हत्तीने भग्न केलेले वृक्ष, विजेने दग्ध झालेले वृक्ष, अर्धवट शुष्क झालेले, भग्न झालेले, यज्ञस्थानावरील, देवालयाजवळचे, संगमाजवळचे, स्मशानामधील, सरोवराजवळील वृक्ष वर्ज्य करावेत. काटेरी वृक्ष, कळंब, निंब, बेहडा, भोकरी आंबा असे वृक्ष गृहासाठी वापरू नयेत. असाणा, अशोक, मोह, सागवान, शाल, चंदन, फणस, देवदास, दारुहळद, हे वृक्ष गृहरचनेस अशुभ आहेत.

शिशवी, श्रीपर्णी, टेंबुरणी वृक्ष योग्य समजावेत. तिवस, सुरू, अर्जुन, पद्मकाष्ठ या वृक्षांची लाकडे इतर लाकडांशी युक्त झाली असता ती इष्टकार्याची सिद्धी करीत नाहीत. कापलेल्या लाकडाचा गाभा अति

पीतवर्णाचा असला तर त्यापासून घरास पीडा होईल असे जाणावे. मंजिष्ठवर्णाचा असला तर वेडकांची पीडा होते. निळ्या रंगाचे काष्ठ वापरले तर घरात सर्पांचा त्रास होईल. आरक्त वर्णाच्या लाकडापासून सरड्यांचा उपद्रव होईल. मौक्तिकासमान शुभ्ररंगाची लाकडे वापरली तर घरात राघूंची वसती होईल. पिंगट रंगाच्या लाकडामुळे घरात उंदीर होतील. गेंड्याच्या रंगाची लाकडे वापरली तर जलाची पीडा होईल.

गृहासाठी जे लाकूड तोडले असेल ते शुभ शकुन पाहून गृह-रचनेच्या स्थानी आणावे. वास्तूच्या भूमीच्या रुंदीच्या संख्येने त्या क्षेत्राच्या लांबीस गुणावे. या गुणाकारास आठाने भागल्यावर जी संख्या उरेल तो त्या वास्तूचा आय जाणावा. हा आय आठ प्रकारचा असतो. १) ध्वज, २) धूम, ३) सिंह, ४) श्वान, ५) वृषभ, ६) खर (गर्दभ), ७) हत्ती व ) ध्वांक्ष (काकपक्षी) हे आठ प्रकारचे आय होत. या प्रत्येक आयाची शुभाशुभ लक्षणे या अध्यायात आली आहेत. गृहस्वामीने हातात दही, अक्षता, आम्रपल्लव, पुष्पे, फळे यांनी सुशोभित कुंभ घेऊन ब्राह्मणास सुवर्ण व वस्त्रे यांचे दान करावे. शांतिकर्म झाल्यावर वास्तूत प्रवेश करावा.

## देव व देवांगना यांच्या प्रतिमा कशा असाव्यात ?

दोनशेअठ्ठावन्नाव्या अध्यायात ज्ञानयोगापेक्षा कर्मयोग महत्त्वाचा असल्याचे त्याचे सविस्तर वर्णन आले आहे. प्रथम सूताने ऋषींना देव-पूजारूप कर्मयोग सांगितला आहे. त्याने प्रथम पूजेस विष्णूंचे रूप कसे असावे, यासंबंधी वर्णन केले आहे. विष्णुरूप शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे चारही हातात धारण करणारे असावे. त्यांचे मस्तक छत्राकार असावे. त्यांचा कंठ शंखासमान असावा. कमलांसारखे सुंदर नेत्र असावेत. नासिका उंच असावी. शिंपल्यासारखे कान असावेत. विष्णुरूप कधी अष्टभुज, तर कधी चतुर्भुज असते. पूजेस कधी द्विभुज विष्णूही चालतो. अष्टभुज विष्णूची आयुधे अशी; नंदक नावाचे खड्ग, गदा, बाण, सुंदर

म...२०

पद्म; ही आयुधे दक्षिण भागातील चार हातांत व धनुष्य, खेटक (ढाल), शंख व चक्र ही वामभागाच्या चार हातांत असावीत. चतुर्भुज मूर्तीत दक्षिणभुजांत गदा व पद्म आणि वामभुजांत शंख व चक्र अशी आयुधे असावीत.

भूदेवीची प्रतिमा कृष्णमूर्तीच्या दोन्ही चरणांमध्ये अधोभागी असावी. दक्षिणभागी नम्र झालेल्या गरुडाची स्थापना करावी. कृष्ण-मूर्तीच्या वामभागी लक्ष्मीची प्रतिमा करावी. तिच्या हातात कमल व मुख सुलक्षण असावे. श्री व पुष्टी या दोनही देवतांच्या हातांत कमल धारण केलेले असावे. त्या कृष्णमूर्तीच्या दोनही बाजूंना असाव्यात. कृष्णमूर्तीच्या ऊर्ध्वभागी तोरण बांधावे. त्यावर विद्याधर नावाचे देवगण, देवांच्या दुंदुभी, गंधर्वांची दांपत्ये, अनेक प्रकारची पत्रे, वेली, सिंह, वाघ, कल्पवृक्ष, देव इत्यादींची चित्रे काढून तोरण सुशोभित करावे.

या प्रतिमांचे मानही सांगितले आहे. गृहांच्या जाळ्यांच्या छिद्रा-तून आलेल्या सूर्यकिरणात जे रज दिसते, त्यास त्रसरेणू म्हणतात. असे आठ रेणू झाले की, त्यांना वालाग्र असे नाव मिळते. आठ वालाग्रांची लिक्षा होते. आठ लिक्षांची एक एक यूका होते. आठ यूकांचा एक यव होतो. आठ यवांचे एक अंगुल होतो. अशा द्वादश अंगुलांच्या मानाने मूर्तीचे मुख असावे. या मुखाच्या मानाने मूर्तीचे इतर अवयव असावेत.

सुवर्ण, रूपे, तांबे, रत्ने, शिला, काष्ठ, मिश्रधातू, पितळ, ताम्र व काष्ठ यांचा मिश्रित धातू, चंदनादि काष्टे यांची प्रतिमा पूजेसाठी इष्ट आहे. प्रतिमा अंगुष्ठाच्या अग्रापासून वितीच्या मानाइतकी उंचीची करावी. यापेक्षा अधिक उंचीची प्रतिमा घरात पूजेसाठी उपयुक्त नाही. देवालय, राजमंदिर यांतील प्रतिमेची उंची सोळा वितींपेक्षा अधिक नसावी.

मंदिराच्या मुख्य द्वाराच्या उंचीचे जे मान असेल त्याचे आठ भाग करावेत. एक भाग त्यांतील वगळून जे सात राहिले त्यांचे पुन्हा तीन भाग करून त्यांतील भागद्वय परिमित उंचीची प्रतिमा असावी. एका भागाएवढे सिंहासन असावे. यापेक्षा उंच वा नीच करू नये. प्रतिमेच्या मुखाच्या मानाने चरणांपासून मस्तकापर्यंत नऊ भागांत सर्व

अवयवांची रचना करावी. मूर्तीची मान चार अंगुले उंच करून एका भागात हृदय असावे. खालील बाजूस वर्तुळाकृतीत खोल नाभी असावी. तिची खोली व तिचा विस्तार एक अंगुल असावा. नाभीच्या खाली शिश्न करून दोन भागांत मांड्या व गुढघे करावेत. त्यांचे मान चार अंगुले असावे. खाली दोन भागांत पोटऱ्या व त्याखाली चार अंगुली उंचीचे चरण असावेत. मूर्तीचे मस्तक चवदा अंगुलांचे असावे.

मूर्तीचे ललाट चार अंगुले रुंद असून नासिकेचा विस्तारही तितकाच असावा. हनुवटी दोन अंगुले असून ओठ दोन अंगुलांचे असावेत. आठ अंगुले कपाळ असावे. दोनही भृकुटींचा विस्तार तितकाच असावा. भुवईची वक्राकार रेषा अर्धे अंगुले असावी. प्रतिमेचे नेत्र दोन अंगुले लांबीचे व एक अंगुल रुंदीचे असावेत. नेत्रातील बुबुळस्थान उंच असावे. नेत्राच्या पांचव्या भागांपैकी अर्ध्या भागावर बाहुलीचा मध्यबिंदू असावा. नासिकेचे मूळ दोन अंगुले रुंद असून दोनही नाकपुड्या एक अंगुल रुंदीच्या असाव्यात. नाकाची छिद्रे अर्ध्या अंगुलाएवढी रुंद असावीत. हनुवटी, भ्रुकुटी, गाल, वरचा ओठ, कर्णमूल, शिखास्थान, मान, स्तने, त्यांची अग्रे, बाहुमूल, पायांची बोटे, टाच, हाताचा अंगठा, करंगळी इत्यादींचीही प्रमाणे दिलेली आहेतः प्रतिमेच्या मनगटाच्या अधोभागी केसांच्या रेखा कराव्यात. मूर्तीची कंबर अठरा अंगुले विस्तृत असावी. स्त्रियांच्या कटीचा विस्तार बावीस अंगुलांचा असावा. स्तन बारा अंगुले विस्तृत असावेत.

मूर्ती सतेज, सुंदर असून अग्रभागी थोडी आरक्त असावी. देव-स्त्रिया आकृतीने कृशांगयुक्त असाव्यात, स्तन, ऊरू (मांड्या), जघन (कटीचा पुढचा भाग), हे पुष्टतेने इतर अंगांपेक्षा अधिक असावेत. स्त्रियांच्या मूर्ती आभूषणांनी अलंकृत असाव्यात. मस्तकावरील केसांची रचना सुंदर असावी.

## शिवमूर्ती कशी असावी ?

यानंतर दोनशेएकूणसाठाव्या अध्यायात श्रीराम, विरोचनपुत्र बली, वराह, नरसिंह, मत्स्य, कूर्म, रुद्र, शिव; इत्यादींच्या मूर्तींची

प्रमाणे सांगितली आहेत. शिवमूर्ती अग्नितप्त सुवर्णासारखी कांतिमान असावी. मांड्या, भुज, स्कंध या पुष्ट अवयवांनी शोभणारी असावी. ती शुभ्र वर्णाची असून सूर्यकिरणांसारखी तेजःपुंज असावी. चंद्रासारख्या प्रकाशाची असावी. जटामुकुट धारण केलेली असावी. शिवप्रतिमेचे बाहू गजशुंडेप्रमाणे दीर्घ व सरळ असावेत. जंघा, ऊरू यांचा घेर वर्तुळाकार असावा. मूर्ती ऊर्ध्वकेश व आकर्ण विशाल नेत्र यांनी युक्त असून व्याघ्र-चर्म परिधान केलेली असावी.

शिवप्रतिमेचे बाहू अनेक आभरणांनी भूषित असावेत. कर्ण कुंडलांनी शोभावेत. शिवमूर्ती आजानुबाहू असावी. मूर्तीच्या वामहस्तात ढाल असावी. दक्षिणहस्तात शंख, शक्ती, दंड व त्रिशूल असावे. नरक-पाल, नाग व खट्वांग; ही आयुधे वामहस्तात असावीत. शिवमूर्तीची आकृती मयूराकार नृत्याच्या भावात उभी असावी. नृत्याकृतीत असलेली शिवमूर्ती दशभुजांची व गजचर्म परिधान केलेली असावी. त्रिपुर दग्ध करणाऱ्या शिवमूर्तीस सोळा हात असावेत. इतर सहा भुजांत चक्र, गदा, शार्ङ्गधनुष्य, घंटा, पिनाकधनुष्य, विष्णुरूपी बाण यांची नियुक्ती व्हावी.

चतुर्भुज वा अष्टभुज शिवमूर्ती ज्ञानयोगदायक असते. तीक्ष्ण नासिकाग्र, दात, भयंकर मुख यांनी युक्त भैरवाची मूर्ती मोठी असावी. ही शिवालयाच्या सन्मुख मंदिरात असावी. मुख्य शिवालयात नसावी. न्यून प्रमाणाची मूर्ती, भयंकर मुखाची मूर्ती यजमानाचा नाश करील. अधिक प्रमाणाची मूर्ती शिल्पकारास मारील. कृश मूर्ती यजमानाच्या द्रव्याचा नाश करील. ज्या देशात मूर्ती कृश उदराने युक्त असेल त्या देशात दुर्भिक्ष पडेल. कृश मूर्ती धनाचा नाश करणारी होईल. वक्र-नासिकायुक्त मूर्ती दुःखकारक होईल. प्रमाणापेक्षा न्यून मूर्ती यजमानास भय उत्पन्न करील. मूर्ती नेत्रहीन झाल्यास यजमानाच्या नेत्रांचा नाश करील. मूर्तीचे मुख सौंदर्यहीन असेल तर पूजकास दुःख होते. हस्तपाद-रहित मूर्ती यजमानास नाशकारक होते. वक्षस्थलरहित मूर्ती पुत्र व मित्र यांचा नाश करील.

मध्यभागी शिव, भोवती सर्व देव त्यांची प्रार्थना करीत आहेत, असे तिचे ऐश्वर्य असावे. इंद्र, नंदी, प्रमथादी गणनायक, भृंगी, भूत,

वेताळ हे सर्व शिवांची स्तुती करीत आहेत, असे असावे. गंधर्व, विद्याधर, किन्नर, अप्सरा, गुह्यक यांचे गण, श्रेष्ठ मुनी हे सर्व हातांत रुद्राक्षमाला घेऊन कोमल पल्लव, पुष्पे, फलादिक घेऊन शिवांना अर्पण करीत आहेत, नमस्कार करीत आहेत, अशी शिवमूर्ती करावी.

## अर्धनारीश्वररूपाची मूर्ती

यानंतर दोनशेसाठाव्या अध्यायात शिवांच्या अर्धनारीश्वरमूर्तीचे वर्णन आले आहे. देवाधिदेव शिवांचे अर्धांग अति सुंदर स्त्रीरूपात तयार करावे. शिवांच्या अर्धभागी बालचंद्रयुक्त जटाभाग तयार करावा. पार्वतींच्या अर्धभागी केसांचा भांग व कुंकुमतिलक दाखवावा. शिवांच्या दक्षिणकर्णात वासुकी व वामकर्णात कुंडल असावे. कुंडलाच्या ऊर्ध्वभागी वाळी असावी. त्रिशूलधारी देवाच्या दक्षिणहस्तात नरकपाल व त्रिशूल असावे. वामभागी पार्वतीच्या हातात दर्पण, कमल देऊन वामबाहू बाहुभूषणाने भूषित करावा. शिवांना यज्ञोपवीत, रत्नमणी, मौक्तिके दाखवावीत.

पार्वतीकडील अर्ध्या भागात एक पुष्ट स्तन दाखवावा. याच वामार्धात कंबरेच्या खाली बहुमुल्ययुक्त कमरपट्टा असावा. शिवांकडील दक्षिणार्धात लिंगाचा अर्धा भाग स्पष्ट दिसण्यासारखा उंच करावा. अर्धा भाग नाग व कृष्णाजिन यांनी युक्त असावा. पार्वतीकडील अर्धा वामभाग परिधानवस्त्राने युक्त असून तो त्रिसूत्री कमरपट्ट्यात गुंतलेला असावा. दक्षिणार्धातील शिवांचे रूप अनेक रत्ने व नाग यांनी सुशोभित करावे. महादेवांचा दक्षिणचरण अधोभागी कमलाकृती करून त्यावर स्थापन करावा. पार्वतीकडील अर्धांगात वामचरण नूपुराने अलंकृत करावा. शिवपार्वतींच्या हातांच्या बोटांत अंगठ्या असाव्यात. अर्धांगी पार्वतीचा चरण आरक्तवर्णाचा असावा.

## उमामहेश्वरांची मूर्ती

यानंतर याच अध्यायात उमामहेश्वरांच्या मूर्तीचेही वर्णन आले आहे. उमामहेश्वरांची मूर्ती चतुर्भुज वा द्विभुज असावी. मस्तकावर जटाभार, चंद्रभूषण, त्रिनयन यांनी मूर्तीस शोभा आणावी. शंकरांचा

एक हात पार्वतीच्या स्कंधावर असावा. त्यांच्या दक्षिणहस्तांत कमल व त्रिशूल असावीत, त्यांचा डावा हात पार्वतीच्या स्तनावर असावा. ही मूर्ती व्याघ्रचर्म परिधान केलेली असावी. नाना प्रकारची वस्त्रे, उत्तम वेष व मस्तकावर अर्धचंद्र यांनी ही मूर्ती सुशोभित असावी. पार्वतीदेवी उमामहेश्वरांच्या मांडीवर वामभागी बसलेली असून त्यांच्या भुजांनी ती आलिंगित असावी. कुरळे केस, उत्तम वर्ण व कपाळावर कुंकुमतिलक यांनी ती शोभलेली असावी. या देदीप्यमान मूर्तीस रत्नखचित कुंडले, कर्णिका (तानवडे), हार, बाहुभूषणे यांनी अलंकृत करून तिने सप्रेम नेत्रकटाक्षांनी शंकरांच्या मुखास अवलोकन करावे. पार्वतीने देवाधिदेवांच्या वामस्कंधास स्पर्श केलेला असावा. महादेवांचा दक्षिण स्कंध व दक्षिणकुशी यांना पार्वतीनें किंचित स्पर्श केलेला असावा.

उमामहेश्वरांना तिहेरी कटिसूत्र असून त्याच्या साखळीचा घोंस कटिपश्चात्भागाच्या बाजूवर लोंबता असावा. जया, विजया, कार्तिकस्वामी, गणपती यांना महादेवांच्या बाजूंना उभे करावे. प्रमथादिक गण, गुह्यक, विद्याधर, वीणा ग्रहण केलेले असावेत.

## शिवनारायणांची मूर्ती

याच अध्यायात शिवनारायणांच्या मूर्तीचे स्वरूप विशद केले आहे. शिवनारायणांच्या वामार्धभागी माधवांची आकृती करून दक्षिणभागी शूलपाणी शिवांची आकृती करावी. वामभागी कृष्णांच्या दोन्ही हातांत रत्नजडित बाहुभूषणे असावीत. हातांत शंख, चक्र धारण केलेले असावे. गदाधारी माधवांच्या हातात गदा असावी. वामकटीवर तेजःपुंज कटिसूत्र असावे. त्यांना पीतवस्त्र असावे. त्यांचा चरण रत्नजडित भूषणाने अलंकृत असावा.

शिवनारायणांच्या दक्षिणार्धात जटाभार अर्धचंद्रकृती भूषणाने नटलेला असावा. भुजंगरूपाचा हार, कंकणे यांनी तो भाग सुशोभित व दक्षिणकर वरद लक्षणाने युक्त असावा. दक्षिणार्धातील शिवरूप त्रिशूल नावाचे आयुध व नागरूप यज्ञोपवीत यांनी युक्त असावे. अर्धकटीत गजचर्मरूपी वस्त्र परिधान केलेले असावे. शिवाकृतीचा दक्षिणचरण

वैडुर्यमणी, रत्ने व नाग यांनी विभूषित असावा.

## वराहमूर्तीचे रूप

यानंतर याच अध्यायात वराहमूर्तीचे रूप वर्णन करून सांगितले आहे. महावराहांच्या एका हातात कमल व एका हातात गदा असावी. तीक्ष्ण दंष्ट्राग्र, नासिका व मुख यांनी ते युक्त असावें. पृथ्वी त्यांच्या वामकर्पूरावर (कोपरावर) असावी. अथवा धरणी दातरूपाने असून एका हातात कमल असावे. दंष्ट्रेच्या ऊर्ध्वभागी धरणीदेवी असावी. तिचा द्वितीय कर स्वकटीवर असावा. वराहमूर्तीचा एक चरण कूर्मावर स्थापन केलेला असून द्वितीय चरण शेषाच्या मस्तकी असावा. भोवती ब्रह्मादिक लोकपाल स्तुती करताना असावेत.

## नृसिंहमूर्तीचे रूप

नृसिंहमूर्ती अष्टभुजांची असावी. त्यांचे सिंहासन भयंकर असून ते विदारित मुख व नेत्र यांनी युक्त असावे. ती ताठ असून आयाळयुक्त असावी. दितिपुत्र हिरण्यकशिपूचे विदारण मूर्ती करीत असल्याचे दाखवावे. हिरण्यकशिपूच्या आतड्यांचा समुदाय बाहेर आलेला असावा. भ्रुकुटी, मुख, नेत्र यांतून रक्त बाहेर येत असलेले दाखवावे. इंद्रियांना बद्ध केल्यामुळे तो दैत्य नरसिंहाची निर्भर्त्सना करीत असलेला दाखवावा. त्याच्या हातांत खड्ग व खेटक म्हणजे ढाल असावी. ब्रह्मादिक प्रमुख देव नरसिंहांची स्तुती करीत असताना दिसावेत.

## विनायक व कात्यायनी यांच्या मूर्ती

अशाच प्रकारे या अध्यायात त्रिविक्रम, कार्तिकस्वामी, मत्स्य, कूर्म, विनायक, कात्यायनी; इत्यादी देवदेवतांच्या मूर्तींचे वर्णन आले आहे. गणपतीचे मुख गजासारखे एक दंष्ट्रायुक्त मोठे असावे. त्रिनेत्र, लंबायमान विशाल उदर, सुपासारखे कान, स्कंधांवर आलेले कर्ण, दक्षिणकरावर भक्तांनी अर्पण केलेले पदार्थ, द्वितीय दक्षिणकरात कमल धारण केलेले असावे, वामकरांतील एकात मोदक व दुसऱ्यात परशू असावा.

ब्रह्मदेव, विष्णू व शिव यांच्या मूर्तींतील काही साम्य कात्यायनीच्या मूर्तीत असावे. मस्तकावर जटाजूट व अर्धचंद्राकृती चिन्ह असावे, ती त्रिनयन व कमलाकर पूर्णचंद्राप्रमाणे आल्हादकारक मुखाने शोभणारी असावी. देवी अतसी म्हणजे जवसाच्या पुष्पाप्रमाणे शोभणारी व विद्यादी सकळ कळांनी युक्त असावी. ती नित्य नूतन तरुण असावी. सर्व आभरणांनी विभूषित असावी. दंतपंक्ती अति सुंदर असावी. पुष्ट व उंच तिचे स्तन असावेत. तिच्या उदराची ठेवण त्रिवलीने युक्त असावी. महिषासुराचे मर्दन करीत असलेली ती असावी. त्रिशूल, खड्ग, चक्र, तीक्ष्ण बाण, शक्ती इत्यादी आयुधांनी ती संपन्न असावी.

खेटक (ढाल), दोरी लावून सिद्ध केलेले धनुष्य, पाश, अंकुश, घंटा, परशू ही आयुधे तिच्या वामांगाकडील पांच हातांत असावीत. शिरच्छेद केलेला महिषासुर देवीच्या अधोभागी असावा. महिषासुराच्या मानेतून निघालेला दानव हातात खड्ग धारण करून वटारलेल्या डोळ्यांनी देवीकडे पाहात असून तो आरक्त वर्णाचा असावा. देवीने नागपाशाने बद्ध केलेला असूनही तो त्याच्या वक्र भ्रुकुटींनी भयंकर मुखाचा असावा. युद्धाच्या श्रमाने तो रक्त वमन करणारा असावा.

देवीचा दक्षिणचरण सिंहाच्या पाठीवर मध्यभागी असून वामचरणाचा अंगुष्ठ त्या असुराच्या मस्तकावर असावा. हा पाय टाचेच्या बाजूने थोडा वर केलेला असावा. सर्व देव त्या देवीची स्तुती करीत असलेले दाखवावेत. यानंतर देवराज इंद्राच्या मूर्तीचे वर्णन आले आहे.

## सूर्यदेवाच्या मूर्तीचे रूप

यानंतर दोनशेएकसष्टाव्या अध्यायात सूर्याच्या मूर्तीचे वर्णन आले आहे. सूर्यदेव सुंदर डोळे व हातात कमळ धारण करणारा असावा. तो रथात आरूढ झालेला असावा. सूर्याचा रथ सात अश्व व एक चक्र यांनी युक्त असावा. ते कमलगर्भासारखे कोमल कांतीने सुशोभित असावे. दोन कमळे सूर्याने लीलेने स्कंधावर धारण केलेली असावीत. सूर्याने दोन वस्त्रे धारण करावीत. त्याचे चरण अमित तेजाने अदृश्य असतात. दोनही बाजूंनी दंड धारण केलेले पिंगट वर्णाचे द्वारपाल उभे असलेले

दाखवावेत. दोनही भागी हातांत खड्ग धारण केलेले पुरुष व हातात लेखणी धारण केलेले अविनाशी ब्रह्मदेव एका बाजूस असावेत.

सूर्याचा अरुण नावाचा सारथी कमलपत्रासारखा आरक्तवर्णाचा असावा. रथास दोनहीकडे कंठांत माळा असलेले दोन अश्व असावेत. ते सर्परूपी रज्जूंनी बांधलेले असावेत. सूर्य कमलाकार अथवा उच्चैःश्रवा सप्तमुख अश्वावर हातात पद्म धारण करून बसलेला दाखवावा. यानंतर अग्नी, यम, लोकपाल, वरुण, वायू, कुबेर, ईश्वर, मातृका, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, योगीश्वरी, कपालमालिनी, चामुंडा, लक्ष्मी, यक्षिणी, नाग, कालभैरव, मदन; अशा प्रमुख देवांच्या व देवींच्या मूर्तींचे वर्णन आले आहे.

## लक्ष्मी व मदन यांच्या मूर्ती

लक्ष्मीची मूर्ती कशी असावी ? ही देवी नित्य षोडशवर्षात्मक असून उत्तम तारुण्याने युक्त असावी. तिचे मुख कुंकुमादी सौभाग्यचिन्हांनी अलंकृत असावे. तिचे गाल पुष्ट असावेत. आरक्त व वक्र भृकुटी असावी. मस्तकावरील केसांचा सुंदर भांग असावा. पद्म, स्वस्तिक, शंख यांच्या आकृतींची शिरोभूषणे असावीत. रत्नजडित कुंडलांनी शोभायमानही असावी. तिची स्तने पुष्ट असून शरणागत बालकांना तृप्त करण्यासाठी उत्सुक व उच्च आणि वर्तुळाकार असावीत. ती कंचुकीने आच्छादित असावीत. हारांनी ती सुशोभित व्हावीत. तिचे भुज गजाच्या शुंडेसारखे पुष्ट व सरळ असावेत. बाजुबंद व तेजस्वी कंकणे यांनी ते शोभावेत. तिच्या दक्षिणहातात श्रीफल बेल वा नारळ व वामहस्तात कमल असावे.

अशी ही लक्ष्मी तप्त सुवर्णाच्या रंगाची असून कमरपट्ट्यासारख्या दागिन्यांनी शोभणारी असावी. तिने श्वेत वस्त्र परिधान केलेले असावे. तिच्या दोनही बाजूंना चवऱ्या ढाळणाऱ्या अनेक स्त्रिया असाव्यात. ही लक्ष्मीदेवी पद्माकृतीच्या सिंहासनावर पद्मासन घालून आरूढ झालेली असावी. तिच्या दोनही बाजूंना गज उभे असून ते स्वतःच्या शुंडाग्रांनी उदकपूर्ण कलशांनी तिला स्नान घालीत असावेत. इतर दोन गज तिचे

अंग प्रक्षालन करीत आहेत, सर्व लोकपाल, गंधर्व, गुह्यक तिचे स्तवन करीत आहेत, अशी लक्ष्मीची प्रतिमा असावी.

मदनाच्या प्रतिमेला दोन भुज असून पुष्प हे त्याचे आयुध असावे. एका बाजूस अश्वमुख किन्नर स्वतःच्या हातात मत्स्यचिन्हयुक्त ध्वज धारण करून उभा असावा. या मदनाच्या दक्षिणहस्तात पुष्पबाण व डाव्या हातात पुष्पाचे धनुष्य असावे. त्याच्या दक्षिणप्रांती प्रीती नावाची स्त्री नाना प्रकारच्या पक्वान्नांचे भोजन घेऊन उभी असावी. त्याच्या वामभागी त्याची दुसरी स्त्री रती या नावाची असावी. त्याची शय्या कमलपुष्पे व उत्तम वस्त्रे यांची असावी. समीप पटह नावाचे वाद्य असावे. अत्यंत विषयलंपट पुरुष हा गर्दभासारखा असतो, हे सांगण्यासाठी समीपच एका कामातुर गर्दभाचे चित्र असावे. ही मदनमूर्ती इंद्राच्या नंदनवनात पुष्पशय्येवर आरूढ झालेली असावी. तिच्या एका बाजूस अमृततुल्य उदकाने भरलेली एक विहीर असावी. पुष्पायुधाने युक्त अशी ही मदनमूर्ती अत्यंत शोभायमान असावी.

## देवांचा स्थापनाविधी

यानंतर दोनशेबासष्टाव्या अध्यायात देवांच्या सिंहासनाचे वर्णन आले आहे. पुढल्या अध्यायात प्रतिमांची लक्षणे निवेदन केली आहेत. यानंतरच्या अध्यायात देवांचा स्थापनाविधी, कुंड, मंडप, वेदी, इत्यादींचे वर्णन आले आहे. चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, माघ, फाल्गुन या मासांत देवतांची स्थापना केली तर ते शुभदायक होते. शुक्लपक्षातील द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, दशमी, पूर्णिमा व त्रयोदशी या तिथी श्रेष्ठ आहेत. पूर्वाषाढा, उत्तराषाढा, मूळ, उत्तरभाद्रपदा, हस्त, अश्विनी, रेवती, पुष्य, मृग, अनुराधा, स्वाती ही नक्षत्रे देवतास्थापनेस उत्तम आहेत. बुध, बृहस्पती, शुक्र हे वार प्रशस्त आहेत.

देवालयाच्या उत्तरेस अथवा पूर्वेस मंडप बांधावा. तो सोळा हात, बारा हात किंवा दहा हात या प्रमाणात असावा. ऊर्ध्वभागी तो आच्छादित करावा. मंडपाच्या मध्यभागी एक वेदिका तयार करावी. चारही दिशांना चार द्वारे करून प्रत्येक द्वारावर तोरण बांधावे. मंडपाच्या पूर्वेस प्लक्ष

(पिंपरी)द्वार असून दक्षिणेस औदुंबरद्वार असावे. पश्चिमेस अश्वत्थ-द्वार असून उत्तरेस वटवृक्षद्वार असावे. मंडपाची भूमी सुंदर असून ती सारवून सुशोभित केलेली असावी. पुष्पे व कोमल पल्लव यांनी मंडप सजवावा. द्वारावर छिद्ररहित असे आठ कलश स्थापन करावेत. त्यांत तेज:पुंज सुवर्ण, सर्व औषधी, अनेक फले, चंदन व उदक घालून त्यांना दोन शुभ्र वस्त्रांनी वेष्टन करावे. आम्रपल्लवांचे आच्छादन करावे. मंडपात गंध, धूप लावून ध्वज लावावेत. मेघाकार पताका मंडपाच्या मध्यभागी लावावी.

नंतर प्रत्येक ध्वजात त्याच्या देवतेच्या मंत्रांनी गंध धूपादी समर्पून पृथक् पृथक् बली द्यावा. नंतर त्या मंडपात सप्तरात्र, पंचरात्र, त्रिरात्र, एकरात्र अशा देवतांची स्थापना करावी. मुख्य मंडपाच्या उत्तरेस देवाचा स्नानमंडप करावा. तेथे लिंगाची वा मूर्तीची पूजा करावी. यजमानाने ऋत्विज ब्राह्मणांचे पूजन करून त्यांना दक्षिणा द्यावी. मुख्य आचार्यास गोप्रदान, पृथ्वी व सुवर्ण यांचे दान करावे. नंतर 'ॐनमो भगवते तुभ्यं०' या मंत्राने मुख्य आचार्याने भक्तिपुर:सर त्या मूर्तीस नेत्रचिन्ह लावावे. मंत्राने मूर्तीस अभिमंत्रित करून सुवर्णाच्या शलाकेने देवाच्या नेत्रगोलांचे चिन्ह व त्यांतील बाहुली याच मंत्राने काढावी. यावेळी मंगलवाद्ये, गायन, वेदघोष इत्यादी कल्याणवृद्धीसाठी करावे. म्हणजे सर्व अमंगलाचा नाश होतो. नेत्रचिन्ह करण्याचा प्रकारही या अध्यायात विस्ताराने सांगितला आहे.

दोनशेपासष्टाव्या अध्यायात मूर्ती स्थापन करणारा व मूर्तीच्या ठिकाणी देवतेचे सान्निध्य यांचे वर्णन आले आहे. मूर्तीच्या स्थापनेचा विधीही विस्तारपूर्वक आला आहे. मूर्ती स्थापन करणारा ब्राह्मण कृष्ण-सारमृग संचार करीत असलेल्या देशातील असावा. तो आकृतीने सुंदर, हस्तपादिक सर्व अवयवांनी पूर्ण, वेद व मंत्र यांत प्रवीण, पुराणज्ञाता, तत्त्वज्ञानी, दंभ, लोभरहित, अंत:शौच व बाह्यशौच यांबद्दल निरंतर तत्पर, वेदबाह्य कर्म करणाऱ्याविषयी निस्पृह, शत्रू व मित्र यांच्याबद्दल समबुद्धीचा, ब्रह्मा-विष्णू-शिव यांच्यावर प्रीती करणारा, यथार्थ तत्त्व जाणणारा, वास्तुशास्त्रात पारंगत, दोषरहित असा ब्राह्मण असावा.

देवमूर्ती अथवा लिंगास स्नानार्थं केलेल्या मंडपात न्यावे व तेथे गीत व मंगलवाद्ये यांच्या घोषात स्नान घालावे. पंचगव्याचे कषाय उटणे, मृत्तिका, भस्म, उदक या चार द्रव्यांनी चार वेदमंत्र म्हणून प्रतिमेची शुद्धी करावी. स्नानानंतर 'अभिवस्त्र' या मंत्राचा उच्चार करून प्रतिमेला दोन वस्त्रांनी आच्छाहित करून देवास गंधानुलेपनादी उपचारांनी पूजित करावे. नंतर 'उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते०' या मंत्राने देवास उठवावे. 'अमूरज०', 'रथेतिष्ठ०' या मंत्रांनी देवासाठी केलेल्या रथात मूर्तीस स्थापन करून शिष्यगणांनी समारंभाने ती मूर्ती आणून 'आकृष्णेन०' या मंत्राने तिला देवालयात आणावे.

यजमानाने मंदिरात दर्भांचे आस्तरण करून पुष्पशय्या करावी व तीवर मूर्तीस ठेवावे. शय्येवर मूर्तीस पूर्वाभिमुख शयन करवून तिचे मस्तक दक्षिणेकडे असावे. देवाच्या शिरोभागी दक्षिणेकडे 'आपोदेवी०' व 'आपोस्मान् मातरः' या दोन मंत्रांचा जप करून निद्राकाली स्थापन करण्याचा उदकपूर्ण कलशवस्त्राने आच्छादित करून त्यात सुवर्ण टाकावे. यानंतर त्याने देवाचे नेत्र उत्तम रेशमी वस्त्राने आच्छादित करून त्याच्या मस्तकाखाली रेशमाची उशी द्यावी. मध व गोघृत यांनी देवाच्या नेत्रांना अभ्यंजन (लेपन) करून शुभ्र मोहऱ्यांनी पूजा करावी. 'आप्यायस्व', 'याते रुद्रशिवा०' या दोन मंत्रांनी देवाची गंधपुष्पांनी पूजा करावी. 'बार्हस्पत्य०' या मंत्राने देवास शुभ्र पुष्पांचा हार घालावा. उत्तम रेशमी वस्त्रांचे पडदे लावावेत. देवाच्या बाजूंना छत्र, चामरे, दर्पण लावून मध्यभागी पुष्पयुक्त चांदवा बांधावा. नाना प्रकारची रत्ने, औषधी, चित्रविचित्र पात्रे, शयने, आसने इत्यादी यजमानाने वैभवानुसार 'अभित्वाशूर०' या मंत्राने देवाच्या मंदिरात स्थापावीत. दुग्ध, मध, घृत, भक्ष्यपक्वान्ने, भोज्यान्न, पायस, मधुर, कटू (तिखट) कषाय(तुरट), आम्ल, क्षार, तिक्त (कडू). अशा षड्रसांचे उपचार देवाच्यासाठी तयार ठेवावेत.

नंतर 'त्र्यंबकंयजामहे०' या मंत्राने देवाच्या अष्टदिशांना बली समर्पण करावा. मूर्तिरक्षण करणारे ब्राह्मण बत्तीस असले तर ते प्रत्येक दिशेस चार अथवा सोळा असले तर प्रत्येक दिशेस दोन व आठ असतील

तर प्रत्येक दिशेस एक स्थापन करावेत. चार दिशांना चार द्वारपाल असावेत. पूर्वेकडील द्वारपाल ऋग्वेदी असून त्याने श्रीसूक्त, पावमान, सोमसूक्त, शांतिकाध्याय, इंद्रसूक्त, रक्षोघ्नसूक्त इत्यादींचा जप करावा. दक्षिणेकडील यजुर्वेदी द्वारपालाने रुद्र, पुरुषसूक्त, शुक्रसूक्त इत्यादींचा जप करावा. पश्चिमेकडील सामवेदी द्वारपालाने वामदेव, बृहत्साम, ज्येष्ठसाम, रथंतर या सामवेदातील भागांसह शांतिसूक्त, पुरुषसूक्त, रुद्रसूक्त, भारुंडसाम यांचा जप करावा. उत्तरद्वारावरील अथर्ववेदी ब्राह्मणाने अंगिरस, नील, रौद्र, अपराजितादेवीचे सप्तसूक्त, रुद्रसूक्त, शांतिकाध्याय यांचा जप करावा.

देवाची स्थापना करणाऱ्या मुख्य आचार्याने देवतेच्या शिर-स्थानीच्या कुंडात व्याहृतिपूर्वक शांतिक व पौष्टिक या मंत्रांनी होम करावा. पलाश, औदुंबर, अश्वत्थ, अपामार्ग (अघाडा), शमी यांच्या समिधांनी एक सहस्राचा होम करून देवमूर्तीच्या चरणांना स्पर्श करावा. कुंडाच्या अष्ट दिशांना वसलेल्या ब्राह्मणांनी पुन्हा सहस्रहोम करून देवाच्या नाभीस, वक्षस्थलास व मस्तकावर मुख्य आचार्याने स्पर्श करावा. मूर्तिरक्षक ब्राह्मणांनी नंतर योनिमुख व मेखला यांनी युक्त करून भक्तीने होम करावा. कुंडाच्या मेखलेवरची योनीची आकृती एक वीत लांबीची, पृष्ठभागी छिद्रयुक्त, दोनही बाजूंनी एक अंगुली उंच व गजाच्या ओष्ठासमान असावी. नाभीचा विस्तारही येथे सांगितला आहे.

आग्नेयकोणावरील कुंड, पूर्व, दक्षिण दिशांतील कुंडे यांतील ऋत्विजांनी उत्तराभिमूख वसून सर्वारिष्ट शांतीसाठी होम करावा. दश-लोकपाल, मूर्तींचे अधिपती, यांच्यासाठीही होम करावा. या मूर्ती अशा आहेत. १) वसुधा, २) वसुरेता, ३) यजमान, ४) दिवाकर, ५)जल, ६) वायू, ७) सोम व ८) आकाश. या मूर्तींची स्थापना होम करणाऱ्याने त्या कुंडात आदराने करावी. शर्व पृथ्वीचे रक्षण करतो. पशुपती अग्नीस रक्षितो. यजमानाचे उग्रमूर्ती शंकर रक्षण करतो. आदित्याचे रक्षण रुद्र करतो. भवनामा शिव जलाचे रक्षण करतो. ईशान वायूस रक्षितो. महादेश चंद्राचे व भीम नावाचे शिव आकाशाचे रक्षण करतात. असे हे अष्टमूर्ती सदाशिवच आठ मूर्तींचे रक्षक आहेत.

या देवांच्यासाठी यजमानानें द्रव्य व शक्ती खर्च करून वेदोक्त मंत्रांनी होम करावा: प्रत्येक कुंडावर त्याने शांतिकारक कलश स्थापावा. शतहोम वा सहस्रहोम झाल्यावर पूर्णाहुती द्यावी. यजमानाने आपले चरण समरीतीनें पृथ्वीवर जुळवून शांतचित्ताने आहुती अग्नीत समर्पण करावी. होमानंतर देवाचे चरण, त्याचा कटिप्रदेश, मस्तक यांवर उदक शिंपडावे. प्रतिप्रहरास धूप, नैवेद्य, चंदनमिश्रित उदक इत्यादी उपचार समर्पण करावेत. प्रत्येक होमानंतर यजमानाने ब्राह्मणास दक्षिणा द्यावी. शुभ्र वस्त्रांनी ऋत्विजांचा त्याने सत्कार करावा. सुवर्णाची विचित्र कडी, सुवर्णाचे गोफ, अंगठ्या, शयनोपयोगी वस्त्रे ब्राह्मणांना द्यावीत. ब्राह्मणांना भोजन द्यावे. सर्व दिशांना, भूतांना बलिदान द्यावे. नृत्य, गीत, पुराण-श्रवण इत्यादींनी रात्री मोठा उत्सव करावा.

## देवमूर्तीची स्थापना

यानंतर दोनशेसहासष्टाव्या अध्यायात देवाची प्रतिष्ठापना, त्याचे कीर्तन इत्यादीबद्दल वर्णन आले आहे. देवालयाच्या मानानें लिंगाचे मान करावे. अथवा लिंगाच्या मानानें देवालयाचे मान करावे. अभिमंत्रित केलेल्या पुष्पयुक्त उदकानें देवालयास प्रोक्षण करून देवाच्या गाभाऱ्यात दोनही भागांत सूत्र टाकावे. महाद्वारावर सूत्र टाकावे. देवालयाच्या मध्यभागी देवाची मूर्ती पूर्वाभिमुख स्थापित करावी. देवाचे मुख किंचित ईशान्यदिशेस असावे. देवाची स्थापना उत्तराभिमुख केल्यास आयुष्य व आरोग्य यांची प्राप्ती होते. देवाच्या सिंहासनात अधोभागी सर्वदा कूर्मशिला असावी. ऊर्ध्वभागी ब्रह्मशिला प्रमाणयुक्त असावी. पिंडिका (सिंहासन), नाम व लक्षण यांनी सिद्ध करून पंचगव्याने तिला प्रक्षालन करावे. अश्वत्थ, वट, तुरटी यांनी अभिमंत्रित कषायाने तिला सर्व बाजूंनी प्रक्षालित करावे. स्थापन करावयाच्या देवास 'उत्तिष्ठ ब्राह्मणस्पते' या मंत्राने उठवून गाभाऱ्यात आणून सिंहासनापाशी आणावे. त्या ठिकाणी देवास अर्घ्यपाद्यादी उपचार देऊन मधुपर्क द्यावा. देवाची स्थापना करण्यापूर्वी त्या ठिकाणी रत्ने घालावीत. वज्र (हिरे). मौक्तिके, वैडूर्य, शंख, स्फटिक, पुष्कराज, इंद्रनील, नील;

अशी रत्ने देवाच्या अधोभागी सिंहासनाच्या गर्तेत घालावीत. हरताल, मनशीळ, हिरे, श्यामवर्ण अंजन (सुरमा), काक्षी (तुरटी), काशी (मोळ) माक्षीक (सुवर्णमुखी), गैरिक (काव) यांचा उपयोग सिंहासनाचा अधोभाग वळकट व्हावा, म्हणून करावा. गोधूम (गहू), यव (सातू), तिल, मुद्ग (मूग), नीवार (देवभात), श्यामाक (सावे), सर्षप (मोहऱ्या), व्रीही (साळी) ही धान्ये व चंदन, रक्तचंदन, अगरू, अंजन, उशीर (वाळा), वैष्णवी (लघुशतावरी), सहदेवी (वाघांटी), लक्ष्मणा (जास्वंद); याही पदार्थांचा उपयोग करावा.

सर्व बीजे, सुवर्णादि धातू, नवरत्ने, औषधी, कांचन, पद्मराग (माणिक), पारद (पारा), कमल हे पदार्थ गर्तेत घालून सिंहासनावर कूर्म, पृथ्वी, वृषभ यांची स्थापना करावी. सुवर्ण, विद्रुम (पोवळे), ताम्र, कास्य, आरकूट (पितळ), रजत, शुद्धपुष्प, लोखंड यांना सिंहासनावरील ब्रह्मस्थानी घालावे. कांचन, हरिताल, यांचाही उपयोग करावा.

मुख्य प्रतिमेच्या भोवती पूर्वदिशादी क्रमाने इंद्रादि लोकपालस्वरूप देव न्यासपूर्वक स्थापन करावेत. अग्नी, यम, निर्ऋती, वरुण, वायू, चंद्र, ईश्वर, ब्रह्मदेव; इत्यादी देवांना मंत्रांसह वंदन करावे. या दहा लोकपालांचे मंत्र वृद्धी, पुत्र इत्यादी फळे देणारे आहेत. गर्तेस पायसाने लेप द्यावा. गर्ता शुभ्र वस्त्राने आच्छादित करावी. शयन करणाऱ्या देवास उचलून स्थापना करण्यासाठी ' ध्रुवा द्यौ ' या मंत्राने योग्य त्या जागी स्थापित करावे. देवाच्या मस्तकावर हात ठेवून मूर्तीत ब्रह्मस्वरूप देवाचे ध्यान करावे. देवव्रतसूक्त, सोमसूक्त, रुद्रसूक्त यांचा जप करावा. देवतांचे विविध मंत्र म्हणावेत. विष्णू, शंकर, चतुर्मुख ब्रह्मदेव, दिवाकर इत्यादींच्या स्थापनेचे मंत्र त्या त्या देवास अनुसरून म्हणावेत.

नंदिनामागण, महाकाल, वृष (नंदिकेश्वर), भृंगी, रिटी, कार्तिकस्वामी, देवी, विनायक, विष्णू, ब्रह्मदेव, रुद्र, इंद्र, जयंत, लोकपाल, अप्सरा, गंधर्व, गुह्यक यांची त्या त्या देवाभोवती स्थापना करावी. मुख्य देवाची स्थापना झाल्यावर यजमानाने मुख्य आचार्यास भक्तीने वस्त्रे, अलंकार, भूषणे इत्यादी समर्पण करावीत. अंध, दीन यांनाही

दाने द्यावीत.

प्रथम दिवशी स्थापित देवास मधानें लेपन करावे. द्वितीय दिवशी हळद व सिद्धार्थं (मोहऱ्या) यांनी मूर्तीस लेपन करावे. तिसऱ्या दिवशी प्रतिमेला यवमिश्रित चंदनाचा लेंप द्यावा. चौथ्या दिवशी मनशीळ व राळे यांच्या कल्काचा लेप द्यावा. असे मूर्तिलेपन सौभाग्यदायक व शुभ-दायक असते. व्याधींचा नाश यामुळे होतो. कृष्णवर्ण अंजन व तिल यांचे लेपन पांचव्या दिवशी करावे. सहाव्या दिवशी घृतयुक्त कमलकेसर-मिश्रित चंदनाचा लेप करावा. गोरोचन व अगरू यांच्या कल्काचा लेप सातव्या दिवशी करावा. एकदा स्थापित झालेल्या देवास चलित करू नये. कारण त्यामुळे दोष घडतो.

मूर्तीच्या खालील गर्तेत वाळू वगैरे घालून सर्व बाजू छिद्ररहित कराव्यात. देवाची स्थापना झाल्यावर ब्राह्मणादिकांना अन्न, वस्त्र इत्यादींचे दान करून मंगल करावे.

## देवमूर्तीचा स्नानविधी

यानंतर दोनशे सदुसष्टाव्या अध्यायात सूतानें ऋषींना देवास स्नान घालण्याचा विधी समजावून दिला: दही, अक्षता, दर्भ, क्षीर (उदक व दूध), दूर्वा, मध, यव, मोहऱ्या; या अष्टांगांचा अर्घ्य उत्तम असतो. गज व अश्व यांचा संचारमार्ग, वारूळ, वराहानें उकरलेले भूमिस्थळ, होमशाला, तीर्थस्थान, व्रज (गोळवाडा), गायींचे स्थान इत्यादी स्थानांतील मृत्तिका अभिमंत्रित करून देवाच्या स्नानासाठी केलेल्या कुंभात घालावी व 'शंन्नोदेवी' व 'आपोहिष्ठा' या मंत्रांनी त्या कलशात जल घालावे. नंतर गायत्रीमंत्रानें गोमूत्र ग्रहण करून 'गंधद्वारा' या मंत्रानें गोमय घ्यावे. 'आप्यायस्व' या मंत्रानें दूध, 'दधिक्राव्णो' या मंत्राने दही, 'तेजोसि' या मंत्राने घृत, यांना एका ताम्रपात्रात एकत्र करावे. त्यात 'देवस्यत्वा' या मंत्राने दर्भमिश्रित उदक घालावे. अशा रीतीनें पंचगव्य तयार करावे.

नंतर पंचगव्याने देवास स्नान घालून 'दधिक्राव्णो' या मंत्रानें केवळ दधिस्नान घालून नंतर रत्नयुक्त उदकाने स्नान घालावे.

'देवस्यत्वा' या मंत्राने देवास दर्भयुक्त स्नान घालावे. 'आयाहि' या मंत्राने फलसहित स्नान घालावे. गायत्रीमंत्राने अभिमंत्रित केलेल्या गंधोदकाने देवास स्नान घालून सहस्र वा पांचशे कलशांनी स्थापित मूर्तीस स्नान घालावे. आपल्या शक्तीस अनुसरून अडीचशे, सव्वाशे, चौसष्ट, बत्तीस, सोळा, आठ वा चार घटांनी देवास महास्नान घालावे. हे स्नानकलश सुवर्णाचे, रुप्याचे, ताम्राचे, पितळेचे, कांस्याचे वा मृत्तिकेचे असावेत. सहदेवी (लघुशतावरी), वचा (वेखंड वा अक्कलकाढा), व्याघ्री (रिंगणी), बला (चिकणा), अतिबला (नागबला), शंखपुष्पी (साखवेल), सिंही (डोर्ली वांगी), वसुवर्चला (जवसाचे झाड); या अष्टमहौषधी देवाच्या स्नानाच्या उदकात घालाव्यात. त्याचप्रमाणे यव (सातू), गोधूम (गहू), नीवार (देवभात), तिल, श्यामाक (सांवे), शाली (साळीचा भेद), प्रियंगू (राळे), व्रीही (भात); अशी धान्येही त्या उदकात घालावीत.

यानंतर स्वस्तिक, पद्म, शंख, कमल, सहस्र पाकळ्यांचे कमल, श्रीवत्साकृती, दर्पण, नंद्यावर्तपुष्प, अंतरपटाच्या शेल्यावरील सुगंधी द्रव्याने काढलेली आकृती; यांची शुद्धी गोमयाने करावी. पंचवर्णयुक्त ओदनादिक पदार्थ, पंचरंगमिश्रित रज (रांगोळी), दूर्वा, कृष्णवर्णाचे तीळ; हे सर्व एकत्र ठेवावेत. अनेक दीपांनी देवास निरांजन दाखवावे. अशी आरती झाल्यावर देवास आचमन द्यावे. यासाठी सर्वपापहारक भागीरथीचे जल असावे. नंतर देवास वस्त्र अर्पण करावे आणि म्हणावे, 'देवाच्याच उद्देशाने काढलेले हे सूत्र आहे. यज्ञातील मुख्य दानभूत दक्षिणायुक्त अशा केशरादि सुगंधी द्रव्यांनी सुवासित केलेली अशी ही तेजःपुंज वस्त्रे आहेत. देवा, ही तुम्ही स्वीकारावीत.' यानंतर आचार्याने हातांत दर्भ पवित्र घेऊन कर्पूर व केशरयुक्त चंदनाने स्थापित देवाची अर्चना करावी. 'त्वं सूर्य-चंद्र ज्योतींषि' या मंत्राने देवास प्रदक्षिणा घालून चाळीस दीप लावावेत. नंतर 'वनस्पतिरसोदिव्यो' हा मंत्र म्हणून देवास धूप अर्पण करावा. देवास आभरण अर्पण करून देवासाठी उत्सव करावा.

सात दिवस महोत्सव केल्यावर आठव्या दिवशी यजमानानें आचार्यांकडून स्वतःस अभिषेक करवून घ्यावा. यावेळी ‘देवस्यत्वा’ हा मंत्र, साम व अथर्व वेदांतील मंत्र, नवग्रहमखातील मंत्र ब्राह्मणांनी म्हणावेत. स्नान झाल्यावर त्यानें शुभ्रवस्त्रे परिधान करून स्थापित देवाचे पूजन करून त्याचे विसर्जन करावे. देवस्थापक मुख्य आचार्यास वस्त्रे, अलंकार, भूषणे यांनी पूजित करावे. पूजेची भांडी, मंडप, अवांतर पदार्थ मुख्य आचार्यास द्यावेत. देवस्थापक आचार्य संतुष्ट झाला तरच देव तृप्त होतो. हे देवतास्थापनकार्य दुष्ट, दांभिक, निषिद्ध अशा पुरुषाने करू नयें. वेदपारंगत अशा ब्राह्मणाने हे कार्य करावे. नाही तर यजमानाचा कुलक्षय होतो. देवतासान्निध्य न झाल्यानें तेथे पिशाचगण फिरतात. ते स्थान अपवित्र होते. यजमानास शोक होतो, पण गुणसंपन्न ब्राह्मणांनी देवस्थापना केली तर यजमानास शुभदायक फल प्राप्त होते. देवस्थान सर्वांना अत्यंत पूज्य वाटते.

## वास्तुशांतीच्या निमित्ताने बलिकर्म

यानंतर शौनकादी ऋषींनी सूतास विचारले, ‘आपणांस संपत्ती प्राप्त झाली की, देवालयं कशा आकृतीची करावीत ? त्यांची प्रमाणं, लक्षणं कशी असावीत ?’ या प्रश्नांना उत्तर म्हणून सूतानें देवमंदिराच्या रचनेंसंबंधी माहिती दिली. वास्तुस्वरूपाभिज्ञ पुरुषाने उत्तम रीतीने परीक्षा करून वास्तुस्थानी समिधायुक्त बलिकर्माने वास्तुशांती करावी. नंतर या भूमीचे एक्याऐंशी भाग करावेत. वास्तुपुरुषाच्या पृष्ठभागावर त्रिमेखलायुक्त एक हस्तप्रमाणाचे कुंड करून त्यात होम करावा. सातू, काळे तीळ, चीक निघणारे औदुंबर वृक्ष, पळस, खैर, यांच्या समिधा वापराव्यात. मध, घृत यांनी लिप्त दर्भ, दूर्वा, पांच बेलफळे यांनी हा होम करावा.

यानंतर अनेक भक्ष्य व भोज्य पदार्थांनी वास्तुपुरुषाच्या ठिकाणी बली अर्पण करावा, पक्वान्नांचा नैवेद्य दाखवावा. बलिदानाचा प्रकार असा असावा. ईशान्यकोणावर घृतमिश्रित अन्न अर्पण करावे. फल-सहित घृतमिश्रित ओदन पर्जन्यदेवतेस द्यावे. पीतवर्णाचा ध्वज, पिठाचे

कासव जय नावाच्या देवास अर्पण करावे. पंचरत्ने व पिष्ठाचे वज्र इंद्रास अर्पण करावे. सूर्यास चांदवा द्यावा. धम्र नावाच्या देवास सातू द्यावेत. घृतसहित गहू सत्य नावाच्या देवास द्यावेत. भृश नावाच्या देवतेस मत्स्य अर्पण करावा. अंतरीक्ष नावाच्या देवास शष्कुली (करंज्या) द्याव्यात. वायूस सातू अर्पण करावेत. पूषा नावाच्या देवास लाजा म्हणजे लाह्या अर्पण कराव्यात. वितथ नावाच्या देवास चणक (हरभरे)-मिश्रित ओदन द्यावा. गृहक्षत नावाच्या देवतेस मद्ययुक्त अन्न द्यावे. यमास जटामांसी नावाच्या वनस्पतीने युक्त असा ओदन द्यावा. गंध-युक्त ओदन गंधर्वास द्यावा. भृंगराज नावाच्या देवतेला भृंगराजपत्रे समर्पण करावीत. मृगास यावक म्हणजे सातूंची अंबील द्यावी. पितरांना कृसरा म्हणजें तीळ व तांदूळ यांचे पक्वान्न समर्पण करावे. दौवारिक नावाच्या देवास दंतकाष्ठ व पिठाचा कृष्णवर्ण बली समर्पण करावा. सुग्रीवास पुष्पक व पुष्पदंतास पायस द्यावे. वरुणास दर्भांच्या झुबक्यां-सहित सुवर्ण कमळे व पिष्ट अर्पण करावे. घृतयुक्त ओदन शोष नावाच्या देवास निवेदन करावे. पापयक्ष्म नावाच्या देवतेस यव म्हणजे सातु-मिश्रित अन्न द्यावे. घृतमिश्रित लाडू रोग नावाच्या देवतेस समर्पण करावेत. नागदेवतेस पुष्पे व फले द्यावीत.

मुख्य नावाच्या देवास घृत द्यावे. भल्लाट नावाच्या देवाच्या स्थानी मुग्दान्न (खिचडी) द्यावी. सोमास घृतमिश्रित पायस द्यावे. भगास साळीचे पिष्ट, अदितीला पोलिका (पोळ्या), दितीला पूरिका (पुऱ्या) द्याव्यात. असा बलिभाग एक्याऐंशी भागांवर देण्यात यावा. आतील भागाच्या देवतास्थानी यमास दूध, आपवत्सास दही, सवित्रास लाडू, मरीच (मिरच्या वा मिरे)सहित दर्भयुक्त ओदन इत्यादींना समर्पण करावे. सूर्यास गुडयुक्त अपूप (अनरसे), जयास घृतसहित चंदन, विवस्वानास रक्तचंदनासह पायस असे पदार्थ द्यावेत. इंद्रास हरिताल-सहित घृतयुक्त ओदन, मित्रास घृतमिश्रित ओदन, रुद्रास घृतयुक्त पायस समर्पण करावे. राजयक्ष्म नावाच्या देवास अपक्व व पक्व असे मांस द्यावे. पृथ्वीधरास मांससहित कूष्मांडी (कोहोळी) द्यावीत. अर्यम्ण नावाच्या पितरांना शर्करायुक्त पायस द्यावे. पंचगव्य, सातू, तिलाक्षता-

मिश्रित चरूही त्यांना द्यावा.

अशा प्रकारचे पदार्थ दिल्यास मुख्य मुख्य देवदेवता संतुष्ट होतात व तेथे सर्वत्र शांती प्रस्थापित करतात. अनेक प्रकारची भक्ष्य, भोज्य अन्ने ब्रह्मदेवांना द्यावीत. त्यांच्यासाठी दुग्धसंपन्न एक गोप्रदान करावे. यानंतर या स्थानावर राक्षसांना बली कसा द्यावा, हे पाहा. ईशान दिग्‌भागाचा आश्रय करणाऱ्या चरकी नावाच्या राक्षसीला मांससहित ओदन, घृत व रक्तयुक्त कमलरज हे पदार्थ द्यावेत. मांस व हळद यांनी युक्त असा ओदन आग्नेयदिशेस असणाऱ्या विदारी नावाच्या राक्षसीला अर्पण करावा. रक्त व अस्थी यांनी युक्त असा पीत व आरक्त दधिमिश्रित ओदन पूतनेला द्यावा. मत्स्यसहित मांस व सुरायुक्त मद्य वायव्येस असलेल्या पापराक्षसीला द्यावा.

मुख्य आचार्यांनी, ऋत्विजांनी सर्व औषधींनी युक्त उदकाने यजमानाकडून स्नानविधी करवावा. नंतर यजमानाने आचार्यांची, ब्राह्मणांची आदराने पूजा करावी. प्रासाद, देवालय, राजमंदिर, सामान्यगृह, उद्यान इत्यादींच्या रचनेचा आरंभ, नवीन गृहात प्रवेश, यांबद्दल वरील रीतीने शांती करून रक्षोघ्नसूक्ते, पवमानसूक्त इत्यादींचा पाठ करून गृहादिक स्थानांना सूत्राने वेष्टित करावे. ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करावे, नृत्य व मंगलवाद्ये यांच्यासहित समारंभ करावा. अशी वास्तुशांती जो करील त्याला दुःख प्राप्त होत नाही. त्याला व्याधीभय उरत नाही. बंधू-बांधव यांचा क्षय होत नाही. त्याला दीर्घ आयुष्य प्राप्त होऊन तो स्वर्गलोकी नंतर निवास करतो.

## प्रासादाची रचना, त्याचे प्रकार

यानंतर दोनशे एकूणसत्तराव्या अध्यायात देवालयाच्या रचनेविषयी आणखी विस्ताराने वर्णन आले आहे. वास्तुशांतीच्या निमित्ताने बलिकर्म झाल्यावर देवालयाचे सोळा भाग करून मध्यभागी चार भागांत गर्भ (गाभारा) करावा. गर्भाच्या भोवती बारा भाग करून प्रासादातून बाहेर निघण्यासाठी चार दिशांना चार दारे असावीत. गाभाऱ्याच्या दारांच्या उंचीपेक्षा बाह्य भिंती चतुर्गुणित उंच असाव्यात. या भिंतीच्या

उंचीपेक्षा शिखराची उंची दुप्पट असावी. देवालयातील प्रदक्षिणा शिखराच्या उंचीच्या चतुर्थांशाने असावी. गाभाऱ्याच्या अग्रभागी कर्तव्य-मंडपाचा विस्तार त्या गर्भसूत्राच्या दुप्पट असावा. मंडप गर्भसूत्राच्या तिप्पट लांब असावा. तो भद्राकृतीने सुशोभित करावा. गाभाऱ्याचे पांच विभाग करून अग्रभागी एक लहान मंडप, मुखमंडप नावाचा करावा.

ज्ञात्या माणसाने मूर्तीच्या मानाने सिंहासन करावे. सिंहासनाचा अर्धा भाग पूजासाहित्यासाठी मोकळा ठेवावा. सिंहासनाच्या रुंदीच्या मानाने देवालयाच्या भिंतीची रुंदी असावी. भिंतीच्या उंचीपेक्षा शिखराची दुप्पट असावी. मंडपाच्या अर्ध्या प्रमाणात अग्रभागी मोठ्या मंडपात जाण्यासाठी म्हणून लहान मंडप करावा. असे देवमंदिर शिल्पीने सिद्ध करावे. प्रासादाची, देवालयाची निर्मिती करताना आणखी काही प्रमाणे सांगितली आहेत. सिंहासनास दोनही बाजूंना मिळून सुंदर आकृतींचे आठ पाय करावेत. एका पायाच्या पांचपट उंचीच्या भिंती असाव्यात. शिखराचेही चार भाग करावेत. सुशोभित पाने व फळे यांनी देवालय नटवावे.

देवालयाच्या रचनेचे तीन भाग करावेत. मध्यभाग रथाकृतीचा करावा. इतर दोन भाग दोनही बाजूंना मोकळे ठेवावे. रथाकार भागाची नेमी (चाकाचा घेर) एकचतुर्थांश असावी. रथाकार देवालयाचा गाभारा नेहमीपेक्षा दुप्पट करावा. देवालयाची द्वारे, खिडक्या यांसंबंधीही सूचना केल्या आहेत. देवालयाच्या गाभाऱ्याच्या मध्यभागी व दाराच्या मूलभागी म्हणजे उंबऱ्यावर सुवर्ण स्थापन करावे. यानंतर मेरू, मंदार, कैलास, कुंभ, सिंह, मृग, विमानच्छंदक, चतुरस्र, अष्टास्र, षोडशास्र, वर्तुळ, सर्वभद्रक, सिंहास्य, नंदन, नंदिवर्धनक, हंस, वृष, सुवर्णेश, पद्मक, समुद्गक इत्यादी प्रासाद प्रकार सांगितले आहेत. त्यांची विविध लक्षणेही निवेदन केली आहेत.

शंभर शिखरे व चार द्वारे यांनी युक्त असा प्रासाद सोळा मजल्यांचा असल्यास त्यास मेरू म्हणावे. मंदर नावाचा प्रासाद बारा मजल्यांचा असतो. कैलास प्रासाद नऊ मजल्यांचा असतो. विमानच्छंदक

प्रासाद अनेक शिखरांनी व द्वारांनी युक्त असतो. त्याला आठ मजले असतात. अनेक लघु शिखरांचा प्रासाद नंदन या नावाने ओळखला जातो. सोळा कोणांचा प्रासाद सर्वतोभद्र या नावाने प्रसिद्ध आहे. जो प्रासाद विचित्र सभागृहांनी युक्त असून पांच मजल्यांचा असतो त्यास वलभीच्छंदक म्हणतात. जो प्रासाद वृषभासारखा उंच व वर्तुळाकार असतो, कोणासहित असतो, तो मंडल नावाचा वर्तुळ प्रासाद जाणावा. सिंह नावाचा प्रासाद सिंहाकृतीचा असून गज प्रासाद गजाकृतीचा असतो. जो नऊ मजल्यांचा प्रासाद कुंभाकृतीचा असतो, त्यास कुंभ प्रासाद म्हणतात. ज्या प्रासादाच्या वामदक्षिणभागात चंद्रशाला (गच्च्या) असून जो दोन मजली असतो, त्यास पद्मक म्हणतात. जो प्रासाद तीन मजल्यांचा असून ज्यास सोळा कोन व विचित्र शिखरे असतात, त्यास षोडशास्त्र म्हणतात. अनेक चंद्रशालांनी युक्त असा शोभिवंत प्रासाद मृगराज या नावाने ओळखला जातो. कोणत्या प्रासादात कोणती मूर्ती स्थापन करावी हेही या अध्यायात सांगितलेले आहे.

## आणि असे मंडपप्रकार

यानंतर पुढल्या दोनशेसत्तराव्या अध्यायात विविध प्रकारच्या मंडपांचे विवेचन आले आहे. पुष्पक, पुष्पभद्रक, सुव्रत, अमृतनंदन, कौशल्य, बुद्धिसंकीर्ण, गजभद्र, जयावह, श्रीवत्स, विजय, वास्तुकीर्ती, श्रुतिजय, यज्ञभद्र, विशाल, सुश्लिष्ट, शत्रूमर्दन, भागपंच, नंदन, मानव, मलभद्रक, सुग्रीव, हरित, कर्णिकार, शतर्धिक, सिंह, श्यामभद्र, सुभद्र, असे अनेक प्रासाद त्यांच्या लक्षणांसह या अध्यायात आले आहेत.

ज्या मंडपात चौसष्ट स्तंभ असतात, त्यास पुष्पक म्हणतात. बासष्ट स्तंभांचा मंडप पुष्पभद्र या नावाने ओळखला जातो. साठ स्तंभांचा मंडप सुव्रत जाणावा. अठ्ठावन्न स्तंभांचा मंडप अमृतनंदन नावाने ओळखतात. छपन्न स्तंभांचा मंडप कौशल्य या नावाने जाणावा. चोपन्न स्तंभांचा मंडप बुद्धिसंकीर्ण जाणावा. बावन्न स्तंभांचा मंडप गजभद्र या नावाने जाणावा. जयावहमंडप पन्नास स्तंभांचा असतो. श्रीवत्स नावाचा

मंडप अठ्ठेचाळीस स्तंभांचा असतो. विजय नावाच्या मंडपास सेहेचाळीस स्तंभ असतात. वास्तुकीर्तिमंडपास चव्वेचाळीस स्तंभ असतात. अशाच प्रकारे सर्व मंडपांची लक्षणे सांगितली आहेत.

मंडपाची रचना त्रिकोण, वर्तुळ, अर्धवर्तुळ, अष्टकोण, षोडशकोण, चतुष्कोण यांपैकी एखादी असावी. राज्य, विजय, आयुष्य, पुत्र, संपत्ती, पुष्टी यांची प्राप्ती या मंडपांमुळे होते, मंडपांची द्वारे कशी असावीत, याचाही विचार झाला आहे. प्रासादास, मंडपास, द्वारांना अनिष्ट काय हेही सांगितले आहे. प्रासादाभोवती वृक्ष कोणते असावेत, याचेही वर्णन आले आहे. जलस्थान, स्वयंपाकगृह, धनस्थान, गृहमालिका, यज्ञशाला, निर्माल्यस्थान, बलिस्थान यांचीही ठिकाणे नक्की कशी व कोठे असावीत, याचा विचार याच अध्यायात आला आहे. नंदी, मदन, घंटा, चांदवा, चित्रयुक्त तोरण, ध्वज यांनी युक्त असे देवालय जो बांधतो, त्याचा त्याग लक्ष्मी कधीच करीत नाही. देहान्त झाल्यावर तो स्वर्गलोकी जातो.

## भविष्यकाळातील राजे

यानंतरच्या दोनशे एकाहत्तराव्या अध्यायापासून कलियुगातील झालेले व पुढे होणारे राजे यांचे वर्णन आले आहे. सूर्यवंशातील बृहद्बल राजाचा पुत्र उरुक्षय नावाचा होईल. त्याचा पुत्र वत्सद्रोह होईल. त्याचा पुत्र प्रतिव्योम, त्याचा दिवाकर. हा पुण्यकारक अयोध्यानगरीत राज्य करील. याचा पुत्र सहदेव होईल. याचा पुत्र ध्रुवाश्व. प्रतीपाश्व, सुप्रतीप, मरुदेव, सुनक्षत्र, किन्नराश्व, अंतरिक्ष, सुषेण, सुमित्र, बृहद्राजा, कृतंजय, रणोजय, संजय, शक्य, शुद्धोदन, पुष्कल, प्रसेनजित्, क्षुद्रक, कुलक, सुरथ, सुमित्र; असे हे इक्ष्वाकुवंशात राजे होतील.

यानंतर सोमाधी गिरिव्रजनगरात राज्य करीत राहील. श्रुतश्रवा, अप्रतीपी, निरमित्र, सुरक्ष, बृहत्कर्मा, सेनाजित, संप्रयात, श्रुतंजय, विभू, शुचिनामा, क्षेमराजा, अनुव्रत, सुनेत्र, निर्वृती, त्रिनेत्र, द्युमत्सेन, महीनेत्र, अचल, पुरंजय इत्यादी राजे किती वर्षे राज्य करतील हेही सांगितले आहे.

यानंतर पुढल्या दोनशेबहात्तराव्या अध्यायात अवंतीच्या वीतिहोत्राच्या वंशात कोण कोण राजे होतील, यासंबंधीचे निवेदन आहे. आपल्या यजमानाचा वध करून पुलक नावाचा राजा आपल्या पुत्रास राज्यावर स्थापन करील. विशाखयूप, सूर्यक, शिशुनाक, काकवर्ण, क्षेमधाम, क्षेमजित, विंध्यसेन, काण्वायन, भूमिमित्र, अजातशत्रू, वंशक, उदासी, नंदिवर्धन, महानंदी, शिशुनाकवंशस्थ बारा राजे इत्यादींच्या राज्यकालासंबंधी वर्णन आले आहे.

इक्ष्वाकुवंशातील राजे, पंचालवंशातील राजे, काशेय राजे, हैहय राजे, कलिंग राजे, अश्मक राजे, कुरुवंशीय राजे, मैथिली राजे, शूरसेन राजे, वीतिहोत्र राजे, इत्यादींचेही वर्णन आले आहे. महानंदीला शूद्र स्त्रीपासून झालेला कलीचा अंशभूत असा महापद्म नावाचा पुत्र क्षत्रियांचा संहार करील. यानंतर शूद्र राजांचे राज्य होईल. या राजांना कौटिल्य नावाचा मनुष्य भ्रष्ट करील. नंतर ही पृथ्वी मौर्य राजांना प्राप्त होईल. शतधन्वा, बृहद्रथ, शक, दशरथ इत्यादी राजे राज्य करतील. नंतर ही पृथ्वी शुंग राजांच्या ताब्यात जाईल. पुष्यमित्र, वसू, वसुमित्र, अंतक, सम, पुलिंदक, वज्रमित्र, पुनर्भव, समाभाग, देवभूमी इत्यादी राजांनी राज्य केल्यावर वसुदेव नावाचा प्रधान राजा होईल. शौंग (शुंगभृत्य), काण्वायन, भूमिपुत्र, नारायण, सुशर्मा, काण्वब्राह्मण यांचे राज्य स्थापन होईल.

यानंतर दोनशेत्र्याहत्तराव्या अध्यायात आणखी काही राजांचा उल्लेख आला आहे, आंध्रराजांचा सजातीय शिशुक नावाचा राजा होईल. श्रीमल्लकर्णी, पूर्णोत्संग, शांतकर्णी, लंबोदर, आपीतक, मेघस्वाती, स्वाती, स्कंदस्वाती, मृगेंद्रस्वातिकर्ण, कुंतलस्वातिकर्ण, स्वातिवर्ण, पुलोमा, रिक्तवर्ण, हाल, मंदुलक, पुरींद्रसेन, शांतिकर्ण, स्वातिकर्ण, शिवस्वाती, गौतमीपुत्र, सुलोमा, शिवश्री, शिवस्कंध, यज्ञश्री, विजय, चंडश्री; असे आंध्र राजे राज्य करतील. आंध्रांचे भृत्य, त्यांचे वंशस्थ राजे चारशेसाठ वर्षे राज्य करतील.

यानंतर सात आंध्र, दहा आभीर राजे, सात गर्दभिल, अठरा शकराजे होतील. आठ यवन, चवदा तुषार, तेरा गुरुंड, एकोणीस हूण

राजे होतील. आठ यवन राजे होतील. नंतर गर्दभिलराजे पृथ्वीचा उपभोग घेतील. म्लेच्छ, वृषल, श्रीपर्वतीय राजे, किलकिल राजे, यवन राजे नंतर होतील. हे लुब्ध व खोटे बोलणारे होतील. प्रजेचा क्षय होईल.

अत्यंत अधार्मिक, पाखंडी, श्रेष्ठ म्लेच्छ राजांमुळे कलीच्या अंती भगवान कल्कींचा अवतार होईल. त्याआधी सर्व राजवंश व वर्णाश्रम-धर्म नष्ट होतील. सर्व प्रजा घोर संकटात पडेल. नद्यांचा व पर्वतांचा आश्रय लोकांना घ्यावा लागेल. नंतर कृतयुगाची प्रवृत्ती होईल.

## महादानांत पंचलांगलदान

यानंतर दोनशेचौऱ्याहत्तराव्या अध्यायात सूताने विविध प्रकारच्या दानांचे वर्णन केले आहे. पुढल्याही अध्यायात असेच दानमाहात्म्य आले आहे. तुलादान, हिरण्यगर्भप्रदान, ब्रह्मांडदान, कल्पवृक्षदान, गोसहस्रदान, कामधेनुदान, अश्वरथदान, सुवर्णहस्तिरथदान, पंचलांगलदान, पृथ्वीदान, विश्वचक्रदान, कल्पलतादान, सप्तसागरदान, रत्नधेनुदान; इत्यादी दानांचे वर्णन दोनशेएकोणण्वदाव्या अध्यायापर्यंत आले आहे. यांतील एका महादानांचा थोडक्यात परिचय करून घेऊ.

दोनशेत्र्याऐंशिव्या अध्यायात पंचलांगलदानाचे महत्त्व वर्णन केले आहे. पुण्यकारक तिथी आली की, मानवाने पांच लांगलक- (नांगर)-युक्त भूमीचे दान करावे. चंदनादिक उत्तम काष्ठांचे पांच नांगर, खिळ्यांसहित सुवर्णाचे पांच नांगर तयार करावेत. या नांगरांचे अग्र-भाग धारण करणारे तारुण्यसंपन्न असे दहा वृषभ मंडपाबाहेर गोशालेत सिद्ध ठेवावेत. ते सुवर्णाची शिंगे, मौक्तिक पुच्छे, रौप्य चरण, ललाटा-वर रौप्यतिलक, रेशमी वस्त्रे, माला, दावी, चंदन यांनी सुशोभित असावेत.

धरणी, आदित्य, रुद्र यांच्या उद्देशाने होमासाठी पायसरूप दुधातील चरू तयार करावा. पलाशसमिधा, घृत, कृष्णवर्ण तीळ यांचा होम करावा. लोकपालांना आवाहन करावे. नंतर यजमानाने शुभ्र माला व वस्त्रे धारण करून मंगल शब्दांनी ब्राह्मण दांपत्यास आवाहन करावे.

त्यास सुवर्णसूत्रे, अंगुलिभूषणे, रेशमी वस्त्रे, कडी व तोडे, नवरत्ने यांनी पूजित करून शय्या व दुग्धसंपन्न धेनू यांचे दान करावे.

अष्टादश धान्ये त्या नांगराच्या भोवती पसरावीत. यजमानाने त्या नांगरांना प्रदक्षिणा घालावी. आणि नांगरयुक्त भूमीचे दान करावे. असे दान केल्यानें नांगरांच्या मुखांतून जितके रज:कण निघतील, वृषभांच्या अंगावर जितके केस असतील, तितकी वर्षे दानकर्त्यास कैलासात स्थान प्राप्त होते.

# ६ तत्त्वज्ञानदर्शन

## संख्यात्मक असा सांख्ययोग

तिसऱ्या अध्यायात ब्रह्मदेवांपासून वेद, सरस्वती, मनू इत्यादींची उत्पत्ती कशी झाली, यासंबंधी कथा आली आहे. याच अध्यायात मनूने बुद्धीपासून मोहाची उत्पत्ती कशी झाली, असा प्रश्न विचारला आहे. अहंकार, क्रोध यांच्यासंबंधीही त्यानें मत्स्यदेवांना विचारले आहे. याचे उत्तर मत्स्यभगवानांनी तात्त्विक दृष्टीतून दिले आहे. सत्त्व, रज, तम या तीन गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृती होय. काही लोक हिलाच प्रधान म्हणतात. काही याचा निर्देश अव्यक्त या नावाने करतात. ही प्रकृतीच प्रजेची निर्मिती करते. हीच तिचा विनाश करते.

हे तीन गुण क्षुब्ध झालें की, यांतून तीन देवता उत्पन्न होतात. या तीन देवांची मूर्ती एकच असली तरी ब्रह्मदेव, विष्णू व महेश्वर या तीन देवांत ती विभक्त झाल्यासारखी दिसते. प्रधान विकृत झाल्यावर त्यापासून महत्तत्त्वाची उत्पत्ती होते. त्याचीच ‘महान’ रूपाने ख्याती होते. या महत्तत्त्वापासून मान वाढविणारा अहंकार उत्पन्न होतो. या

अहंकारापासून दहा इंद्रिये निर्माण होतात. त्यांतील पांच ज्ञानाशी संबंधित असतात. इतर पांच कर्माच्या अधीन असतात. या इंद्रियसमुदायात क्रमशः श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका ही पांच ज्ञानेंद्रिये आहेत. पायू (गुदा), उपस्थ (मूत्रेंद्रिय), हस्त, पाद व वाणी; ही पांच कर्मेंद्रिये आहेत. या दहा इंद्रियांची क्रमशः शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, उत्सर्ग (मल, अपानवायू यांचा त्याग), आनंदन, आदान (ग्रहण करणे), गमन, आलाप; अशी दहा कार्ये आहेत.

या दहा इंद्रियांच्या अतिरिक्त मन नावाचे अकरावे इंद्रिय आहे. त्यात कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये यांचे समस्त गुण असतात. या इंद्रियांचे जे सूक्ष्म अवयव शरीराचा आश्रय घेतात, त्यांना तन्मात्रा म्हणतात. या आश्रयाच्या संपर्काने तन्मात्राची उत्पत्ती होते. यासच शरीर म्हणतात. या शरीराचा संबंध आल्यामुळे जीवास शरीरी म्हटले जाते. सृष्टी निर्माण करण्यासाठी जेव्हा इच्छा मनास प्रेरित करते, तेव्हा या सृष्टीची निर्मिती होते. यावेळी शब्दतन्मात्राने शब्दरूप गुणाचे आकाश प्रकट होते. हे आकाश विकृत झाले की, वायूची उत्पत्ती होते. वायू शब्द व स्पर्श या दोन गुणांनी युक्त असतो. यानंतर वायू व स्पर्शतन्मात्रापासून तेजाचा आविर्भाव होतो. तेज शब्द, स्पर्श, रूप या तीन विकारांनी युक्त असते. या त्रिगुणात्मक तेजास विकार झाला की, चार गुणांच्या जलाची निर्मिती होते. ते रसतन्मात्रापासून उद्भूत झाल्यामुळे प्रायः रस गुणप्रधान असते. यानंतर पांचही गुणांनी संपन्न अशा पृथ्वीचा प्रादुर्भाव होतो. पृथ्वी प्रायः गंध-गुणाने युक्त असते. या सर्वांचे यथार्थ ज्ञान म्हणजे श्रेष्ठ बुद्धी होय. या चोवीस (पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेंद्रिये, पांच महाभूते, पांच तन्मात्रा, एक मन, एक बुद्धी, एक अव्यक्त, अहंकार) तत्त्वांपासून संपादित अशा सुख-दुःखात्मक पंचविसावे तत्त्व पुरुष आहे. कपिलादी महर्षींनी संख्यात्मक असा हा ' सांख्य 'योग सांगितला आहे.

## ययातीचा पूरूस उपदेश

छत्तिसाव्या अध्यायात ययातीने आपल्या पुत्रास, पूरूस केलेल्या उपदेशाची चर्चा आली आहे. स्वर्गात ययाती देवभवनात निवास करू

लागला. तेथे देव, साध्य, मरुद्गण, वसू त्याचे मोठे स्वागत करीत असत: एकदा नृपश्रेष्ठ ययाती देवराज इंद्रापाशी आला: इंद्रानें राजास विचारले, 'राजन्, ज्यावेळी पूरू आपली वृद्धावस्था घेऊ लागला तेव्हा आपण त्याला काय उपदेश केला होता ?'

तेव्हा पूरूस ययातीने जे सांगितले तेच त्याने इंद्रास सांगितले. ययाती म्हणाला होता, 'पुत्रा, गंगा व यमुना यांच्या मधल्या प्रदेशावर तुझा अधिकार राहील. पृथ्वीचा हा मध्यभाग आहे: तू येथील राजा होशील. तुझे भाऊ सीमांत देशांचे अधिपती होतील. मनुष्यानं दीनता, शठता, क्रोध कधी करू नये. कुटिलता, मात्सर्य, वैर कधी करू नये। माता, पिता, विद्वान, तपस्वी, क्षमाशील पुरुष यांचा कधी अपमान करू नये. शक्तिशाली पुरुष सदा क्षमा करतो. शक्तिहीन मनुष्य क्रोधात असतो. दुष्ट मनुष्य साधुपुरुषाशी व दुर्बल मनुष्य अधिक बलवानाशी द्वेष करतो: कुरूप मनुष्य रूपवानाचा, निर्धन धनवानाचा, अकर्मण्य कर्मनिष्ठाचा, अधार्मिक धर्मात्म्याचा द्वेष करतो. गुणहीन मनुष्य गुणवानाचा द्वेष करतो. कधी क्रोध करीत नाही तो श्रेष्ठ पुरुष मानावा. असहनशील मनुष्यापेक्षा सहनशील उत्तम मानावा. मनुष्येतर प्राण्यांपेक्षा मनुष्य श्रेष्ठ आहे. मूर्खापेक्षा विद्वान उत्तम आहे. क्रोधवश बनून कुणाच्या मर्मस्थानास जखम करू नये. कुणासही कठोर वचन बोलू नये. अनुचित उपायानं शत्रूसही वश करू नये. दुसऱ्यास उद्वेग वाटेल असे बोल मुखातून काढू नयेत. जो स्वभावत:च कठोर आहे, जो इतरांच्या मर्मस्थानास दुखवितो, तो लक्ष्मीहीन समजावा. त्याच्याकडं पाहणंही वाईट आहे. दुष्ट मनुष्याच्या मुखातून सदा कटुवचनरूपी बाण सुटत असतात. त्यांनी जखमी होऊन मनुष्य रात्रंदिवस शोक व चिंता यांत बुडून जातो. विद्वान पुरुषानं दुसऱ्याच्या अंत:करणास लागेल अशी कठोर वाणी बोलू नये. सर्व प्राण्यांशी दया, मैत्री, मधुरवाणी यांचं वर्तन करावं. पूजनीय पुरुषांचा आदरसत्कार सदा करावा. दुसऱ्यांना दान द्यावं. स्वत: मात्र इतरांपासून काही मागू नये.

## अष्टक व ययाती यांच्यांतील तत्त्वचर्चा

एकोणचाळीसाव्या अध्यायात अष्टक व ययाती यांच्या संवादातून तात्त्विक चर्चा आलेली आहे. अष्टकाने ययातीस विचारले, 'नरेशा, इतकी वर्षं आपण नंदनवनात निवास केलात. मग आपण भूतलावर का निघालात ?' त्यावर ययाती म्हणाला, 'ज्या प्रकारानं या लोकी जातभाई, सुहृद, स्वजन धन नष्ट झाल्यावर मनुष्याचा त्याग करतात, त्याचप्रकारे स्वर्गलोकी ज्याचं पुण्य क्षीण होतं, त्याला देवराज इंद्रासह स्वर्गाचा त्याग करावा लागतो.'

यावर अष्टकाने विचारले, 'देवलोकात मनुष्याचं पुण्य कसं क्षीण होतं ? मग असं कोणतं धाम आहे की जिथून पुन: परत यावं लागत नाही ?' यावर ययाती म्हणाला, 'जे आपल्या मुखातून पुण्यकर्माचं वर्णन करतात, ते सर्व भौमनरकात पडतात. तेच गिधाडं, कावळे इत्यादींनी खाण्यायोग्य अशा शरीररूपधारी पुत्रपौत्रादिकांना जन्म देतात. म्हणून या लोकी दुष्ट व निंद्य कर्मांचा त्याग करावा.' तेव्हा अष्टकाने विचारले, 'मनुष्यास मृत्यूच्या नंतर कावळे, गिधाडं, मयूर, पतंग इत्यादी टोचून टोचून खातात. मग तो पुन: कोणत्या रूपात जन्मास येतो ? मी आपल्या तोंडून प्रथमच भौम नावाच्या नरकाचं नाव ऐकलं आहे.'

तेव्हा ययाती म्हणाला, 'कर्मानं उत्पन्न झालेला व वाढणारा हा देह स्वीकारल्यावर जीव सर्वांसमक्ष या पृथ्वीवर विषयांत रस घेतो. त्याचं हे विचरणच भौम नरक आहे. तो यात पडून अनेक वर्षं गेली तरी त्याकडं लक्ष देत नाही. कित्येक प्राणी स्वर्गादी लोकांत साठ हजार वर्षांपर्यंत राहातात. काही ऐंशी हजार वर्षं राहातात. यानंतर ते भूमीवर परत येतात. या जीवांस पृथ्वीवर भयानक दाढांचे प्राणी अत्यंत पीडा देतात.' यावर अष्टकाने विचारले, 'आकाशातून परत येणाऱ्या जीवांना तीक्ष्ण दाढांचे जीव सतावतात, तर ते जिवंत कसे राहातात ? इंद्रिययुक्त कसे होतात ? गर्भांत येतात तरी कसे ?'

यावर ययाती म्हणाला, 'अंतरिक्षातून खाली आलेला प्राणी असृक् (रक्त) असतो. नंतर तो क्रमश: नूतन शरीराचं बीजभूत वीर्य बनतो.

नंतर तो पुष्पाच्या रसाशी संयुक्त होऊन कर्मानुसार योनीत निर्माण होतो. गर्भाधान करणाऱ्या पुरुषाच्या स्त्रीसंसर्गानं वीर्यातील जीव स्त्रीच्या रक्तात मिसळून जातो. नंतर तोच गर्भरूपात परिणत होतो. जीव कर्मानुसार पशू वा मनुष्य बनतो.'

यानंतर अष्टकानें विचारले, 'राजन्, या मनुष्ययोनीत येणारा जीव आपल्या शरीरासह येतो, की दुसरं शरीर धारण करतो? गर्भातील शरीरास डोळे, कान आदी इंद्रियं व चेतना यांचा लाभ कसा होतो?' यावर ययाती म्हणाला, 'ऋतुकाळात पुष्परसाशी संयुक्त झालेल्या वीर्यास वायू गर्भाशयात खेचून घेतो. या गर्भास नंतर क्रमाक्रमानं अवयव निर्माण होतात. गर्भ चेतनेनं युक्त बनून योनीतून बाहेर येतो. तो कानांनी शब्द ऐकतो, डोळ्यांनी रूप पाहातो. नाकानं वास घेतो. जिभेनं रसाचा आस्वाद घेतो. त्वचेनं स्पर्श ओळखतो. मनानं आंतरिक भाव जाणतो. अशा प्रकारे महान आत्मबलानं संपन्न प्राणधारियांच्या शरीरात जीवाची स्थापना होते.'

यावर अष्टकानें विचारले, 'जो मनुष्य मरून जातो, तो अग्नीस समर्पण होतो. अथवा मातीत गाडला जातो. अशा प्रकारे स्थूल शरीराचा विनाश होतो. मग तो जीवात्मा चेतन होऊन शरीराचा आधार कसा घेतो?' यावर ययाती म्हणाला, 'ज्याप्रमाणं मनुष्य श्वास घेऊन प्राणयुक्त स्थूल शरीर सोडून स्वप्नात भ्रमण करतो, तसंच चेतन जीवात्मा अस्फुट शब्दोच्चारणानं मृतक स्थूल शरीराचा त्याग करून सूक्ष्म शरीरानं संयुक्त होतो. नंतर पापपुण्यानुसार त्याला जन्म घ्यावा लागतो.' यावर अष्टकानें विचारले, 'राजन्, मनुष्य कोणत्या कर्मानं उत्तम यश प्राप्त करतो? हे यश तपानं प्राप्त होतं की विद्येनं?'

यावर ययाती म्हणाला, 'साधू पुरुष स्वर्गलोकाचे सात महान दरवाजे सांगतात. तप, दान, शम, दम, लज्जा, सरलता व सर्व प्राण्यांवर दया, हे ते सात दरवाजे होत. अग्निहोत्र, मौन, अध्ययन व यज्ञ या चार कर्मांमुळं मनुष्य भयापासून मुक्त होतो. पण ही कर्मं ठीक झाली नाहीत तर उलट भय प्राप्त होतं. विद्वान पुरुष सन्मानित झाल्यावर अधिक आनंदित होत नाही. अपमानित झाल्यावर कष्टी होत नाही,

दान, यजन, स्वाध्याय यात रमून गेलं पाहिजे. जे सर्वांचं आश्रयस्थान आहे, जिथं सर्वांची मती कुंठित होते, तो परब्रह्म परमात्मा सर्वांसाठी कल्याणकारी आहे. जो त्याला जाणतो, त्याला परत इहलोकात यावं लागत नाही. परलोकात त्याला शांती प्राप्त होते.'

यानंतर पुढल्या अध्यायातही आश्रमधर्मासंबंधी चर्चा आलेली आहे.

## कर्मयोगाचे महत्त्व

बावन्नाव्या अध्यायात कर्मयोगाची महत्ता वर्णन केली आहे. एकदा ऋषींनी सूतास विचारलें, 'सूर्यपुत्र मनूनं विचारल्यावरून भगवान विष्णूंनी त्याला धर्म-अधर्म पूर्णपणानं समजावून सांगितला. तो आम्हांस विस्तारानं सांगावा.' तेव्हा सूताने ऋषींना विस्तारपूर्वक कर्मयोग समजावून सांगितला.

कर्मयोग ज्ञानयोगापेक्षा हजार पटींनी अधिक प्रशस्त आहे. कारण कर्मयोगापासूनच ज्ञान प्राप्त होते. कर्मज्ञानापासूनच ब्रह्म उत्पन्न होते. कर्माशिवाय ज्ञानास सत्ताच नाही. म्हणून कर्मयोगी मनुष्यासच अविनाशी तत्त्वाची प्राप्ती होते. सर्व वेद व वेदज्ञांचे आचारविचार धर्माचे मूळ आहे. त्यात आठ प्रकारचे आत्मगुण प्रधान रूपाने विद्यमान असतात. सर्व प्राण्यांवर दया, क्षमा, दुःखी प्राण्यांना आश्वासन देणे, त्यांचे रक्षण करणे, कोणाचाही ईर्ष्याद्वेष न करणे, बाह्य व आंतरिक पवित्रता, परिश्रमरहित प्राप्त झालेल्या कार्यांना मांगलिक आचारव्यवहाराने संपन्न करणे, आपण मिळविलेले द्रव्य दीन-दुःखितांसाठी खर्च करणे, परक्याचे धन, परक्याची स्त्री यांबद्दल निःस्पृह असणे, असे हे आठ सद्गुण आहेत. हाच कर्मयोग ज्ञानयोगाचे साधन आहे. जगात कर्मयोगाशिवाय कोणास ज्ञानाची प्राप्ती होत नाही. म्हणून श्रुती व स्मृती यांत सांगितल्याप्रमाणे धर्माचे पालन प्रयत्नपूर्वक करावयास हवे. प्रतिदिन देव, पितर व मनुष्य यांना यज्ञाने तृप्त करावे. पितर व ऋषी यांना तर्पण करावे. स्वाध्याय करून देवांची, हवनाने ऋषींची, श्राद्धाने पितरांची, अन्नद्वारा अतिथींची, बलिकर्मद्वारा मृत प्राण्यांची अर्चना करावी.

गृहस्थाच्या घरात जीवहिंसा होण्याची पांच स्थानें आहेत. यातून होणाऱ्या पापांच्या निवृत्तीसाठी पांच प्रकारच्या यज्ञांचे विधान सांगितले आहे. उखळी, चाळणी, चूल, पाण्याचा घडा, प्रमार्जनी (केरसुणी) या ठिकाणी होणाऱ्या पापांसाठी पांच यज्ञ सांगितले आहेत. द्विजातीस यांनी संस्कारित चाळीस प्रकारचे संस्कार सांगितले आहेत. संस्कृत झालेला जो मनुष्य आत्मगुणांनी रहित असतो, याला मोक्षाची प्राप्ती होत नाही. गृहस्थानें मिळालेल्या धनाच्या साह्याने गायी व ब्राह्मण यांचे कल्याण साधले पाहिजे. व्रतस्थ राहून त्याने गाय, पृथ्वी, सुवर्ण, वस्त्र, गंध, माला व जल इत्यादींनी ब्रह्मदेव, विष्णू, सूर्य, रुद्र, वसुस्वरूप शिव यांची श्रद्धापूर्वक विधिसहित पूजा करावी. इंद्रियांना अगोचर, परम शांत, सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म, अव्यक्त, अविनाशी, विश्वस्वरूप भगवान वासुदेव असून त्यांच्याच विभूती म्हणजे ब्रह्मा, विष्णू, सूर्य, शिव, आठ वसू, अकरा गणाधिप, लोकपालाधीश्वर, पितर व मातृका या होत.

चराचर जगतासह या सर्व विभूती मानल्या गेल्या आहेत. ब्रह्मदेव, विष्णू, शिव हे देव मूलरूपाने या जगताचे अव्यक्त अधिपती आहेत. म्हणून यांची पूजा अभेदभावाने करावी. म्हणून मनुष्यानें अग्नी अथवा ब्राह्मण यांच्या मुखांतून यांना आवाहन करावे. दान, व्रत, उपवास, जप, हवन इत्यादींनी यांची पूजा करावी. अशा प्रकारे जो कर्मनिष्ठ, वेदान्तशास्त्री व स्मृती यांचा प्रेमी राहील, अधर्मास भिऊन राहील, त्याला या लोकी वा परलोकी प्राप्तव्य असे काहीच राहाणार नाही. त्याला सर्व पदार्थ हस्तगत झाल्यासारखेच असतात.

# ७ उपसंहार व महिमा

## विषयांची अनुक्रमणिका

मत्स्यपुराणाचे एकूण अध्याय दोनशेएक्याण्णव आहेत. शेवटच्या अध्यायात एकूण विषयांची अनुक्रमणिका आहे. सूताने ऋषींना म्हटले,

'ऋषींनो, विश्वरूपी मत्स्यभगवानांनी जे संपूर्ण मत्स्यपुराण मनूला सांगितलं ते धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांचं साधक आहे.' त्याने सर्व पुराणाचा संक्षेपाने आढावा घेतला आहे. आरंभी मनू व मत्स्यरूपी नारायण यांचा संवाद आला असून त्यांनी मनूला ब्रह्मांडकथन केले आहे. ब्रह्मदेवांच्या मुखातून निघालेले सांख्यशास्त्र आले आहे. पुढे देव, असुर व वायू यांची उत्पत्ती सांगून मदनद्वादशीव्रत व लोकपालांचे पूजन यांचे निवेदन केले आहे. मन्वन्तरांचे कथन, पृथुराजाचे वर्णन, सूर्य, वैवस्वत-मनू यांची उत्पत्ती, बुधाचे पृथ्वीवर आगमन इत्यादींचे निवेदन आहे. यानंतर पितृवंश, श्राद्धकाल, पितृतीर्थयात्रा, चंद्राची उत्पत्ती इत्यादी विषय आले आहेत.

पुढे सोमवंश, ययातिचरित्र सांगितल्यावर कार्तवीर्याचे माहात्म्य आले आहे. यादववंशाचे वर्णनही आले आहे. विष्णूंना झालेला शुक्रशाप, शुक्राचार्यांनी दैत्यास दिलेला शाप, पुरुषेशांचे वर्णन, अग्निवंश इत्यादी विषय आले आहेत. पुराणवर्णन, कर्मयोग, नक्षत्रसंख्याव्रत, मार्तंडशयन-व्रत, कृष्णाष्टमीव्रत, रोहिणीचंद्रशयनव्रत, तडागविधिमाहात्म्य, वृक्षांचा उत्सर्गविधी, सौभाग्यशयनव्रत, अगस्त्यव्रत, अनंततृतीया, रसकल्याणिनी याही व्रतांचा परिचय पुढे आला आहे. आर्द्रानंदकरीतृतीया, सरस्वती-व्रत, ग्रहणातील अभिषेक, सप्तमीस्नपन, भीमद्वादशीव्रत, अनंगशयनव्रत, अशून्यशयनव्रत, अंगारकव्रत, सप्तसप्तमीव्रते, विशोकद्वादशीव्रत, मेरु-पर्वताची दाने, ग्रहशांती, ग्रहस्वरूपकथन, शिवचतुर्दशीव्रत, सर्वफलत्याग-व्रत, सूर्यवारव्रत, संक्रांतिस्नपन, विभूतिद्वादशीव्रत, षष्टिव्रतांचेमाहात्म्य, स्नानविधी इत्यादींचीही माहिती यात आहे.

यानंतर प्रयागाचे माहात्म्य, सर्व तीर्थांची वर्णने, पैलाश्रमातील फले, द्वीपे, लोक यांचीही वर्णने आली आहेत. अंतरिक्षसंचारिलोक, ध्रुव यांचे माहात्म्य, त्रिपुराचे वर्णन, पितरांना पिंडदानमाहात्म्य, मन्वन्तरांचा निर्णय, वज्रांगदैत्य व तारकासुर यांची उत्पत्ती, तारका-सुराचे माहात्म्य, ब्रह्मदेवांचे वर्णन, पार्वतीचा जन्म, शिवांच्या तपरूपाचे वर्णन; अशी काही आख्यानेही क्रमाने यात आली आहेत. मदनाचा देह-

म...२२

दाह, रतीला झालेला शोक, पार्वतीच्या तपोवनाचे वर्णन, विश्वनाथ शिवांचा पार्वतीला मिळालेला प्रसाद, शिवपार्वतींचा मंगलविवाह, कार्तिकस्वामीचा जन्म, त्याचा विजय इत्यादी आख्याने आली आहेत.

यानंतर तारकासुराचा वध, नरसिंहाचा अवतार, अंधकासुराचा वध, अशी काही आख्यानें आली आहेत. पुढे वाराणसी, नर्मदा यांची माहात्म्ये, प्रवरांचा अनुक्रम, पितृगाथांचे वर्णन इत्यादी विषय आले आहेत. यानंतर उभयमुखी गोप्रदान, कृष्णाजिनदान, सावित्रीचे आख्यान, राजधर्म, यात्रानिमित्तांचे कथन, उत्तम स्वप्नांचे वर्णन, वामन व वराह यांचे अवतार; इत्यादी विषय आले आहेत. क्षीरसमुद्रमंथन, त्यातून उत्पन्न झालेल्या कालकूटाची व्यवस्था, देवासुरांचे युद्ध, वास्तुशास्त्र, प्रतिमांची लक्षणे, देवतास्थापनाविधी इत्यादी विषयांवर विवेचन आले आहे.

## आणि ही फलश्रुती

नंतर प्रासादांची मंडपांची लक्षणे, पूरूच्या वंशातील भावी राजांची वर्णनें आली असून नंतर तुलादानासारख्या महादानांचे माहात्म्यवर्णन आले आहे. या पुराणाचा समारोप करताना कर्त्यानें म्हटले आहे;

एतत्पवित्रमायुष्यमेतत्कीर्तिविवर्धनम् ।
एतत्पवित्रं कल्याणं महापापहरं शुभम् ।।

(२९१-२९)

म्हणून हे पुराण पवित्र असून, आयुष्य व कीर्ती यांची वृद्धी करणारे आहे. तसेच हे पुराण श्रवण करणाऱ्यास, याचा पाठ करणाऱ्यास पवित्रता व कल्याण यांची प्राप्ती करून देणारे आहे. सर्व पापांचा नाश करून सकल मंगलकारक आहे.

शेवटच्या श्लोकात म्हटले आहे, 'फार काय सांगावे ? जो मानव या पुराणाचा एक चरण जरी पठण करील तरी तो सर्व पापांतून मुक्त होऊन जाईल. तो या लोकी मदनासारखी दिव्य सुखे भोगून अंती निश्चयानें नारायणाच्या पदास जाईल.'

# ८ स्तोत्रमंजूषा

## १. शुक्राचार्यांनी केलेली शिवस्तुती

नमोऽस्तु शितिकण्ठाय कनिष्ठाय सुवर्चसे ।
लेलिहानाय काव्याय वत्सरायान्धसःपते ॥१॥
कपर्दिने करालाय हर्यक्ष्णे वरदाय च ।
संस्तुताय सुतीर्थाय देवदेवाय रंहसे ॥२॥
उष्णीषिणे सुवक्त्राय बहुरूपाय वेधसे ।
वसुरेताय रुद्राय तपसे चित्रवाससे ॥३॥
ऱ्हस्वाय मुक्तकेशाय सेनान्ये रोहिताय च ।
कवये राजवृक्षाय तक्षकक्रीडनाय च ॥४॥
सहस्रशिरसे चैव सहस्राक्षाय मीढुषे ।
वराय भव्यरूपाय श्वेताय पुरुषाय च ॥५॥
गिरिशाय नमोऽर्काय बलिने आज्यपाय च ।
सुतृप्ताय सुवस्त्राय धन्विने भार्गवाय च ॥६॥
निषङ्गिणे च ताराय स्वक्षाय क्षपणाय च ।
ताम्राय चैव भीमाय उग्राय च शिवाय च ॥७॥
महादेवाय शर्वाय विश्वरूपशिवाय च ।
हिरण्याय वरिष्ठाय ज्येष्ठाय मध्यमाय च ॥८॥
वास्तोष्पते पिनाकाय मुक्तये केवलाय च ।
मृगव्याधाय दक्षाय स्थाणवे भीषणाय च ॥९॥
बहुनेत्राय धुर्याय त्रिनेत्रायेश्वराय च ।
कपालिने च वीराय मृत्यवे त्र्यम्बकाय च ॥१०॥

बभ्रवे च पिशङ्गाय पिङ्गलायारुणाय च ।
पिनाकिने चेषुमते चित्राय रोहिताय च ॥११॥
दुन्दुभ्यायैकपादाय अजाय बुद्धिदाय च ।
आरण्याय गृहस्थाय यतये ब्रह्मचारिणे ॥१२॥
सांख्याय चैव योगाय व्यापिने दीक्षिताय च ।
अनाहताय शर्वाय भव्येशाय यमाय च ॥१३॥
रोधसे चेकितानाय ब्रह्मिष्ठाय महर्षये ।
चतुष्पदाय मेध्याय रक्षिणे शीघ्रगाय च ॥१४॥
शिखण्डिने करालाय दंष्ट्रिणे विश्ववेधसे ।
भास्वराय प्रतीताय सुदीप्ताय सुमेधसे ॥१५॥
क्रूरायाविकृतायैव भीषणाय शिवाय च ।
सौम्याय चैव मुख्याय धार्मिकाय शुभाय च ॥१६॥
अवध्यायामृतायैव नित्याय शाश्वताय च ।
व्यापृताय विशिष्टाय भरताय च साक्षिणे ॥१७॥
क्षेमाय सहमानाय सत्याय चामृताय च ।
कर्त्रे परशवे चैव शूलिने दिव्यचक्षुषे ॥१८॥
सोमपायाज्यपायैव धूमपायोष्मपाय च ।
शुचये परिधानाय सद्योजाताय मृत्यवे ॥१९॥
पिशिताशाय शर्वाय मेघाय वैद्युताय च ।
व्यावृत्ताय वरिष्ठाय भरिताय तरक्षवे ॥२०॥
त्रिपुरघ्नाय तीर्थायावक्राय रोमशाय च ।
तिग्मायुधाय व्याख्याय सुसिद्धाय पुलस्तये ॥२१॥
रोचमानाय चण्डाय स्फीताय ऋषभाय च ।
व्रतिने युञ्जमानाय शुचये चोर्ध्वरेतसे ॥२२॥
असुरघ्नाय स्वाघ्नाय मृत्युघ्ने यज्ञियाय च ।
कृशानवे प्रचेताय वन्ह्ये निर्मलाय च ॥२३॥

रक्षोघ्नाय पशुघ्नायाविघ्नाय श्वसिताय च ।
विश्रान्ताय महान्ताय अत्यन्तं दुर्गमाय च ॥२४॥
कृष्णाय च जयन्ताय लोकनामीश्वराय च ।
अनाश्रिताय वेध्याय समत्वाधिष्ठिताय च ॥२५॥
हिरण्यवाहवे चैव व्याप्ताय च महाय च ।
सुकर्मणे प्रसह्याय चेशानाय सुचक्षुषे ॥२६॥
क्षिप्रेषवे सदश्वाय शिवाय मोक्षदाय च ।
कपिलाय पिशङ्गाय महादेवाय धीमते ॥२७॥
महाकल्पाय दीप्ताय रोदनाय हसाय च ।
दृढधन्विने कवचिने रथिने च वरूथिने ॥२८॥
भृगुनाथाय शुक्राय गव्हरेष्ठाय वेधसे ।
अमोघाय प्रशान्ताय सुमेधाय वृषाय च ॥२९॥
नमोऽस्तु तुभ्यं भगवन् विश्वाय कृत्तिवाससे ।
पशूनां पतये तुभ्यं भूतानां पतये नमः ॥३०॥
प्रणवे ऋग्यजुःसाम्ने स्वाहाय च स्वधाय च ।
वषट्कारात्मने चैव तुभ्यं मन्त्रात्मने नमः ॥३१॥
त्वष्ट्रे धात्रे तथा कर्त्रे चक्षुःश्रोत्रमयाय च ।
भूतभव्यभवेशाय तुभ्यं कर्मात्मने नमः ॥३२॥
वसवे चैव साध्याय रुद्रादित्यसुराय च ।
विश्वाय मारुतायैव तुभ्यं देवात्मने नमः ॥३३॥
अग्नीषोमविधिज्ञाय पशुमन्त्रौषधाय च ।
स्वयम्भुवे ह्यजायैव अपूर्वप्रथमाय च ।
प्रजानां पतये चैव तुभ्यं ब्रह्मात्मने नमः ॥३४॥
आत्मेशायात्मवश्याय सर्वेशातिशयाय च ।
सर्वभूताङ्गभूताय तुभ्यं भूतात्मने नमः ॥३५॥

निर्गुणाय गुणज्ञाय व्याकृतायामृताय च ।
निरुपाख्याय मित्राय तुभ्यं योगयात्मने नमः ॥३६॥
पृथिव्यै चान्तरिक्षाय महसे त्रिदिवाय च ।
जनस्तपाय सत्याय तुभ्यं लोकात्मने नमः ॥३७॥
अव्यक्ताय च महते भूतादेरिन्द्रियाय च ।
आत्मज्ञाय विशेषाय तुभ्यं सर्वात्मने नमः ॥३८॥
नित्याय चात्मलिङ्गाय सूक्ष्मायैवेतराय च ।
शुद्धाय विभवे चैव तुभ्यं मोक्षात्मने नमः ॥३९॥
नमस्ते त्रिषु लोकेषु नमस्ते परतस्त्रिषु ।
सत्यान्तेषु महाद्येषु चतुर्षु च नमोऽस्तु ते ॥४०॥
नमः स्तोत्रे मया ह्यस्मिन् सदसद् व्याहृतं विभो ।
मद्भक्त इति ब्रह्मण्य तत् सर्वं क्षन्तुमर्हसि ॥४१॥
(४७.१३४-१६८)

(स्तोत्राचा भावार्थ कृपया पृष्ठे ७१ ते ७३ वर पाहावा.)

## २. देवांनी केलेली शंभूंची प्रार्थना

नमो भवाय शर्वाय रुद्राय वरदाय च ।
पशूनां पतये नित्यमुग्राय च कपर्दिने ॥१॥
महादेवाय भीमाय त्र्यम्बकाय च शान्तये ।
ईशानाय भयघ्नाय नमस्त्वन्धकघातिने ॥२॥
नीलग्रीवाय भीमाय वेधसे वेधसा स्तुते ।
कुमारशत्रुनिघ्नाय कुमारजनकाय च ॥३॥
विलोहिताय धूम्राय वराय क्रथनाय च ।
नित्यं नीलशिखण्डाय शूलिने दिव्यशायिने ॥४॥

उरगाय त्रिनेत्राय हिरण्यवसुरेतसे ।
अचिन्त्यायाम्बिकाभर्त्रे सर्वदेवस्तुताय च ॥५॥
वृषध्वजाय मुण्डाय जटिने ब्रह्मचारिणे ।
तप्यमानाय सलिले ब्रह्मण्यायाजिताय च ॥६॥
विश्वात्मने विश्वसृजे विश्वमावृत्य तिष्ठते ।
नमोऽस्तु दिव्यरूपाय प्रभवे दिव्यशम्भवे ॥७॥
अभिगम्याय काम्याय स्तुत्यायार्च्याय सर्वदा ।
भक्तानुकम्पिने नित्यं दिशते यन्मनोगतम् ॥८॥

(१३२.२२–२९)

देवांनी म्हटले, 'भगवन्, आपण **भव** म्हणजे सृष्टीचे उत्पादक व पालक आहात. **शर्व** म्हणजे प्रलयकालात सर्वांचे संहारक आहात. **रुद्र** म्हणजे सर्व प्राण्यांना प्राणस्वरूप आहात. **वरद** म्हणजे वर देणारे आहात. **पशुपती** म्हणजे सर्व जीवांचे स्वामी आहात. **उग्र** म्हणजे कठोर आहात. **कपर्दी** म्हणजे जटाजूटधारी आहात. आपणांस नमस्कार असो.

आपणच **महादेव** आहात. आपण भीम म्हणजे भयंकर आहात. आपण त्रिनेत्रधारी असल्यामुळे **त्र्यम्बक** आहात. आपण **शांत** आहात. आपण **ईशान** म्हणजे नियंते आहात. भयाचा नाश करणारे आपण **भयघ्न** आहात. अंधकासुराचा नाश करणारे आपण **अंधकघाती** आहात. निळ्या रंगाचा कंठ असणारे आपण **नीलग्रीव** आहात. आपण भयदायक **भीम** आहात. ब्रह्मस्वरूप **वेधा** आहात. ब्रह्मदेवांकडून स्तुत असल्यामुळे आपण **वेधसा स्तुत** आहात. कुमार कार्तिकेयाच्या शत्रूंचा नाश करणारे आपण कुमारशत्रुनिघ्न आहात. स्वामी कार्तिकेयाचे पिता आपण **कुमार-जनक** आहात. आपण लालरंगाची म्हणजे **विलोहित** आहात. आपण धूम्रवर्णाचे **धूम्र** आहात. **वर** देणारे श्रेष्ठ आहात.

**क्रथन** म्हणजे प्रलयकारी आपण आहात. आपल्या जटा नील-वर्णाच्या असल्याने आपण **नीलशिखण्ड** आहात. आपण त्रिशूलधारी **शूली** आहात. आपण दिव्य समाधीत रमणारे **दिव्यशायी** आहात. आपण सर्प-

धारी **उरग** आहात. आपण तीन डोळ्यांचे **त्रिनेत्र** आहात. सुवर्णादी धातूंचे आपण उद्गमस्थान असल्यानें **हिरण्यवसुरेता** आहात. आपण **अचिंत्य** म्हणजे अतर्क्य आहात. आपण पार्वतीपती म्हणजे **अम्बिकाभर्ता** आहात. सर्व देवांनी आपली स्तुती केलेली असल्यानें आपण **सर्वदेवस्तुत** आहात. बैलाच्या चिन्हानें युक्त असा आपला ध्वज असल्यानें आपण **वृषध्वज** आहात. आपण मुंडधारी मुंड आहात. जटा-धारी **जटी** आहात. आपण **ब्रह्मचारी** आहात.

आपण जलात तपस्या करणारे **सलिले तप्यमान** आहात. आपण ब्राह्मणाभक्त **ब्रह्मण्य** आहात. आपण अजेय **अजित** आहात. आपण **विश्वात्मा** आहात. आपण विश्वाचे स्रष्टे **विश्वसृक्** आहात. जगतास व्यापणारे आपण **विश्वमावृत्य तिष्ठते** आहात. आपण **दिव्यरूप** आहात. प्रभू म्हणजे सामर्थ्यशाली आहात. अत्यंत मंगलमय असे आपण **दिव्यशंभु** आहात. आपण शरण जाण्यास योग्य **अभिगम्य** आहात. आपण अत्यंत सुंदर असल्यामुळे **काम्य** आहात. आपण स्तवन करण्यास योग्य असे **स्तुत्य** आहात. आपण सदा पूजनीय म्हणून **सर्वदा अर्च्य** आहात. आपण भक्तांवर दया करणारे **भक्तानुकम्पी** आहात. आपण मनाची अभिलाषा पूर्ण करणारे **यन्मनोगतं नित्यं विशते** आहात. आपणांस आमचे अभिवादन असो.

—

